श्रीसमर्थ रामदासस्वामी-विरचित

# श्रीदासबोध.



( श्रीसमर्थांचें चरित्र व शिकवण यांसह )

प्रकाशक

भट आणि मंडळी, बुधवार पेठ पुणें शहर.



आक्टोबर सन १९१५.

किंमत एक रुपया.

# उपोद्घात.

## श्रीसमर्थांचें अल्प चरित्र.

**"श्रीसमर्थांचें सारें चरित्र कोणासच ठाऊक नाहीं. अशा स्थितींत ज्याला जितकी माहिती आहे तितकीच त्याजपासून घेऊन श्रीसमर्थांचें स्वरूप ओळखण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे."**

—श्रीसमर्थप्रताप, प्रस्तावना ( रा. देव ).

महाराष्ट्रांत, महाराष्ट्रधर्माचा उदय होऊन मोंगलांच्या जाचांतून त्याची सुटका होण्यापूर्वीं जें संतमंडळ उद्भूत झालें व कै. न्या. **रानडे** यांच्या मताप्रमाणें ज्या संतमंडळीनें राष्ट्रीय स्वातंत्र्याचें बीजारोपण करण्याकरितां जमीन तयार केली, त्यांत **श्रीसमर्थ रामदास** हे अग्रेसर होत. सदर न्यायमूर्तींनीं आपल्या 'मराठ्यांच्या इतिहासां'त वर्णिलेल्या संतमालिकेंत **श्रीसमर्थां**चा उल्लेख जरी प्रमुखत्वानें करण्यांत आलेला आहे, तरी त्या वेळीं त्यांच्यासंबंधानें सध्यां उपलब्ध असलेली माहिती अप्रसिद्ध असल्यामुळें न्यायमूर्तींना **समर्थां**च्या कृतींचें व योग्यतेचें यथास्थित शब्दचित्र रेखाटतां आलेलें नाहीं. तथापि महाराष्ट्रांत **महाराष्ट्रधर्मा**चा प्रसार करून मराठ्यांना राष्ट्रीय वैभव प्राप्त करून देण्याचा उद्योग करणाऱ्यांत **समर्थ रामदास** हे प्रमुख होते, असें त्यांनीं नमूद करून ठेवलें आहे; मात्र त्यांनीं ह्या उद्योगाचें सर्वच श्रेय **समर्थांस** न देतां त्याचा कांहीं वाटा इतर संतांच्या पदरींहि घातलेला आहे. न्यायमूर्तींचें हें मत प्रसिद्ध होऊन कांहीं काल लोटल्यानंतर महाराष्ट्र-इतिहासाचे संशोधक प्रख्यात रा. रा. **विश्वनाथ काशीनाथ राजवाडे** यांनीं माजी **'ग्रंथमाला'** मासिकांत **रामदासांवर** एक विस्तृत निबंध लिहिला व त्यांत त्यांनीं न्यायमूर्ति **रानड्यांचें** सदर मत खोडून काढून महाराष्ट्रांत महाराष्ट्रधर्माची स्थापना करण्याचें सर्व श्रेय एकट्या **रामदासांसच** देणें योग्य आहे, असें प्रतिपादिलें. रा. **राजवाडे** यांचा हा गंभीर व विचारार्ह निबंध वाचून धुळ्याचे प्रसिद्ध वकील शंकरराव **देव** यांना **रामदासांसंबंधीं** खरी व विश्वसनीय माहिती

शोधून काढण्याची स्फूर्ति झाली व त्यांनीं गेल्या ७।८ वर्षांत एतद्विषयक जे शोध केले, व तदनुसार जे ग्रंथ प्रसिद्ध केले, त्यावरून रा. **राजवाडे** यांचे वरील प्रतिपादनासच विशेष पुष्टि मिळालेली आहे. इतकेंच नव्हे तर त्या प्रतिपादना-संबंधीं प्रचलित विद्वान लोकांत खूप जोराची चर्चा होऊन अखेर बहुतेक सर्व विचारी लोकांचें मत रा. **राजवाडे** यांच्या मताप्रमाणेंच बनलेलें आहे. न्याय-मूर्ति **रानडे** जर आज हयात असते तर त्यांना देखील **राजवाड्यांचें** मत मान्य करावें लागलें असतें व तसें त्यांनीं मोठ्या संतोषानें केलेंहि असतें. कारण ते दुराग्रही नसल्यामुळें उपलब्ध झालेल्या माहितीचा व साधनांचा धिक्कार अथवा विपर्यास करण्याच्या भानगडींत बिलकूल पडले नसते, अशी आमची खात्री आहे. **समर्थांचें** खरें स्वरूप जाणण्याचे कामीं त्यांच्या हातून ज्या कांहीं चुका झाल्या त्या त्यांनीं जाणून बुजून केलेल्या नसून योग्य माहितीच्या अभावीं झालेल्या आहेत. **समर्थांच्या** चरित्राचे सर्व धागे सुव्यवस्थित रीतीनें उकलणें अद्यापहि शक्य नाहीं. न्या. **रानड्यांचा** 'The Rise of the Maratha Power' हा आदरणीय ग्रंथ प्रसिद्ध होऊन गेल्यानंतर व विशेषेंकरून अलीकडील ७।८ वर्षांत **समर्थांच्या** चारित्र्यावर प्रकाश पाडणारी पुष्कळ नवी माहिती उपलब्ध झालेली आहे; परंतु अद्यापहि **समर्थांचें** सर्वांगपरिपूर्ण असें चरित्र लिहितां येण्या-इतकीं साधनें मिळालेलीं नाहींत असें रामदासी वाङ्मयसमुद्रांत नित्य पोहणारे रा. **देव** यांचें मत आहे. आजपर्यंत झालेल्या शोधांचा विचार करितां **समर्थां**-च्या चरित्राचीं कांहीं अंगें केवळ गुप्त असल्यामुळें तीं कधीं काळीं उघडकीस येतील कीं नाहीं याबद्दल शंका वाटते. असें जरी आहे, तरी स्थूल मानानें **सम-र्थांच्या** चरित्राची स्पष्ट रूपरेखा रेखाटण्याइतकी सामुग्री रा. **देव** यांच्या प्रयत्ना-मुळें सध्यां प्रसिद्ध झालेली आहे. तिचा साकल्यानें विचार केल्यास समर्थांचें एक सुसंबद्ध व बरेंच मोठें चरित्र लिहितां येईल. अर्थात् प्रस्तुतसारख्या उपो-द्घातलेखांत अवश्यक असणारें अल्पसें चरित्र तर त्यावरून निःसंशय लिहितां येईल असें वाटतें. **देवांचे** ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वीं **समर्थांचीं** बखरीवजा अशीं ४।५ चरित्रें प्रसिद्ध झालेलीं आहेत. त्यांत **हनुमंतस्वामींनीं** लिहिलेली बखर विशेष प्रसिद्ध आहे. परंतु हीं सर्व चरित्रें इतिहासप्रिय चिकित्सकाच्या कसोटी-पुढें नम्र होणारीं आहेत! गबाळपणा, अतिशयोक्ति व भ्रामक विधानें यांनीं तीं

लिप्त झालेलीं आहेत. तथापि त्यांत सत्यांशहि बराच आहे; यामुळें तीं टाकाऊ ठरवितां येत नाहींत. या चरित्रांखेरीज रा. **देव** यांनीं समर्थांचीं आणखी दोन चरित्रें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांत **भीमस्वामी**नामक समर्थशिष्यानें वर्णिलेलें चरित्र असून तें पुष्कळ विश्वसनीय व ऐतिहासिकदृष्ट्या विशेष महत्वाचें आहे. **देवां**नीं प्रसिद्ध केलेले '**श्रीसमर्थप्रताप**' व '**समर्थसंबंधीं पत्रव्यवहारादि कागदपत्र**' हे दोन ग्रंथ, तसेंच त्यांनीं लिहिलेली दासबोधाची प्रस्तावना यांचाहि समर्थांचें चरित्र लिहिण्याचे कामीं विशेष उपयोग होण्याजोगा आहे. ह्या सर्व ग्रंथांच्या आधारानेंच पुढील अल्प चरित्र लिहिलें आहे.

मोंगलाईत औरंगाबाद जिल्ह्यांतील आंबड परगण्यांत **जांब** म्हणून गांव आहे. तेथील सदाचारी व ईश्वरभक्त कुळकर्णी **सूर्याजीपंत** हे **समर्थां**चे जनक होत. त्यांची भार्या **राणूबाई** हिच्या पोटीं शके १५३० मध्यें **समर्थां**नीं जन्म घेतला. **समर्थ** हे अवतारी पुरुष असून मारुतीचा अवतार होते, अशी भाविकांची समजूत आहे. त्यांचें पूर्वाश्रमींचें नांव **नारायण** असें होतें. त्यांस **गंगाधरपंत** या नांवाचे एक वडील बंधु होते. हेहि परम भाविक व भगवद्भक्त असून त्यांस '**श्रेष्ठ**' या नांवानें संबोधीत असत. **समर्थां**च्या जन्मानंतर लवकरच त्यांचे वडील वारले. तेव्हां गृहप्रपंचाचा सर्व भार त्यांची मातोश्री व ज्येष्ठ बंधु यांजवर पडला. ह्या कुटुंबाची गृहस्थिति फार चांगली होती. **समर्थां**चे घराण्यांत १२ गांवचें कुळकर्णीपण होतें. तसेंच त्यांची वतनवाडीहि बरीच मोठी होती. एकंदरींत चांगल्या सुखवस्तु पांढरपेशांत त्यांची गणना होण्याजोगी होती. परंतु **समर्थ** ऊर्फ **नारायण** यांची वृत्ति बालपणापासून विरक्त बनली होती. महाराष्ट्रांत त्या वेळीं भक्तिमार्गाचा अतिरेक झाल्यानें बहुतेक सुखवस्तु लोकांना वेदान्ती अगर भक्तिमार्गी बनण्याची सहज संवय जडलेली होती. ज्याला खाण्यापिण्याची ददात नसेल, त्यानें देवदेवतार्चन, कथाकीर्तन वगैरे प्रकारांनीं आपली कालक्रमणा करावी, असा समान्यतः प्रचार पडलेला होता. समर्थांच्या कुटुंबांतहि हा प्रचार शिरलेला होता. त्यांचे वडील, मातोश्री व ज्येष्ठ बंधु हे सर्वच कमजास्त प्रमाणानें भक्तिमार्गाचे अनुचर बनलेले होते. तेव्हां ह्या परिस्थितीचे संस्कार नारायणावरहि व्हावेत हें साहजिक आहे. नारायणाची बुद्धिमत्ता अत्यंत श्रेष्ठ दर्जाची होती. अर्थात् जिकडे त्याची वृत्ति वळेल तें कार्य उत्कट–उत्तान–

स्वरूपास नेऊन पोंचवावयाचें असा त्याचा सहज स्वभाव बनणें अपरिहार्य होतें. 'संसारत्याग व मोक्षमार्गानुगामी परमार्थाचें ग्रहण' हें भक्तिमार्गाचें मुख्य ध्येय नारायणाच्या चटकन लक्ष्यांत येऊन त्यांत त्याची तंद्री लागून राहिली आणि त्यामुळें संसार करण्याचा त्यास साहजिकच कंटाळा वाटूं लागला. तो संसाराविषयीं पूर्ण उदासीन बनून ईश्वरचिंतन करून ईश्वराचा शोध करण्याच्या मार्गास लागला. त्याच्या आईनें व ज्येष्ठ बंधूनें त्याच्या भक्तिभावाच्या उत्तान स्वरूपास मर्यादित करण्याचा पुष्कळ यत्न केला, पण तो साहजिकच व्यर्थ गेला. बालपणीं बरोबरीचीं मुलें घेऊन रानावनांत फिरणें, जलाशयांत पोहणें, शरीरसामर्थ्य वाढविणें इत्यादि कर्मे स्वैरपणें नारायण करीत असे. यथाकालीं त्याचें मौंजीबंधन झालें व तत्कालीन पद्धतीप्रमाणें थोडेंबहुत शिक्षणहि झालें. पुढें लग्नाचें वय आलें, तरीहि त्याचा पूर्वींचा क्रम चालूच होता. मात्र त्याच्या प्रत्येक कृतींत व वागणुकींत लोकोत्तरपणा दृग्गोचर होत असे. इतर मोठमोठे सत्पुरुष जसे भगवत्साक्षात्कारी होऊन जगदुद्धार करिते झाले त्याप्रमाणें आपणहि करावें अशी भावना नारायणाच्या मनांत बाणली आणि त्याच कारणामुळें त्यानें लग्न करण्याचें टाळलें. त्याचे वडील बंधु व मातोश्री यांनीं बळेंच त्याचा विवाह करण्याचा घाट घातला. तेव्हां लग्नमंडपांतून आयत्या वेळीं त्यानें पलायन केलें. (शके १५४२) या वेळीं त्याचें वय अवघें १२ वर्षांचें होतें. इतक्या अल्प वयांत नारायणास उपरति व्हावी ही गोष्ट असामान्य आहे, यांत शंका नाहीं. परंतु अशा गोष्टी अशक्य कोटींतील मात्र नाहींत. तैलबुद्धीच्या व तेजस्वी आणि करारी पुरुषांच्या भावना अल्प वयांत देखील अत्यंत उत्कट व दृढ असतात, असें सृष्टींतील अनेक थोर व श्रेष्ठ पुरुषांच्या उदाहरणांवरून सिद्ध करितां येईल. बालपणीं अशा पुरुषांच्या डोक्यांत एखादी कल्पना अगर भावना संचरली कीं पुरे; लागलीच ती तेथें दृढ होऊन तदनुसार कृति होण्यास विलंब लागत नाहीं. लग्नविधि चालू असतां नारायणानें केलेलें पलायन हें वरील गोष्टीचेंच प्रत्यंतर होय. "संसार मिथ्या आहे; त्याचा त्याग करून परमार्थसाधन करणें यांतच नरदेहाचें सार्थक आहे." अशी कल्पना ऊर्फ भावना नारायणाच्या मनोभूमींत दृढतर झाल्यामुळें त्यास सहज लीलेनें, मोहक अशा लग्नसोहळ्याचा त्याग करितां आला. नारायण लग्नमंडपांतून नेसलेल्या व पांघरलेल्या २ धोतरांनिशीं घराबाहेर पळत सुटला, तेव्हां

लोक त्याच्या मागें लागले. इतक्यांत त्यानें नदीतीर गांठलें व डोहांत उडी घेतली. तेव्हां लोक 'बुडाला रे बुडाला!' म्हणून ओरडले. परंतु त्यांस दाद न देतां तो पैलतीरास जाऊन पोंचला व दूर निघून गेला. पुढें ७ दिवस त्यानें अन्नपाणी वर्ज्य करून श्रीरामाची प्रार्थना केली. तेव्हां त्यास श्रीरामानें दर्शन दिलें. त्यानंतर तपश्चर्या करण्याकरितां तो टांकळीस निघून गेला. तेथें १२ वर्षेपर्यंत पुरश्चरण करून त्यानें यौगिक सामर्थ्य संपादन केलें. त्यानंतर १२ वर्षें तीर्थाटन म्हणजे सर्व भरतखंडभर प्रवास केला. व याच अवधींत त्यानें त्या वेळीं प्रचलित असलेल्या सर्व शास्त्रांचा अभ्यास आणि लोकस्थितीचें अवलोकन केलें. तीर्थाटनाचा काल जेव्हां पूर्ण झाला, तेव्हां नारायणाचें वय ३६ वर्षांचें होतें. त्यानंतर म्हणजे शके १५६६ च्या सुमारास नारायण चाफळखोऱ्यांत येऊन राहिला व तेथें दासबोध ग्रंथ निर्माण करून **समर्थ रामदासस्वामी** या नांवानें प्रसिद्धि पावून अनेक ठिकाणीं मारुती व मठ यांची स्थापना करण्यांत व लोकसंग्रह करण्यांत त्यानें सुमारें तीन तपें घालविलीं.

नारायण ऊर्फ **समर्थ रामदास** यांच्या तीर्थाटनाचा काल हा त्यांच्या आयुष्यांतील एक अत्यंत महत्वाचा भाग आहे. ह्या कालांत त्यांस जो अनुभव प्राप्त झाला, त्यावरच त्यांच्या पुढील आयुष्यक्रमाची भव्य व टोलेजंग इमारत उभारलेली आहे. किंबहुना, या तीर्थाटनांतील अनुभवाची जोड जर **समर्थांना** झाली नसती, तर त्यांच्या हातून पुढें जें मोठें राष्ट्रोद्धाराचें कार्य झालें तें झालें असतें कीं नाहीं याची शंका आहे. **समर्थ** टांकळी येथें पुरश्चरण करून जेव्हां यौगिक सामर्थ्य संपादन करिते झाले, तेव्हां स्वतःप्रमाणें भरतखंडांतील जनतेलाहि परमार्थप्रवण करून जीवन्मुक्त करण्याच्या हेतूनें प्रेरित झाले; आणि तो हेतु डोळ्यांपुढें ठेवूनच त्यांनीं तीर्थाटनास प्रारंभ केला. परंतु यावनी राज्याच्या भाराखालीं सर्व जनता इतकी वांकून गेलेली होती कीं, इतःपर तिचें व्यक्तित्व जिवंत राहील कीं नाहीं, याविषयीं संशय वाटूं लागला होता. समाजरचना अत्यंत विस्कळित झाल्यानें व धर्माचें अधिष्ठान नाहींसें होत गेल्यानें सर्व जनता सर्वतोपरी पंगू बनली होती. तिच्यामध्यें सद्गुणांचा ऱ्हास व दुर्गुणांचा सुळसुळाट चालू होता. सर्व समाजांत बजबजपुरी माजून राहिली होती. धर्मदृष्ट्या, राजकीयदृष्ट्या व नैतिकदृष्ट्या तत्कालीन हिंदु समाजाची फार निकृष्ट अवस्था

झालेली होती. सामान्य जन अन्नाला महाग झाले होते, व पतिव्रतेचें पातिव्रत्य टिकणें मुष्किल झालें होतें. ह्या दुःस्थितीचें चित्र समर्थांनीं आपल्या **दासबोधांत** यथास्थित रेखाटलें आहे. तें जिज्ञासूंनीं वाचावें. समाजाची ही दुर्दशा पाहून समर्थ फार खिन्न झाले. त्यांचा उत्साहभंग होऊन त्यांस मोठें औदासीन्य प्राप्त झालें. **उदासीन हा काळ कोठें न कंठे, उदास वाटतें जिवीं आतां जावें कुणीकडे,** वगैरे त्यांच्या उक्ती ह्या काळच्या परिस्थितीस अनुलक्षूनच त्यांच्या मुखांतून बाहेर पडल्या आहेत. अशा रीतीनें ज्या समाजाची–जनतेची–दुर्दशा होत चालली आहे, तिला केवळ मोक्षाचा उपदेश करून काय फायदा? तो मोक्षहि सर्वतोपरी बद्ध व पंगू झालेली जनता कशी मिळवूं शकणार? तसेंच जेथें घटकों घटकीं अधर्माचरण होत आहे तेथें धर्मस्थापना तरी कशी होणार? इत्यादि प्रश्न मनांत येऊन **समर्थांचें** अंतःकरण अगदीं उद्विग्न झालें. अशा जनतेचा उद्धार करणें दुस्तर आहे असें वाटून एक वेळ ते हताशहि झाले असावेत असें वाटतें. **'समर्थप्रताप'** ग्रंथांत असें वर्णन आहे कीं, तीर्थाटन करीत असतांना वैराग्याचा अतिरेक होऊन एक वेळ त्यांनीं आपला देह हिमालयकुंडांत झोंकून दिला. त्या वेळीं श्रीरामांनीं त्यांस वरच्यावर धरिलें. तेव्हां समर्थांनीं त्यांस 'कां धरिलें' म्हणून विचारितां—

**तुम्हांसी जगोद्धार करणें आहे । तुमची तनु ते आमची तनु पाहें ।**
**दोनी तपें तुमची रक्षिली काया हे । धर्मस्थापनेकारणें ॥**

असें श्रीरामचंद्रांनीं उत्तर दिलें. आणि नंतर त्यांनीं **समर्थांस** आपल्या जटाकलापीं असलेला हुर्मुजी रंगाचा फेटा त्यांचे हवालीं करून त्यांस परत पाठविलें. या प्रसंगाचा इत्यर्थ इतकाच दिसतो कीं, वर सांगितल्याप्रमाणें **समर्थांस** जें औदासीन्य प्राप्त झालें होतें तें हिमालयांत त्यांच्याहून श्रेष्ठ अशा कोणा तरी महात्म्यानें दूर करून त्यांचें मन पुन्हा स्थिर केलें. कदाचित् त्यांचें त्यांनींहि तसें केलें असेल. त्यानंतर **समर्थांनीं** फिरून भरतखंडाच्या अंतर्भागीं प्रवेश केला व ते कृष्णातीरीं चाफळखोऱ्यांत येऊन लोकोद्धाराचें कृत्य कोणत्या रीतीनें करावें याचा विचार करूं लागले. हा विचार करीत असतांनाच, तत्कालीन जनतेचें ऐहिक कल्याण साधण्याचा यत्न केल्यावांचून त्यांचें पारमार्थिक कल्याण साधतां येणार नाहीं, असें त्यांस आढळून आलें. अशा रीतीनें काय करावयाचें

याचा निर्णय व निश्चय त्यांच्या मनाशीं ठरल्यावर मग त्यांनीं पुढें मठस्थापना व लोकसंग्रह इत्यादि अचाट व्याप सुरू केला. **समर्थां**च्या वेळीं धार्मिकदृष्ट्या त्यांच्याइतकेच श्रेष्ठ असे अनेक संत महाराष्ट्रांत होते, व त्या सर्वांना महाराष्ट्राच्या तत्कालीन स्थितीबद्दल तळमळ वाटत होती. परंतु नुसत्या मानसिक तळमळीनें ती स्थिति थोडीच बदलते! ती बदलण्यास कांहीं तरी योग्य प्रयत्नच केला पाहिजे. असा प्रयत्न करण्याची कल्पना फक्त एकट्या **समर्थां**च्याच मनांत आली व त्याप्रमाणें त्यांनीं प्रयत्न करून त्यांत यशहि संपादन केलें. इतर संतांची प्रवृत्ति अखेरपर्यंत निवृत्तिपरच राहिली. **रामदासांनीं** मात्र कालाकडे नजर देऊन आपल्या प्रवृत्तींत अंशतः बदल केला; म्हणजे त्यांनीं प्रवृत्ति व निवृत्ति या दोहोंची सांगड घालून '**महाराष्ट्रधर्म**' या नांवाची एक विशिष्ट शिकवण तत्कालीन जनतेस शिकविली. व शिवाजीसारख्या पराक्रमी क्षत्रियाची दैवयोगानें त्यांस जोड मिळाल्यामुळें त्यांची ही शिकवण तत्काल फलद्रूपहि झाली.

राष्ट्रोद्धाराचें कार्य करण्याचा मनांत संकल्प केल्यानंतर **समर्थांनीं** कृष्णातीरीं चाफळखोऱ्यांत आपल्या आयुष्याचा बहुतेक काल घालविला व तेथूनच त्यांनीं आपल्या अवाढव्य उद्योगाचीं सर्व सूत्रें चालविलीं. यावरून कोणतेंहि महत्त्वाचें संघटनात्मक कृत्य करण्यास महाराष्ट्रांतील सह्याद्रीचा टापू व कृष्णातीरचा प्रदेश विशेष अनुकूळ असावा असें दिसतें. तसें नसतें तर **समर्थांनीं** आपल्या वास्तव्याकरितां तो निवडला नसता. वस्तुतः **समर्थांची** जन्मभूमि पाहिली तर ती ह्या प्रदेशापासून पुष्कळ दूर आहे. तसेंच **समर्थांनीं** भरतखंडांतील इतर प्रदेशहि सूक्ष्मदृष्टीनें पाहिलेले होते. मग त्या सर्वांत ज्या अर्थी त्यांनीं महाराष्ट्रांतील उपरोक्त प्रदेशच आपल्या कार्याचें मुख्य क्षेत्र बनविला, त्या अर्थी त्या प्रदेशाचे अंगीं खरोखरच कांहीं तरी अपूर्व नैसर्गिक सामर्थ्य असलें पाहिजे, यांत कांहीं शंका नाहीं. शिवाय हाच प्रदेश आपल्या कार्यक्षेत्राकरितां निवडण्याचें आणखी एक कारण दिसतें व तें रा० **राजवाडे** यांनीं आपल्या रामदासावरील निबंधांत नमूद केलेलें आहे. तें असें:—

"दासांच्या निरूपणाचा मुख्य कटाक्ष महाराष्ट्रावर सर्वस्वीं असलेला दिसतो. बहुतेक सर्व हिंदुस्थान व महाराष्ट्राचा बराच भाग म्लेंच्छ संस्कृतीनें भिनून गेला होता. तेव्हां बाकी उरलेला जो थोडा महाराष्ट्र देश त्याला

अनुलक्षून समर्थांनीं आपला उपदेश सांगितला आहे. परमार्थाचीं मुख्य साधनें जीं नीति, धर्म व राज्य त्यांना मूर्तस्वरूप धारण करून अवतीर्ण होण्याला हा महाराष्ट्र देशच तेवढा त्या वेळीं पक्क झाला होता."

याचा स्पष्टार्थ असा कीं, महाराष्ट्राच्या कांहीं विशिष्ट भागांत स्वधर्म व स्वराज्य यांची जाणीव उत्पन्न झाल्यास तत्प्रीत्यर्थ उद्योग करणारे पुरुष व त्यास लागणारें सामर्थ्य तेथें अस्तित्वांत होतें. महाराष्ट्रांतील सह्याद्रीच्या प्रदेशांत स्वधर्म व स्वदेश यांची व्यक्त व अव्यक्त रूपानें चाड बाळगणारे अनेक सरदार व जहागीरदार त्या वेळीं होते व त्यांना योग्य मार्गदर्शक मिळाल्यास स्वराज्यस्थापनेचें कार्य त्यांच्या हातून होण्याचा संभव दिसत होता. थोडीबहुत तरी राजकीय सत्ता, सैन्य व संपत्ति त्यांचेपाशीं होती. या साधनांच्या साह्यानें **समर्थासारख्यांचा** उपदेश अंमलांत आणणें त्यांस शक्य होतें.

महाराष्ट्रांत आल्यावर **समर्थांनीं** अनेक अलौकिक कृत्यें केलीं व त्यामुळें लोकांचें त्यांच्याकडे विशेष लक्ष वेधून त्यांचा शिष्यसांप्रदाय वाढत्त चालला. महाराष्ट्रांत त्यांनीं ११ मारुतींची ठिकठिकाणीं स्थापना करून मारुती व राम यांच्या उपासना जागोजाग सुरू करविल्या. मारुतीच्या उपासनेंत शारीर शिक्षणाचें कार्य आपोआप घडून यावें अशी योजना केलेली होती. **समर्थ** प्रथम कृष्णातीरीं '**बहें**' क्षेत्रांत आले. तेथें रामलिंग व मारुती यांची स्थापना करून ते मसुरानजिक '**शहापूर**' म्हणून गांव आहे तेथें येऊन राहिले (शके १५६६). तेथें त्यांचा संध्यामठ असे; तो अघ्यापहि आहे.* तेथून ते कांहीं दिवस **चंद्रगिरी**च्या डोंगरावर रहावयास गेले होते. **शहापूर, मसूर, शिरगांव, उंब्रज, शिराळें, पारगांव, मनपाडळें, माजगांव, सिंगणवाडी** इत्यादि स्थळीं मारुतींची स्थापना करून समर्थ **चाफळ**गांवीं आले व तेथें शके १५७१ त त्यानीं श्रीराममूर्तीची स्थापना केली. आणि तेव्हांपासून सुमारें २५।३० वर्षे त्यांचें वास्तव्य मुख्यतः ह्या ठिकाणींच होतें. **चाफळा**पासून ७।८ मैलांवर '**रामघळ**' या नांवाचें एक अत्यंत बिकट चढणीचें ठिकाण आहे, तें **समर्थांचें**

* ह्या मठाचा जीर्णोद्धार कांहीं वर्षांपूर्वीं धुळ्याचे रामदासभक्त श्री. शंकरराव देव यांनीं केला आहे. तेथें समर्थांची संध्याकर्म करण्याची एक छोटीशी गुहा असून ती चांगली बांधून काढलेली आहे.

एकांतवासाचें स्थल होय. ह्या ठिकाणीं—तेथील भुयारांत—**समर्थ** वर्षांतून कांहीं महिने जाऊन रहात असत. **चाफळास** राहिल्यानंतर **समर्थांनीं** शिष्यसमुदाय व लोकसंग्रह ( ज्याला हल्लींच्या भाषेंत संघटना म्हणतां येईल तो ) करण्यास सुरुवात केली. '**सामर्थ्य आहे चळवळीचें**' वगैरे त्यांची उक्ति कृतींत उतरविण्याचें काम त्यांनीं येथेंच केलें. **चाफळ** हेंच त्यांच्या चळवळीचें केंद्रस्थान होय. तेथून सुमारें अकराशें शिष्य ऊर्फ महंत त्यांनीं भरतखंडांत पसरविले होते. भरतखंडाच्या बहुतेक प्रमुख भागांत त्यांनीं आपल्या सांप्रदायाचे मठ स्थापन केलेले होते. हे मठ किती होते याचा अद्याप नक्की आंकडा कळलेला नाहीं, तथापि उपलब्ध झालेल्या माहितींत सुमारें १५० मठांचा थांग लागलेला आहे. त्यावरून त्यांनीं केवढें मोठें संघटनात्मक यंत्र महाराष्ट्राच्या नैतिक व राष्ट्रीय उन्नतीकरितां तयार केलें होतें याचा अंदाज करितां येईल. **समर्थांनीं** योजलेलें हें कार्य सिद्धीस नेण्याचे कामीं त्यांस क्षत्रियकुलावतंस **श्रीशिवाजीमहाराज** यांचा फार उपयोग झाला. **समर्थांची** व **शिवाजीमहाराजांची** प्रथम भेट शके १५६९ च्या सुमारास झाली. त्या वेळीं **शिवरायाचें** वय सुमारें १९।२० वर्षांचे होत. ह्या प्रथमभेटीनंतर लवकरच उभयतांमध्यें गुरुशिष्याचें नातें सुरु झालें. **समर्थांच्या** विवेकपूर्ण उपदेशामुळें **शिवाजीच्या** हातून स्वराज्यस्थानेचें काम विशेष सुयंत्रितपणें पार पडलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. **शिवाजी समर्थांच्या** सेवेस नेहमीं तत्पर असे; तथापि **समर्थांचें** वर्तन सर्वथा निस्पृहपणाचें असे. फार काय सांगावें, **चाफळास** श्रीरामाचें देवालय बांधण्याचें कामींहि **समर्थांनीं शिवाजीची** मदत घेतली नाहीं! हें देवालय आपण बांधून द्यावें अशी **शिवरायांची** इच्छा होती व ती त्यांनीं समर्थचरणीं निवेदनहि केली. परंतु **समर्थांनीं** त्यांची विनंती मान्य न करितां सामान्य भिक्षेवरच आपल्या शिष्यांकरवीं तें देवालय बांधविलें. यासंबंधानें **समर्थप्रतापांत** पुढील उल्लेख आहेः—

**समर्थआज्ञा पुसे शिवराजा । श्रीरघुनाथदेवालय मी बांधेन वोजा ॥**
**समर्थ म्हणती शिष्यसमुदाय माझा । देवालयें करवीन अनंतहस्तें ॥**

अशी त्यांची निस्पहवृत्ति होती, म्हणूनच त्यांच्या हातून महत्कार्य झालें. एकदा **शिवरायांनीं समर्थांस** ११००० होन अर्पण केले. ते त्यांनीं लागलीच ब्राह्मणांस वांटून टाकले. **समर्थांस** अनेक लोकांकडून अनेक प्रकारच्या देणग्या येत असत,

परंतु त्यांचा त्यांनीं स्वतःचे उपयोगाकरितां म्हणून कधींहि स्वीकार केला नाहीं. अशा सर्व वस्तु ते वांटून टाकीत असत. **समर्थ** दिसण्यांत वेडसर अथवा बावळट दिसत; तसेंच त्यांची वृत्ति अगदीं सौम्य व मृदु दिसे; परंतु वस्तुतः ते मोठे सावध, इंद्रियदमनी, करारी व कडक प्रकृतीचे पुरुष होते. त्यांचें अंतरंग जाणणें फार कठीण असे, इतकें तें खोल होतें. त्यांची त्यांच्या शिष्यावर्गावर मोठी जरब होती. तसेंच त्यांच्या सांप्रदायाची शिस्तहि फार चोख असून ती कडकपणें पाळली जावी म्हणून त्यांचा मोठा कटाक्ष असे. त्यांनीं जागोजाग ठेवलेले महंत पुष्कळ थोर योग्यतेचे होते; परंतु त्यांच्यापैकीं कोणीं सांप्रदायाची शिस्त मोडल्यास त्यास ते तत्काल कडक शासन करीत. महंत आपलें काम बरोबर करितो कीं नाहीं हें ते फार सूक्ष्म प्रकारची कसोटी लावून पहात असत. जवळच्या महंतांनीं दर तीन वर्षांनीं व दूरच्या महंतांनीं ११ वर्षांच्या आंत एकदां तरी आपली गांठ घेतली पाहिजे, असा त्यांचा सक्त नियम होता. ह्याप्रमाणें जे ठिकठिकाणचे महंत भेटीस येतील त्यांच्याशीं गुप्त संवाद करण्याकरितां त्यांनीं अनेक विवरें ऊर्फ गुहा निर्माण केलेल्या होत्या. ह्या गुप्त स्थानांत ते कधीं कधीं महिनेच्या महिने विवंचना करीत बसत असत. ह्या गुप्तस्थानांपैकीं **हेळवाक** व **शिवथर** येथील स्थानें उर्फ घळी विशेष महत्त्वाच्या आहेत. येथें त्यांचीं अनेक महत्त्वाचीं कामें चालत असत, असें तत्संबंधीं उपलब्ध झालेल्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें. (रामदासी ग्रंथमालेचा ९ वा भाग पहा.) या दोन घळींपैकीं पहिली-हेळवाकची—कऱ्हाड-चिपळुण रस्त्यावर कुंभारली घाटाच्या तोंडाशीं आहे, व दुसरी—शिवथरची—भोर-महाड रस्त्यावरील वरंधा घाटांत आहे. दोन्ही स्थळें अद्यापहि प्रेक्षणीय अशीं आहेत. याप्रमाणें त्यांचा व्याप सुरू असतां ते अनेक ठिकाणीं संचार करून जागजागीं देवालयें, बगिचे, जलाशयें हीं निर्माण करण्याचाहि उद्योग करीत असत. यवनांच्या त्रासानें देवदेवतार्चनास उपसर्ग पोंचूं नये म्हणून त्यांनीं पर्वतावर जागोजाग गुप्त सदनें निर्माण केलीं.

समर्थांची शरीरयष्टि मजबूत असून त्यांचा बांधा मोठा व भव्य होता. त्यांचा वर्ण गौर असून ब्रह्मचर्यामुळें तो गौरवर्ण विशेष सतेज दिसत असे. त्यांच्या कपाळावर एक मोठें आवाळूं होतें, व त्यांच्या विशाल भालप्रदेशास त्यामुळें एक प्रकारची शोभा आलेली होती. रोज २०।२५ मैल मजल सहज

मारण्याइतकें त्यांचें शरीर बळकट होतें; तसेंच तें पूर्ण निरोगीहि होतें. **समर्थां**च्या वागणुकीसंबंधानें '**समर्थप्रताप**' नामक ग्रंथांत बरेंच विस्तृत वर्णन आहे. यावरून असें दिसून येतें कीं, **समर्थ** भराभर चालत; मित भाषण करीत; अहंकारानें त्यांजकडे कोणी गेल्यास त्याशीं मुळींच बोलत नसत. नवीन मनुष्य विनयानें बोलल्यास प्रथम भेटीस थोडे बोलत, पण पुढें जास्त सहवास घडल्यास विशेष सलगीनें बोलत. त्यांची सामान्यतः नेहमीं अधोदृष्टि असे. तसेंच त्यांची चर्या ध्यानस्थ–विचारमग्न–दिसत असे. भोजनापेक्षां फलाहार त्यांस विशेष प्रिय असे, तथापि दिवसांतून एकवार ते यथास्थित भोजन करीत. उपोषण करून काया कृश करावी, हें आळशी वेदान्त्यांचें तत्त्व त्यांस मान्य नव्हतें. भोजन झाल्यावर तांबुल भक्षण करीत असत. तांबुल तयार करून कुटून देण्याचें काम **भोळाराम** नामक एका लडिवाळ शिष्याकडे असे. भोजनोत्तर दोन-प्रहरीं कांहीं वेळ निद्रा करीत, परंतु रात्रीं क्वचितच झोंप घेत! रात्र बरीच झाली म्हणजे जवळ असलेल्या महंतादि मंडळीस निजावयाची आज्ञा करून व आपणहि निजावयास जातों असें सांगून ते निजावयास गेल्यावर आपण एखाद्या डोंगराची वाट धरावयाची असा त्यांचा परिपाठ असे! ते नेहमीं जमिनीवर घोंगडीचें हांतरूण करून त्यावर निजत. बैठकीच्या वेळीं सिद्धासन घालीत. त्यांचें राहणें सतत एके ठिकाणीं फार थोडें असे. स्नानसंध्या एके ठिकाणीं तर भोजन दुसऱ्या ठिकाणीं, तांबूल सेवन त्याहून अन्य ठिकाणीं व विश्रांति अथवा शयन त्याहूनहि अन्यत्र, अशी त्यांची वागणूक असे. त्यांची वृत्ति नेहमीं उदास व निस्पृह अशी असे. सदासर्वकाळ एकान्तीं बसून स्वजनांची ऐहिक व पारमार्थिक उन्नति कशी होईल, याची ते एकसारखी विवंचना करीत असत. याविषयीं '**समर्थप्रतापांत**' पुढील उल्लेख आहे:—

**श्रीगुरुसमर्थ एकांतीं बैसती । प्रांतींचे लोक दर्शनासी येती ।**
**सकळ प्रांतींचा स्वामी परामृश घेती । चिंता करिती विश्वाची ॥**
**देशकाळवर्तमानें । आपण चिंताग्रस्त होती मनें ।**
**म्हणती कैसीं वांचतील जनें । कैसीं ब्राह्मण्यें राहतील ॥**
**कैसी क्षेम राहेल जगती । कैसीं देवदेवालयें तगतां ।**
**कैसे कुटुंबवत्सल लोक जगती । कोणेकडे जातील हे ॥**

ह्या उतारा किंचित् लांब वाटेल, परंतु तो मुद्दाम दिला आहे. त्यावरून समर्थांना कोणतें कार्य करावयाचें होतें व तें किती महत्त्वाचें आणि बिकट होतें याची वाचकांस बरोबर कल्पना करतां येईल. हें कार्य करण्यांतच **समर्थांनीं** चाफळ-खोऱ्यांतील आपलें आयुष्य घालविलें. आणि तें कार्य सिद्ध झाल्यानंतर शिवाजी-महाराजांच्या आग्रहावरून ते **परळी**नजिक **सज्जन**गडावर रहावयास गेले.सज्जन-गडावरहि त्यांनीं श्रीरामाचें देवालय बांधून उपासना सुरू केली. यापुढें त्यांचा बहुतेक काळ केवळ परमार्थाचा उपदेश करण्यांत गेला. राष्ट्रप्रपंचाची घडी यथास्थितपणें नीट बसविल्यानंतर सर्वतोपरी श्रेष्ठ असा जो **मोक्षधर्म** त्याचा उपदेश करण्यांत त्यांनीं धन्यता मानावी हें साहजिक आहे. तथापि ह्या कालां-तहि राष्ट्रप्रपंचाकडे त्यांची दृष्टि होतीच. स्वतःच्या '**दासबोध**' ग्रंथांतील शिकवणीचा आपल्या महंतांकडून भरतखंडांत प्रसार करविणें, त्या कामीं नियोजित केलेल्या शिष्यवर्गांच्या भेटी घेणें व त्यांना वारंवार योग्य ती सल्ला-मसलत देणें, या गोष्टी त्यांनीं चालू ठेवल्याच होत्या. **शिवाजी**महाराजहि त्यांचें दर्शन घेऊन त्यांच्या बोधामृताचें पान करण्याकरितां **सज्जनगडावर** वारं-वार येत असत. **सज्जनगडा**वर आल्यानंतर शके १६०० मध्यें म्हणजे समर्थांचें देहावसान होण्याचा समय जवळ आल्यावर शिवाजीमहाराजांच्या इच्छेवरून त्यांनीं आपल्या पश्चात् आपला सांप्रदाय दीर्घकाल टिकावा म्हणून चाफळ व इतर ठिकाणच्या देवालयांस उत्पन्न संपादन करून ठेवलें. ह्या प्रसंगीं **शिवाजी-महाराजांनीं समर्थां**स लिहिलेलें पत्र रा. **देव** यांनीं प्रसिद्ध करून महाराष्ट्रावर मोठे उपकार केले आहेत. कारण त्या पत्रावरून **समर्थ** व **शिवाजी** राजे यांचा परस्परसंबंध कशा प्रकारचा होता, हें कोणासहि स्पष्टपणें कळून येण्याजोगें आहे. तें पत्र इतकें महत्वाचें आहे कीं, त्यांतील महत्वाचा भाग येथें उद्धृत करून घेतल्यावांचून राहवत नाहीं. तें पत्र असें:—

श्री

श्रीरघुपती. श्रीमारुती.

**श्रीसद्गुरुवर्य श्रीसकलतीर्थरूप श्रीकैवल्यधाम**

**श्रीमहाराज श्रीस्वामी,** स्वामींचे सेवेसीं.

चरणरज शिवाजी राजे यानी चरणावरी मस्तक ठेऊन विज्ञापना जे: मजवर

कृपा करूनु सनाथ केले आज्ञा केली कीं, तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करूनु धर्म-स्थापना देवब्राह्मणांची सेवा प्रजेची पीडा दूर करून पाळणरक्षण करावे; हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुम्ही जें मनीं धराल तें श्री... ...सिद्धीस पाववील. त्याजवरून जो जो उद्योग केला, व दुष्ट तुरूक लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्य करूनु राज्यपरंपरा अक्षई चालेल ऐशीं स्थळें दुर्घट करावी, ऐसें जें जें मनीं धारिलें ते ते स्वामीनीं आशिर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केले. याउपरी राज्य सर्व संपादिलें, तें चरणीं अर्पण करूनु सर्व काळ सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला. तेव्हां आज्ञा जाहाली कीं, तुम्हास पूर्वीं धर्म सांगितले ते च करावेस, तीच सेवा होय, ऐसें आज्ञापिले. यावरून निकट वास घडुनु वारंवार दर्शन घडावें, श्री......चीं स्थापना कोठें तरी होऊनु सांप्रदाय शिष्य व भक्ती दिगंत विस्तीर्ण घडावी, ऐसी प्रार्थना केली; तेही आसमंतात गिरिगव्हरीं वास करूनु चाफळीं श्री......चीं स्थापना करूनु सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली. त्यास चाफळीं श्री....चीं पूजा मोहोछाव ब्राह्मणभोजन अतिथि इमारत सर्व यथासांग घडावे. जेथें जेथें श्री... च्या मूर्तिस्थापना जाहाली तेथें उछाव पूजा घडावी, यास राज्य संपादिले. यांतील ग्रामभूमि कोठें काय नेमावी ते आज्ञा व्हावी. तेव्हां आज्ञा जाहाली कीं, विशेष उपाधीचें कारण काय? तथापि तुमचे मनीं श्री...ची सेवा घडावी हा निश्चय झाला. त्यास येथाअवकाश जेथें जें नेमावेसें वाटेल तें नेमावें व पुढें जसा सांप्रदायाचा व राज्याचा व वंशाचा विस्तार होईल तसें करीत जावें. याप्रकारें आज्ञा जाहाली. या-वरूनु देशांतरीं सांप्रदाय व श्री......च्या स्थापना जाहल्या, त्यास ग्रामभूमीचीं पत्रें करून पाठविलीं. श्री......संनिध चाफळीं एकशेएकवीस गांव सर्वमान्य व एकशेंएकवीस गांवीं अकरा बिघेप्रमाणें भूमि व अकरा स्थळीं श्री......चीं स्था-पना जाहाली. तेथें नैवेद्य पूजेस भूमि अकरा बिघेप्रमाणें नेमिले आहेती. ऐसा संकल्प केला आहे, तो सिद्धीस नेहण्याविषयीं विनंति केली; तेव्हां संकल्प केला तो परंपरेनें सेवटास न्याहावा ऐसी आज्ञा जाहाली. त्याजवरून सांप्रत गाऊ व भूमी नेमिले.........तपशील.

(येथें ३३ गांवें, ४१९ बिघे जमीन, एक कुरण,
१२१ खंडी धान्य यांचा तपशील आहे.)

येकूण दरोबस्त सर्वमान्य गांऊ तेहतीस व जमीन बिघे गाऊगना चारसें

येकोणीस व कुर्ण येक, व गल्ला खंडी एकशेंएकवीस श्री......चे पूजाउछाहाबद्दल संकल्पांतील सांप्रत नेमिले व उछाहाचे दिवसास व इमारतीस नक्ती ऐवज व धान्य समयाचे समयास प्रविष्ट करीन. येणेंकरोन अक्षई उछाहादि चालविण्याविषयीं आज्ञा असावी-राज्याभिषेक ५, काल्युक्ताक्षी नाम संवत्सरे, आश्विन शुद्ध १० दशमी, बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

या पत्रावरून असें स्वच्छ दिसून येतें कीं, **शिवाजीमहाराजांस** स्वराज्यस्थापनेचा कानमंत्र **समर्थांनीं**च सांगितला. तसेंच **समर्थांचें** वर्तन महाराजांबरोबर फारच निस्पृहपणाचें होतें. **समर्थ** सांप्रदायाच्या रूपानें उपाधीचा विस्तार करीत; पण स्वतः मात्र त्यांत लिप्त होत नसत. **चाफळास** त्यांनीं रामस्थापना केली, परंतु ते स्वतः बहुधा गिरिगव्हरींच राहत. इतर साधुसंतांप्रमाणें सांप्रदायामुळें प्राप्त होणारे भोग त्यांनीं कधीं उपभोगिले नाहींत. त्यांच्या चरित्राचें खरें रहस्य व थोरवी त्यांच्या ह्या वर्तनांतच आहे.

**समर्थ** सज्जनगडावर राहूं लागल्यावर थोड्याच वर्षांनीं (शके १६०२) शिवछत्रपति कैलासवासी झाले. त्या कारणानें त्यांस मोठें दुःख झालें. संभाजीची[१] लहरी व दुराचारी वृत्ति त्यांस ठाऊक असल्यामुळें तर त्यांचें हें दुःख विशेषच दुणावलें. बहुत सायास व कष्ट सोसून शिवरायाच्या हस्तें ज्या स्वराज्यमंदिराची भव्य व दैदीप्यमान इमारत आपण उभारली, तिची हा करंटा पोर वाताहात करील कीं काय, अशी त्यांस शंका वाटूं लागली होती. परंतु त्याला सर्वस्वीं ताळ्यावर आणण्याचा अथवा तसें न झाल्यास राज्यरक्षणार्थ अन्य कांहीं घडामोड करण्याचा यत्न करणें वृद्धापकाळामुळें (वय ७२) त्यांस अशक्य झालेलें होतें. तथापि ह्या राज्यरक्षणासंबंधीं त्यांच्या मनाला जी तळमळ वाटत होती, ती त्यांनीं पत्रद्वारें संभाजीस कळवून त्यास आपल्या पित्याचें अनुकरण करून त्याचा नांवलौकिक राखण्याचा उपदेश त्यांनीं मोठ्या कळवळ्यानें केला होता. त्या उपदेशाचा मनावर परिणाम होऊन **संभाजी** राजा **समर्थांच्या** भेटीसहि आला होता. पुढें लवकरच म्हणजे शके १६०३ मध्यें **सम-**

१. त्यांच्या ह्या दुःखाचें वर्णन 'समर्थप्रतापांत' असें आहे:—
समर्थ स्वप्रकाशें अंधारीं तीन मास बैसताती । मुरुमपात्रें उदकें सेविताती । शकलपात्रें घेऊनि धावताती । अरण्याकडे दुश्चिन्हें ॥ ६४ ॥ (स० २०)

र्थांचेंहि देहावसान झाल्यामुळें **संभाजी**च्या मनावर साक्षात् त्यांच्या दिव्य मूर्तीचें पडणारें दडपण नष्ट झाल्यानें त्यांचा उपदेशहि तो विसरत गेला. त्याचे अखेर परिणाम काय झाले, हें मराठ्यांचा इतिहास सांगतच आहे! **संभाजी**च्या दुर्वर्तनामुळें **शिवाजी**नें उभारलेल्या स्वराज्याच्या भव्य इमारतीस बरेच धक्के बसले; परंतु **समर्थां**नीं आपल्या सांप्रदायाच्या द्वारानें महाराष्ट्रांत 'महाराष्ट्र-धर्माची (नीति + धर्म + राजकारण = महाराष्ट्रधर्म) स्थापना करून महाराष्ट्रीय लोकांमध्यें जी कर्तव्यबुद्धि जागृत केली होती, तिचीं पाळेंमुळें महाराष्ट्रसमाजांत खोलवर जाऊन पोंचलेलीं असल्यामुळें सदर धक्क्यांनीं ती इमारत ढांसळून पडली नाहीं. उलट पुढें तिचा मोठा विस्तार होऊन सुमारें एक शतकभर ती उद्दिष्ट कार्य चांगल्या रीतीनें करीत होती. एवढें मोठें सामर्थ्य महाराष्ट्रांत ज्या सांप्रदायाच्या द्वारें समर्थांनीं उत्पन्न केलें, त्या सांप्रदायाचें स्वरूप काय व त्याच्या द्वारें महाराष्ट्रास त्यांनीं काय शिकविलें याचा अंमळ विस्तारानें विचार करणें जरूर आहे. तो करून हा प्रास्ताविक लेख पुरा करूं.

---

# श्रीसमर्थांची शिकवण.

(**समर्थां**च्या शिकवणीचें मुख्य सार अथवा त्यांच्या सांप्रदायाचें मुख्य लक्षण त्यांनींच सूत्ररूपानें आपल्या **दासबोध** ग्रंथांत सांगितलें आहे तें असें:—

**(१) मुख्य हरिकथानिरूपण। दुसरें तें राजकारण।**
**तिसरें तें सावधपण सर्वविषयीं॥ ११।५।४॥**

**(२) हरिकथानिरूपण। नेमस्तपणें राजकारण।**
**वर्तायाचें लक्षण। तेंही असावें॥ ११।६।४॥**

**हरिकथानिरूपणः**—यांत (१) हरिकथा म्हणजे सगुणभजन अथवा उपा-

१. शके १६०३ मध्यें सज्जनगडावर समर्थांचें देहावसान झाल्यावर त्यांच्या शिष्यमंडळींनीं तेथेंच त्यांची समाधि बांधली. ह्या ठिकाणीं दरसाल माघ महिन्यांत मोठी यात्रा भरते व मोठा उत्सव होत असतो. समर्थांनीं येथें स्थापिलेल्या रामाचाहि उत्सव याच वेळीं दरसाल येथें होत असतो.

सना, आणि ( २ ) निरूपण म्हणजे अद्वैताचें विवरण, असे दोन विभाग आहेत. पैकीं पाहिला, समाजास परमेश्वराची भक्ति करावयास लावून त्यास नीतिमान व स्वधर्मपरायण बनवितो; आणि दुसरा, जीवशिवांचें ऐक्य घडवून मनुष्यास मोक्षाचा लाभ करून देतो. मोक्ष–मुक्ति–हेंच मानवी प्राण्याचें अंतिम साध्य आहे, असें समर्थांचें मत असून खुद्द त्यांचें स्वतःचेंहि तेंच ध्येय आहे. संसार हा सर्व मायेचा पसारा असून खोटा आहे. माया ही सत्त्व, रज व तम या तीन गुणांनीं युक्त आहे, त्यामुळें ती तापत्रयास कारण आहे. परंतु मनुष्य-प्राणी जन्मास आला कीं, तो या त्रिगुणातीत मायेच्या पाशांत सांपडल्यावांचून रहात नाहीं. ह्या मायापाशांतून सुटून मुक्तस्थितीस जाऊन पोंचणें यासच समर्थ **परमार्थ** म्हणतात. तो परमार्थ कसा साधावा हा अध्यात्मज्ञानाचा विषय असून आमच्याकडील वेदान्तग्रंथांत त्यासंबंधानें यथास्थित विवरण केलेलें आहे. समर्थांच्या **दासबोध** ग्रंथाचा मुख्य प्रतिपाद्य विषय हाच आहे. आणि त्या-करितांच त्यांनीं 'हरिकथानिरूपण' हें आपल्या शिकवणीचें व सांप्रदायाचें मुख्य अंग मानिलें आहे.

मोक्षसाधन हें जरी मनुष्यप्राण्याचें अथवा मानवसमाजाचें मुख्य ध्येय असलें, तरी यच्चयावत् सर्व मानवी प्राणी हें ध्येय प्राप्त करून घेण्यास पात्र असतात–म्हणजे कोणत्याहि काळीं सर्वत्रांची एकसारखीच स्थिति असते–असें मात्र दिसून येत नाहीं. हें ऐतिहासिक सत्य विचारांत घेऊन समर्थांनीं मानव-समाजाच्या ४ अवस्था कल्पिल्या आहेत. ( १ ) बद्ध, ( २ ) मुमुक्षु, ( ३ ) साधक व ( ४ ) सिद्ध ह्या त्या अवस्था होत. मोक्षसाधन हें प्रत्येक मनुष्यास शक्य आहे, असें वेदान्त्यांप्रमाणें समर्थांचेंहि मत आहे. परंतु 'सिद्धा'ची अवस्था प्राप्त झाल्याखेरीज मात्र कोणासहि मोक्ष मिळवितां येणार नाहीं, हें त्यांनीं स्पष्ट करून सांगितलेलें आहे. ही अवस्था प्रत्येक माणसास प्राप्त करून घेतां येईल असें त्यांनीं—

**कोणासीच नाहीं बंधन । भ्रांतीस्तव भुलले जन ।**
**दृढ घेतला देहाभिमान । म्हणोनिया ॥ ५।६।५७ ॥**

या ओवीच्या द्वारां सूचित केलें आहे. परंतु सिद्धाची अवस्था प्राप्त होण्यास मायेचा बंध तोडून टाकावा लागतो. तो तोडून टाकणें हें जरी शक्य असलें

तरी तें फार दुस्तर असल्यामुळें अखिल मानवप्राण्यांना एकसमयावच्छेदेंकरून तें साध्य होत नाहीं, असें मानवसमाजाच्या आजपर्यंतच्या इतिहासावरून सिद्ध आहे. मानवसमाजांतील बहुतेक प्राणी उपरोक्त मायेनें लिप्त म्हणजे बद्ध स्थितींतच असतात. कांहीं थोडे लोक मुमुक्षु बनलेले असतात, व त्यांहूनही थोडे साधक, आणि फारच थोडे—हाताच्या बोटांनीं मोजण्याइतके—सिद्धकोटींत गेलेले असतात. ह्या निरनिराळ्या अवस्थांचीं लक्षणें **समर्थांनीं** दासबोधांत विस्तृतपणें सांगितलीं आहेत. त्यावरून असें दिसून येतें कीं, मनुष्याची 'बंधनभ्रांति' उडून गेली म्हणजे त्याचे ठायीं मुमुक्षेचा उदय होतो. तो झाल्यावर तो मनुष्य सत्त्वगुणसंपन्न व परोपकारी बनतो. त्याचा अहंकार जळाला म्हणजे तो साधक होतो. साधक झाला तरी त्याचे ठायीं 'तें' व 'मी' ह्या भेदाची जाणीव रहातेच. ती नष्ट होऊन 'तें' (ब्रह्म) व 'मी' एकच अशी भावना जेव्हां होते, तेव्हां तो सिद्धाच्या स्थितीस पोंचून मोक्षाचा मालक होतो. सिद्ध व साधक हे जरी थोडे असले तरी बाकीच्या सर्व मानवांना मोक्षमार्गाकडे नेण्यास ते समर्थ असतात; व तसें करणें हें **रामदासांच्या** मतें त्यांचें कर्तव्यच आहे. कारण त्यांत त्यांचें स्वतःचेंहि हित आहे. सर्व समाज जर बद्ध अतएव विपन्न व दुःखी असेल, तर त्या स्थितीचा स्पर्श अंशतः तरी सिद्ध व साधक यांस होऊन त्यांच्या मानसिक स्वास्थ्याचा भंग झाल्यावांचून राहणार नाहीं. अर्थात् त्यांनाहि दुःखाचे आवेग सहन करण्याचा प्रसंग येऊन तेहि विपन्न व बद्ध होऊं लागतील! ही स्थिति टाळण्याकरितां म्हणून तरी स्वसमाजाला उन्नतावस्थेकडे नेणें त्यांस भाग आहे. हें कार्य त्यांनीं कसें सिद्धीस न्यावें याचा विस्तृत प्रपंच करण्यांतच समर्थांनीं आपल्या **दासबोधाचा** बहुतेक भाग व्यापला आहे. हें कार्य साधण्याकरितां तीन उपाय किंवा साधनें समर्थांनीं सांगितलीं आहेत. ते तीन उपाय म्हटले म्हणजे नीति, धर्म व राज्य—अर्थात् स्वराज—यांची समाजांत स्थापना करून त्यांची अभिवृद्धि करणें हे होत. सगुणोपासना किंवा हरिकथा आणि वर्णाश्रमधर्मांचें निरूपण करून त्यांनीं नीति व धर्म यांच्या स्थापनेचा मार्ग दाखवून दिला आहे. परंतु धर्म व नीति यांस जर राज्यसंस्थेचें पाठबळ नसेल तर त्यांची अभिवृद्धि होण्यास मोठी अडचण पडते. ती कशी याचें स्पष्ट चित्र त्या वेळच्या समाजस्थितीच्या रूपानें समर्थांच्या डोळ्यांपुढें होतें. तें त्यांनीं

दासबोधांतील कलिधर्मनिरूपणांत व इतर काव्यांत जागोजाग चितारिलें आहेच. ( समर्थांची स्फुट कविता, रामदासी ग्रंथमाला खंड ३ पहा.) महाराष्ट्रांत त्या वेळीं असलेली राज्यसंस्था यवनांच्या ताब्यांत होती. अर्थात् आमचा धर्म व तत्प्रणीत नीति यांच्या स्थापनेस व अभिवृद्धीस ह्या राज्यसंस्थेचा कांहींएक उपयोग होण्यासारखा नव्हता; इतकेंच नव्हे, तर उलट त्यांचा ऱ्हास करण्यास ती कारणीभूत झालेली होती. अर्थातच ती पूर्णपणें मोडून टाकून त्या ठिकाणीं ह्या धर्मास व नीतीस पाठिंबा देणारी आणि तेणेंकरून मोक्षसाधनाचा मार्ग सुकर करणारी अशी स्वदेशी राज्यसंस्था स्थापन करणें अवश्य झालेलें होतें. ही विशिष्ट परिस्थिति लक्षांत घेऊनच समर्थांनीं '**राजकारण**' हें आपल्या सांप्रदायाचें **दुसरें अंग** बनविलें, व तद्विषयक शिकवणीचा **दासबोधांत** समावेश केला. तात्पर्य, राजकारण ऊर्फ राज्यस्थापना हें साधन म्हणून समर्थांनीं योजिलें. साध्य व साधन यांत मोठा भेद आहे, आणि तो लक्षांत न आल्यास मोठमोठे प्रमाद घडून येण्याचा संभव असतो, हें लक्षांत घेणें जरूर आहे. धर्म व नीति यांचा उपदेश करण्याचें काम समर्थकालीन अनेक संतांनीं केलें होतें; परंतु त्यापासून फारसें कांहीं कार्य झालें नाहीं. समाजांत मुमुक्षेचा उदय होण्यास हा उपदेश थोडा फार उपयोगीं पडला असेल, नाहीं असें नाहीं; परंतु यवनराज्यामुळें उत्पन्न झालेल्या विपरीत स्थितींत धर्मांच्या व नीतीच्या बाबतींत सर्वत्र जी बजबजपुरी व स्वैराचार यांचें प्राबल्य माजलें तें मोडण्याचें काम संतांच्या उपदेशानें झालें नाहीं व होण्यासारखेंहि नव्हतें. अज्ञ जनांच्या मनावर संतांच्या उपदेशाचा कांहीं तरी इष्ट परिणाम होण्याचा संभव होता; पण धर्म व नीति यांचा राजाश्रय सुटला म्हणजे विद्वन्मन्य असा जो एक पढतमूर्खांचा वर्ग समाजांत असतो ( याचें वर्णन दासबोधाच्या प्रारंभींच आहे ), तो फार उच्छृंखल होऊन अनीति व अधर्म यांचा प्रसार करतो. त्याला वेसण घालण्याचें काम संतांसारख्या सद्हेतुप्रेरित पण पंगु उपदेशकांच्या हातून होत नाहीं. तें करण्याकरितां शासनसामर्थ्याचें अधिष्ठान असणाऱ्या सामाजिक अथवा राजकीय संस्था स्थापाव्या लागतात व त्यांचेंहि यथान्याय रक्षण व्हावें म्हणून धर्म व नीति यांचा अभिमान बाळगणारी राज्यसंस्था असावी लागते. ही गोष्ट लक्ष्यांत घेऊनच समर्थांनीं 'समुदाय' ऊर्फ संघटना करून धर्मस्थापना व राज्यस्थापना करण्याचा

तत्कालीन महाराष्ट्रास उपदेश केला. नुसता उपदेशच करून समर्थ राहिले नाहींत, तर ह्या संघटनात्मक संस्था कशा स्थापाव्यात हें देखील त्यांनीं मोठ्या चतुरपणानें दाखवून दिलें आहे. समुदाय कसे करावेत, त्यांना कसें व काय शिकवावें, त्यांचा कोणत्या वेळीं कसा उपयोग करून घ्यावा याचें अगदीं खुलासेवार वर्णन त्यांनीं आपल्या **दासबोधांत** जागोजागीं केलेलें आहे. नुसतें शाब्दिक वर्णन करूनच ते थांबले नाहींत, तर त्यांनीं स्वतः त्याप्रमाणें आचरण करून उपदेशिलेलें तत्त्वज्ञान प्रचितीस आणून दिलेलें आहे. "मीं सांगितलेल्या गोष्टी मीं आधीं केल्या व नंतर त्यांचें निरूपण केलें" असें समर्थांनीं **दासबोधांत** अनेक ठिकाणीं म्हटलेलें आहे. त्यांनीं स्वसांप्रदायाचा विस्तार करण्याकरितां जो व्याप केला त्याची आतां महाराष्ट्रास बरीचशी माहिती झालेली असल्यामुळें समर्थांच्या ह्या वरील विधानासंबंधानें ('आधीं केलें मग सांगितलें') कोणी आशंका घेईल असें वाटत नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं, प्रचितीवांचून कोणाच्याहि उपदेशांत प्रायः जोमदारपणा येत नसतो. **दासबोध** ग्रंथांतील कोणताहि भाग घेतला तरी तो निःशंक असून जोमदारपणानें सर्वतोपरी मुसमुसलेला आढळून येईल. तो वाचून समर्थांचा आत्मविश्वास फार विलक्षण होता असें तेव्हांच लक्ष्यांत येतें. येथून तेथून सारा **दासबोध** भेदक वक्तृत्वानें ठासून भरलेला आहे. त्यांत अनेक गहन विषयांचें विवेचन केलेलें आहे, परंतु तें सर्व अगदीं नेमक्या पण साध्या आणि औचित्यपूर्ण शब्दांत केलें असूनहि चित्ताकर्षक झालें आहे. तें इतकें कीं, (कित्येक लोक ह्या ग्रंथास 'काव्य' अशी संज्ञा देऊं लागले. (वस्तुतः हा ग्रंथ 'काव्य' नाहीं; तो तत्वज्ञानाचा ग्रंथ आहे. असें असूनहि तो काव्य आहे असा जो भास होतो, तो दासांच्या चित्ताकर्षक विवेचनपद्धतीमुळेंच होय. हा चित्तवेधकपणा नवरसात्मक अलंकारांनीं साधलेला नसून प्रचितीपूर्ण अशा भेदक व ठसकेदार शब्दरचनेनें साधलेला आहे) हा ग्रंथ जो कोणी **लक्ष्यपूर्वक** वाचील, त्याचे ठायीं सामान्यतः मुमुक्षुत्वाचा उदय झालाच पाहिजे, असें म्हणण्यास हरकत नाहीं; मुमुक्षुत्व बाणलें कीं, त्यांतील उपदेशाचें खोल रहस्य मनुष्याच्या लक्षांत येऊं लागतें आणि तें लक्षांत येऊन त्याप्रमाणें आचरण घडल्यास मोक्षाची ऊर्फ स्वातंत्र्याची प्राप्ति निःसंशय होते, असा ह्या ग्रंथाचा महिमा आहे!

दासांच्या शिकवणीचा दुसरा एक लक्षांत ठेवण्यासारखा विशेष असा आहे कीं, त्यानीं धर्मस्थापना अगर राज्यस्थापना करण्याकारितां समुदाय ऊर्फ संघटना करण्याचें तत्व विशेष रीतीनें लोकनिदर्शनास आणून दिलेलें आहे. आणि तसें करण्यांत, हें कार्य पिढ्यानपिढ्या चालू रहावें, हाच त्यांचा हेतु स्पष्ट दिसतो. ते म्हणतात:—

**आपण अवचितें मरोन जावें । मग भजन कोणें करावें ।**
**या कारणें भजनास लावावें । बहुत लोक ॥** (१२–१०–३३)

संघटना करून राष्ट्रोद्धार करण्याचा मार्ग समर्थांपूर्वी त्यांच्याइतका कोणीहि विशद करून सांगितलेला नाहीं.तो सांगून व त्याप्रमाणें प्रत्यक्ष कृती करून भावी पिढ्यांस त्यांनीं एक सुंदर उदाहरण घालून दिलेलें आहे. आणि ज्या ज्या वेळीं महाराष्ट्रास विपन्नावस्था प्राप्त होईल, त्या त्या वेळीं समर्थांनीं घालून दिलेल्या ह्या उदाहरणाचें व त्यांनीं दाखवून दिलेल्या मार्गाचें मनन केल्यास त्यापासून फायदा होण्यासारखा आहे.

समर्थांचे वेळीं भरतखंडांत धर्माला जी ग्लानि आली होती, तीस परधर्मी राज्यकर्त्यांप्रमाणें स्वधर्मी लोकहि कारणीभूत झालेले होते. स्वदेशी शासन-संस्थेच्या अभावामुळें ह्या दुसऱ्या प्रकारच्या लोकांच्या मनावरचा दाब नष्ट होऊन ते स्वैराचार करूं लागले होते व त्यांपैकीं जे पढतमूर्ख होते ते 'सर्व-ब्रह्म'वादी बनून वर्णसंकर ऊर्फ सबगोलंकार करण्यास उत्तेजन देत होते. त्या-मुळें समाजांत मोठा घोटाळा माजून राहिला होता. त्या स्थितीचें वर्णन **दास-बोधांत** आहे. मासल्याकारितां त्यांतील कांहीं उतारे पुढें देतों:—

**मतामतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला ।**
**जो जे मतीं सांपडला । तयास तेंचि थोर ॥** (११–२–२५)

× × × × ×

**ब्रह्मरूप जालें आघवें । तेथें काय निवडावें ।**
**अवघी साकरचि टाकावें । काये कोठें ॥ २२ ॥**
**तैसें सार आणि असार । आवघा झाला एकंकार ।**
**तेथें बळावला अविचार । विचार कैचा ॥ २३ ॥**
**वंद्य निंद्य येक जालें । तेथें काये हाता आलें ।**

उन्मत्त द्रव्यें जें भुललें । तें भलतेंच बोले ॥ २४ ॥
तैसा अज्ञानभ्रमें भुलला । सर्वब्रह्म म्हणोन बैसला ।
माहापापी आणि भला । येकचि मानी ॥ २५ ॥
सर्वसंगपरित्याग । अव्हासवा विषयेभोग ।
दोघे एकचि मानितां मग । काये उरलें ॥ २६ ॥
भेद ईश्वर करून गेला । त्याच्या बाचेन न वचे मोडिला ॥
मुखामध्यें घास घातला । तो अपानीं घालावा ॥ २७ ॥
(द. १७–स. ४)

× × × × ×

ब्राह्मण बुद्धिपासून चेवले । आचारापासून भ्रष्ट झाले ।
गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्यांचे ॥ (१४–७–३१)

या उताऱ्यांत वर्णिलेल्या स्वजनांच्या स्वैर व भ्रष्ट वर्तनापासून माजलेली बजबजपुरी नष्ट झाल्यावांचून धर्मस्थापनेचें कार्य होणार नाहीं, असें समर्थांचें स्पष्ट मत होतें; व तदनुसार त्यांनीं आपल्या विवेकपूर्ण उपदेशानें व कृतीनें हें बंड मोडलेंहि. मनुष्यप्राणी किंबहुना सर्व प्राणी समसमान आहेत; एकाच ब्रह्माचे ते अंश आहेत; त्यांच्यांत भेदाभेद मानण्याचें कारण नाहीं, या तत्त्वाचा आश्रय करून समाजांत विस्कळितपणा उत्पन्न करणारे स्वैराचारी लोक सर्वकाळीं थोडेबहुत तरी असतातच. परंतु त्यांचें प्राबल्य न होऊं देणें हेंच समाजाच्या खऱ्या हितकर्त्यांचें व नियंत्यांचें कर्तव्य आहे. कारण वरील सर्वब्रह्मत्वाचें तत्त्व सृष्टींतील व्यवहाराचें निरीक्षण केलें असतां अव्यवहार्य अतएव भ्रामक ठरतें. तत्वतः सर्व माणसें सारखीं असें जरी क्षणभर मानलें, तरी व्यवहारांत त्यांचा सारखेपणा केव्हांहि अनुभवास येत नसल्यामुळें समाजव्यवस्था करितांना त्या तत्त्वाची कास धरून चालावयाचें नाहीं. जोंपर्यंत प्रत्येक मनुष्याच्या शारीरिक व बौद्धिक स्थितींत निसर्गतःच भिन्नत्व आढळून येतें, तोंपर्यंत सर्वांना एकाच पायरीवर बसवितां येणार नाहीं. हें लक्षांत घेऊनच आमचेकडील **मन्वादि** ऋषींनीं ह्या देशांत 'चातुर्वर्ण्या'ची सुंदर संस्था स्थापन केली. समर्थांनींहि ह्या संस्थेचा पुरस्कार करूनच धर्मस्थापनेचा मार्ग दाखवून दिला. ह्या संस्थेमुळें राष्ट्र या नात्यानें आम्ही जगांतील सर्व राष्ट्रांपेक्षां दीर्घकाल जिवंत राहिलों

आहों. ती मोडून टाकून सबगोलंकार करण्याचे २।३ मोठे प्रयत्न परकीयांनीं व स्वकीयांनीं केले, परंतु त्यांना यश न येतां अद्यापर्यंत ती टिकाव धरून आहे; इतकेंच नव्हे, तर ज्या ज्या वेळीं हे प्रयत्न झाले, त्या त्या वेळीं तिचें रक्षण करण्याकारितां मोठमोठे महात्मे पुढें येऊन त्यांनीं बहुजनसमाजाच्या साह्यानें बंडखोरांचा पाडाव करून धर्मरक्षण केलेलें आहे. यावरून येथील बहुजनसमाजास ही संस्था अत्यंत हिताची वाटत आहे, हें उघड दिसून येतें. अलीकडे पाश्चात्य संस्कृतीचा ह्मा देशांत उदय झाल्यापासून ह्या संस्थेवर पुन्हा जोराचे हल्ले होऊं लागले आहेत. त्यांत स्वजनांनींहि तिच्यावर शस्त्र उचललेलें आहे. त्यांच्या ह्या आघातासहि ही संस्था दाद देणार नाहीं, याबद्दल आमची खात्री आहे. परंतु या लोकांस आम्हांस एवढेंच सुचावावयाचें आहे कीं, सुधारलेल्या पाश्चात्य समाजांतील असंतुष्ट वृत्ति व त्यामुळें तेथें होणारी खळबळ यांचा विचार कारितां ह्मा संतोषप्रवण संस्थेचा आश्रय करणें हेंच परिणामीं हितकर होणार आहे. **जर्मनी**सारख्या सुधारलेल्या राष्ट्रांतील तत्वज्ञांनींहि तिकडे निराळ्या रूपानें याच संस्थेचें बीजारोपण करण्याचा प्रयत्न सुरू केला * आहे. तसेंच इतर पाश्चात्य

---

* प्रख्यात जर्मन तत्त्ववेत्ता **नीच** याच्या तत्वज्ञानाचें स्पष्टीकरण करीत असतां ए. एम्. लुडोव्हिगी नामक ग्रंथकार निचच्या एतद्विषयक मताचा निष्कर्ष येणेंप्रमाणें सांगतो:--

"It is ridiculous to pretend to treat everyone without regard to those natural distinctions which are manifested by superior intellectuality, or exceptional muscular strength or mediocrity of spiritual and bodily powers, or inferiority of both. It is not the legislator, but nature herself, who establishes these broad classes, and to ignore them when forming a society would be just as foolish as to ignore the order of rank among material and structural principles when building a manument. .... .... Thus he (**नीच**) would have the intellectually superior, those who can bear responsibility and endure hardships, at the head. Beneath them are the warriors, the physicully strong who are the guardians

राष्ट्राचाहि ओढा पुढें मागें लवकरच अशा प्रकारच्या संस्थेकडे लागेल असा तिकडील हालचालीवरून व विचारप्रदर्शनावरून रंग दिसत आहे. अशा स्थितींत आयतीं परंपरागत चालत आलेली इष्ट संस्था मोडून राष्ट्रसुधारणेची हाव बाळगल्यास ती यशस्वी तर होणार नाहींच, पण उलट त्यापासून नुकसान मात्र फार होईल, असा स्पष्ट इशारा दासांच्या शिकवणीच्या निरूपणानुसार देणें आम्हांस इष्ट वाटतें. चातुर्वर्ण्य कायम ठेवण्याची इच्छा बाळगून मग त्यांतील दोष सुधारण्याचा जर कोणी महात्मा यत्न करील, तर त्याच्या हातून मात्र आमची राष्ट्रीय उन्नति होणें शक्य आहे. चातुवर्ण्य मोडून तें कार्य करूं असें जर कोणी म्हणेल तर त्याच्या त्या केवळ वल्गना असून परिणामीं त्या निर्फळ होऊन दुःखास कारणीभूत होणाऱ्या आहेत. राष्ट्राची परंपरा सोडून म्हणजे उत्क्रांतीचा मार्ग सोडून क्रांतीचा मार्ग स्वीकारल्यास आपत्तिच जास्त ओढवते, असें अनेक राष्ट्रांचा इतिहास आज आपणांस सांगत आहे. विश्वबंधुत्व, समता, स्वातंत्र्य ( लोकस्वातंत्र्य ) ह्या गोंडस कल्पनांचा प्रसार युरोपखंडांत प्रथम फ्रेंच राज्य-

---

of right, the keepers of order and security, the king above all as the highest formula of warrior, judge, and keeper of the law. The second in rank are the executive of the most intellectual. And below this caste are the mediocre. Handicraft, trade, agriculture, science, the greater part of art, in a word, the whole campass of business activity, is exclusively compatible with an average amount of ability and pretention. At the very base of the social edifice, Nietzsche sees the class of man who thrives best when he is well looked after and closely observed—the man who is happy to serve, not because he must, but because he *is* what he is—the man uncorrupted by political and religious lies concerning equality, liberty, and fraternity—who is half conscious of the abyss which seperates him from his superiors, and who is happiest when performing those acts which are not beyond his limitations.

—Nietzsche, The sociolsgist-P. 85.

क्रांतीनें केला. परंतु ज्या फ्रेंच लोकांनीं ह्या कल्पनांची कास धरून पूर्वीची परंपरा तोडून टाकली, त्यांनाहि ह्या तिन्ही वस्तूंचा त्यांच्या कल्पनेबरहुकूम लाभ झाला नाहीं; व एक प्रकारचा जुलूम नाहींसा करण्याकरितां अघोरपणें अपार मनुष्यसंहार करूनहि अखेर त्यांस पुन्हा पूर्वपदावर यावें लागलें! पाद्र्यांचा व **बोरबोन** राजघराण्याचा जुलूम त्यांनीं नष्ट केला, पण नेपोलियनची एकतंत्री सत्ता त्यांस मान्य करावी लागली! ह्या लोकांच्या ह्या उच्छृंखल वृत्तीमुळें एका शतकाच्या आंत ३।४ वेळां क्रांतीचे प्रसंग त्यांच्यावर आले व त्यामुळें त्यांच्या समाजाची मोठी हानि होऊन त्यांस युरोपांतील आपलें श्रेष्ठ स्थान गमावून दुय्यम प्रकारचें राष्ट्र होऊन राहावें लागलें. अजूनहि त्या लोकांचा समाज स्थैर्य पावला आहे अथवा मानवी प्राण्याच्या अंतिम ध्येयाच्या नजिक येऊन पोंचला आहे असें म्हणतां येत नाहीं. फ्रेंच राष्ट्राचा इतिहास म्हणजे निरनिराळ्या सामाजिक व राजकीय तत्त्वांच्या अतिरेकाचा इतिहास होय, असें **'आंद्रे ल बाँ'** नामक फ्रेंच इतिहासकार व फ्रेंच चेंबर ऊर्फ पार्लमेंटचा सभासद यानें आपल्या 'मॉडर्न फ्रान्स' ह्या ग्रंथांत स्पष्टपणें कबूल केलेलें आहे. पूर्वपरंपरा मोडण्याची प्रवृत्ति हेंच ह्या अतिरेकाचें मुख्य कारण आहे. फ्रेंच लोक स्वभावतः मोठे बुद्धिमान, चपल, दक्ष व सुशिक्षित असल्यामुळें आणि त्यांचें राज्ययंत्र त्यांच्याच हातीं असल्यामुळें त्यांना इतके धक्केचपेटे सोसूनहि राष्ट्र ह्या नात्यानें जिवंत राहतां आलें. राज्ययंत्र स्वदेशी असल्यामुळें एकप्रकारची समाजव्यवस्था बरी नाहीं असें वाटतांच तेथें दुसरी, किंवा तीहि बरी न दिसतांच तिच्या ठिकाणीं तिसरी; अशी भराभर योजना करून जिवंत राहणें त्यांस शक्य झालें. परंतु ज्या देशांत परराज्य असेल तेथील लोक जर उच्छृंखळपणा करूं लागतील तर ते नाशाचेच धनी व्हावयाचे हें उघड आहे. ही गोष्ट लक्षांत घेऊनच समर्थांनीं परंपरा न मोडतां चातुवर्ण्याच्या पद्धतींत जे कांहीं दोष तत्कालीं शिरले होते ते काढून टाकून ती संस्था फिरून कार्यक्षम बनविण्याचा प्रयत्न केला व तो यशस्वी झाला.

या चातुर्वर्ण्याप्रमाणेंच **भक्तिमार्गाचीहि** समर्थांनीं पूर्वपरंपरा कायम ठेवूनच सुधारणा केली. भक्तिमार्गालाहि त्या वेळीं एकदेशीपणा आलेला होता. भक्तिमार्गी लोक त्या काळीं सर्व लौकिक कर्मांचा त्याग करून दुस-

त्याच्या जिवावर पोट भरण्याचें कार्य करीत होते व हेंच आपलें कर्तव्य असें ते मानूं लागले होते. संन्यासी, विरक्त, साधु यांनीं तर ह्या परोपजीवी आयुष्य-क्रमास एकप्रकारचा प्रतिष्ठितपणा प्राप्त करून दिला होता. त्यामुळें समाजांत आलस्य व दौर्बल्य यांचा सुळसुळाट झालेला होता. अन्नवस्त्र हें प्रारब्धाधीन अथवा ईश्वराधीन आहे; त्याकरितां मनुष्यानें वृथा धडपड करण्याचें कारण नाहीं. त्यानें खुशाल घरीं हरि हरि करीत बसावें व 'असेल माझा हरि । तरी देईल खाटल्यावरी' या उक्तीचा आश्रय करून आळशी बनावें, आणि स्वतःच्या कुटुंबाचाहि भार समाजावर टाकावा, अशी अवस्था झाली होती. भक्तिमार्गानें उत्पन्न केलेली ही दुरवस्था नष्ट करण्यास भक्तिमार्गाचें समूळ उच्चाटन करणें हा एक पक्ष होता; व युरोपांतील 'रॅशनॅलिस्ट' लोकांप्रमाणें समर्थांनाहि ह्या मार्गाचें उच्चाटण करण्याचा यत्न करितां आला असता. परंतु येथेंहि पूर्वपरंपरा राखण्याचेंच धोरण त्यांनीं स्वीकारलें. कारण त्याचें उच्चाटन केल्यास अगोदरच विस्कळित झालेल्या समाजांत जी कांहीं थोडी बहुत नीतिमत्ता वावरत होती, तीहि नष्ट होण्याचा संभव होता. सामान्य जनतेच्या मनोभूमींतून भक्तीचें उच्चाटन करून परमेश्वराचें अधिष्ठान नाहींसें करणें म्हणजे त्यास धर्म व नीति यांपासून परावृत्त करून सैतान बनण्याच्या मार्गास लावणें आहे. असें करणें समाजव्यवस्थेच्या दृष्टीनें केव्हांहि हिताचें नसतें, म्हणून समर्थांनीं भक्तिमार्गाचें उच्चाटन न करितां त्या मार्गांत शिरलेले दोष काढून टाकून त्याच्याच द्वारें प्रपंच व परमार्थ यांकडे लोकांचें लक्ष लावून दिलें. परमार्थज्ञानाचे सागर असे जे सिद्ध पुरुष त्यांनीं परोपजीवनाचा व आलस्याचा मार्ग टाकून साधकाची भूमिका घेऊन लोकांना परमार्थाचा मार्ग दाखवावा असें **दासबोधांत** त्यांनीं अनेक ठिकाणीं प्रतिपादिलें आहे. भक्तिमार्गाची तत्कालीन संन्यासप्रवण वृत्ति व नैराश्यवाद मोडून त्याच्या ठिकाणीं कार्यक्षमता व आशावादित्व उत्पन्न करण्याचा समर्थांनीं किती जोरानें प्रयत्न केला हें त्यांच्या शिकवणींतील पुढील उताऱ्यांवरून दिसून येईलः—

(१) **वन्ही तो चेतवावा रे । चेतवितांच चेततो ।**
**विवेक जाणिजे तैसा । वाढवितांच वाढतो ।। १ ।।**
**संग तो साक्षपी याचा । धरितां साक्षपु घडे ।**

साक्षपें साक्षपु वाढे । पुरती मनकामना ॥ २ ॥
कष्टतां सौख्य मानावें । कष्टीं फळाचि पाविजे ।
आळसें सुख वाटे तें । दुःखब्रह्मांड भोगवी ॥ ३ ॥
केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंचि पाहिजे ।
येत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥ ४ ॥

—स्फुट काव्यें.

(२) लहान थोर काम कांहीं । केल्यावेगळें होत नाहीं ।
म्हणोन आळस सोडावा । येत्न साक्षपें जोडावा ।
दुश्चितपणाचा मोडावा । थारा बळें ॥ (१२–९–८)

—दासबोध.

(३) घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहून जाड ।
तेथें कैंचें आणिलें द्वाड । करंटपण ॥ (१२–९–२९)
(४) व्याप आटोप करिती । धके चपेटे सोसिती ।
तेणें प्राणी सदेव होती । देखत देखतां ॥ (१५–३–७)
(५) कष्टेंविण फळ नाहीं । कष्टेंविण राज्य नाहीं ।
केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं ॥ (१८–७–३)
(६) येहलोक अथवा परलोक । दोहींकडे सारिखाचि विवेक ॥
(१८–७–६)

ऐहिक अथवा पारमार्थिक यांपैकीं कोणतेंहि कल्याण साधावयाचें असेल तर मनुष्यानें प्रयत्नरत झालें पाहिजे, असें समर्थांनीं निक्षून सांगितलें आहे; इतकेंच नव्हे, तर प्रयत्न हाच देव—ईश्वर—असेंहि ते म्हणतात! ऐहिक कल्याण साधणारांस तर यत्न पाहिजेच, परंतु परमार्थाचा लाभ करून घेणाऱ्यानेंहि दुश्चितपणा ऊर्फ आलस्य व करंटपण सोडून उपासनेचा पडिभर वाढवावा असें त्यांचें सांगणें आहे.

ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या । भक्तमंडळ्या मानाव्या ।
संतमंडळ्या शोधाव्या । भूमंडळीं ॥

हा उपदेश अशा लोकांनाच अनुलक्षून केला आहे.

याप्रमाणें चातुर्वर्ण्य व भक्तिमार्ग यांची सुधारणा करून धर्म व नीति

यांची समाजांत स्थापना केल्यावर किंवा ती करीत असतां त्यास पाठिंबा देऊन त्यांचें रक्षण करणारी राज्यसंस्थाहि त्यांनीं शिवाजीमहाराजांच्या हस्तें निर्माण केली. ही राज्यसंस्था कशी निर्माण केली याचेंहि खुलासेवार विवेचन त्यांनीं आपल्या **दासबोधांत** केलें आहे. तें चांगलें मनन करण्याजोगें आहे.

सावधपण अथवा वर्तायाचें लक्षण हें समर्थांच्या शिकवणीचें **तिसरें अंग** आहे. यांत सर्व प्रकारची चतुरस्रता–दक्षता–ऊर्फ व्यवहारज्ञान याचा समावेश होतो. याचा उपयोग प्रपंच व परमार्थ ह्या दोहींकडे सारखाच असतो. प्रपंच–परमार्थाविषयीं अव्यग्रता असणें, काळप्रसंग जाणणें, सर्व कांहीं उपाधी करीत असूनहि उदासीन असणें–त्यांत लिप्त न होणें आणि प्राणिमात्राविषयीं समबुद्धि बाळगणें इत्यादि ह्या तिसऱ्या अंगाचीं लक्षणें आहेत. परिभ्रमण, चाळणा, विवेक, कष्ट, देहाच्या क्षणभंगुरतेविषयीं तीव्र जाणीव, कीर्तीची चाड, वैराग्य, निस्पृहता, मृदुवचन, क्षमा, शांति, सहिष्णुता, परोपकार व उत्कटता ह्या ११ उपायांच्या द्वारें उपरिनिर्दिष्ट अंगत्रयांनीं युक्त अशा आपल्या सांप्रदायाचें कार्य हातीं घेण्याची पात्रता संपादन करावी असें समर्थांचें सांगणें आहे. ही पात्रता संपादन करण्याचे वेळींहि वरील 'वर्तायाचें लक्षणा'चा फार उपयोग असतो, तो कसा याचें खुलासेवार स्पष्टीकरण दासबोधांत जागोजाग केलेलें आहे. नमुन्याकरितां कांहीं उतारे देतोः—

**(१) आपणास जें जें अनकूळ । तें तें करावें तत्काळ ।**
**होईना त्यास निबळ । विवेक उमजावा ॥ (१९–६–२७)**

**(२) दुसऱ्याचें अंतर जाणावें । तदनुसारचि वर्तावें ।।**

**(३) दुसऱ्याचे मनोगतें जावें । मिळोनिया ॥ (१५–६–१७)**

**(४) राहराहों शोध घ्यावा । परांतराचा (१५–१–४)**

**(५) मृत्याभेणें पळों जातां । तरी मृत्य सोडिना सर्वथा ।**
**मृत्यास न ये चुकावितां । कांहीं केल्या ॥ (३–९–३८)**

**(६) ऐसें जाणोनियां जीवें । याचें सार्थकचि करावें ।**
**जनीं मरोन उरावें । कीर्तिरूपें ॥ (३–९–४४)**

**(७) कीर्ति करून नाहीं मेले । ते उगेच आले आणि गेले ।**
**शाहाणे होऊन भुलले । काये सांगावें ॥**

(८) झिजल्यावांचूनी कीर्ति कैची । मान्यता नव्हे कीं फुकाची ॥
उपाधीसी विस्तारावें । उपाधींत न संपडावें ।
(११–५–९)
(१०) उत्कट भव्य तेंचि घ्यावें । मळमळित अवघेंचि टाकावें ।
निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं । (–१४–१)
(११) नाना जनांचें हृदय । मृदु शब्दें उकलावें ॥
(१२) वेड्यास वेडें म्हणों नये । वर्म कदापि बोलों नये ।
तरीच घडे दिग्विजये । निस्पृहासी ॥ (१३–१०–२६)
(१३) बरें वाईट सोसावें । समुदायाचें ॥
(१४) शरीर परोपकारीं लावावें । बहुतांच्या कार्यास यावें ।
उणें पडों नेदावें । कोणीयेकाचें ॥
(१५) उत्कट भक्ति उत्कट ज्ञान । उत्कट चातुर्य उत्कट भजन ।
उत्कट योग अनुष्ठान । ठायीं ठायीं ॥
कांहींएक उत्कटेंविण । कीर्ति कदापि नव्हे जाण ।
उगेंच वणवण हिंडोन । काये होतें ॥

हे उतारे अगदीं निवडक व त्रोटक आहेत. त्यांत बीजरूपानें जीं तत्त्वें सांगितलीं आहेत, त्यांचा विस्तार पहावयाचा असल्यास **दासबोध** ग्रंथ समग्र लक्षपूर्वक वाचावा.

**दासबोधा**खेरीज समर्थांचे काव्यबद्ध असे आणखी कित्येक प्रबंध आहेत. त्यांपैकीं कांहीं प्रकाशित व कांहीं अप्रकाशित आहेत. अप्रकाशित प्रकरणांपैकीं बरींच प्रकरणें धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेस उपलब्ध झालीं आहेत व त्यांतील कांहीं तिनें एका स्वतंत्र खंडाच्या रूपानें प्रसिद्धहि केलीं आहेत. हीं सर्व प्रकरणें **समर्थांनीं** निरनिराळ्या प्रसंगीं लिहिलेलीं आहेत. त्यांतील मतलब सामान्यतः **दासबोधां**तील प्रमेयास पोषक आहे. किंबहुना, ह्या प्रमेयांचें विशेष व खुलासेवार स्पष्टीकरणच त्यांत आहे असें म्हटलें तरी चालेल. ह्या स्फुटकाव्याप्रमाणें **समर्थांनीं** एक रामायणहि रचिलें आहे. परंतु हें रामायण साग्र नाहीं. सीतेची बंधमुक्तता करून रावणाचा वध करण्याचा जो भाग मूळ रामायणांत आहे तोच समर्थांनीं आपल्या रामायणाचा मुख्य विषय बनविला

आहे. ही निवड करण्यांतहि त्यांचें औचित्य व राष्ट्रीय दृष्टि दिसून येते. तत्कालीन महाराष्ट्राचें बंधन दूर करणें हें समर्थांचें उद्दिष्ट कार्य होतें. अर्थात् ह्या कार्यास पोषक असा जो सीताबंधविमोचनाचा प्रसंग तेवढाच निवडून घेऊन तो आपल्या भेदक वक्तृत्वानें तत्कालीन महाराष्ट्राच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न त्यांनीं करावा, हें त्यांच्या विचक्षणतेस व धूर्ततेस साजेसेंच आहे. ह्या एकाच गोष्टीवरून समर्थांची दृष्टि इतर संतांहून कशी निराळी म्हणजे राष्ट्रीय अशी होती हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. त्यांची इतर काव्यप्रकरणेंहि बहुधा याच दृष्टीनें लिहिलेलीं आहेत. त्यामुळें दासबोधाप्रमाणेंच तींहि धगधगीत व चैतन्यरूप असून आजकालच्या वाचकवर्गाचेंहि चित्ताकर्षण करूं शकतात. ह्या प्रकरणांतहि राष्ट्रोद्धाराला अवश्यक अशा गुणांचें वर्णन ठिकठिकाणीं फार मोहक रीतीनें केलेलें आहे. प्रत्यंतराकरितां कांहीं उदाहरणें देतों:—

(१) भाग्यासी काय उणें रे । येत्नावांचूनि राहिलें ।
येत्न तो करावा कैसा । हेंचि आधीं कळेचिना ॥ १ ॥
मुख्य येत्न विचाराचा । त्यावरी बोलणें बरें ।
चालणें सत्य नेमाचें । नीति न्याय चुकों नये ॥ २ ॥
गलबला बुद्धि नासीतो । नाना निश्चय सांगती ।
ऐकावें कोणकोणाचें । बोलताहे बहुचकी ॥ ३ ॥
सांगोंचि जाणती सर्व । कर्ता कोण्ही दिसेचिना ।
जाणते नेणते सांगो । स्वभाव लागला जनीं ॥ ४ ॥

* * * *

करंटे मिळाले सर्वे । जो तो बुधिच सांगतो ।
सांगावें तें आपणाला । आपणु करितां बळें ॥ ७ ॥ (स्फु. प्रक.)

(२) धीर्धरा धीर्धरा तकवा । हडबडुं गडबडूं नका ।
काळ देखोनि वर्तावें । सांडावें भय पोटिचें ॥ १ ॥
धरावा धीर तो मोठा । विचारें पाहतां बरें ।
अधीर माणसें खोटीं । काम कांहीं कळेचिना ॥ २ ॥

* * * *

प्रसंगीं चळचळा कांपे । तो प्राणी आत्मघातकी ॥५॥ (स्फु. प्रक.)

(३) राम उपासना माझी । त्रयलोक्य सुख पावलें ।
सोडिले देव इंद्रादि । तोडिलीं बंधनें बळें ॥
कीर्तीसी तुळणा नाहीं । प्रतापें आगळा बहु ।
न्याय नेमस्त हे लीळा । न भूतो न भविष्यति ॥
उन्मत्त रावणें येणें । त्रैलोक्य पीडिलें बळें ॥
देव ते घातले बंदी । कैपक्षी राम पावला ॥

श्रीरामांनीं सीताशुद्धि करून शक्ति ऊर्फ आदिमाया-जगज्जननी—हिची आराधना करून तिच्या वरप्रसादानें रावणाचा पराभव केला असें सांगून पुढें समर्थ म्हणतातः—

(४) जननि रामवरदानी । तधीपासूनि बोलिजे ।
उदंड ऐकिलें होतें । प्रचीत मजला नसे ॥
प्रतापगिरीचें ठायीं । आदिशक्ती विराजते ।
कामना पुरती तेथें । प्रचीती रोकड्या जनीं ॥
तुळजापुरीची माता । प्रतापेंचि प्रगटली ॥
आदिशक्ती माहंमाया । कुळीची कुळस्वामिनी ॥
कुळची पाळिलें आम्हां । रक्षिलें बहुतां परीं ।
तिची ते वैष्णवी माया । तारिते मारिते जनीं ॥
शक्तीनें पावती सुखें । शक्ती नस्तां विटंबना ।
शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगितां दिसे ॥
कोण पुसे अशक्ताला । रोगीसे बराडी दिसे ।
कळा नाहीं कांति नाहीं । युक्ति बुधी दुरावली ॥
साजिरी शक्ती तों काया । काया मायाचि वाढवी ।
शक्ती तों सर्वही सुखें । शक्ती आनंद भोगवी ॥
सार संसार शक्तीनें । शक्तीनें शक्ति भोगिजे ।
शाक्त तो सर्वही भोगी । शक्तीवीण दारिद्रता ॥
शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें येत्न होतसे ।
शक्ती युक्ती जये ठायीं । तेथें श्रीमंत धांवती ॥
युक्ती ते जाड कळा । विशक्तीसी तुळणा नसे ।

अचूक चुकेना कोठें । त्याचीं राज्यें समस्तही ॥
युक्तीनें चालती सेना । युक्तीनें युक्ति वाढवी ।
संकटीं आपणा रक्षी । रक्षी सेना परोपरीं ॥

× × × ×

चोरटीं होरटीं[1] तुंदे[2] । नासकें लांच इच्छिती ।
लौंढीचे दुरी घालावे । मारावे राजकारणें ॥
लोकांसी राखणें राजी । तें राज्य प्रबळे बळें ।
बंद बेबंद जाणावे । तांबे[3] ताबे परोपरीं ॥
खळें[4] खोचरें[5] काढावे । तंदुळासारिखे खडे ।
खरें तें आदरें घ्यावें । खोटें सर्वत्र टाकिती ॥
कांहींएक परिक्षावें । शोधावें बहुतांपरीं ।
नेटकें कार्य साधावें । रोधावें कुटिला जना ॥
असो हें बोलणें जालें । युक्तीवीण कामा नये ।
युक्तीला पाहिजे शक्ती । तस्मात् शक्ती प्रमाण हे ॥
मुक्त केल्या देवकोडी । सर्वही शक्तिच्या बळें ।
समर्थ भवानी माता । समर्था वरु दीधला ॥

× × × ×

बोळतां भवानी माता । महींद्र दास्य इच्छिती ।
बोलणें हें प्रचीतीचें । अन्यथा वाउगें नव्हे ॥

—अध्यात्मसार, स्फुट काव्यें.

आतां फक्त एकच उतारा देतों. त्यांत समर्थांनीं आपल्या सांप्रदायाचीं लक्षणें विशद करून दाखविलीं आहेत.

प्रथम लिहिणें दुसरें वाचणें । तिसरें सांगणें अर्थांतर ॥ १ ॥
आशंकानिवृत्ति ऐसी चौथी स्थिती । पांचवी प्रचीती अनुभवें ॥ २ ॥
साहावें तें गाणें सातवें नाचणें । ताळि वाजवणें आठवें तें ॥ ३ ॥
नवां अर्थभेद दाहावा प्रबंद । आकावा प्रबोध प्रचीतसिी ॥ ४ ॥

१. हटवादी. २. गर्विष्ठ. ३. समुदाय. ४. छिद्रें. ५. दोष.

बारावें वैराग्य तेरावा विवेक । चौदावा तो लोक राजी राखे ॥ ५ ॥
पंध्रावें लक्षण तें राजकारण । सोळावें तें जाण अवेग्रता ॥ ६ ॥
प्रसंग जाणावा हा गुण सत्रावा । काळ समजावा सर्वांठायीं ॥ ७ ॥
आठ्रावें लक्षण वृत्ती उदासीन । लोलंगता जाण तेथें नाहीं ॥ ८ ॥
येकोणीसावें चिन्ह सर्वांसी समान । राखे समाधान ज्याचें त्याचें ॥९॥
विसावें लक्षण रामउपासना । वेध लावी जना भक्तिरंगें ॥ १० ॥

(हरिकथानिरूपण, राजकारण व सावधपण हीं जीं रामदासी सांप्रदायाचीं तीन प्रमुख अंगें त्यांचीं एकंदर २० लक्षणें समर्थांनीं वरील कवितेंत सांगितलीं आहेत. त्यांचें मनन करून तीं आपल्या अंगीं बाणण्याचा प्रयत्न करणारास प्रपंच व परमार्थ यांचा उत्कृष्ट प्रकारें लाभ होतो,' असें समर्थांचें अनुभवजन्य वचन आहे. त्याकडे प्रस्तुतकालीन महाराष्ट्राचें लक्ष वेधावें अशी सदाशा प्रगट करून लेखणी खालीं ठेवतों.

---





# श्रीदासबोध.

## दशक पहिला.

### १ ग्रंथारंभनिरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रोते पुसती कोण ग्रंथ । काय बोलिलें जी येथ । श्रवण केलियानें प्राप्त । काय आहे ॥ १ ॥ ग्रंथनाम दासबोध । गुरुशिष्यांचा संवाद । येथें बोलिला विशद[1] । भक्तिमार्ग ॥ २ ॥ नवविधा[2] भक्ति आणि ज्ञान । बोलिलें वैराग्याचें लक्षण । बहुधा अध्यात्मनिरूपण । निरूपिलें ॥ ३ ॥ भक्तीचेनि योगें देव । निश्चयें पावती मानव । ऐसा आहे अभिप्राव । इये ग्रंथीं ॥ ४ ॥ मुख्य भक्तीचा निश्चय । शुद्ध ज्ञानाचा निश्चय । आत्मस्थितीचा निश्चय । बोलिला असे ॥ ५ ॥ शुद्ध उपदेशाचा निश्चय । सायुज्य[3] मुक्तीचा निश्चय । मोक्षप्राप्तीचा निश्चय । बोलिला असे ॥ ६ ॥ शुद्ध स्वरूपाचा निश्चय । विदेह[4]-स्थितीचा निश्चय । अलिप्तपणाचा निश्चय । बोलिला असे ॥ ७ ॥ मुख्य देवाचा निश्चय । मुख्य भक्ताचा निश्चय । जीवशिवांचा निश्चय । बोलिला असे ॥ ८ ॥ मुख्य ब्रह्माचा निश्चय । नाना मतांचा निश्चय । आपण कोण हा निश्चय । बोलिला असे ॥ ९ ॥ मुख्य उपासनालक्षण । नाना कवित्वलक्षण । नाना चातुर्यलक्षण । बोलिलें असे ॥ १० ॥ मायोद्भवाचें लक्षण । पंचभूतांचें लक्षण । कर्ता कोण हें लक्षण । बोलिलें असे ॥ ११ ॥ नाना

१. स्पष्ट, स्वच्छ. २. श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवा, पूजा, वंदन, दास्य, सख्य व देहसमर्पण अशी नऊ प्रकारची. ३. शुद्ध ब्रह्मीं लीन होणें. ५. देहाभिमानरहित स्थितीचा. ६. मायेच्या उत्पत्तीचें. ७. पृथ्वी, उदक, अग्नि, वायु आणि आकाश यांचें.

किंतु निवारले । नाना संशय छेदिले । नाना आशंका फेडिले । नाना प्रश्न ॥ १२ ॥ ऐसें बहुधा निरूपिलें । ग्रंथगर्भीं जें बोलिलें । तें अवघेंचि अनुवादलें[1] । न वंचे कीं कदा ॥ १३ ॥ तथापि अवघा दासबोध । दशक फोडोनि केला विशद । जे जे दशकींचा अनुवाद । ते ते दशकीं बोलिला ॥ १४ ॥ नाना ग्रंथांच्या संमती । उपनिषदें[2] वेदान्त श्रुती । आणि मुख्य आत्मप्रतीती । शास्त्रेंसहित ॥ १५ ॥ नाना संमतिअन्वयें । म्हणोनि मिथ्या म्हणतां नये । तथापि हें अनुभवास ये । प्रत्यक्ष आतां ॥१६॥ मत्सरें यासी मिथ्या म्हणतो । तरी अवघेचि ग्रंथ उच्छेदिती । नाना ग्रंथांच्या संमति भगवद्वाक्यें ॥ १७ ॥ शिवगीता रामगीता । गुरुगीता गर्भगीता । उत्तरगीता अवधूतगीता । वेद आणि वेदान्त ॥ १८ ॥ भगवद्गीता ब्रह्मगीता । हंसगीता पांडवगीता । गणेशगीता यमगीता । उपनिषदें[2] भागवत ॥ १९ ॥ इत्यादिक नाना ग्रंथ । संमतीस बोलिले येथ । भगवद्वाक्यें यथार्थ । निश्चयेंसी ॥२०॥ भगवद्वचनीं अविश्वासे । ऐसा कोण पतित असे । भगवद्वाक्याविरहित नसे । बोलणें येथींचें ॥ २१ ॥ पूर्ण ग्रंथ पाहिल्याविण । उगाच ठेवी जो दूषण । तो दुरात्मा दुरभिमान । मत्सर करी ॥२२॥ अभिमानें उठे मत्सर । मत्सरें तिरस्कार । पुढें क्रोधाचा विकार । प्रबळे बळें ॥ २३ ॥ ऐसा अंतरीं नासला । कामक्रोधें खवळला । अहंभावें पालटला । प्रत्यक्ष दिसे ॥ २४ ॥ कामक्रोधें लिथाडिला[3] । तो कैसा म्हणावा भला । अमृत सेवितांचि पावला । मृत्यु राहू ॥ २५ ॥ आतां असो हें बोलणें । अधिकारासारिखें घेणें । परंतु अभिमान त्यागणें । हें उत्तमोत्तम ॥ २६ ॥ मागां श्रोतीं आक्षेपिलें[4] । जी ये ग्रंथीं काय बोलिलें । तें सकळहि निरूपिलें । संकलितें मार्गें[5] ॥२७॥ आतां श्रवण केलियाचें फळ । क्रिया पालटे तात्काळ । तुटे संशयाचें मूळ । एकसरां ॥ २८ ॥ मार्ग सांपडे सुगम । नलगे साधन दुर्गम । सायुज्यमुक्तीचें वर्म । ठाईं पडे ॥२९॥ नासे अज्ञान दुःख भ्रांती । शीघ्रचि येथें ज्ञानप्राप्ती । ऐसी आहे फलश्रुति । इये ग्रंथीं ॥ ३० ॥ योगियांचें परम भाग्य । अंगीं बाणे तें वैराग्य । चातुर्यकळा यथायोग्य । विवेकेंसहित ॥ ३१ ॥ भ्रांत अवगुणी

---

१. सांगितलें जात नाहीं. २. वेदांतील एक भाग. ३. लिप्त झाला. ४. विचारलें. ५. संक्षिप्त रीतीनें.

अवलक्षण । तेचि होती सुलक्षण । धूर्त तार्किक विचक्षण । समय जाणती ॥ ३२ ॥ आळसी तेचि साक्षेपी[१] होती । पापी तेचि पस्तावती । निंदक तेचि वंदू लागती । भक्तिमार्गासी ॥ ३३ ॥ बद्धचि होती मुमुक्षें[२] । मूर्खचि होती अतिदक्ष । अभक्तचि पावती मोक्ष । भक्तिमार्गें ॥ ३४ ॥ नाना दोष ते नासती । पतित तेचि पावन होती । प्राणी पावे उत्तम गती । श्रवणमात्रें ॥ ३५ ॥ नाना धोके देहबुद्धीचे । नाना किंतु संदेहाचे । नाना उद्वेग[३] संसाराचे । नासती श्रवणें ॥ ३६ ॥ ऐशी याची फलश्रुती । श्रवणें चुके अधोगती । मनासी होय विश्रांती । समाधानें ॥ ३७ ॥ जयाचा भावार्थ जैसा । तयास लाभ तैसा । मत्सर धरी जो पुंसा[४] । तयासी तेंचि प्राप्त ॥ ३८ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रथमदशके ग्रंथारंभनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. गणेशस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐनमोजी गणनायका । सर्वसिद्धिफळदायका । अज्ञानभ्रांतिछेदका ॥ बोधरूपा ॥ १ ॥ माझिये अंतरीं भरावें ॥ सर्वकाळ वास्तव्य करावें । मज वाक्शून्यासि[५] वदवावें । कृपाकटाक्षेंकरूनी ॥ २ ॥ तुझिये कृपेचेनि बळें । वितुळती भ्रांतीचीं पडळें[६] । आणि विश्वभक्षकें काळें । दास्यत्व कीजे ॥ ३ ॥ येतां निजकृपेची उडी । विघ्नें कांपती बापुडीं । होऊनि जाती देशधडी । नाममात्रें ॥ ४ ॥ म्हणोनि नाम विघ्नहर । आम्हां अनाथांचें माहेर । आदिकरूनी हरिहर । अमर वंदिती ॥ ५ ॥ वंदूनियां मंगळनिधी । कार्य करितां सर्व सिद्धी । आघात अडथळे उपाधी । बाधूं शकेना ॥ ६ ॥ जयाचें आठवितां ध्यान । वाटे परम समाधान । नेत्रीं निवोनियां मन । पांगुळे सर्वांगीं ॥ ७ ॥ सगुण रूपाची ठेव । महालावण्यलाघव । नृत्य करितां सकळ देव । तटस्थ होती ॥ ८ ॥ सर्वकाळ मदोन्मत्त । सदा आनंदें डोलत । हर्षें निर्भर[७] उदित्तें । सुप्रसन्नवदन ॥ ९ ॥ भव्य रूप वितंड । भीममूर्ति महाप्रचंड । विस्तीर्ण मस्तकीं उदंड । सिंदूर चर्चिला

---

१. मोठे उद्योगी. २. मुक्त होण्याची इच्छा करणारे. ३. दुःखें. ४. पुरुष. ५. मूर्खास. ६ पडदे. ७. अतिशय उल्हसित.

॥ १० ॥ नाना सुगंध परिमळें[1]। थबथबां गळती गंडस्थळें। येथें आलीं षट्पदकुळें[2]। झंकारशब्दें ॥ ११ ॥ मुरडींव शुंडादंड[3] सरळें। शोभे आभिनव[4] आवाळें[5]। लंबित अधर[6] तीक्ष्ण गळे। क्षणक्षणा मद स्रवी[7] ॥ १२ ॥ चौदा विद्यांचा गोसावी। ऱ्हस्व लोचन[8] ते हालवी। लवलवीत फडकावी। फडै फडै कर्णथापा ॥ १३ ॥ रत्नखचित मुगुटीं झळाळ। नाना सुरंग फांकती कीळ[9]। कुंडलें तळपती नीळ। वरी जडले झळकती ॥ १४ ॥ दंत शुभ्र सदट[10]। रत्नखचित हेमकट[11]। तया तळवटीं पत्रें नीट। तळपती लघुलघु[12] ॥ १५ ॥ लवलवीत मेलपे[13] दोंद। वेष्टित कटी नागबंद। क्षुद्र[14] घंटिका मंदमंद। वाजती झणत्कारें ॥ १६ ॥ चुतर्भुज लंबोदर। कांसे कासिला पीतांबर। फडके दोंदीचा फणिवर[15]। धुधुःकार टाकी ॥ १७ ॥ डोलवी मस्तक जिव्हा लाळी। घालूनी बैसला वेंटाळी। उभारोनी नाभिकमळीं। टकमकां पाहे ॥ १८ ॥ नानायाती[16] कुसुममाळा। व्याळपर्यंत[17] रुळती गळां। रत्नजडित हृदयकमळा–। वरी पदक शोभे ॥ १९ ॥ शोभे परश आणि कमळ। अंकुश तीक्ष्ण तेजाळ। एके करीं मोदकगोळ। तयावरी आंतप्रीती ॥ २० ॥ नटनाट्य कळाकुसरी[18]। नानाछंदें नृत्य करी। टाळ मृदंग भरोवरी[19]। उपांग[20] हुंकारे ॥ २१ ॥ स्थिरता नाहीं एक क्षण। चपळविषयीं अग्रगण। साजिरी मूर्ति सुलक्षण। लावण्यखाणी ॥ २२ ॥ रुणझुणा वाजती नूपुरें[21]। वांकी वोभाटती[22] गजरें। घागरियांसहित मनोहरें। पाउलें दोनी ॥ २३ ॥ ईश्वरसभेसी आली शोभा। दिव्यांबराची फांकली प्रभा। साहित्यविषयीं सुलभा। अष्टनायका होती ॥ २४ ॥ ऐसा सर्वांगें सुंदर। सकळ विद्यांचा आगर[23]। त्यासी माझा नमस्कार। साष्टांग भावें ॥ २५ ॥ ध्यान गणेशाचें वर्णितां। मतिप्रकाश होय श्रोता। गुणानुवाद श्रवण करितां। वोळे सरस्वती ॥ २६ ॥ जयास ब्रह्मादिक वंदिती। तेथें मानव बापुडें किती। असो प्राणी मंदमती। तिहीं गणेश चिंतावा ॥ २७ ॥ जे मूर्ख अवलक्षण। जे कां हीना-

१. सुवास. २. भ्रमरांचा समुदाय. ३. सोंड. ४. कोमल. ५. गंडस्थळ. ६. ओंठ. ७. वाहणारा. ८. नेत्र. ९. प्रभा. १०. बळकट, मोठे. ११. सोनेरी. १२. हळूहळू. १३. हाले. १४. लहान, वागऱ्या. १५. नाग. १६. अनेक जातीच्या. १७. सर्पापर्यंत. १८. कौशल्यानें. १९. सामग्री. २०. उपसाहित्य. २१. पैंजण. २२. वाजती. २३. खाण.

हूनी हीन । तेचि होती दक्ष प्रवीण । सर्व विषयीं ॥ २८ ॥ ऐसा जो परम समर्थ । पूर्ण करी मनोरथ । सप्रचीत भजनस्वार्थे । कलौ चंडीविनायकौ ॥ २९ ॥ ऐसा गणेश मंगळमूर्ती । तो म्यां स्तविला यथामती । वांछा धरूनियां चित्तीं । परमार्थाची ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रथमदशके गणेशस्तवनं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. शारदास्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ आतां वंदीन वेदमाता[१]। श्रीशारदा ब्रह्मसुता शब्दमूळ वाग्देवता । महामाया ॥ १ ॥ जे उठवी शब्दांकुर । वदे वैखरी[२] अपार । जे निःशब्दाचें अभ्यंतर । उकलूनि दावी ॥ २ ॥ जे योगियांची समाधी । जे धारिष्टाची कृतबुद्धी । जे विद्या अविद्या[३] उपाधी । तोडूनि टाकी ॥ ३ ॥ जे महा पुरुषाची भार्या । अति संलग्न अवस्था[४] तुर्या । जियेचेनि महत्कार्या । प्रवर्तले साधु ॥ ४ ॥ जे महंतांची शांती । जे ईश्वराची निजशक्ती । जे ज्ञानियांची विरक्ती । नैराश्यशोभा ॥ ५ ॥ जे अनंत ब्रह्मांडें घडी । लीलाविनोदेंचि मोडी । आपण आदिपुरुषीं दडी । मारूनि राहे ॥ ६ ॥ जे प्रत्यक्ष पाहतां आढळे । विचार घेतां नाडळे । जियेचा पार न कळे । ब्रह्मादिकांसी ॥ ७ ॥ जे सर्वनाटक-अंतर्कळा । जे जाणिव स्फूर्ति निर्मळा । जियेचेनि स्वानंदसोहळा । ज्ञानशक्ती ॥ ८ ॥ जे लावण्य स्वरूपाची शोभा । जे परब्रह्मसूर्याची प्रभा[५] । शब्दीं वदोनि उभा । संसार नाशी ॥ ९ ॥ जे मोक्षश्रिया महामंगळा । जे सत्रावी[६] जीवनकळा । जे सत्वलीला सुशीळा[७] । लावण्यखाणी ॥ १० ॥ जे अव्यक्त पुरुषाची व्यक्ती । जे विस्तारें वाढली इच्छाशक्ती । जे कळिकाळाची नियंती । सद्गुरुकृपा ॥ ११ ॥ जे परमार्थमार्गाचा विचार । निवडोनि दावी सारासार । भवसिंधूचा पैलपार । पाववी शब्दबळें ॥ १२ ॥ ऐसी बहु वेषें नटली । माया शार्रदा[८] एकली ।

---

१. सरस्वती. २. वाणीनें. ३. अज्ञान. ४. चवथी अवस्था, समाधि. ५. तेज. ६. लिंगदेहांत सोळा तत्वें आहेत, त्यांस चाळविणारी—सतरावी कळा. ७. चांगल्या स्वभावाची. ८. सरस्वती.

सिद्धांचे अंतरीं संचली। चतुर्विधे[1] प्रकारें ॥ १३ ॥ तिहीं वाचां अंतरीं आलें। तें वैखरीया प्रगट केलें। म्हणोनि कर्तृत्व जितुकें झालें। तें शारदागुणें ॥ १४ ॥ जे ब्रह्मादिकांची जननी। हरि हर जियेपासुनी। सृष्टिरचना लोक तिन्ही। विस्तार जियेचा ॥ १५ ॥ जे परमार्थींचें मूळ। नातरी सद्विद्याच केवळ। निवांत निर्मळ निश्चळ। स्वरूपस्थिती ॥ १६ ॥ जे योगियांचे ध्यानीं। जे साधकांचे चिंतनीं। जे सिद्धांचे अंतःकरणीं। समाधिरूपें ॥ १७ ॥ जे निर्गुणाची[2] ओळखण। जे अनुभवाची खूण। जे व्यापकपणें संपूर्ण। सकळां घटीं ॥ १८ ॥ शास्त्रें पुराणें वेद श्रुती। अखंड जियेचें स्तवन करिती। नाना रूपें जियेस स्तविती। प्राणिमात्र ॥ १९ ॥ जे वेदशास्त्रांची महिमा। जे निरुपमाची उपमा। जियेकरितां परमात्मा। ऐसें बोलिजे ॥ २० ॥ नाना विद्या कळा सिद्धी। नाना निश्चयांची बुद्धी। जे सूक्ष्म वस्तूची शुद्धी। ज्ञप्तिमात्र ॥ २१ ॥ जे हरिभक्तांची निजभक्ती। जे अंतर्निष्ठांची अंतरस्थिती। जे जीवन्मुक्तांची मुक्ती। सायुज्यता ॥ २२ ॥ जे अनंत माया वैष्णवी[3]। नकळे नाटक लाघवी। जे थोरथोरांस गोंवी। जाणतपणें ॥ २३ ॥ जें जें दृष्टीनें देखिलें। जें जें शब्दें बोलिलें। जें जें मनास भासलें। तितुकें रूप जियेचें ॥ २४ ॥ स्तवन भजन भक्तिभाव। जियेवांचूनि नाहीं ठाव। या वचनाचा अभिप्राव। अनुभवी जाणती ॥ २५ ॥ म्हणोनि थोराहूनि थोर। जे ईश्वराची ईश्वर। तिये माझा नमस्कार। तदंशेंचि आतां ॥ २६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रथमदशके शारदास्तवनं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. सद्गुरुस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ आतां सद्गुरु वर्णवेना। जेथें माया स्पर्शों शकेना तें स्वरूप मज अज्ञाना। काय कळे ॥ १ ॥ न कळे न कळे नेति[4] नेती[4]। ऐसें बोलतसे श्रुती। तेथें मज मूर्खाची मती। पवाडेल कोठें ॥ २ ॥ मज न कळे हा विचार दुरून माझा नमस्कार। गुरुदेवा पैलपार। पाववी मज ॥ ३ ॥ होती

---

१. परा, पश्यंती, मध्यमा, आणि वैखरी. २. निराकार ब्रह्माची. ३. विष्णूची. ४. हें नव्हे, हें नव्हे. ५. शिरेल.

स्तवनाची दुराशा । तुटला मायेचा भरवसा । आतां असाल तैसे असा । सद्गुरु स्वामी ॥ ४ ॥ मायेच्या बळें करीन स्तवन । ऐसें वांच्छित होतें मन । ते माया जाहली लज्जायमान । काय करूं ॥ ५ ॥ नातुडे[1] मुख्य परमात्मा । म्हणोनि करावी लागे प्रतिमा[2] । तैसा मायायोगें महिमा । वर्णीन सद्गुरूचा ॥ ६ ॥ आपुल्या भावासारिखा मनीं । देव आठवावा ध्यानीं । तैसा सद्गुरु हा स्तवनीं । स्तवूं आतां ॥ ७ ॥ जयजयाजी सद्गुरुराजा । विश्वंभरा विश्वबीजा । परमपुरुषा मोक्षध्वजा । दीनबंधू ॥ ८ ॥ तुझियेनि अभय करें । अनावर माया हे वोसरे[3] । जैसें सूर्यप्रकाशें अंधारें । पळोनि जाय ॥ ९ ॥ आदित्यें अंधकार निवारे । परंतु मागुतें ब्रह्मांड भरे । निशी[4] जाहलिया नंतरें । पुनः काळोखें ॥ १० ॥ तैसा नव्हे स्वामीराव । करी जन्ममृत्यूंचा वाव[5] । समूळ अज्ञानाचा ठाव । पुसून टाकी ॥ ११ ॥ सुवर्णाचें लोह कांहीं । सर्वथा होणार नाहीं । तैसा गुरुदास संदेहीं । पडोंचि नेणे सर्वथा ॥ १२ ॥ कां सरिता[6] गंगेसि मिळाली । मिळणी होतां गंगाचि जाहली । मग जरी वेगळी केली । तरी होणार नाहीं सर्वथा ॥ १३ ॥ परी ते सरिता मिळणीमागें । वोहळ मानिजेत जगें । तैसा नोहे शिष्य वेगें । स्वामीचि होय ॥ १४ ॥ परिस आपणाऐसें करीना । सुवर्णे लोह पालटेना । उपदेश करी बहुत जना । अंकित[7] सद्गुरूचा ॥ १५ ॥ शिष्यास गुरुत्व प्राप्त होय । सुवर्णें सुवर्ण करितां नये । म्हणोनि उपमा काय । सद्गुरूसी परिसाची ॥ १६ ॥ उपमे द्यावा सागर । तरी तो अत्यंतचि क्षार । अथवा म्हणों क्षीरसागर । तरी तो नासेल कल्पांतीं ॥ १७ ॥ उपमे द्यावा जरी मेरू । तरी तो जड पाषाण कठोरू । तैसा नव्हे कीं सद्गुरु । परम कोमळ दीनाचा ॥ १८ ॥ उपमेस द्यावें गगन । परी गगनापरीस तो निर्गुण[8] । या कारणें दृष्टांत हीन । सद्गुरूसी गगनाचा ॥ १९ ॥ धीरपणें उपमूं जगती[9] । तरी हेही खचेल कल्पांतीं । म्हणोनि धीरत्वासि दृष्टांतीं । हीन वसुंधरा ॥ २० ॥ आतां उपमेस द्यावा गभस्ती[10] । तरी गभस्तीचा प्रकाश किती । शास्त्रें मर्यादा बोलती । सद्गुरु तो अमर्याद ॥ २१ ॥ म्हणोनि उप-

१. जाणतां येत नाहीं. २. मूर्ति. ३. नाहींशी होते. ४. रात्र. ५. नाश. ६. नदी. ७. दास. ८. निराकार. ९. पृथ्वी. १०. सूर्य.

मेस उणा दिनकर । सद्गुरुज्ञानप्रकाश थोर । आतां उपमावा फणिवर[1] । तरी तो भारवाही ॥ २२ ॥ आतां उपमेस द्यावें जळ । तरी तें कालांतरें आटेल सकळ । सद्गुरुरूप तें निश्चळ । जाणार नाहीं ॥ २३ ॥ सद्गुरूस उपमावें अमृत । तरी अमर[2] धरिती मृत्युपंथ । सद्गुरुकृपा यथार्थ । अमरचि करी ॥ २४ ॥ सद्गुरूस म्हणावें कल्पतरू । तरी हा कल्पनातीत विचारू । कल्पवृक्षाचा अंगिकारू । कोण करी ॥ २५ ॥ चिंता मात्र नसे मनीं । कोण पुसे चिंतामणी । कामधेनूची दुभणी । निष्कामास न लगती ॥ २६ ॥ सद्गुरूस म्हणों लक्ष्मीवंत । तरी ते लक्ष्मी नाशवंत । ज्याचे द्वारीं असे तिष्ठत । मोक्षलक्ष्मी ॥ २७ ॥ स्वर्गलोक इंद्रसंपत्ती । हे कालांतरें विटंबती । सद्गुरुकृपेची प्राप्ती । काळांतरीं चळेना ॥ २८ ॥ हरिहरब्रह्मादिक । नाश पावती सकळिक । सर्वदा अविनाश एक । सद्गुरुपद ॥ २९ ॥ तयास उपमा काय द्यावी । नाशवंत सृष्टि आघवी । पंचभौतिक उठाठेवी । न चले तेथें ॥३०॥ म्हणोनि सद्गुरु वर्णवेना । हे गे हेचि माझी वर्णना । अंतरस्थितीचिया खुणा ॥ अंतर्निष्ठ जाणती ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रथमदशके सद्गुरुस्तवनं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. संतस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ आतां वंदीन संतसज्जन । जे परमार्थीचें अधिष्ठानें[3] । जयांचेनि गुह्य ज्ञान । प्रगटे जनीं ॥ १ ॥ जे वस्तु परम दुर्लभ । जयाचा अलभ्य लाभ । तेंचि होय परम सुलभ । सत्संगेंकरूनी ॥ २ ॥ वस्तु प्रगटचि असे । पाहतां कोणासीच न दिसे । नाना साधनें सायासें । न पडे ठाईं ॥ ३ ॥ जेथें परीक्षावंत थकले । नातरी डोळसचि अंध झाले । पाहत असतांच चुकले । निजवस्तूसी[4] ॥ ४ ॥ जें दीपाचेनि दिसेना । नाना प्रकाशें गवसेना । नेत्रांजनेंहि वसेना । दृष्टीपुढें ॥ ५ ॥ सोळा कळीं पूर्ण शशी[5] । दाखवूं शकेना वस्तूसी । तीव्र आदित्य कळाराशी । तोहि दाखवीना ॥ ६ ॥ जया सूर्याचेनि प्रकाशें । ऊर्णतंतू[6] तोहि दिसे । नाना सूक्ष्म पदार्थ भासे ।

---

१. शेष. २. देव. ३. आश्रय. ४. परब्रह्मास. ५. चंद्र. ६. कोळ्याचें सूत.

अणुरेणुआदिक ॥ ७ ॥ चिरलें वालाग्र[1] तेंहि प्रकाशी। परी तो दाखवीना वस्तूसी । तें जथाचेनि साधकासी । प्राप्त होय ॥ ८ ॥ जेथें आक्षेपं[2] आटले। जेथें प्रयत्न पस्तावले । जेथें तर्क मंदावले । तर्कितां निजवस्तूसी ॥ ९ ॥ वळे[3] विवेकाची वेंगडी[3] । पडे शब्दाची बोबडी । जेथें मनाची तांतडी। कामा नये ॥ १० ॥ जो बोलकेपणें विशेष । सहस्र मुखांचा जो शेष । तोहि शिणला निःशेष । वस्तु न सांगवे ॥ ११ ॥ वेदें प्रकाशिलें सर्वही । वेद-रहित कांहीं नाहीं । तो वेद कोणासही । दाखवूं शकेना ॥ १२ ॥ तेचि वस्तु संतसंगें । स्वानुभवें कळों लागे । त्यांचा महिमा वचनीं सांगे । ऐसा कवण ॥ १३ ॥ विचित्र कळा ये मायेची । परी ओळखी न सांगवे वस्तूची । मायातीत अनंताची । संत सोये[4] सांगती ॥ १४ ॥ वस्तूसि वर्णिलें न वचे[5] । तेंचि स्वरूप संतांचें । या कारणें वचनाचें । कार्य नाहीं ॥ १५ ॥ संत आनंदाचें स्थळ ॥ संत सुखचि केवळ । नाना संतोषाचें मूळ । ते हे संत ॥ १६ ॥ संत मोक्षाची विश्रांती। संत तृप्तीची निजतृप्ती । नातरी भक्तीची फलश्रुती । ते हे संत ॥ १७ ॥ संत धर्माचें क्षेत्र[6] । संत स्वरूपाचें[7] सत्पात्र। नातरी पुण्यचि पवित्र । पुण्यभूमी ॥ १८ ॥ संत समाधीचें मंदिर । संत विवेकाचें भांडार । नातरी बोलिजे माहेर । सायुज्यमुक्तीचें[8] ॥ १९ ॥ संत सत्याचा निश्चय । संत सार्थकाचा जय । संत प्राप्तीचा समय । सिद्ध-स्वरूप ॥ २० ॥ मोक्षश्रिया[9] अलंकृत । ऐसे हे संत श्रीमंत । जीव दारिद्री असंख्यात । नृपति केले ॥ २१ ॥ जे समर्थपणें उदार । जे कां अत्यंत दान-शूर । तयांचेनि हा ज्ञानविचार । दिधला न वचे ॥ २२ ॥ महाराजे चक्र-वर्ती[10] । झाले आहेत पुढें होती । परंतु कोणी सायुज्यमुक्ती । देणार नाहीं। २३ ॥ जें त्रैलोक्यीं नाहीं दान । तेंचि करिती संतसज्जन । तया संतांचें महिमान । काय म्हणोनि वर्णावें ॥ २४ ॥ जें त्रैलोक्याहूनि वेगळें । जें वेदश्रुतींसी नाकळे[11] । तेंचि जयांचेनि बोलें परब्रह्म अंतरीं ॥ २५ ॥ ऐसी

१. केसाचें अग्र. २. शंका, प्रश्न. ३. वेंगडी वळे—विवेक संकुचित होतो, असा भाव. ४. मार्ग. ५. न जाई, वर्णिलें जात नाहीं. ६. पुण्य उत्पन्न होण्याचें स्थळ. ७. ब्रह्माचें. ८. ब्रह्मरूप होणें एतद्रूप मुक्तीचें. ९. मोक्षरूप लक्ष्मीनें. १०. सार्वभौम. ११. समजत नाहीं.

संतांची महिमा । बोलिजे तितुकी उणी उपमा । जयांचेनि मुख्य परमात्मा प्रगट होय ॥ २६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रथमदशके संतस्तवनं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. श्रोतृस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ आतां वंदूं श्रोते जन । भक्त ज्ञानी संत सज्जन । विरक्त योगी गुणसंपन्न । सत्यवादी ॥ १ ॥ एक सत्वाचे[१] सागर । एक बुद्धीचे आगर । एक श्रोते वैरागरें[२] । नाना शब्दरत्नांचे ॥ २ ॥ जे नाना अर्थामृताचे भोक्ते । जे प्रसंगीं वक्तयाचे वक्ते । नाना संशयाचे छेदिते । निश्चयी पुरुष ॥ ३ ॥ ज्यांची धारणा अपार । जे ईश्वराचे अवतार । नातरी प्रत्यक्ष सुरवर । बैसले जैसे ॥ ४ ॥ कीं ऋषीश्वरांची मंडळी । शांतस्वरूप सत्वागळी[३] । जयांचेनि सभामंडळीं । परम शोभा ॥ ५ ॥ हृदयीं वेदगर्भ[४] विलसे । मुखीं सरस्वती विलासे । साहित्य[५] बोलतां जैसे । भासती देवगुरु[६] ॥ ६ ॥ जे पवित्रपणें वैश्वानर[७] । जे स्फूर्तिकिरणाचे दिनकर । ज्ञातेपणें दृष्टीसमोर । ब्रह्मांड नये ॥ ७ ॥ जे अखंड सावधान । जयांसि त्रिकाळींचें ज्ञान । सर्वकाळ निरभिमान । आत्मज्ञानी ॥ ८ ॥ ज्यांचे दृष्टीखालून गेलें । ऐसें कांहींच नाहीं उरलें । पदार्थमात्रासि लक्षिलें । मनें जयांच्या ॥ ९ ॥ जें जें कांहीं आठवावें । तें तें तयांसि पूर्वीच ठावें । तेथें काय अनुवादावें । ज्ञातेपणेंकरूनी ॥ १० ॥ परंतु हे गुणग्राहक । म्हणोनि बोलतों निःशंक । भाग्यपुरुष काय एक । सेवीत नाहीं ॥ ११ ॥ सदा सेविती दिव्यान्नें । पालटाकारणें अवीट अन्नें । तैसीं हीं माझीं वचनें । प्राकृत ॥ १२ ॥ आपुले शक्त्यनुसार । भावें पुजावा परमेश्वर । परंतु पुजूं नये हा विचार । कोठेंचि नाहीं ॥ १३ ॥ तैसा मी एक वाग्दुर्बळ । श्रोते परमेश्वरचि केवळ । त्यांची पूजा वाचाबरळ[८] । करूं पाहे ॥ १४ ॥ व्युत्पत्ति नाहीं कळा नाहीं । चातुर्य नाहीं प्रबंध नाहीं । भक्ति ज्ञान वैराग्य नाहीं । गौल्यता[९] नाहीं वचनाची ॥

---

१. धैर्याचे, किंवा सत्वगुणाचे. २. खाण. ३. सत्वगुणानें अधिक. ४. वेदांत वर्णन केलेलें ब्रह्म. ५. अलंकारयुक्त भाषण. ६. बृहस्पति. ७. अग्नि. ८. वाणीनें बरळणारा, वाचाट. ९. रसाळपणा.

१५ ॥ ऐसा माझा वाग्विलास । निःशंक बोलतों सावकाश । भावाचा भोक्ता जगदीश । म्हणोनियां ॥ १६ ॥ तुम्ही श्रोते जगदीशमूर्ती । तेथें माझी व्युत्पत्ति किती । बुद्धिहीन अल्पमती । सलगी करितों ॥ १७ ॥ समर्थाचा पुत्र मूर्ख जगीं । परी सामर्थ्य असे त्याचिया अंगीं । तुम्हां संतांची मी सलगी । म्हणोनि करितों ॥ १८ ॥ व्याघ्र सिंह भयानक । देखोनि भयचकित होती लोक । परी त्यांचीं पिलीं निःशंक । तयांपुढें खेळती ॥ १९ ॥ तैसा मी संतांचा अंकित । तुम्हां संतापाशीं बोलत । परी माझी चिंता तुमचें चित्त । वाहेलचि कीं ॥ २० ॥ आपुलेंचि बोले वाउगें । त्याची संपादणी करणेंचि लागे । परंतु कांहीं सांगणें नलगे । न्यून तें पूर्ण करावें ॥ २१ ॥ हें तों प्रीतीचें लक्षण । स्वभावेंचि करी मन । तैसे तुम्ही संत सज्जन । मायबाप विश्वाचे ॥ २२ ॥ माझा आशय जाणोनि जीवें । आतां उचित तें करावें । पुढें कथेसि अवधान द्यावें । म्हणे दासानुदास ॥ २३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रथमदशके श्रोतृस्तवनं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. कवीश्वरस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ आतां वंदूं कवीश्वर । जे शब्दसृष्टीचे ईश्वर । नातरी हे परमेश्वर । वेदावतारी ॥ १ ॥ कीं हे सरस्वतीचें निजस्थान । कीं हे नाना कळांचें जीवन । नाना शब्दांचें भूषण । यथार्थ होय ॥ २ ॥ कीं हे पुरुषार्थाचें[१] वैभव । कीं हे जगदीशाचें महत्व । नाना लाघवें सत्कीर्तीस्तव । निर्माण कवी ॥ ३ ॥ कीं हे शब्दरत्नांचे सागर । कीं हे मुक्तांचें मुक्त[२] सरोवर । नाना बुद्धीचे वैरागर[३] । निर्माण जाहले ॥ ४ ॥ कीं हे अध्यात्मरत्नाची खाणी । कीं हे बोलके चिंतामणी । नाना कामधेनूंची दुभणी । वोळली[४] श्रोतयांवरी ॥ ५ ॥ कीं हे कल्पनेचे कल्पतरू । कीं हे मोक्षाचे मुख्य पडिभरू[५] । नाना सायुज्यतेचे विस्तारू । विस्तारले ॥ ६ ॥ कीं हा परलोकींचा निजस्वार्थ । कीं हा योगियांचा गुप्त पंथ । नाना ज्ञानियांचा परमार्थ । रूपासि आला ॥ ७ ॥ कीं हे निरंजनाची[६] खूण । कीं हे

---

१. धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचें. २. खुलें, मोकळें. ३. खाण ४. प्राप्त झाली. ५. आधार. ६. ब्रह्माची.

निर्गुणाची वोळखण । मायाविलक्षणाचें लक्षण । ते हे कवी ॥ ८ ॥ कीं हा श्रुतीचा भावगर्भ । कीं हा परमेश्वराचा अलभ्य लाभ । नातरी होय सुलभ । निजबोधें कविरूपें ॥ ९ ॥ कवि मुमुक्षूंचें अंजन । कवि साधकांचें साधन । कवि सिद्धांचें समाधान । निश्चयात्मक ॥ १० ॥ कवि स्वधर्माचा आश्रय । कवि मनाचा मनोदय । कवि धार्मिकांचा विनय । विनयकर्ते ॥ ११ ॥ कवि वैराग्याचें रक्षण । कवि भक्तांचें भूषण । नाना स्वधर्माचें स्थापन । ते हे कवी ॥ १२ ॥ कवि प्रेमळांची प्रेमस्थिती । कवि ध्यानस्थांची ध्यानमूर्ती । कवि उपासकांची वाडे कीर्ती । विस्तारली ॥ १३ ॥ नाना साधनांचें मूळ । कवि नाना प्रयत्नांचें फळ । नाना कार्यसिद्धि सकळ । कवीचेनि प्रसादें ॥ १४ ॥ आधीं कवीचा वाग्विलास । तरी मग श्रवणीं तुंबळे रस । कवीचेनि मतिप्रकाश । कवित्वास होय ॥ १५ ॥ कवि व्युत्पन्नाची योग्यता । कवि सामर्थ्यवंताची सत्ता । कवि विचक्षणाची कुशलता । नाना प्रकारें ॥ १६ ॥ कवि कवित्वाचा प्रबंध । कवि नाना धाटी मुद्रा छंद । कवि गद्यपद्य भेदाभेद । पदप्रास-कर्ते ॥ १७ ॥ कवि-सृष्टीचा अलंकार । कवि लक्ष्मीचा शृंगार । सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवी ॥ १८ ॥ कवि सभेचें मंडण । कवि भाग्याचें भूषण । नाना सुखाचें संरक्षण । ते हे कवी ॥ १९ ॥ कवि देवाचे रूपकर्ते । कवि ऋषींचें महत्त्व वर्णिते । नाना शास्त्रांचे सामर्थ्यातें । कवि वाखाणिती ॥ २० ॥ नसता कवीचा व्यापार । तरी कैंचा असता जगदुद्धार । म्हणोनि कवि हे आधार । सकळ सृष्टीसी ॥ २१ ॥ नाना विद्या ज्ञातृत्व कांहीं । कवीश्वरावीण तें नाहीं । कवीपासून सर्वही । सर्वज्ञता ॥ २२ ॥ मागां वाल्मीकव्यासादिक । जाहले कवीश्वर अनेक । तयांपासून विवेक । सकळ जनांसी ॥ २३ ॥ पूर्वीं काव्यें होतीं केलीं । तरीच व्युत्पत्ति प्राप्त जाहली । तेणें पंडिताअंगीं बाणली । परम योग्यता ॥ २४ ॥ ऐसे पूर्वीं थोर थोर । जाहले कवीश्वर अपार । आतां आहेत पुढें होणार । नमन त्यांसी ॥ २५ ॥ नाना चातुर्यांच्या मूर्ती । कीं हे साक्षात् बृहस्पती । वेदश्रुती बोलों म्हणती । ज्यांच्या मुखें ॥ २६ ॥ परोपकाराकारणें । नाना निश्चय अनुवादणें । सेखीं बोलिलें

---

१. आत्मज्ञान. २. मोठी. ३ शेवटीं.

पूर्णपणें । संशयातीत ॥ २७ ॥ कीं हे अमृताचे मेघ वोळले । कीं हे नव[1]-रसांचे वोघ लोटले । नाना सुखांचें उचंबळलें[2] । सरोवर हें ॥ २८ ॥ कीं हीं विवेकनिधीचीं भांडारें । प्रकट जाहलीं मनुष्याकारें । नाना वस्तूंचेनि विचारें । कोंदाटले हे ॥ २९ ॥ कीं हें आदिशक्तीचें ठेवणें । नाना पदार्थांसि आणी उणें । लाधलें पूर्वसंचिताच्या गुणें । विश्वजनांसी ॥ ३० ॥ कीं हीं सुखाचीं तारवें लोटलीं । अक्षय आनंदें[2] उतटलीं । विश्वजनांसी उपयोगा आलीं । नाना प्रयोगाकारणें ॥ ३१ ॥ कीं हे निरंजनाची संपत्ती । कीं हे विराटाची[3] योगस्थिती । कीं हे भक्तीची फलश्रुती । फळासि आली ॥३२॥ कीं हा ईश्वराचा पैंवाड[4] । पहातां गगनाहून वाड । ब्रह्मांडरचनेहून जाड । कविप्रबंधरचना ॥ ३३ आतां असो हा विस्तार । जगासि आधार कवीश्वर । तयांसि माझा नमस्कार । साष्टांग भावें ॥ ३४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रथमदशके कवीश्वरस्तवनं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. सभावर्णन.

श्रीगणेशाय नमः ॥ आतां वंदूं सकळ सभा । जिये सभेसी मुक्ति सुलभा । जेथें स्वयें जगदीश उभा । तिष्ठत प्रेमभरें ॥ १ ॥ श्लोक ॥ नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ । मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ॥ १ ॥ टी० ॥ नाहीं वैकुंठींच्या ठायीं । नाहीं योगियांचे हृदयीं । माझे भक्त गाती जे ठाईं । तेथें मी तिष्ठत नारदा ॥ २ ॥ या कारणें सभा श्रेष्ठ । भक्त गाती तें वैकुंठ । नामघोष घडघडाट । जयजयकारें गर्जती ॥३॥ प्रेमळ भक्तांचीं गायनें । भगवद्वाक्यें हरिकीर्तनें । वेदव्याख्यान पुराणश्रवणें । जेथें निरंतर ॥ ४ ॥ परमेश्वराचे गुणानुवाद । नाना निरूपणांचे संवाद । अध्यात्मविद्या[5] भेदाभेद- । मथन जेथें ॥ ५ ॥ नाना समाधानें तृप्ती । नाना आशंकानिवृत्ती । चित्तीं बैसे ध्यानमूर्ती । वाग्विलासें ॥ ६ ॥ भक्त प्रेमळ भाविक । सभ्य सखोल[6] सात्विक । रम्य रसाळ गायक । निष्ठावंत

---

१. शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र आणि शांत या नऊ रसांचे. २. उचंबळून आलीं. ३. विश्वस्वरूप ईश्वराची. ४. कीर्ति, मोठेपणा. ५. वेदान्तविद्या. ६. गंभीर.

॥ ७ ॥ कर्मशीळ आचारशीळ । दानशीळ धर्मशीळ । शुचिष्मंत[1] पुण्यशीळ अंतरशुद्ध कृपाळू ॥ ८ ॥ योगी विरागी उदास । नेमनिग्रही तापस । विरक्त निस्पृह बहुवस । अरण्यवासी ॥ ९ ॥ दंडधारी जटाधारी । नाथपंथी मुद्राधारी । एक बाळब्रह्मचारी । योगीश्वर ॥ १० ॥ पुरश्चरणी आणि तपस्वी । तीर्थवासी आणि मनस्वी[2] । महायोगी आणि जनस्वी[3] । जनासारिखे ॥ ११ ॥ सिद्ध साधु आणि साधक । मंत्रयंत्रादि शोधक । एकनिष्ठ उपासक । गुणग्राही ॥ १२ ॥ संत सज्जन विद्वज्जन । वेदज्ञ शास्त्रज्ञ महाजन । प्रबुद्ध सर्वज्ञ समाधान । विमळ कर्ते ॥ १३ ॥ योगी व्युत्पन्न ऋषीश्वर । धूर्त तार्किक कवीश्वर । मनोजयाचे मुनीश्वर । आणि दिग्वल्कळी[4] ॥ १४ ॥ ब्रह्मज्ञानी आत्मज्ञानी । तत्त्वज्ञानी पिंडज्ञानी[5] । योगाभ्यासी योगज्ञानी । उदासीन ॥ १५ ॥ पंडित आणि पुराणिक । विद्वांस आणि वैदिक । भट्ट आणि पाठक । यजुर्वेदी ॥ १६ ॥ महाभले महाश्रोत्री । याज्ञिक आणि अग्निहोत्री । वैद्य आणि पंचाक्षरी । परोपकारकर्ते ॥ १७ ॥ भूत भविष्य वर्तमान । जयांसि त्रिकाळींचें ज्ञान । बहुश्रुत निरभिमान । निरपेक्षी ॥ १८ ॥ शांतिक्षमादयाशीळ । पवित्र आणि सत्त्वशीळ । अंतरशुद्ध ज्ञानशीळ । ईश्वरी पुरुष ॥ १९ ॥ ऐसे जे कां सभानायक । जेथें नित्यानित्यविवेक । त्यांचा महिमा अलौकिक । काय म्हणून वर्णावा ॥ २० ॥ जेथें श्रवणाचा उपाय । आणि परमार्थसमुदाय । तेथें जनांस तरणोपाय । सहजचि घडे ॥ २१ ॥ उत्तम गुणांची मंडळी । सत्त्वधीर सत्वागळी । नित्य सुखाची नव्हाळी[6] । जेथें वसे ॥ २२ ॥ विद्यापात्रें कळापात्रें । विशेष गुणांचीं सत्पात्रें । भगवंताचीं प्रीतिपात्रें । मिळालीं जेथें ॥ २३ ॥ प्रवृत्ति आणि निवृत्ति । प्रपंची आणि परमार्थी । गृहस्थाश्रमी वानप्रस्थी । संन्यासादिक ॥ २४ ॥ वृद्ध तरुण आणि बाळ । पुरुष स्त्रियादि सकळ । अखंड ध्याती तमालनीळ[7] । अंतर्यामीं[8] ॥ २५ ॥ ऐसे परमेश्वराचे जन । त्यांसि माझें अभिवंदन । जयांचेनि समाधान । अकस्मात बाणे ॥ २६ ॥ ऐसिये सभेचा गजर । तेथें माझा नमस्कार । जेथें नित्य निरंतर । कीर्तन भगवंताचें ॥ २७ ॥ जेथें

---

१. शुद्ध. २. मन जिंकणारे. ३. जनप्रिय, ४. दिशाच ज्यांचीं वल्कलें तें. ५. शरीराचें तत्व जाणणारे. ६. नवेपणा. ७. घनश्याम, श्रीकृष्ण. ८. हृदयामध्यें.

भगवंताच्या मूर्ती । तेथें पाविजे उत्तम गती । ऐसा निश्चय बहुतां ग्रंथीं । महंत बोलिले ॥ २८ ॥ कलौ कीर्तन वरिष्ठ । जेथें होय ते सभा श्रेष्ठ । कथाश्रवणें नाना नष्ट । संदेह मावळती ॥ २९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रथमदशके सभावर्णनं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. परमार्थस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ आतां स्तवूं हा परमार्थ । जो साधकांचा निजस्वार्थ । नातरी समर्थांमध्यें समर्थ । योग हा ॥ १ ॥ आहे तरी परम सुगम । परी जनासि जाहला दुर्गम । कां जयाचें चुकलें वर्म । सत्समागमाकडे ॥ २ ॥ नाना साधनांचें उधार । हा रोकडा ब्रह्मसाक्षात्कार । वेदशास्त्रीं जें सार । तें अनुभवास ये ॥ ३ ॥ आहे तरी चहूंकडे । परी अणुमात्र दृष्टीस न पडे । उदास परी एकीकडे । पहातां दिसेना ॥ ४ ॥ आकाशमार्गें गुप्त पंथ । जाणती योगी समर्थ । इतरांस हा गुह्यार्थ । सहसा न कळे ॥ ५ ॥ साराचेंहि निजसार । अखंड अक्षय अपार । नेऊं न शकती तस्कर । कांहीं केल्या ॥ ६ ॥ तयासि नाहीं राजभय । अथवा नाहीं अग्निभय । अथवा श्वापदभय । बोलोंच नये ॥ ७ ॥ परब्रह्म तें हालवेना । अथवा ठावही चुकेना । काळांतरीं चळेना । जेथींचें तेथें ॥ ८ ॥ ऐसें तें निज ठेवणें । कदापि पालटों नेणे । अथवा नव्हे अधिक उणें । बहुतां काळें ॥ ९ ॥ अथवा तें वसवटेना । अथवा अदृश्य होईना । नातरी पाहतां दिसेना । गुरुअंजनेंविण[२] ॥ १० ॥ मागां योगिये समर्थ । त्यांचाहि निजस्वार्थ । त्यासि बोलिजे परमार्थ । परम गुह्य म्हणोनि ॥ ११ ॥ ज्यांहीं शोधून पाहिला । त्यांसीच अर्थ सांपडला । येरां असोनि अलभ्य झाला । जन्मोजन्मीं ॥ १२ ॥ अपूर्वता या परमार्थाची । वार्ता नाहीं जन्ममृत्यूची । आणि पदवी सायुज्यतेची । सन्निधचि लाभे ॥ १३ ॥ माया विवेकें मावळे । सारासार विचार कळे । परब्रह्म तेंहि निवळे । अंतर्यामीं ॥ १४ ॥ ब्रह्मीं भासलें उदंड । ब्रह्मीं बुडालें ब्रह्मांड । पंचभूतांचें थोतांड । तुच्छ वाटे ॥ १५ ॥ प्रपंच वाटे लटिका । माया वाटे लापाणिका[३] । शुद्ध आत्मा विवेका— । अंतरीं आला ॥ १६ ॥ ब्रह्मस्थिति बा-

---

१. अलिप्त. २. सद्गुरूच्या उपदेशावांचून. ३. कृत्रिम, पोकळ.

णतां अंतरीं । संदेह गेला ब्रह्मांडाबाहेरी । दृश्याची जुनी जर्जरी[1] । कुहीटें जाहली[2] ॥ १७ ॥ ऐसा हा परमार्थ । जो करील त्याचा निजस्वार्थ । आतां या समर्थासि समर्थ । किती म्हणोनि म्हणावें ॥ १८ ॥ या परमार्थाकारितां ब्रह्मादिकांसि विश्रामता । योगी पावती तन्मयता । परब्रह्मीं ॥ १९ ॥ परमार्थ सकळांस विसांवा । सिद्ध साधु महानुभावां । सेखीं सात्विक जडजीवा । सत्संगेंकरूनी ॥ २० ॥ परमार्थ जन्माचें सार्थक । परमार्थ संसारीं तारक । परमार्थ दाखवी परलोक । धार्मिकांसी ॥ २१ ॥ परमार्थ तापसांसी आधार । परमार्थ साधकांसी धार । परमार्थ पाववी पार । भवसागराचा ॥ २२ ॥ परमार्थी तो राज्यधारी । परमार्थ नाहीं तो भिकारी । या परमार्थाची सरी । कोणास द्यावी ॥ २३ ॥ अनंत जन्मींचें पुण्य जोडे । तरीच हा परमार्थ घडे । मुख्य परमात्मा आतुडे[3] । स्वानुभवासी ॥ २४ ॥ जेणें परमार्थ वोळखिला । तेणें जन्म सार्थ केला । येर तो पापी जन्मला । कुळक्षयाकारणें ॥ २५ ॥ असो भगवत्प्राप्तीविण । करी संसाराचा शीण । त्या मूर्खाचें मुखावलोकन । करूंच नये ॥ २६ ॥ भल्यानें परमार्थी भरावें । शरीर सार्थक करावें । पूर्वजांसी उद्धरावें । हारिभक्ती करूनी ॥ २७ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रथमदशके परमार्थस्तवनं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. नरदेहस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ धन्य धन्य हा नरदेहो । येथील अपूर्वता पाहा हो । जो जो कीजे परमार्थलाहो । तो तो पावे सिद्धीतें ॥ १ ॥ या नरदेहाचेनि लागवेगें[4] । एक लागले भक्तिसंगें । एकीं परम वीतरागें । गिरिकंदरें सेविलीं ॥ २ ॥ एक फिरती तीर्थाटणें । एक करिती पुरश्चरणें । एक अखंड नामस्मरणें । निष्ठावंत राहिले ॥ ३ ॥ एक तपें करूं लागले । एक योगाभ्यासी भले । एक अभ्यासयोगें जाहले । वेदशास्त्रीं व्युत्पन्न ॥ ४ ॥ एकीं हठनिग्रह केला । देह अत्यंतचि पीडिला । एकीं देव ठाईं पाडिला । भावार्थबळें ॥ ५ ॥ एक महानुभाव विख्यात । एक भक्त झाले ख्याति-

---

१. जीर्णावस्था. २. नासून गेली. ३. प्राप्त होतो. ४. लाभानें, आधारानें.

वंत । एक सिद्ध अकस्मात । गगन वोळंगती ॥ ६ ॥ एक तेजीं तेज जाहले । एक जळीं मिळोन गेले । एक दिसतचि अदृश्य जाहले । वायुरूपीं ॥ ७ ॥ एक एकचि बहुधा होती । एक देखतांचि निघोन जाती । एक बैसले असतांचि भ्रमती । नाना स्थानीं समुद्रीं ॥ ८ ॥ एक भयानकांवरी[1] बैसती । एक अचेतनें[2] चालविती । एक ते प्रेतें उठविती । तपोबळेंकरूनी ॥ ९ ॥ एक तेजें मंद करिती । एक जळें आटविती । एक वायु निरोधिती । विश्वजनांचा ॥ १० ॥ ऐसे हठनिग्रही कृतबुद्धी[3] । जयांसि वोळल्या नाना सिद्धी । ऐसे सिद्ध लक्षावधी । होऊनि गेले ॥ ११ ॥ एक मनःसिद्ध एक वाचासिद्ध । एक अल्पसिद्ध एक सर्वसिद्ध । ऐसे नानाप्रकारचे सिद्ध । विख्यात जाहले ॥ १२ ॥ एक नवविधाभक्तिराजपंथें । गेले तरले परलोकींच्या निजस्वार्थें । एक योगी गुप्त पंथें । ब्रह्मभुवन पावले ॥ १३ ॥ एक वैकुंठास गेले । एक सत्यलोकीं राहिले । एक कैलासीं बैसले । शिवरूप होउनी ॥ १४ ॥ एक इंद्रलोकीं इंद्र जाहले । एक पितृलोकीं मिळाले । एक उडुगणीं[4] बैसले । एक ते क्षीरसागरीं ॥ १५ ॥ सलोकता समीपता । स्वरूपता सायुज्यता । या चार मुक्ति तत्वतां । इच्छा सेवून राहिले ॥ १६ ॥ ऐसे सिद्ध साधु संत । स्वहितीं प्रवर्तले अनंत । ऐसा हा नरदेह विख्यात । काय म्हणोनि वर्णावा ॥ १७ ॥ या नरदेहाचेनि आधारें । नाना साधनांचेनि द्वारें । मुख्य सारासारविचारें । बहुत सुटले ॥ १८ ॥ या नरदेहाचेनि संबंधें । बहुत पावले उत्तम पदें । अहंता सोडोनि स्वानंदें । सुखी जाहले ॥ १९ ॥ नरदेहीं येऊनि सकळ । ऊर्ध्वगति पावले केवळ । एथें संशयाचें मूळ । खंडोनि गेलें ॥ २० ॥ पशुदेहीं नाहीं गती । ऐसें सर्वत्र बोलती । म्हणोनि नरदेहींच प्राप्ती । परलोकाची ॥ २१ ॥ संत महंत ऋषि मुनि । सिद्ध साधु समाधानी । भक्त मुक्त ब्रह्मज्ञानी । विरक्त योगी तपस्वी ॥ २२ ॥ तत्त्वज्ञानी योगाभ्यासी । ब्रह्मचारी दिगंबर संन्यासी । पिंडज्ञानी षट्दर्शनी[5] तापसी । नरदेहींच जाहले ॥ २३ ॥ म्ह

---

१. सिंह, व्याघ्र इत्यादिकांवर. २. निर्जीव पदार्थ. ३. निश्चयी. ४. नक्षत्रांच्या समुदायांत. ५. न्याय, वैशेषिक, सांख्य, पातंजल, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा अशीं सहा शास्त्रें जाणणारे.

णोन नरदेहचि श्रेष्ठ । नाना देहांमध्यें वरिष्ठ । जयाचेनि चुके आरिष्ट । यमयातनेचें ॥ २४ ॥ नरदेह हा स्वाधीन । सहसा नव्हे पराधीन । परंतु हा परोपकारीं झिजवून । कीर्तिरूपें उरवावा ॥ २५ ॥ अश्व वृषभ गाई म्हैसी । नाना पशु स्त्रिया दासी । कृपाळूपणें सोडितां त्यांसी । कोणी तरी धरील ॥ २६ ॥ तैसा नव्हे नरदेहो । इच्छा जावो अथवा राहो । परी यास कोणी पहा हो । बंधन करूं शकेना ॥ २७ ॥ नरदेह पांगुळ असता । तरी तो कार्यास न येता । अथवा थोंटा जरी असता । तरी परोपकारास न ये ॥२८॥ नरदेह अंध आसिला । तरी तो निपट वायां गेला । अथवा बधिर जरी आसिला । तरी निरूपण नाहीं ॥ २९ ॥ नरदेह आसिला मुका । तरी घेतां न ये आशंका । अशक्त रोगी नासका । तरी तो निष्कारण ॥३०॥ नरदेह असिला मूर्ख । अथवा फेंपऱ्या समंधाचें दुःख । तरी तो जाणावा निरर्थक । निश्चयेंसी ॥ ३१ ॥ इतुकेंही नसतां व्यंग । नरदेह आणि सकळ सांगे[१] । तेणें धरावा परमार्थमार्ग । लागवेगें[२] ॥ ३२ ॥ सांग नरदेह जोडला । आणि परमार्थबुद्धि विसरला । तरी मूर्ख कैसा भ्रमला । मायाजाळीं ॥३३॥ मृत्तिका खणोनि घर केलें । तें माझें असें दृढ कल्पिलें । परी हें बहुतांचें कळलें । नाहींच तयासी ॥ ३४ ॥ मूषक[३] म्हणती घर आमुचें । पाली म्हणती घर आमुचें । माक्षिका म्हणती घर आमुचें । निश्चयेंसी ॥ ३५ ॥ कांतण्या[४] म्हणती घर आमुचें । मुंगळे म्हणती घर आमुचें । मुंग्या म्हणती घर आमुचें । निश्चयेंसी ॥ ३६ ॥ विंचू म्हणती आमुचें घर । सर्प म्हणती आमुचें घर । झुरळें म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ ३७ ॥ भ्रमर म्हणती आमुचें घर । भिंगोऱ्या[५] म्हणती आमुचें घर । आळिका[६] म्हणती आमुचें घर । काष्ठामध्यें ॥३८॥ मार्जारें म्हणती आमुचें घर । श्वानें म्हणती आमुचें घर । मुंगुसें म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ ३९ ॥ ढेंकूण म्हणती आमुचें घर । चांचणें म्हणती आमुचें घर । घुंगरडीं म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ ४० ॥ पिंगूळ म्हणती आमुचें घर । व्याळें[७] म्हणती आमुचें घर । पिसुवा म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ ४१ ॥ पिसोळे म्हणती आमुचें

१. सर्व अवयवांनीं युक्त. २. अति त्वरेनें. ३. उंदोर. ४. कोळ्याच्या जातीचा एक लहान किडा. ५. भ्रमरीची आळी. ६. कीड. ७. सर्प.

घर । गांधले म्हणती आमुचें घर । सोट म्हणती आमुचें घर । आणि गोमी ॥ ४२ ॥ बहुत किड्यांचा जोजार[१] । किती सांगावा विस्तार । समस्त म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ ४३ ॥ पाहुणे म्हणती आमुचें घर । मित्र म्हणती आमुचें घर । ग्रामस्थ म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥४४॥ पशु म्हणती आमुचें घर । दासी म्हणती आमुचें घर । घरचीं म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ ४५ ॥ तस्कर म्हणती आमुचें घर । राजकीय म्हणती आमुचें घर । अग्नि म्हणे आमुचें घर । भस्म करूं ॥ ४६ ॥ समस्त म्हणती घर माझें । हें मूर्खही म्हणे माझें माझें । शेवटीं जड जाहलें वोझें । टाकिला देश ॥ ४७ ॥ अवघीं घरें भंगलीं । गांवाची पांढरी[२] पडली । मग ते गृहीं राहिलीं । अरण्यश्वापदें ॥ ४८ ॥ किडा मुंगी वाळवी मूषक । त्यांचें घर निश्चयात्मक । हें प्राणी बापुडें मूर्ख । निघोनि गेलें ॥ ४९ ॥ ऐसी गृहाची स्थिती । मिथ्या आली आत्मप्रतीती । जन्म दों दिवसांची वस्ती । कोठें तरी करावी ॥ ५० ॥ देह म्हणावें आपुलें । तरी तें बहुतांकारणें निर्मिलें । प्राणियांच्या माथां घर केलें । उवा मस्तकीं भक्षिती ॥ ५१ ॥ रोममुळीं किडे भक्षिती । खांडूक झाल्या किडे पडती । पोटामध्यें जंत होती । प्रत्यक्ष प्राणियांच्या ॥ ५२ ॥ कीड लागे दांतासी । कीड लागे डोळयांसी । कीड लागे कर्णासी । आणि गोमाशा भरती ॥ ५३ ॥ गोचिड अशुद्ध[३] सेविती । चामवा मांसांत घुसती । पिसोळे चावून पळती । अकस्मात ॥ ५४ ॥ भुंगे गांधले चाविती । गोमी जळवा अशुद्ध[३] घेती । विंचू सर्प दंश कारिती । कानटें[४] फुर्शी ॥ ५५ ॥ जन्मोन देह पाळिलें । तें अकस्मात व्याघ्रें नेलें । कीं तें लांडगेंचि भक्षिलें । बलात्कारें ॥ ५६ ॥ मूषकमार्जारें दंश कारिती । श्वानें अश्वें लोळे[५] तोडिती । रिसें[६] मर्कटें मारिती । कासावीस करूनियां ॥ ५७ ॥ उंष्ट्रं[७] डसोन उचलिती । हस्ती चिरडोनि टाकिती । वृषभं[८] टोंचोन मारिती । अकस्मात ॥ ५८ ॥ तस्कर तडतडां तोडिती । भुतें झडपोन मारिती । असो या देहाची स्थिती । ऐसी आहे ॥ ५९ ॥ ऐसें शरीर बहुतांचें । हें मूर्ख म्हणे आमुचें । परंतु खाजें[९] जिवांचें ।

---

१. जंजाळ. २. लोकवस्ती; गांव ओस झाला हा अर्थ. ३. रक्त. ४. एक जातीचे जंतु. ५. लादे, मांसाचे तुकडे. ६. अस्वलें. ७. उंट. ८. बैल. ९. खाद्य.

तापत्रयीं बोलिलें ॥ ६० ॥ देह परमार्थी लाविलें । तरीच याचें सार्थक जाहलें । नाहीं तरी व्यर्थचि गेलें । नाना आघातें मृत्युपंथें ॥ ६१ ॥ असो जे प्रापंचिक मूर्ख । ते काय जाणती परमार्थसुख । त्या मूर्खांचें लक्षण कांहींएक । पुढें बोलिलें असे ॥ ६२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रथमदशके नरदेहस्तवनं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी ३२६.

---

# दशक दुसरा.

## १. मूर्खलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ ॐनमोजी गजवदना । एकदंता त्रिनयना । कृपादृष्टीं भक्तजना । अवलोकावें ॥ १ ॥ तुज नमूं वेदमाते । श्रीशारदे ब्रह्मसुते । अंतरीं वसें कृपावंते । स्फूर्तिरूपें[2] ॥ २ ॥ वंदूनि सद्गुरुचरण । करूनि रघुनाथस्मरण । त्यागार्थ मूर्खलक्षण । बोलिजेल ॥३॥ एक मूर्ख एक पढतमूर्ख । उभय लक्षणीं कौतुक । श्रोतीं सादरें विवेक । केला पाहिजे ॥ ४ ॥ पढतमूर्खाचें लक्षण । पुढिले समासीं निरूपण । सावध होऊनि विचक्षण । परिसोत पुढें ॥ ५ ॥ आतां प्रस्तुत विचार । लक्षणें सांगतां अपार । परी कांहीं एक तत्पर । होऊनि ऐका ॥ ६ ॥ जे प्रापंचिक जन । जयांसि नाहीं आत्मज्ञान । जे केवळ अज्ञान । त्यांचीं हीं लक्षणें ॥ ७ ॥ जन्मला जयांचे उदरीं । तयांसि जो विरोध करी । सखी मानिली अंतुरी[3] । तो एक मूर्ख ॥ ८ ॥ सांडोनि सर्वहि गोत । स्त्रिये आधीन जीवित । सांगे अंतरींची मात । तो एक मूर्ख ॥ ९ ॥ परस्त्रियेसी प्रेम धरी । श्वशुरगृहीं वास करी । कुळेंविण कन्या वरी । तो एक मूर्ख ॥ १० ॥ समर्थावरी अहंता । अंतरीं मानी समता । सामर्थ्येंविण करी सत्ता । तो एक मूर्ख ॥ ११ ॥ आपली

---

१. तापत्रयनिरूपणांत. (दशक ३, समास ६।७।८ पहा.) २. ग्रंथलेखनाच्या स्फुरणरूपानें ३. स्त्री.

आपण करी स्तुती । स्वदेशीं भोगी विपत्ती । सांगे वडिलांची कीर्ती । तो एक मूर्ख ॥ १२ ॥ अकारण हास्य करी । विवेक सांगतां न धरी । जो बहुतांचा वैरी । तो एक मूर्ख ॥ १३ ॥ आपुलीं धरूनियां दुरी । पराव्यांसी मैत्री करी । परन्यून बोले अहोरात्रीं । तो एक मूर्ख ॥ १४ ॥ बहुत जागते जन । तयांमध्यें करी शयन । परस्थळीं बहु भोजन । करी तो एक मूर्ख ॥ १५ ॥ मान अथवा अपमान । स्वयें करी परिच्छिन्न[1] । सदा व्यसनीं जयाचें मन । तो एक मूर्ख ॥ १६ ॥ धरूनि पराची आस । प्रयत्न सांडी सावकाश । निसुगाईचा[2] संतोष । मानी तो एक मूर्ख ॥ १७ ॥ घरीं विवेक उमजे । आणि सभेमध्यें लाजे । शब्द बोलतां निर्बुजे[3] । तो एक मूर्ख ॥ १८ ॥ नायके त्यास शिकवी । वडिलांसि जाणीव दावी । जो सात्विकांसि गोंवी[4] । तो एक मूर्ख ॥ १९ ॥ आपणाहून जो श्रेष्ठ । तयासि अत्यंत निकट । शिकवणीचा मानी वीट । तो एक मूर्ख ॥ २० ॥ एकाएकीं एकसरा । जाहला विषयीं निलाजिरा । मर्यादा सांडोनि सैरा[5] । वर्ते तो एक मूर्ख ॥ २१ ॥ औषध न घे असोनि व्यथा । पथ्य न करी सर्वथा । न मिळे आलिया पदार्था । तो एक मूर्ख ॥ २२ ॥ संगेंविण विदेश[6] करी । वोळखीविण संग धरी । उडी घाली महापुरीं । तो एक मूर्ख ॥ २३ ॥ आपणासि जेथें मान । तेथें अखंड करी गमन । रक्षूं नेणे मानाभिमान । तो एक मूर्ख ॥ २४ ॥ सेवक जाहला लक्ष्मीवंत । तयाचा होय अंकित । सर्वकाळ जो दुश्चित । तो एक मूर्ख ॥ २५ ॥ विचार न करितां कारण । दंड करी अपराधाविण । स्वल्पासाठीं जो कृपण । तो एक मूर्ख ॥ २६ ॥ देवलंड पितृलंड । शक्तीविण करितो दंड । ज्याचे मुखीं भंडउभंड[7] । तो एक मूर्ख ॥ २७ ॥ घरींच्यावरी खाय दाढा । बाहेर दीन बापुडा । ऐसा जो कां मूढ वेडा । तो एक मूर्ख ॥ २८ ॥ नीच यातीसि सांगात । परांगनेसि एकांत । मार्गीं जाय खात खात । तो एक मूर्ख ॥ २९ ॥ स्वयें नेणे परोपकार । उपकाराचा अनुपकार । करी थोडें बोले फार । तो एक मूर्ख ॥ ३० ॥ तापिळ[8] खादाड आळसी । कुश्चिळ[9] कुटिळ[10] मानसीं । धारिष्ट नाहीं जयापाशीं । तो एक मूर्ख

१. उघड. २. आळसाचा, किंवा निर्लज्जपणाचा. ३. घाबरतो. ४. पीडा करी. ५. स्वैर. ६. प्रवास ७. बडबड. ८. तापट. ९. दुष्ट स्वभावी १०. कपटी.

॥ ३१ ॥ विद्या वैभव ना धन । पुरुषार्थ सामर्थ्य ना मान । कोरडाच वाहे अभिमान । तो एक मूर्ख ३२ ॥ लंडी लटिका लबाड । कुकर्मी कुटिल निचाड । निद्रा जयाची वाड । तो एक मूर्ख ॥ ३३ ॥ दंत चक्षु आणि घ्राण पाणी वसन आणि चरण । सर्वकाळ जयाचे मलिन । तो एक मूर्ख ॥ ३४ ॥ उंचीं जाऊनि वस्त्र नेसे । चौबारां बाहेरि बैसे । सर्वकाळ नग्न दिसे । तो एक मूर्ख ॥ ३५ ॥ वैधृति आणि व्यतिपात । नाना कुमुहूर्तें जात । अपशकुनें करी घात । तो एक मूर्ख ॥ ३६ ॥ क्रोध अभिमान कुबुद्धी आपणासि आपण वधी । जयासि नाहीं दृढ बुद्धी । तो एक मूर्ख ॥ ३७ ॥ जिवलगांसी परम खेदी । सुखाचा शब्द तोही नेदी । नीच जनांसि वंदी । तो एक मूर्ख ॥ ३८ ॥ आपणासि राखे नानापरी । शरणागतासि अव्हेरी । लक्ष्मीचा भरंवसा धरी । तो एक मूर्ख ॥ ३९ ॥ पुत्र कलत्र आणि दारा । इतु-काचि मानूनियां थारा । विसरोन गेला ईश्वरा । तो एक मूर्ख ॥४०॥ जैसें जैसें करावें । तैसें तैसें पावावें । हें जयासी नेणवे । तो एक मूर्ख ॥ ४१ ॥ पुरुषाचेनि अष्टगुणें । स्त्रियांसी ईश्वरी देणें । ऐशा केल्या बहुत जेणें । तो एक मूर्ख ॥ ४२ ॥ दुर्जनाचेनि बोलें । मर्यादा सांडोनि चाले । दिवसा झांकिले डोळे । तो एक मूर्ख ॥ ४३ ॥ देवद्रोही गुरुद्रोही । मातृद्रोही पितृद्रोही । ब्रह्मद्रोही स्वामीद्रोही । तो एक मूर्ख ॥ ४४ ॥ आदरेंविण बोलणें । न पुसतां साक्ष देणें । निंद्य वस्तु अंगिकारणें । तो एक मूर्ख ॥ ४५ ॥ तुर्क तोडोनि बोले । मार्ग सोडोनि चाले । कुकर्मी मित्र केले । तो एक मूर्ख ॥ ४६ ॥ परपीडेचें मानी सुख । परसंतोषाचें मानी दुःख । गेले वस्तूचा करी शोक । तो एक मूर्ख ॥ ४७ ॥ पर्त राखों नेणें कदा । विनोद करी सर्वदा । हांसतां खिजे पेटे द्वंद्वा । तो एक मूर्ख ॥ ४८ ॥ होर्ड घाली अवघड । काजेंविण करी बडबड । बोलोंचि नेणे मुखजड । तो एक मूर्ख ॥ ४९ ॥ वस्त्र शास्त्र दोनी नसे । उंचस्थानीं जाऊनि बैसे । जो गोत्रजांसि विश्वासे । तो एक मूर्ख ॥ ५० ॥ तस्करासी वोळखी सांगे । देखिली वस्तु तेचि मागे । आपुलें अनहित करी रागें । तो एक मूर्ख ॥ ५१ ॥ हीन जनांसि बरोबरी । बोल

१. निर्लज्ज. २. अतिशय. ३. हात ४. चवाठा. ५. कामविकार. ६. वजन, महत्व. ७. झोंबी करण्यास. ८. पैज.

बोले सरोत्तरीं[1] । वामहस्तें प्राशन करी । तो एक मूर्ख ॥ ५२ ॥ समर्थासीं मत्सर धरी । अलभ्य वस्तूचा हेवा[2] करी । घरींच्या घरीं करी चोरी । तो एक मूर्ख ॥ ५३ ॥ सांडोनियां जगदीशा । मनुष्याचा मानी भरंवसा । सार्थकेंविण वेंची वयसा । तो एक मूर्ख ॥ ५४ ॥ संसारदुःखाचेनि गुणें । देवासी गाळी देणें । मैत्राचे बोले उणें । तो एक मूर्ख ॥ ५५ ॥ अल्प अन्याय क्षमा न करी । सर्वकाळ धारकीं[3] धरी । जो विश्वासघात करी । तो एक मूर्ख ॥ ५६ ॥ समर्थाचे मनींचा तुटे । जयाचेनि सभा विटे । क्षणीं बरा क्षणीं पालटे । तो एक मूर्ख ॥ ५७ ॥ बहुत दिवसांचे सेवक । त्यागून ठेवी आणिक । ज्याची सभा निर्नायक । तो एक मूर्ख ॥ ५८ ॥ अनीतीनें द्रव्य जोडी । धर्म नीति न्याय सोडी । संगतीचें मनुष्य तोडी । तो एक मूर्ख ॥ ५९ ॥ घरीं असोनि सुंदरी । जो सदा परद्वार करी । बहुतांचें उच्छिष्ट अंगिकारी । तो एक मूर्ख ॥ ६० ॥ आपलें अर्थ[4] दुसऱ्यापाशीं । आणि दुसऱ्याचें अभिलाषी । पर्वतें[5] करी हीनासी । तो एक मूर्ख ॥ ६१ ॥ अतीताचा[6] अंत पाहे । कुग्रामामध्यें राहे । सर्वकाळ चिंता वाहे । तो एक मूर्ख ॥ ६२ ॥ दोघे बोलत असती जेथें । तिसरा जाऊन बैसे तेथें । डोई खाजवी दोहीं हातें । तो एक मूर्ख ॥ ६३ ॥ उदकामध्यें सांडी गुरळी[7] । पायें पाय खांजोळी । सेवा करी हीन कुळीं । तो एक मूर्ख ॥ ६४ ॥ स्त्री-बाळकांस सलगी देणें । पिशाचासन्निध बैसणें । मर्यादेविण पाळी सुणें[8] । तो एक मूर्ख ॥ ६५ ॥ परस्त्रीशीं कलह करी । मुकी वस्तु[9] निवातें मारी । मूर्खाची संगति धरी । तो एक मूर्ख ॥ ६६ ॥ कलह पाहत उभा राहे । सोडवीना कौतुक पाहे । खरें असतां खोटें साहे । तो एक मूर्ख ॥ ६७ ॥ लक्ष्मी आलियावरी । जो मागील ओळखी न धरी । देवीं ब्राह्मणीं सत्ता करी । तो एक मूर्ख ॥ ६८ ॥ आपुलें कार्य होय तोंवरी । बहुसाल नम्रता धरी । पुढिलांचें[10] कार्य न करी । तो एक मूर्ख ॥ ६९ ॥ अक्षरें गाळून वाची । कांहीं घाली पदरींचीं । निगा न करी पुस्तकाची । तो एक मूर्ख ॥ ७० ॥ आपण वाचीना कधीं । कोणासि वाचाया नेदी । बांधोनि ठेवी बंदीं । तो

१. उत्तरास उत्तर असे. २. हांव. ३. धारेवर धरतो, त्रास देतो. ४. द्रव्य, ठेव. ५. देणें घेणें. ६. याचकाचा. ७. गुळणी. ८. कुत्रें. ९. प्राणी. १० दुसऱ्याचें.

एक मूर्ख ॥ ७१ ॥ ऐसीं हीं मूर्खलक्षणें । श्रवणें चातुर्य बाणे । चित्त देऊनियां शाहणे । ऐकती सदा ॥ ७२ ॥ लक्षणें अपार असती । परी कांहीं एक यथामती । त्यागार्थ बोलिलों श्रोतीं । क्षमा केली पाहिजे ॥ ७३ ॥ उत्तम लक्षणें घ्यावीं । मूर्खलक्षणें त्यागावीं । पुढिले समासीं आघवीं । निरूपिलीं ॥ ७४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वितीयदशके मूर्खलक्षणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. उत्तमलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रोतीं व्हावें सावधान । आतां सांगतों उत्तम गुण । जेणेंकरितां बाणे खुण । सर्वज्ञपणाची ॥ १ ॥ वाट पुसल्याविण जाऊं नये । फळ वोळखिल्याविण खाऊं नये । सांपडली वस्तु घेऊं नये । एकाएकीं ॥ २ ॥ अतिवाद करूं नये । पोटीं कपट धरूं नये । शोधिल्याविण करूं नये । कुळहीन कांता ॥३॥ विचारेंविण बोलूं नये । मर्यादेविण हालूं नये । विवंचनेविणें[1] चालूं नये । कांहीं केल्या ॥ ४ ॥ प्रीतीविण रुसूं नये । चोरासि वोळखी पुसूं नये । रात्रीं पंथ क्रमूं नये । एकाएकीं ॥ ५ ॥ जनीं आर्जव तोडूं नये । पापद्रव्य जोडूं नये । पुण्यमार्ग सोडूं नये । कदाकाळीं ॥ ६ ॥ निंदाद्वेष करूं नये । असत्संग धरूं नये । द्रव्यदारा हरूं नये । बलात्कारें ॥ ७ ॥ वक्तयास खंडूं नये । ऐक्यतेसि फोडूं नये । विद्याभ्यास सोडूं नये । कांहीं केल्या ॥ ८ ॥ तोंडाळासि भांडूं नये । वाचाळासि तंडूं नये । संतसंग खंडूं नये । अंतर्यामीं ॥ ९ ॥ अतिक्रोध करूं नये । जिवलगासि खेदूं नये । मनीं वीट मानूं नये । शिकवणीचा ॥ १० ॥ क्षणक्षणा रुसूं नये । लटिका पुरुषार्थ बोलूं नये । केल्याविण सांगूं नये । आपुला पराक्रम ॥ ११ ॥ बोलिला बोल विसरूं नये । प्रसंगीं सामर्थ्य चुकूं नये । केल्याविण निखंदूं[2] नये । पुढिलांसी कदा ॥ १२ ॥ आळसें सुख मानूं नये । चहाडी मनासी आणूं नये । शोधिल्याविण करूं नये । कार्य कांहीं ॥ १३ सुखा अंग देऊं नये । प्रयत्न पुरुषें सांडूं नये । कष्ट करितां त्रासूं नये । निरंतर ॥ १४ ॥ सभेमध्यें लाजूं नये । बाष्कळपणें बोलूं नये । पैज होड

---

१. विचार केल्यांशिवाय. २. तिरस्कार अथवा धिक्कार करूं नये.

घालूं नये । कांहीं केल्या ॥ १५ ॥ बहुत चिंता करूं नये । निःसंगपणें राहूं नये । परस्त्रीतें पाहूं नये । पापबुद्धीं ॥ १६ ॥ कोणाचा उपकार घेऊं नये । घेतला तरी राखूं नये । परपीडा करूं नये । विश्वासघात ॥ १७ ॥ शौचेंविण असूं नये । मळिण वस्त्र नेसूं नये । जाणारासी पुसूं नये । कोठें जातोसि म्हणोनि ॥ १८ ॥ व्यापकपण[१] सोडूं नये । पराधीन होऊं नये । आपलें ओझें घालूं नये । कोणी एकासी ॥ १९ ॥ पत्रेंविणें[२] पर्वतें करूं नये । हीनाचें ऋण घेऊं नये । ग्वाहीविण[३] जाऊं नये । राजद्वारीं ॥ २० ॥ लटकी जाजूं[४] घेऊं नये । सभेसि लटिकें करूं नये । आदर नसतां बोलूं नये । स्वाभाविक ॥ २१ ॥ अदेखणेंपण करूं नये । अन्यायाविण गांजूं नये । अनीतिनें वर्तूं नये । अंगबळें ॥ २२ ॥ बहुत अन्न खाऊं नये । बहुत निद्रा करूं नये । बहुत दिवस राहूं नये पिशुनांचे[५] येथें ॥ २३ ॥ आपुल्याची ग्वाही देऊं नये । आपुली कीर्ति वर्णूं नये । आपलें आपण हासूं नये । गोष्टी सांगोनि ॥ २४ ॥ धूम्रपान घेऊं नये । उन्मत्त[६] द्रव्य सेवूं नये । बहुचकांशीं[७] करूं नये । मैत्री कदा ॥ २५ ॥ कामेंविण कोठें राहूं नये । नीच उत्तर साहूं नये । आसुदें[८] अन्न सेवूं नये । वडिलांचें ॥ २६ ॥ तोंडीं शिवी असूं नये । दुसऱ्यासि देखोन हासूं नये । उणें अंगीं संचारूं नये । कुळवंतानें ॥ २७ ॥ देखिली वस्तु चोरूं नये । बहुत कृपण होऊं नये । जिवलगासी करूं नये । कलह कदा ॥ २८ ॥ कोणाचा घात करूं नये । लटकी ग्वाही देऊं नये । अप्रमाण वर्तूं नये । कदाकाळीं ॥ २९ ॥ चहाडी चोरी धरूं नये । परद्वार करूं नये । मागें उणें बोलूं नये । कोणी एकाचें ॥ ३० ॥ समयीं धीवा[९] चूकूं नये । सत्वगुण सांडूं नये । वैरियास दडूं नये । शरण आलिया ॥ ३१ ॥ अल्प धनें माजूं नये । हरिभक्तीसि लाजूं नये । मर्यादेविण चालूं नये । पवित्र जनीं ॥ ३२ ॥ मूर्खासि संबंध पाडूं नये । अंधारीं हात घालूं नये । दुश्चितपणें विसरूं नये । वस्तु आपुली ॥ ३३ ॥ स्नान संध्या सांडूं नये । कुलाचार खंडूं नये । अनाचार मांडूं नये । कुचरपणें ॥ ३४ ॥ हरिकथा सांडूं नये । निरूपण तोडूं नये । परमार्थासि मोडूं नये । प्रपंचबळें ॥ ३५ ॥ दे-

---

१. उद्योगीपणा. २. लेखावांचून देणें घेणें. ३. साक्षीवांचून. ४. आळ. ५. दुर्जनाचे, चहाडखोराचे. ६. मादक. ७. वाचाळ. ८. आयतें. ९. धैर्य.

वाचा नवस बुडवूं नये । आपुला धर्म उडवूं नये । भलते भरीं पडूं नये । विचारेंविण ॥ ३६ ॥ निष्ठुरपण धरूं नये । जीवहत्या करूं नये । पाऊस देखोन जाऊं नये । अथवा अवकाळीं ॥ ३७ ॥ सभा देखोनि गळूं नये । समयीं उत्तर टळूं नये । धिक्कारितां ढळूं नये । धारिष्ट आपुलें ॥ ३८ ॥ गुरुविरहित असूं नये । नीच यातीचा गुरु करूं नये । जिणें शाश्वत मानूं नये । वैभवेंसी ॥ ३९ ॥ सत्य मार्ग सोडूं नये । असत्य पंथें जाऊं नये । कदा अभिमान घेऊं नये । असत्याचा ॥ ४० ॥ अपकीर्ति सोडावी । सत्कीर्ति वाढवावी । विवेकें दृढ धरावी । वाट सत्याची ॥ ४१ ॥ न घेतां हे उत्तम गुण । तो मनुष्य अवलक्षण । ऐक त्याचें लक्षण । पुढिलिये समासीं ॥ ४२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वितीयदशके उत्तमलक्षणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. कुविद्यालक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका कुविद्येचीं लक्षणें । अतिहीन कुलक्षणें । त्यागार्थ बोलिलों श्रवणें । त्याग घडे ॥ १ ॥ ऐका कुविद्येचे प्राणी । जन्मा येऊनि केली हानी । सांगिजेल इहीं लक्षणीं । श्रोतीं ओळखावा ॥ २ ॥ कुविद्येचा प्राणी असे । तो कठिण निरूपणीं त्रासे । अवगुणांची समृद्धि असे । ह्मणोनियां ॥ ३ ॥ श्लोक ॥ दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च । अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम्[१] ॥ टी० ॥ काम क्रोध मद मत्सर । लोभ दंभ तिरस्कार । गर्व ताठा अहंकार । द्वेष विवाद विकल्पी ॥ ४ ॥ आशा ममता तृष्णा कल्पना । चिंता अहंता कामना भावना । असूया[२] अविद्या ईषणा[३] वासना । अतृप्ति लोलंगता[४] ॥ ५ ॥ इच्छा वांच्छा चिकित्सा निंदा । अनीति ग्रामणी[५] मस्ती सदा । जाणीव अवज्ञा विपत्ती आपदा । दुर्वृत्ति दुर्वासना ॥ ६ ॥ स्पर्धा खटपट आणि चटपट । नव्हे झटपट आणि वटवट । सदा खटनट[६] आणि लटपट । परम व्यथा आणि कुविद्या ॥७॥ कुरूप आणि कुलक्षण । अशक्त आणि दुर्जन । दरिद्री आणि कृपण । अतिशयेंसी ॥८॥ आळसी आणि खादाड । दुर्बळ आणि लाताड । तुटक आणि लबाड ।

१. गी.अ.१६. २.मत्सर. ३.इच्छा. ४.लुब्धपणा. ५.हरामी. ६.शठ व नष्ट.

अतिशयेंसी ॥ ९ ॥ मूर्ख आणि तपिळ[१] । वेडें आणि वाचाळ । लटिकें आणि तोंडाळ । अतिशयेंसी ॥ १० ॥ नेणे आणि नायके । न ये आणि न शिके । न करी आणि न देखे । अभ्यासदृष्टीं ॥ ११ ॥ अज्ञान आणि अविश्वासी । छळवादी आणि दोषी । अभक्त आणि भक्तासी । देखों शकेना ॥१२॥ पापी आणि निंदक । कष्टी आणि घातक । दुःखी आणि हिंसक । अतिशयेंसी ॥ १३ ॥ हीन आणि कृत्रिमी । रोगी आणि कुकर्मी । अमंगल आणि अधर्मी । वासना रमे ॥ १४ ॥ नीच देह आणि ताठा । अप्रमाण आणि फांटा । बाष्कळ आणि करंटा । विवेक सांगे ॥ १५ ॥ लंडी आणि उन्मत्त । निष्कामी आणि डुल्लत । भ्याड आणि बोलत । पराक्रम ॥ १६ ॥ कनिष्ठ आणि गर्विष्ठ । न पुरतें आणि नष्ट । द्वेषी आणि भ्रष्ट । अतिशयेंसी ॥ १७ ॥ अभिमानी आणि निःसंगळ[२] । वोडगस्त आणि खळ । दांभिक आणि अनर्गळ[३] । अतिशयेंसी ॥ १८ ॥ वोखटें आणि विकारी । खोटें आणि अनुपकारी । अवलक्षण आणि धिक्कारी । प्राणिमात्रांसी ॥ १९ ॥ अल्पमति आणि वादक । दीनरूप आणि भेदक । सूक्ष्मरूप आणि त्रासक । कुशब्दें करूनी ॥ २० ॥ कठीणवचनी कर्कशवचनी । कापट्यवचनी संदेहवचनी । दुःखवचनी तीव्रवचनी । क्रूर निष्ठुर दुरात्मा ॥ २१ ॥ न्यूनवचनी पैशून्यवचनी । अशुभवचनी अनित्यवचनी । द्वेषवचनी अनृतवचनी । बाष्कळवचनी धिक्कारी ॥ २२ ॥ कपटी कुटिल गांठ्याळ । कुरटें कुचर नाठाळ । कोपी कुधन टवाळ । अतिशयेंसी ॥ २३ ॥ तपिळ तामसी अविचार । पापी अनर्थी अपस्मार । भूतसमंधी संचार । अंगीं वसे ॥ २४ ॥ आत्महत्यारा स्त्रीहत्यारा । गोहत्यारा ब्रह्महत्यारा । मातृहत्यारा पितृहत्यारा । महापापी पतित ॥ २५ ॥ उणें कुपात्र कुतर्की । मित्रद्रोही विश्वासघातकी । कृतघ्न गुरुतल्पी[४] नरकी[५] । आततायी जल्पक ॥ २६ ॥ नित्य भांडण झगडा कलह । अधर्म अनराहाटी[६] शोकसंग्रह । चाहाड व्यसनी विग्रहें[७] । निग्रहकर्ता ॥ २७ ॥ द्वाड अपेशी वोंगळ । चाळक चुंबक लचाळ । स्वार्थी अभिलाषी वोढाळ । अदत्त झोंड अदेखणा ॥ २८ ॥ शठ शुंभ कातरु[८] । लंड तरमुंडे सितरु[९][१०][११] । बंड पाखांड

१. तापट. २. निर्लज्ज. ३. स्वच्छंद. ४. गुरुपत्नीशीं जाणारा. ५. नरकांत पडणारा. ६. कुमार्ग. ७. भांडण. ८. कृपण. ९. भित्रा १०. घुसणारा. ११. ठक.

तस्करु । अपहारकर्ता ॥ २९ ॥ धीट सैराट मोकाट । चाट चावट वाजट[1] । थोंटे[2] उद्धट लंपट । बटवाळ[3] कुबुद्धि ॥ ३० ॥ मारेकरी वरपेकरी[4]। दरवडेकरी खोणोरी[5] । मैंद भोंदु परद्वारी । भुरेकरी[6] चेटकी ॥ ३१ ॥ निःशंक निलाजिरा कैंळभंट । टोणपा लौंद धट उद्धट । ठेंस ठोंबस[9] खटनट । जगभांड विकारी ॥ ३२ ॥ अधीर आळकी अनाचारी । अंध पंगु खोकलेकरी । थोंटा बधिर दमेकरी । तरी ताठा न सांडी ॥ ३३ ॥ विद्याहीन वैभवहीन । कुळहीन लक्ष्मीहीन । शक्तिहीन सामर्थ्यहीन । अदृष्टहीन[11] भिकारी ॥ ३४ ॥ बळहीन कळाहीन । मुद्राहीन दीक्षाहीन । लक्षणहीन लावण्यहीन । अंगहीन विपारी[12] ॥ ३५ ॥ युक्तिहीन बुद्धिहीन । क्रियाहीन सत्वहीन । आचारहीन विचारहीन । विवेकहीन संशयी ॥ ३६ ॥ भक्तिहीन भावहीन । ज्ञानहीन वैराग्यहीन । शांतिहीन क्षमाहीन । सर्वहीन क्षुल्लक ॥ ३७ ॥ समय नेणे प्रसंग नेणे । प्रयत्न नेणे अभ्यास नेणे । आर्जव नेणे मैत्रिकी नेणे । कांहींच नेणे अभागी ॥ ३८ ॥ असो ऐसे नाना विकार । कुलक्षणांचें कोठार । ऐसे कुविद्येचे नर । श्रोतीं वोळखावे ॥ ३९ ॥ ऐसीं कुविद्येचीं लक्षणें । ऐकोनि त्यागाचि करणें । अभिमानें त्न्हे[13] भरणें[13] हें विहित नव्हे ॥ ४० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वितियदशके कुविद्यालक्षणं नाम तृतीयः समाप्तः ॥ ३ ॥

---

## ४. भक्तिनिरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ नाना सुकृतांचें फळ । तो हा नरदेह केवळ । त्याहीमध्यें भाग्य सफळ । तरीच सन्मार्ग लागे ॥ १ ॥ नरदेहीं विशेष ब्राह्मण । त्याहीवरी संध्या स्नान । सद्वासना भगवद्भजन । घडे पूर्वपुण्यें ॥ २ ॥ भगवद्भक्ति हे उत्तम । त्याहीवरी सत्समागम । काळ सार्थक हाचि परम लाभ जाणावा ॥३॥ प्रेमप्रीतीचा सद्भाव । आणि भक्तांचा समुदाव । हरिकथा महोत्सव । तेणें प्रेम दुणावे ॥ ४ ॥ नरदेहीं आलिया एक । कांहीं करावें सार्थक । जेणें पाविजे परलोक । परम दुर्लभ जो ॥ ५ ॥ विधियुक्त

---

१. वात्रट. २. कुभांडी. ३. भ्रष्ट. ४. लुटारू. ५. काळीजखाऊ. ६. भुरळ पाडणारा. ७. कळ काढणारा. ८. ताठर. ९. ठोंब्या. १०. हावरा. ११. दुर्दैवी. १२. कुरूप. १३. हट्टास पेटणें.

ब्रह्मकर्म । अथवा दया दान धर्म । अथवा करणें सुगम । भजन भगवंताचें ॥ ६ ॥ अनुतापें करावा त्याग । अथवा करणें भक्तियोग । नाहीं तरी धरणें संग । साधुजनांचा ॥ ७ ॥ नाना शास्त्रें धांडोळावीं । अथवा तीर्थें तरी करावीं । अथवा पुरश्चरणें बरवीं । पापक्षयाकारणें ॥८॥ अथवा कीजे परोपकार । अथवा ज्ञानाचा विचार। निरूपणीं सारासार । विवेक करणें ॥ ९ ॥ पाळावी वेदाची आज्ञा । कर्मकांड उपासना । जेणें होइजे ज्ञाना । अधिकारपात्र ॥ १० ॥ काया वाचा आणि मनें । पत्रें पुष्पें फळें जीवनें । कांहीं तरी एक भजनें । सार्थक करावें ॥ ११ ॥ जन्मा आलियाचें फळ । कांहीं करावें सफळ । ऐसें न करितां निष्फळ ॥ भूमिभार होय ॥ १२ ॥ नरदेहाचें उचित । कांहीं करावें आत्महित । यथानुशक्त्या चित्तवित्त । सर्वोत्तमीं लावावें ॥ १३ ॥ हें कांहींच न धरी जो मनीं । तो मृतप्राय वर्ते जनीं । जन्मास येऊन तेणें जननी । वायांच कष्टविली ॥ १४ ॥ नाहीं संध्या नाहीं स्नान । नाहीं भजन देवतार्चन । नाहीं मंत्र जप ध्यान । मानसपूजा ॥ १५ ॥ नाहीं भक्ति नाहीं प्रेम । नाहीं निष्ठा नाहीं नेम । नाहीं देव नाहीं धर्म । अतीत अभ्यागत ॥ १६ ॥ नाहीं सद्‌बुद्धि नाहीं गुण । नाहीं कथा नाहीं श्रवण । नाहीं अध्यात्मनिरूपण । ऐकिलें कदा ॥ १७ ॥ नाहीं भल्याची संगती । नाहीं शुद्ध चित्तवृत्ती । नाहीं कैवल्याची[1] प्राप्ती । मिथ्या मदें ॥ १८ ॥ नाहीं नीति नाहीं न्याय । नाहीं पुण्याचा उपाय । नाहीं परत्रींची[2] सोय । युक्तायुक्त क्रिया ॥ १९ ॥ नाहीं विद्या नाहीं वैभव । नाहीं चातुर्याचा भाव । नाहीं कळा नाहीं लाघव । रम्य सरस्वतीचें ॥ २० ॥ शांति नाहीं क्षमा नाहीं । दीक्षा नाहीं मैत्री नाहीं । शुभाशुभ कांहींच नाहीं । साधनादिक ॥ २१ ॥ शुचि नाहीं स्वधर्म नाहीं । आचार नाहीं विचार नाहीं । अरत्रें[3] नाहीं परत्र[4] नाहीं । मुक्त क्रिया मनाची ॥ २२ ॥ कर्म नाहीं उपासना नाहीं । ज्ञान नाहीं वैराग्य नाहीं । योग नाहीं धारिष्ट नाहीं । कांहींच नाहीं पाहतां ॥ २३ ॥ उपरति[5] नाहीं त्याग नाहीं । समता नाहीं लक्षण नाहीं । आदर नाहीं प्रीति नाहीं । परमेश्वराची ॥ २४ ॥ परगुणाचा संतोष नाहीं । परोपकारें सुख नाहीं । हरिभक्तीचा

---

१. मोक्षाची. २. परलोकाची. ३. इहलोक ४. परलोक. ५. वैराग्य.

लेश नाहीं । अंतर्यामीं ॥ २५ ॥ ऐसे प्रकारचे पाहतां जन । ते जितचि प्रेतासमान । त्यांसी न करावें भाषण । पवित्र जनीं ॥ २६ ॥ पुण्य सामग्री पुरती । तयासीच वडे भगवद्भक्ती । जे जे जैसें संचित करिती । ते ते पावती तैसेंची ॥ २७ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वितीयदशके भक्तिनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. रजोगुणनिरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ मुळीं देह त्रिगुणांचा । सत्व-रज-तमांचा । त्यांमध्यें सत्वाचा । उत्तम गुण ॥ १ ॥ सत्वगुणें भगवद्भक्ती । रजोगुणें पुनरावृत्ती[1] । तमोगुणें अधोगती[2] । पावती प्राणी ॥ २ ॥ श्लोक ॥ ऊर्ध्वं गच्छन्ति सत्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः । जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः[3] ॥१॥ टी० ॥ त्यांतही शुद्ध आणि शबल । तेहि बोलिजेती सकळ । शुद्ध तेंचि जें निर्मल । शबलें[4] बाधक जाणावें ॥ ३ ॥ शुद्ध-शबलांचें लक्षण । सावध परिसा विचक्षण । शुद्ध तो परमार्थी जाण । शबलें[4] तो संसारिक ॥४॥ तया संसारिकाची स्थिती । देहीं त्रिगुण वर्तती । एक येतां दोनी जाती । निघोनियां ॥ ५ ॥ रज तम आणि सत्व । तेणेंचि चाले जीवित्व । रजोगुणाचें कर्तृत्व । दाखवूं आतां ॥ ६ ॥ रजोगुण येतां शरीरीं । वर्तणूक कैसी करी । सावध होऊनियां चतुरीं । परिसावें ॥ ७ ॥ माझें घर माझा संसार । देव कैंचा आणिला थोर । ऐसा करी जो निर्धार । तो रजोगुण ॥ ८ ॥ माता पिता आणि कांता । पुत्र सुना आणि दुहिता । इतुकियांची वाहे चिंता । तो रजोगुण ॥ ९ ॥ बरें खावें बरें जेवावें । बरें ल्यावें बरें नेसावें । दुसऱ्याचें अभिलाषावें । तो रजोगुण ॥ १० ॥ कैंचा धर्म कैंचें दान । कैंचा जप कैंचें ध्यान । विचारीना पापपुण्य । तो रजोगुण ॥ ११ ॥ नेणे तीर्थ नेण व्रत । नेणे अतीत अभ्यागत । अनाचारीं मनोगत । तो रजोगुण ॥ १२ ॥ धनधान्याचें संचित । मन होय द्रव्यासक्त । अत्यंत कृपण जीवित । तो रजोगुण ॥ १३ ॥ मी तरुण मी सुंदर । मी बलाढ्य मी चतुर । मी सकळांमध्यें थोर । म्हणे तो रजोगुण ॥ १४ ॥ माझा देश माझा गांव । माझा

---

१. पुनः जन्मास येणें. २. नीच योनि. ३. गीता, अ० १४ पद्य. ४. मिश्र.

वाडा माझा ठाव । ऐसी मनीं धरी हांव । तो रजोगुण ॥ १५ ॥ दुसऱ्याचें सर्व जावें । माझेंचि बरवें असावें । ऐसें आठवे स्वभावें । तो रजोगुण ॥ १६ ॥ कपट आणि मत्सर । उठे देहीं तिरस्कार । अथवा कामाचा विकार । तो रजोगुण ॥ १७ ॥ बाळकावरी ममता । प्रीतीनें आवडे कांता । लोभ वाटे समस्तां । तो रजोगुण ॥ १८ ॥ जिवलगाची खंती । जेणें काळें वाटे चित्तीं । तेणें काळें शीघ्रगति । रजोगुण आला ॥ १९ ॥ संसाराचे बहुत कष्ट । कैसा होईल शेवट । मनास आठवे संकट । तो रजोगुण ॥ २० ॥ वैभव देखोनि दृष्टीं । आवडी उपजली पोटीं । आशागुणें हिंपुटी । करी तो रजोगुण ॥ २१ ॥ कां मागें जें जें भोगिलें । तें तें मनीं आठवलें । दुःख अत्यंत वाटलें । तो रजोगुण ॥ २२ ॥ जें जें दृष्टीं पडलें । तें तें मनें मागितलें । लभ्य नसतां दुःख जाहलें । तो रजोगुण ॥ २३ ॥ विनोदार्थ भरे मन । शृंगारिक करी गायन । रागरंग तानमान । करी तो रजोगुण ॥२४॥ टवाळी ढवाळी निंदा । सांगणें घडे विवादा । हास्यविनोद करी सर्वदा । तो रजोगुण ॥ २५ ॥ आळस उठे प्रबळ । कर्मणुकीचे नाना खेळ । कां उपभोगाचे गोंधळ । तो रजोगुण ॥ २६ ॥ कळावंत बहुरूपी । नटावें[2]लोकीं सांक्षेपी[3] । नाना खेळीं दान अर्पी । तो रजोगुण ॥ २७ ॥ उन्मत्त[4] द्रव्यावरी अति प्रीती । आवडे नीचाची संगती । ग्रामण्य[5] आठवे चित्तीं । तो रजोगुण ॥ २८ ॥ तस्करविद्या जीवीं उठे । परन्यून बोलावें वाटे । नित्यनेमासि मन विटे । तो रजोगुण ॥ २९ ॥ देवाकारणीं लाजाळू । उदरालागीं कष्टाळू । प्रपंचीं जो स्नेहाळू । तो रजोगुण ॥ ३० ॥ गोड ग्रासीं आळ[6]केपण । अत्यादरें पिंडपोषण[7] । रजोगुणें उपोषण । केलें न वचे ॥ ३१ ॥ शृंगारिक तें आवडे । भक्ति वैराग्य नावडे । कळालाघवीं मन पवाडे[8] । तो रजोगुण ॥ ३२ ॥ नेणोनियां परमात्मा । सकळ पदार्थीं प्रेमा । बळात्कारें घाली जन्मा । तो रजोगुण ॥ ३३ ॥ असो ऐसा रजोगुण । लोभें दावी जन्ममरण । प्रपंचीं तो शबल[9] जाण । दारुण दुःख भोगवी ॥ ३४ ॥ आतां

१. धिरमोड. २. नट वगैरेंना पाहण्यांत. ३. प्रयत्न करणारा. ४. मादक. ५. हरामखोरी. ६. अतिशय हाव. ७. देहाचें पोषण. ८. शिरे. ९ रजोगुणाचे प्रकार दोन, शुद्ध आणि शबल; त्यांतील एक.

रजोगुण हा सुटेना । संसारिक हेतु तुटेना । प्रपंचीं गुंतली वासना । यासि उपाय कोण ॥ ३५ ॥ उपाय एक भगवद्भक्ती । जरी ठाकेना[1] विरक्ती । तरी यथानुशक्ती । भजन करावें ॥ ३६ ॥ काया वाचा आणि मनें । पत्रें पुष्पें फळें जीवनें । ईश्वरीं अर्पोनियां नमनें । सार्थक करावें ॥ ३७ ॥ यथानुशक्ति दान पुण्य । परी भगवंतीं अनन्य । सुखदुःखें परीं चिंतन । देवाचेंचि करावें ॥ ३८ ॥ आदि अंतीं एक देव । मध्येंचि लाविली माव[2] । म्हणोनियां पूर्ण भाव । भगवंतीं असावा ॥ ३९ ॥ ऐसा शबल रजोगुण । संक्षेपें केलें कथन । आतां शुद्ध तो तूं जाण । पारमार्थिक ॥ ४० ॥ त्याचे वोळखीचें चिन्ह । सत्वगुणीं असे जाण । तो सत्वगुण परिपूर्ण । भजनमूळ ॥ ४१ ॥ ऐसा रजोगुण बोलिला । श्रोतीं मनें अनुभविला । आतां पुढें परिसिला । पाहिजे तमोगुण ॥ ४२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वितीयदशके रजोगुणनिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. तमोगुणनिरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां बोलिला रजोगुण । क्रियेसहित लक्षण । आतां ऐका तमोगुण । तोहि सांगिजेल ॥ १ ॥ संसारीं दुःखसंबंध । प्राप्त होतां उठे खेद । कां अद्भुत आला क्रोध । तो तमोगुण ॥ २ ॥ शरीरीं क्रोध भरतां । नोळखे माता आणि पिता । बंधु बहिण आणि कांता । ताडी तो तमोगुण ॥ ३ ॥ दुसऱ्याचा प्राण घ्यावा । आपला आपण स्वयें द्यावा । विसरवी जीवभावा । तो तमोगुण ॥ ४ ॥ भरलें क्रोधाचें काविरें[3] । पिशाच्यापरी वावरे[4] । नाना उपायीं नावरे । तो तमोगुण ॥ ५ ॥ आपला आपण शस्त्रपात । पराव्याचा[5] करी घात । ऐसा समय वर्तत । तो तमोगुण ॥ ६ ॥ डोळां युद्धचि पाहावें । रण पडिलें तेथें जावें । ऐसें घेतलें जीवें । तो तमोगुण ॥ ७ ॥ अखंड भ्रांति पडे । केला निश्चय बिघडे । अत्यंत निद्रा आवडे । तो तमोगुण ॥ ८ ॥ क्षुधा जयाची वाड । नेणे कडू अथवा गोड । अत्यंत जो कां मूढ । तो तमोगुण ॥ ९ ॥ प्रीतिपात्र गेलें मरणें । तयालागीं जीव देणें । स्वयें आत्महत्या करणें । तो तमोगुण ॥ १० ॥ किडा मुंगी आणि श्वापद । यांचा करूं

---

१. स्थिर होत नाहीं. २. माया. ३. वेड. ४. भटके, वागे. ५. दुसऱ्याचा.

आवडे वध । अत्यंत जो कृपामंद । तो तमोगुण ॥ ११ ॥ स्त्रीहत्या बाळहत्या । द्रव्यालागीं ब्रह्महत्या । करूं आवडे गोहत्या । तो तमोगुण ॥ १२ ॥ ईसाळाचेनि नेटें । विष घ्यावें ऐसें वाटे । परवध मनीं उठे । तो तमोगुण ॥ १३ ॥ अंतरीं धरूनि कपट । पराचें करी तळपट । सदा मस्त सदा उद्धट तो तमोगुण ॥ १४ ॥ युद्ध देखावें ऐकावें । स्वयें युद्धचि करावें । मरावें कीं मारावें । तो तमोगुण ॥ १५ ॥ कलह व्हावा ऐसें वाटे । झोंबी घ्यावी ऐसें उठे । अंतरीं द्वेष प्रकटे । तो तमोगुण ॥ १६ ॥ मत्सरें भक्ति मोडावी । देवालयें बिघडावीं । फळतीं झाडें तोडावीं । तो तमोगुण ॥ १७ ॥ सत्कर्में तीं नावडतीं । नाना दोष ते आवडती । पापभय नाहीं चित्तीं । तो तमोगुण ॥ १८ ॥ ब्रह्मवृत्तीचा उच्छेद । जीवमात्रांस देणें खेद । करूं आवडे प्रमाद । तो तमोगुण ॥ १९ ॥ अग्निप्रळय शस्त्रप्रळय । भूतप्रळय विषप्रळय । मत्सरें करी जीवक्षय । तो तमोगुण ॥ २० ॥ भांडण लावून द्यावें । स्वयें कौतुक पाहावें । कुबुद्धि घेतली जीवें । तो तमोगुण ॥ २१ ॥ प्राप्त झालिया संपत्ती । जीवासी करी यातायाती । कळवळा नये चित्तीं । तो तमोगुण ॥ २२ ॥ नावडे भक्ति नावडे भाव । नावडे तीर्थ नावडे देव । वेद शास्त्र नलगे सर्व । तो तमोगुण ॥ २३ ॥ परपीडेचा संतोष । निष्ठुरपणाचा हव्यास । संसाराचा न ये त्रास । तो तमोगुण ॥ २४ ॥ स्नान संध्या नेम नसे । स्वधर्मीं भ्रष्टला दिसे । अकर्तव्य करीतसे । तो तमोगुण ॥ २५ ॥ ज्येष्ठ बंधु बाप माये । त्यांचीं वचनें न साहे । शीघ्रकोपी निघूनि जाये । तो तमोगुण ॥ २६ ॥ उगेंचि खावें उगेंचि असावें । स्तब्ध होऊनि बैसावें । कांहींच स्मरेना स्वभावें । तो तमोगुण ॥ २७ ॥ चेटकी विद्येचा अभ्यास । शस्त्रविद्येचा हव्यास । मल्लविद्या व्हावी ज्यास । तो तमोगुण ॥ २८ ॥ केले गळाचे नवस । रांडी-वेडीचे सायास । काष्ठयंत्रें छेदी जिव्हेस । तो तमोगुण ॥ २९ मस्तकीं भेंदें जाळावें । पोतें अंग हुरपळावें । स्वयें शस्त्र टोंचून घ्यावें । तो तमोगुण ॥ ३० ॥ निग्रह करून धरणें । कां तें टांगून घेणें ।

१. कांहीं बाधेमुळें, किंवा ईर्ष्येमुळें. २. धगधगीत निखाऱ्यांची खाई. ३. ज्वाळा निघतील असा विस्तव खापरांत पेटवून तें डोईवर घेऊन नाचावें. ४. भुत्याच्या हातांतील दिवटीनें.



देवद्वारीं जीव देणें। तो तमोगुण ॥ ३१ देवासि शिर वाहावें। कां तें अंग समर्पावें। कडणीवरून घालून घ्यावें। तो तमोगुण ॥ ३२ ॥ निराहार उपोषण। पंचाग्निधूम्रपान। आपणास घ्यावें पुरून। तो तमोगुण ॥ ३३ ॥ सकाम जें कां अनुष्टान। कां तें वायुनिरोधन। अथवा रहावें पडोन। तो तमोगुण ॥ ३४ ॥ नखें केश वाढवावे। हस्तचि वरते करावे। अथवा वाक्शून्य[1] व्हावें। तो तमोगुण ॥ ३५ ॥ नाना निग्रहीं पडावें। देहदुःखें चरफडावें। क्रोधें देवास फोडावें। तो तमोगुण ॥ ३६ ॥ देवाची जो निंदा करी। तो आशाबद्ध अघोरी। जो संतसंग न करी। तो तमोगुण ॥ ३७ ॥ ऐसा हा तमोगुण। सांगतां तो असाधारण। परी त्यागार्थ निरूपण। कांहींएक ॥ ३८ ॥ ऐसें वर्ते तो तमोगुण। परी हा पतनासि[2] कारण। मोक्षप्राप्तीचें लक्षण। नव्हे येणें ॥ ३९ ॥ केल्या कर्माचें फळ। प्राप्त होईल सकळ। जन्म दुःखाचें मूळ। तुटेना कीं ॥ ४० ॥ व्हावया जन्माचें खंडण। पाहिजे तो सत्वगुण। तेंचि असे निरूपण। पुढिलिये समासीं ॥ ४१ ॥ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वितीयदशके तमोगुणनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. सत्त्वगुणनिरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां बोलिला तमोगुण। जो दुःखदायक दारुण। आतां ऐका सत्वगुण। परम दुर्लभ जो ॥ १ ॥ जो भजनाचा आधार। जो योगियांचा थार। जो निरसी[3] संसार। दुःखमूळ जो ॥ २ ॥ जेणें होय उत्तम गती। मार्ग फुटे भगवंतीं। जेणें पाविजे मुक्ती। सायुज्यता ती ॥ ३ ॥ जो भक्तांचा कोंवसा[4]। जो भवार्णवींचा भरंवसा। मोक्षलक्ष्मीची दशा। तो सत्वगुण ॥ ४ ॥ जो परमार्थाचें मंडण। जो महंतांचें भूषण। रजतमांचें निरसन। जयाचेनी ॥ ५ ॥ जो परम सुखकारी। जो आनंदाची लहरी। देऊनियां निवारी। जन्ममृत्यु ॥ ६ ॥ जो ज्ञानाचा शेवट। जो पुण्याचें मूळपीठ। जयाचेनि सांपडे वाट। परलोकाची ॥ ७ ॥ ऐसा हा सत्वगुण। देहीं उमटतां आपण। तया क्रियेचें लक्षण। ऐसें असे

१. मौन धरावें. २. अधोगतीस. ३. नष्ट करितो. ४. आश्रय, आधार.

॥ ८ ॥ ईश्वरीं प्रेम अधिक । प्रपंच संपादणें लौकिक । सदा सान्निध विवेक । तो सत्वगुण ॥ ९ ॥ संसारदुःख विसरवी । भक्तिमार्ग विमल दावी । भजनक्रिया जो उपजवी । तो सत्वगुण ॥ १० ॥ परमार्थाची आवडी । उठे भावार्थाची गोडी । परोपकारीं तांतडी । तो सत्वगुण ॥ ११ ॥ स्नान संध्या पुण्यशीळ । अभ्यंतरींचा निर्मळ । शरीर वस्त्रें सोज्वळ । तो सत्वगुण ॥ १२ ॥ यजन आणि याजन । अध्ययन आणि अध्यापन । स्वयें करी पुण्यदान । तो सत्वगुण ॥ १३ ॥ निरूपणाची आवडी । जया हरिकथेची गोडी । क्रिया पालटे रोकडी । तो सत्वगुण ॥ १४ ॥ अश्वदानें गजदानें । गोदानें भूमिदानें । नाना रत्नांचीं दानें । तो सत्वगुण ॥ १५ ॥ धनदान वस्त्रदान । अन्नदान उदकदान । करी ब्राह्मणसंतर्पण । तो सत्वगुण ॥ १६ ॥ कार्तिकस्नानें माघस्नानें । व्रतें उद्यापनें दानें । निष्काम तीर्थें उपोषणें । तो सत्वगुण ॥ १७ ॥ सहस्रभोजनें लक्षभोजनें । विविध प्रकारचीं दानें । निष्काम करी सत्वगुणें । कामना रजोगुण ॥ १८ ॥ तीर्थीं अर्पी जो अग्रहारें[२] । बांधी वापी कूप सरोवरें । बांधी देवालयें शिखरें । तो सत्वगुण ॥ १९ ॥ देवद्वारीं पडशाळा[३] । पायरिया दीपमाळा । वृंदावनें पार पिंपळा । बांधी तो सत्वगुण ॥ २० ॥ लावी वनें उपवनें[४] । पुष्पवाटिका जीवनें । निववी तापासियांचीं मनें । तो सत्वगुण ॥ २१ ॥ संध्यामठ आणि भुयारीं । पायरिया नदीतीरीं । भांडारगृहें देवद्वारीं । बांधी तो सत्वगुण ॥ २२ ॥ नाना देवांचीं जीं स्थानें । तेथें नंदादीप घालणें । वाहे अलंकारभूषणें । तो सत्वगुण ॥ २३ ॥ झांगट मृदंग टाळ । दमामे नगारे काहाळ । नाना वाद्यांचे कल्लोळ । सुस्वरादिक ॥ २४ ॥ नाना सामुग्री सुंदर । देवालयीं घाली नर । हरिभजनीं तत्पर । तो सत्वगुण ॥ २५ ॥ छत्रें आणि सुखासनें । दिंड्या पताका निशाणें । वाहे चामरें सूर्यपानें[५] । तो सत्वगुण ॥ २६ ॥ वृंदावनें तुलसीवनें । रंगमाळा संमार्जनें । ऐसी प्रीति घेतली मनें । तो सत्वगुण ॥ २७ ॥ सुंदर नाना उपकरणें । मंडप चांदवे आसनें । देवालयीं समर्पणें । तो सत्वगुण ॥ २८ ॥ देवाकारणें खाद्य । नाना प्रकारचे नैवेद्य । अपूर्व

१. बाह्यात्कारीं. २. देवब्राह्मणांस दिलेला गांव इत्यादि. ३. धर्मशाळा. ४. बागबगीचे. ५. अबदागिरी.

फळें अर्पी सर्व । तो सत्वगुण ॥ २९ ॥ ऐसी भक्तीची आवडी । नित्य दास्यत्वाची गोडी । स्वयें देवद्वार झाडी । तो सत्वगुण ॥ ३० ॥ तिथि पर्व महोत्सव । तेथें ज्याचा अंतर्भाव । कायावाचामनें सर्व । अर्पी तो सत्वगुण ॥ ३१ ॥ हरिकथेसि तत्पर । गंध माळा आणि धूप कर्पूर । घेऊन उभा निरंतर । तो सत्वगुण ॥ ३२ ॥ नर अथवा नारी । यथानुशक्ति सामुग्री । येऊन उभी देवद्वारीं । तो सत्वगुण ॥३३॥ महत्कृत्य सांडूनि मागें। देवास ये [1]लागवेगें । भक्ति निकट अंतरंगें । तो सत्वगुण ॥ ३४ ॥ थोरपण सांडूनि दुरी । नीच कृत्य अंगिकारी । तिष्ठत उभा देवद्वारीं । तो सत्वगुण ॥ ३५ ॥ देवालागीं उपोषण । वर्जी तांबूल भोजन । नित्यनेम जप ध्यान। करी तो सत्वगुण ॥ ३६ ॥ शब्द कठिण न बोले । अतिनेमेंसि चाले । योगी जेणें तोषविले । तो सत्वगुण ॥३७॥ सांडूनियां अभिमान । निष्काम करी कीर्तन । स्वेद रोमांच स्फुरण । तो सत्वगुण ॥ ३८ ॥ अंतरीं देवाचें ध्यान । तेणें [2]निडारले नयन । पडे देहाचें विस्मरण । तो सत्वगुण ॥३९॥ हरिकथेसी अति प्रीती । सर्वथा न ये [3]विकृती । अधिक प्रेमा आदि अंतीं । तो सत्वगुण ॥ ४० ॥ मुखीं नाम हातीं टाळी । नाचत बोले बिरुदावळी । घेऊनि लावी पायधुळी । तो सत्वगुण ॥ ४१ ॥ देहाभिमान गळे । विषयीं वैराग्य प्रबळे । मिथ्या माया ऐसें कळे । तो सत्वगुण ॥ ४२ ॥ कांहीं करावा उपाय । संसारीं गुंतोनि काय । उकलवी ऐसें हृदय । तो सत्वगुण ॥ ४३ ॥ संसारासि त्रासे मन । कांहीं करावें भजन । ऐसें मनीं उठे ज्ञान। तो सत्वगुण ॥ ४४ ॥ असतां आपुले आश्रमीं । अत्यादर नित्यनेमीं । सदा प्रीति लागे रामीं । तो सत्वगुण ॥ ४५ ॥ सकळांचा आला वीट । परमार्थीं जो निकट । आघातीं उपजे धारिष्ट । तो सत्वगुण ॥ ४६ ॥ सर्वकाळ उदासीन । नाना भोगीं विटे मन । आवडे भगवद्भजन । तो सत्वगुण ॥ ४७ ॥ पदार्थीं न बैसे चित्त । मनीं आठवे भगवंत । ऐसा दृढ भावार्थ । तो सत्वगुण ॥ ४८ ॥ अंतरीं स्फूर्ति स्फुरे । स्वस्वरूपीं तर्क भरे। नष्ट संदेह निवारे। तो सत्वगुण ॥ ४९ ॥ लोक बोलती विकारी । तरी अधिक [4]प्रेमा धरी । निश्चय बाणे अंतरीं । तो सत्वगुण ॥ ५० ॥ शरीर लावावें कारणीं । साक्षेप

१. तत्काळ, उत्कंठेनें. २. निश्चल झाले, एकाग्र झाले. ३. वीट. ४. उत्कंठा.

उठे अंतःकरणीं । सत्वगुणाची करणी । ऐसी असे ॥५१॥ शांति क्षमा आणि दया । निश्चय उपजे जया । सत्वगुण जाणावा तया- । अंतरीं आला ॥५२॥ आले अतित अभ्यागत । जाऊं नेदी जो भुकिस्त । यथाशक्ति दान देत । तो सत्वगुण ॥ ५३ ॥ तडीतापडी दैन्यवाणे । आले आश्रमाचेनि गुणें । तयांलागीं स्थळ देणें । तो सत्वगुण ॥ ५४ ॥ आश्रमीं अन्नाची आपदा । परी विमुख नव्हे कदा । शक्त्यनुसार दे सर्वदा । तो सत्वगुण ॥ ५५ ॥ जेणें जिंकिली रसना । तृप्त जयाची वासना । जयासि नाहीं कामना । तो सत्वगुण ॥ ५६ ॥ होणार तैसें होत जात । प्रपंचीं झाला आघात । डळमळीना ज्याचें चित्त । तो सत्वगुण ॥ ५७ ॥ एका भगवंताकारणें । सर्व सुख सोडिलें जेणें । केलें देहाचें सांडणें । तो सत्वगुण ॥ ५८ ॥ विषयीं धांवे वासना । परी तो कदा डळमळीना । ज्याचें धारिष्ट चळेना । तो सत्वगुण ॥ ५९ ॥ देह आपदेनें पीडिला । क्षुधेतृषेनें वोसावला[२] । तरी निश्चय राहिला । तो सत्वगुण ॥ ६० ॥ श्रवण आणि मनन । निजध्यासें समाधान । शुद्ध झालें आत्मज्ञान । तो सत्वगुण ॥ ६१ ॥ सकळांसि नम्र बोले । मर्यादा धरून चाले । सर्व जन तोषविले । तो सत्वगुण ॥ ६२ ॥ जयासि अहंकार नसे । नैराश्यता विलसे । जयापाशीं कृपा वसे । तो सत्वगुण ॥ ॥ ६३ ॥ सकळ जनांसि आर्जव । नाहीं विरोधासी ठाव । परोपकारीं वेंची जीव । तो सत्वगुण ॥६४॥ आपकार्याहूनि जीवीं । परकार्यसिद्धि करावी । मरून कीर्ति उरवावी । तो सत्वगुण ॥ ६५ ॥ पराव्याचे दोष गुण । दृष्टीस देखे आपण । समुद्राऐसी सांठवण । तो सत्वगुण ॥ ६६ ॥ नीच उत्तर साहणें । प्रत्युत्तर न देणें । आपुला क्रोध सांवरणें । तो सत्वगुण ॥ ६७ ॥ अन्यायेंविण गांजिती । नानापरी पीडा करिती । तितकेंही सांठवी चित्तीं । तो सत्वगुण ॥ ६८ शरीरें झीज साहणें । दुर्जनासि मिळोन जाणें । निंदकास उपकार करणें । तो सत्वगुण ॥ ६९ ॥ मन भलतीकडे धांवे । तें विवेकें आंवरावें । इंद्रियदमन करावें । तो सत्वगुण ॥ ७० ॥ सत्क्रिया आचरावी । असत्क्रिया त्यागावी । वाट भक्तीची धरावी । तो सत्वगुण ॥ ७१ ॥ जया आवडे प्रातःस्नान । आवडे पुराणश्रवण । नानामंत्रीं देव-

१. तपस्वी, भिक्षु. २. कासावीस झाला.

तार्चन । करी तो सत्वगुण ॥ ७२ ॥ पर्वकाळीं अतिसादर । वसंतपूजेसि तत्पर । जयंत्यादि प्रीति थोर । तो सत्वगुण ॥ ७३ ॥ विदेशीं मेलें मरणें । तयासि संस्कार देणें । अथवा सादर होणें । तो सत्वगुण ॥ ७४ ॥ कोणी एकास मारी । तयासि जाऊन निवारी । जीव बंधनमुक्त करी । तो सत्वगुण ॥ ७५ ॥ लिंगलाखोली अभिशेष । नामस्मरणीं विश्वास । देव दर्शनीं अवकाश । तो सत्वगुण ॥ ७६ ॥ संत देखोनि धांवे । परमसुख हेलावे । नमस्कारी सर्वभावें । तो सत्वगुण ॥ ७७ ॥ संतकृपा होय जयास । तेणें उद्धरिला वंश । जो ईश्वराचा अंश । तो सत्वगुण ॥ ७८ ॥ सन्मार्ग दाखवी जना । जो लावी हरिभजना । ज्ञान शिकवी अज्ञाना । तो सत्वगुण ॥ ७९ ॥ आवडे पुण्यसंस्कार । प्रदक्षिणा नमस्कार । जया राहे पाठांतर । तो सत्वगुण ॥ ८० ॥ भक्तीचा हव्यास भारी । ग्रंथसामुग्री जो करी । धातुमूर्ति नानापरी । पूजा तो सत्वगुण ॥ ८१ ॥ झळझळीत उपकरणें । माळा गवाळीं आसनें । पवित्र सोज्वळ वसनें । तो सत्वगुण ॥ ८२ ॥ परपीडेचें वाहे दुःख । परसंतोषाचें सुख । वैराग्य देखोनि मानी हरिखें । तो सत्वगुण ॥८३॥ परभूषणीं भूषण । परदूषणीं दूषण । परदुःखीं शिणे जाण । तो सत्वगुण ॥ ८४ ॥ आतां असो हें बहुत । देवधर्मीं ज्याचें चित्त । भजे कामनारहित । तो सत्वगुण ॥ ८५ ॥ ऐसा हा सत्वगुण सात्विक । संसारसागरीं तारक । येणें उपजे विवेक । ज्ञानमार्गाचा ॥ ८६ ॥ सत्वगुणें भगवद्भक्ती । सत्वगुणें ज्ञानप्राप्ती । सत्वगुणें सायुज्यमुक्ती । पाविजे ते ॥ ८७ ॥ ऐसी सत्वगुणाची स्थिति । स्वल्प बोलिलों यथामती । सावध होऊनि श्रोतीं । पुढें अवधान द्यावें ॥ ८८ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वितीयदशके सत्वगुणनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. सद्विद्यानिरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका सद्विद्येचीं लक्षणें । परम शुद्ध सुलक्षणें । विचार घेतां बळेचि बाणे । सद्विद्या अंगीं ॥ १ ॥ सद्विद्येचा जो पुरुष । तो उत्तम लक्षणीं विशेष । त्याचे गुण ऐकतां संतोष । विशेष वाटे ॥ २ ॥

१. भरून येई. २. वस्त्रं. ३. हर्ष.

भाविक सात्विक प्रेमळ । शांतिक्षमादयाशीळ। लीन तत्पर केवळ । अमृतवचनी ॥ ३ ॥ परम सुंदर आणि चतुर । परम सबळ आणि धीर । परम संपन्न आणि उदार । अतिशयेंसी ॥ ४ ॥ परम ज्ञाता आणि भक्त । महापंडित आणि विरक्त । महातपस्वी आणि शांत । अतिशयेंसी ॥ ५ ॥ वक्ता आणि नैराश्यता । सर्वज्ञ आणि सादरता । श्रेष्ठ आणि नम्रता । सर्वत्रांसी ॥ ६ ॥ राजा आणि धार्मिक । शूर आणि विवेक । तारुण्य आणि नेमक । अतिशयेंसी ॥ ७ ॥ वृद्धाचारी कुळाचारी । युक्ताहारी निर्विकारी । धन्वंतरी परोपकारी । पद्महस्ती[2] ॥ ८ ॥ कार्यकर्ता निरभिमानी । गायक आणि वैष्णव जनीं । वैभव आणि भगवद्भजनीं । अत्यादर ॥ ९ ॥ तत्वज्ञ आणि उदासीन । बहुश्रुत आणि सज्जन । मित्र आणि सत्वगुण । नीतिवंत ॥ १० ॥ साधु पवित्र पुण्यशीळ। अंतरशुद्ध धर्मात्मा केवळ कृपाळ । कर्मनिष्ठ स्वधर्मे निर्मळ । निर्लोभ अनुतापी ॥ ११ ॥ गोडी आवडी परमार्थप्रीती । सन्मार्गी सत्क्रिया धारणा[3] धृती । श्रुति स्फूर्ति लीळा युक्ती । स्तुती मती परीक्षा ॥ १२ ॥ दक्ष धूर्त योग्य तार्किक । सत्य साहित्य नेम भेदक । कुशळ चपळ चमत्कारिक । नाना प्रकारें ॥ १३ ॥ आदर सन्मान तारतम्य जाणे । प्रयोग समय प्रसंग जाणे । कार्यकारणचिन्हें जाणे । विचक्षण बोलका ॥ १४ ॥ सावध साक्षेपी[6] साधक । आगमनिगमशोधक । ज्ञानविज्ञानबोधक । निश्चयात्मक ॥ १५ ॥ पुरश्चरणी तीर्थवासी । दृढव्रती कायक्लेशी । उपासक निग्रहासी । करूं जाणे ॥ १६ ॥ सत्यवचनी शुभवचनी । कोमळवचनी एकवचनी । निश्चयवचनी सौख्यवचनी । सर्वकाळ ॥ १७ वासनातृप्त सखोल योगी । भव्य सुप्रसन्न वीतरागी । सौम्य सात्विक शुद्धमार्गी । निष्कपट निर्व्यसनी ॥ १८ ॥ सुघड[11] संगीत गुणग्राही । अनपेक्षी[12] लोकसंग्रही । आर्जव[13] सख्य सर्वही । प्राणिमात्रांसी ॥ १९ ॥ द्रव्यशुची दानशुची । न्यायशुची अंतरशुची । प्रवृत्तिशुची निवृत्तिशुची । सर्वशुची निःसंगपणें ॥ २० ॥ मित्रपणें परहितकारी । वाङ्माधुर्यता परशोकापहारी । सामर्थ्यपणें परत्रेत्र-

---

१ औदार्यान्य. २ यशस्वी. ३ चित्ताची स्थिरता. ४. धैर्य. ५. विचारशील. ६. दीर्घोद्योगी. ७ वेदशास्त्रांचें मनन करणारा. ८ शरीरकष्ट सोसणारा. ९. गंभीर स्वभावाचा. १०. वैराग्यशील. ११. चतुर. १२. निरिच्छ. १३. सरळपणा.

धीरी । पुरुषार्थें जगमित्र ॥ २१ ॥ संशयछेदक विशाळ वक्ता । सकळ-कळश[3] असोनि श्रोता । कथानिरूपणीं शब्दार्थी । जाऊंच नेदी ॥ २२ ॥ विवादरहित संवादी । संगरहित निरुपाधी । दुराशारहित अक्रोधी । निर्दोष निर्मत्सरी ॥ २३ ॥ विमळज्ञानी निश्चयात्मक । समाधानी आणि भजक । सिद्ध असोनि साधक । स्वधर्म रक्षी ॥ २४ ॥ सुखरूप संतोष-रूप । आनंदरूप हास्यरूप । ऐक्यरूप आत्मरूप । सर्वत्रांसी ॥२५॥ भाग्यवंत जयवंत । रूपवंत गुणवंत । आचारवंत क्रियावंत । विचारवंत स्थिती ॥२६॥ यशवंत कीर्तिवंत । शक्तिवंत सामर्थ्यवंत । वीर्यवंत वैरदवंत[3] । सत्यवंत सुकृती[4] ॥ २७ ॥ विद्यावंत कळावंत । लक्ष्मीवंत लक्षणवंत । कुळवंत शुचिष्मंत[5] । बळवंत दयाळू ॥ २८ ॥ युक्तिवंत गुणवंत । बुद्धिवंत बहुधारिष्ट । दयावंत सदा संतुष्ट । निस्पृह[6] वीतरागी[7] ॥ २९ ॥ असो ऐसे उत्तम गुण । हें सद्विद्येचें लक्षण । अभ्यासावयासि निरूपण । अल्पमात्र बोलिलों ॥३०॥ रूपलावण्य अभ्यासितां न ये । सहज गुणासि न चले उपाये । कांहीं तरी धरावी सोये । आगंतुक[8] गुणांची ॥ ३१ ॥ ऐसी हे सद्विद्या बरवी । सर्वत्रांपासीं असावी । परी विरक्त पुरुषें अभ्यासावी । अगत्यरूपें ॥ ३२ ॥ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वितीयदशके सद्विद्यानिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. विरक्तलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका विरक्तांचीं लक्षणें । विरक्तें असावें कोण्या गुणें । जेणें अंगीं सामर्थ्य बाणे । योगियांचें ॥ १ ॥ जेणें सत्कीर्ति वाढे । जेणें सार्थकता घडे । जेणेंकरितां महिमा चढे । विरक्तांसी ॥ २ ॥ जेणें परमार्थ फावे[9] । जेणें आनंद हेलावे[10] । जेणें विरक्ति दुणावे । विवेकेंसहित ॥ ३ ॥ जेणें सुख उचंबळे । जेणें सद्विद्या वोळे[11] । जेणें भाग्यश्री प्रबळे । मोक्षसहित ॥ ४ ॥ मनोरथ पूर्ण होती । सकळ कामना पुरती । मुखीं

१. लोकांचें रक्षण करणारा. २. सर्वज्ञाता. ३. अनुग्रह प्राप्त झालेला. ४. पुण्यवान्. ५. शुद्ध, निर्मळ. ६. निरिच्छ. ७. वैराग्यशील. ८. आंगचे नाहींत असे, अभ्यासानें येणारे. ९. लाभे. १०. उचंबळून येई. ११. प्राप्त होते.

2177 37

राहे सरस्वती । मधुर शब्द बोलावया ॥ ५ ॥ हीं लक्षणें श्रवण कीजे । आणि सुदृढ जीवीं धरिजे । तरी मग विख्यात होइजे । भूमंडळीं ॥ ६ ॥ विरक्तें विवेकें असावें । विरक्तें अध्यात्म वाढवावें । विरक्तें धारिष्ट धरावें । दमनविषयीं ॥ ७ ॥ विरक्तें करावें साधन । विरक्तें लावावें भजन । विरक्तें विशेष ब्रह्मज्ञान । प्रगटवावें ॥ ८ ॥ विरक्तें भक्ति वाढवावी । विरक्तें शांति दाखवावी । विरक्तें यत्नें करावी । विरक्ति आपुली ॥ ९ ॥ विरक्तें सत्क्रिया प्रतिष्ठावी[1] । विरक्तें निवृत्ति विस्तारावी । विरक्तें नैराश्यता धरावी । सदृढ जीवीं ॥ १० ॥ विरक्तें धर्मस्थापना करावी । विरक्तें नीति अवलंबावी । विरक्तें क्षमा सांभाळावी । अत्यादरें ॥ ११ ॥ विरक्तें परमार्थ उजळावा । विरक्तें विचार शोधावा । विरक्तें सान्निध ठेवावा । सन्मार्ग सत्वगुण ॥ १२ ॥ विरक्तें भाविकें सांभाळावीं । विरक्तें प्रेमळें निववावीं । विरक्तें सांवडी[2] नुपेक्षावीं । शरणागतें ॥ १३ ॥ विरक्तें असावें परम दक्ष । विरक्तें असावें अंतरसाक्ष । विरक्तें ओढावावा[3] कैपक्ष । परमार्थाचा ॥ १४ ॥ विरक्तें अभ्यास करावा । विरक्तें साक्षेप[4] धरावा । विरक्तें वक्तृत्वें उभारावा । मोडला परमार्थ ॥ १५ ॥ विरक्तें विमळ ज्ञान बोलावें । विरक्तें वैराग्य स्तवीत जावें । विरक्तें निश्चयाचें[5] करावें । समाधान ॥ १६ ॥ पर्वें करावीं अचाटें । चालवावीं भक्तीचीं थाटें । नाना वैभवें कचाटें[6] । उपासनामार्गें ॥ १७ ॥ हरिकीर्तनें करावीं । निरूपणें माजवावीं । भक्तिमार्गें लाजवावीं निंदक दुर्जनें ॥ १८ ॥ बहुतांस करावे परोपकार । भलेपणाचा जीर्णोद्धार । पुण्यमार्गाचा विचार । बळेंचि करावा ॥ १९ ॥ स्नान संध्या जप ध्यान । तीर्थयात्रा भगवद्भजन । नित्यनेम पवित्रपण । अंतर शुद्ध असावें ॥ २० ॥ दृढ निश्चय धरावा । संसार मिथ्या जाणावा । विश्वाचा उद्धार करावा । संसर्गमात्रें ॥ २१ ॥ विरक्तें असावें धीर । विरक्तें असावें उदार । विरक्तें असावें तत्पर निरूपणविषयीं ॥ २२ ॥ विरक्तें सावध असावें । विरक्तें शुद्धमार्गें जावें । विरक्तें झिजोनि उरावावें । सत्कीर्तीसी ॥ २३ ॥ विरक्तें विरक्त धुडावे । विरक्तें साधु ओळखावे । विरक्तें मित्र करावे । संत योगी

१. स्थापावी. २. भोळीं मनुष्यें. ३. कैवार घ्यावा. ४. उद्योग. ५. निश्चित, स्थिर. ६. खटपटी.

सज्जन ॥ २४ ॥ विरक्तें करावीं पुरश्चरणें । विरक्तें फिरावीं तीर्थाटणें । विरक्तें करावीं नाना स्थानें । परम रमणीय ॥ २५ ॥ विरक्तें उपाधी न करावी । आणि उदासवृत्ति न सांडावी । दुराशा जडों न द्यावी । कोणे एके विषयीं ॥ २६ ॥ विरक्तें असावें अंतर्निष्ठ । विरक्तें नसावें क्रियाभ्रष्ट । विरक्तें न व्हावें कनिष्ट । पराधीनपणें ॥ २७ ॥ विरक्तें समय जाणावा । विरक्तें प्रसंग वोळखावा । विरक्त चतुर असावा । सर्व प्रकारें ॥ २८ ॥ विरक्तें एकेदेशी[1] नसावें । विरक्तें सर्व अभ्यासावें । विरक्तें अवघें जाणावें । ज्याचें त्यापरी ॥ २९ ॥ हरिकथानिरूपण । सगुणभजन ब्रह्मज्ञान । पिंडज्ञान[2] तत्वज्ञान । सर्व जाणावें ॥ ३० ॥ कर्ममार्ग उपासनामार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग । प्रवृत्तिमार्ग निवृत्तिमार्ग । सकळ जाणावे ॥ ३१ ॥ प्रेमळ स्थिति उदासस्थिति । अंतरस्थिति अलिप्त[3]स्थिति । विदेहस्थिति[4] सहजस्थिति[5] । सकळ जाणावें ॥ ३२ ॥ ध्यान लक्षण मुद्रा आसनें । मंत्र यंत्र विधि[6] विधानें[7] । नाना मतांचें देखणें । पाहून सांडावें ॥ ३३ ॥ विरक्तें असावें जगमित्र । विरक्तें असावें स्वतंत्र । विरक्तें असावें विचित्र । बहुगुणी ॥ ३४ ॥ विरक्तें असावें विरक्त । विरक्तें असावें हरिभक्त । विरक्तें असावें नित्यमुक्त । अलिप्तपणें ॥ ३५ ॥ विरक्तें शास्त्रें धांडोळावीं[8] । विरक्तें मतें विभांडावीं[10] । विरक्तें मुमुक्षें लावावीं । शुद्धमार्गीं ॥ ३६ ॥ विरक्तें शुद्धमार्ग सांगावा । विरक्तें संशय छेदावा । विरक्तें आपुला म्हणावा । विश्वजनें[11] ॥ ३७ ॥ विरक्तें निंदक वंदावे । विरक्तें साधक बोधावे । विरक्तें बद्ध चेतवावे[12] । मुमुक्षुनिरूपणें ॥ ३८ ॥ विरक्तें उत्तम गुण घ्यावे । विरक्तें अवगुण त्यागावे । नाना अपाय भंगावे । विवेकबळें ॥ ३९ ॥ ऐशीं हीं उत्तम लक्षणें । ऐकावीं एकाग्र मनें । यांचा अव्हेर[13] न करणें । विरक्त

---

१. एकांगी, एकाद्या विषयाचा मात्र विचार करणारा. २. देहाच्या जन्मनाशादिकांचें तात्विक ज्ञान. ३. कोणत्याही गोष्टीनें चित्तास क्षोभ होत नाहीं अशी स्थिति. ४. देहविस्मृतिरूप ज्ञानी पुरुषाची निर्विकल्प स्थिति. ५. व्यवहारांत असतांही चित्ताची समाधानवृत्ति. ६. शास्त्रनियम. ७. व्रतें, अनुष्ठानें इत्यादि. ८. विचार. ९. बारकाईनें शोधून पहावीं. १०. जिंकावीं, मोड करावा. ११. सर्व विश्वांतील लोक. १२. जागे करावे, विचारास प्रवृत्त करावे. १३. उपेक्षा.

पुरुषें ॥ ४० ॥ इतुकें बोलिलें स्वभावें । त्यांत मानेल तितुकें घ्यावें । श्रोतीं उदास न व्हावें । बहु बोलिलों म्हणोनी ॥ ४१ ॥ परंतु हीं लक्षणें न घेतां । अवलक्षणें बाष्कळता । तेणें त्यास पढतमूर्खता । येऊं पाहे ॥ ४२ ॥ त्या पढतमूर्खाचें लक्षण । पुढिलिये समासीं निरूपण । बोलिलें असे सावधान । होऊनि ऐका ॥ ४३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वितीयदशके विरक्तलक्षणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १० पढतमूर्खलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां सांगितलीं लक्षणें । मूर्खां अंगीं चातुर्य बाणे । आतां ऐका शहाणे । असोन मूर्ख ॥ १ ॥ तया नांव पढतमूर्ख । श्रोतीं न मानावें दुःख । अवगुण त्यागितां सुख । प्राप्त होय ॥ २ ॥ बहुश्रुत आणि-व्युत्पन्न । प्रांजळ[1] बोले ब्रह्मज्ञान । दुराशा आणि अभिमान । धरी तो एक पढतमूर्ख ॥ ३ ॥ मुक्तक्रिया[2] प्रतिपादी । सगुणभक्ति उच्छेदी । स्वधर्म आणि साधन निंदी । तो एक पढतमूर्ख ॥ ४ ॥ आपुलेनि ज्ञातेपणें । सकळांस शब्द ठेवणें । प्राणिमात्राचें पाहे उणें । तो एक पढतमूर्ख ॥ ५ ॥ शिष्यांसि अवज्ञा घडे । कां तो संकटीं पडे । ज्याचेनि शब्दें मन मोडे । तो एक पढतमूर्ख ॥ ६ ॥ रजोगुणी तमोगुणी । कपटी कुटिल अंतःकरणीं । वैभव देखोनि वाखाणी । तो एक पढतमूर्ख ॥ ७ ॥ समूळ ग्रंथ पाहिल्याविण । उगाच ठेवी जो दूषण । गुण सांगतां पाहे अवगुण । तो एक पढतमूर्ख ॥ ८ ॥ लक्षणें ऐकोनि मानी वीट । मत्सरें करी खटपट । नीति नायके उद्धट । तो एक पढतमूर्ख ॥ ९ ॥ जाणपणें भरीं भरे । आला क्रोध नावरे । क्रिया[3] शब्दास[4] अंतरे । तो एक पढतमूर्ख ॥ १० ॥ वक्ता अधिकारेंविण । वक्तृत्वाचा करी शीण । वचन जयाचें कठिण । तो एक पढतमूर्ख ॥ ११ ॥ श्रोता बहुश्रुतपणें । वक्त्यासि आणी उणें । वाचाळपणाचेनि गुणें । तो एक पढतमूर्ख ॥ १२ ॥ दोष ठेवी पुढिलांसी[5] । तेंचि स्वयें आपणापाशीं । ऐसें कळेना जयासी । तो एक पढतमूर्ख ॥ १३ ॥ अभ्यासाचेनि गुणें । सकळ

---

१. स्पष्ट. २. वेदाधारहित कर्म, स्वैर वर्तन. ३. मलत्याच नादांत शिरतो. ४. आचरणास व बोलण्यास मेळ पडत नाहीं. ५. दुसऱ्यांस.

विद्या जाणें । जनासि विवंचूं[1] नेणे । तो एक पढतमूर्ख ॥ १४ ॥ हस्ती बांधिजे ऊर्णतंतें[2] । लोभें मृत्यु भ्रमरातें । ऐसा जो प्रपंचीं गुंते । तो एक पढतमूर्ख ॥ १५ ॥ स्त्रियांचा संग धरी । स्त्रियांसि निरूपण करी । निंद्य वस्तु अंगीकारी । तो एक पढतमूर्ख ॥ १६ ॥ जेणें उणीव ये अंगासी । तेंचि दृढ धरी मानसीं । देहबुद्धि[3] जयापाशीं । तो एक पढतमूर्ख ॥ १७ ॥ सांडूनियां श्रीपती । जो करी नरस्तुती । कां दृष्टी पडल्याची वर्णी कीर्ती । तो एक पढतमूर्ख ॥ १८ ॥ वर्णी स्त्रियांचे अवयव । नाना नाटकें हावभाव । देवास विसरे जो मानव । तो एक पढतमूर्ख ॥ १९ ॥ भरोनि वैभवाचे भरीं । जीवमात्रास तुच्छ करी । पाषांड[4] मत सांवरी[5] । तो एक पढतमूर्ख ॥ ॥ २० ॥ व्युत्पन्न[6] आणि वीतरागी[7] । ब्रह्मज्ञानी महायोगी । भविष्य सांगों लागे जगीं । तो एक पढतमूर्ख ॥ २१ ॥ श्रवण होतां अभ्यंतरीं । गुणदोषांची चाळणा करी । परभूषणें मत्सरी । तो एक पढतमूर्ख ॥ २२ ॥ नाहीं भक्तीचें साधन । नाहीं वैराग्य ना भजन । क्रियेवीण बोले ब्रह्मज्ञान । तो एक पढतमूर्ख ॥ २३ ॥ न मानी तीर्थ न मानी क्षेत्र । न मानी वेद न मानी शास्त्र । पवित्र कुळीं जो अपवित्र । तो एक पढतमूर्ख ॥ २४ ॥ आदर देखोनि मन धरी । कीर्तीविण स्तुति करी । सर्वेंचि निंदी अनादरी । तो एक पढतमूर्ख ॥ २५ ॥ मागें एक पुढें एक ॥ ऐसा जयाचा दंडक[8] । बोले एक करी एक । तो एक पढतमूर्ख ॥ २६ ॥ प्रपंचविषयीं सादर । परमार्थीं जयाचा अनादर । जाणतपणें घे अंधार । तो एक पढतमूर्ख ॥ २७ ॥यथार्थ सांडूनि वचन । जो रक्षून बोले मन । ज्याचें जिणें पराधीन । तो एक पढतमूर्ख ॥ २८ ॥ सोंग संपादी वरीवरी । करूं नये तेंचि करी । मार्ग चुकोन भेरे[10] भेरीं । तो एक पढतमूर्ख ॥ २९ ॥ रात्रंदिवस करी श्रवण । न सांडी आपुले अवगुण । स्वहित आपुलें नेणे आपण । तो एक पढतमूर्ख ॥ ॥ ३० ॥ निरूपणीं भले भले । श्रोते येऊन बैसले । क्षुद्र लक्षूनि बोले । तो एक पढतमूर्ख ॥ ३१ ॥ शिष्य जाहला अनधिकारी । आपुली अवज्ञा

---

१. समजावून सांगूं. २. कोळ्याच्या सुतानें. ३. मी म्हणजे हा स्थूल देह, अशी भावना. ४. वेदशास्त्रविरुद्ध. ५. मंडन करितो. ६. शास्त्रें पढलेला. ७. वैराग्यशील. ८. वागणूक. ९. खरें. १०. नादांत शिरतो.

करी । पुन्हां त्याची आशा धरी । तो एक पढतमूर्ख ॥ ३२ ॥ होत असतां श्रवण । देहास आलें उणेपण । क्रोधें करी चिणचिणे । तो एक पढतमूर्ख ॥ ॥ ३३ ॥ भरोनि वैभवाचे भरीं । सद्गुरूची उपेक्षा करी । गुरुपरंपरा चोरी । तो एक पढतमूर्ख ॥ ३४ ॥ ज्ञान बोलोनि करी स्वार्थ । कृपणाऐसा सांची अर्थ । अर्थासाठीं लावी परमार्थ । तो एक पढतमूर्ख ॥ ३५ ॥ वर्तल्याविण शिकवी । ब्रह्मज्ञान लावणी लावी । पराधीन गोसावी । तो एक पढतमूर्ख ॥ ३६ ॥ भक्तिमार्ग अवघा मोडे । आपणांमध्यें उंपंढरें पडे । ऐसिये कर्मी पवांडे । तो एक पढतमूर्ख ॥ ३७ ॥ प्रपंच गेला हातींचा । लेश नाहीं परमार्थाचा । द्वेषी देवाब्राह्मणाचा । तो एक पढतमूर्ख ॥ ३८ ॥ त्यागावया अवगुण । बोलिलों पढतमूर्खांचें लक्षण । विचक्षणीं न्यूनपूर्ण । क्षमा केली पाहिजे ॥ ३९ ॥ परम मूर्खांमाजी मूर्ख । जो या संसारीं मानी सुख । या संसारदुःखा ऐसें दुःख । आणिक नाहीं ॥ ४० ॥ तेंचि पुढें निरूपण । जन्मदुःखांचें लक्षण । गर्भवास हा दारुण । पुढें निरूपिला ॥ ४१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वितीयदशके पढतमूर्खलक्षणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी ४८० ॥ शुभं भवतु ॥

---

# दशक तिसरा.

## जन्मदुःख.

श्रीगणेशाय नमः ॥ जन्म दुःखाचा अंकुर । जन्म शोकाचा सागर । जन्म भयाचा डोंगर । चळेना ऐसा ॥ १ ॥ जन्म कर्माची आटणी । जन्म पातकाची खाणी । जन्म काळाची जाचणी । नित्य नवी ॥ २ ॥ जन्म कुविद्येचें फळ । जन्म लोभाचें कमळ । जन्म भ्रांतीचें पडळ । ज्ञानहीन ॥ ३ ॥ जन्म जीवासि बंधन । जन्म मृत्यूसि कारण । जन्म हेंचि अकारण । गाथांगोंवी ॥ ४ ॥ जन्म सुखाचा विसर । जन्म चिंतेचा आगर । जन्म वासनाविस्तार । विस्तारला ॥ ५ ॥ जन्म जीवाची अवदसा । जन्म

१. धुसफूस. २. सांठवितो. ३. द्रव्य. ४. अव्यवस्था. ५. शिरतो. ६. पंडितांनीं. ७. मूस. ८. पडदा. ९. गुंतागुंत.

कल्पनेचा ठसा । जन्म लाचेचा वळसा[1] । ममतारूप ॥ ६ ॥ जन्म मायेचें मैंदावें[2] । जन्म क्रोधाचें विरावें[3] । जन्म मोक्षास आडवें । विघ्न आहे ॥ ७ ॥ जन्म जीवाचें मीपण । जन्म अहंतेचा गुण । जन्म हेंचि विस्मरण । ईश्वराचें ॥ ८ ॥ जन्म विषयाची आवडी । जन्म दुराशेची बेडी । जन्म काळाची कांकडी । भक्षिताहे ॥ ९ ॥ जन्म हाचि विषम काळ । जन्म हेचि वोखटी वेळ । जन्म हें अति कुश्चळ[4] । नरकपतन ॥ १० ॥ पाहतां शरीराचें मूळ । या ऐसें नाहीं अमंगळ । रजस्वलेचा जो विटाळ । त्यामध्यें जन्म यासी ॥ ११ ॥ अत्यंत दोष ज्या विटाळा । त्या विटाळाचाचि पुतळा । तेथें निर्मळपणाचा सोहळा । केवीं घडे ॥ १२ ॥ रजस्वलेचा जो विटाळ । त्याचा आळोनि झाला गाळ । त्या गाळाचेंचि केवळ । शरीर हें ॥ १३ ॥ वरीवरी दिसे वैभवाचें । अंतरीं पोतडें नरकाचें । जैसें झांकण चर्मकुंडाचें । उघाडितांचि नये ॥ १४ ॥ कुंड धुतां शुद्ध होतें । यास प्रत्यहीं धुइजेते । तरी दुर्गंधि देहातें । शुद्धता न ये ॥ १५ ॥ अस्थिपंजर उभाविला । शिरानाडीं गुंडाळिला । मेदें[5]मांसें सरसाविला । सांदोसांदीं भरोनी ॥ १६ ॥ अशुद्ध[6] शब्दें शुद्ध नाहीं । तेंही भरलें असे देहीं । नाना व्याधि दुःखें तींही । अभ्यंतरीं वसती ॥ १७ ॥ नरकाचें कोठार भरलें । आंत बाहेरी लिडबिडिलें । मूत्रपोतडें जमलें । दुर्गंधि करूनी ॥ १८ ॥ जंत किडे आणि आंतडीं । नाना दुर्गंधीचीं पोतडीं । अमूप[7] लवथवती कातडीं । कंटाळवाणीं ॥ १९ ॥ सर्वांगास शिर प्रमाण । तेथें वळसे वाहे घ्राण । उठे घाणी फुटतां श्रवण । ते दुर्गंधि न घेववे ॥ २० ॥ डोळां निघती चिपडें । नाकीं दाटली मेकडें[8] । प्रातःकाळीं घाणी पडे । मुखीं मळासारिखी ॥ २१ ॥ लाळ थुंका आणि मळ । पित्त श्लेष्मा[9] प्रबळ । तयास म्हणती मुखकमळ । चंद्रासारिखें ॥ २२ ॥ मुख ऐसें कुश्चिळ दिसे । पोटीं विष्ठा भरली असे । प्रत्यक्षास प्रमाण नसे । भूमंडळीं सर्वथा ॥ २३ ॥ पोटीं घालितां दिव्यान्न । कांहीं विष्ठा कांहीं वमन । भागीरथीचें घेतां जीवन । त्याची होय लघुशंका ॥ २४ ॥ एवं मळ मूत्र आणि वमन[10] । हेंचि देहाचें जीवन । येणेंचि

---

१. फेरा, झपाटा. २. फसवणूक. ३. शौर्य. ४. घाणेरडें. ५. वसा, चरबी यांनीं. ६. रक्त. ७. पुष्कळ. ८. शेंबुड. ९. कफ. १०. ओक.

देह वाढे जाण । यदर्थी संशय नाहीं ॥ २५ ॥ पोटीं नसतां मळ मूत्र चोक । तरी मरोन जाती सकळ लोक । झाला राव अथवा रंक । पोटीं विष्ठा चुकेना ॥ २६ ॥ निर्मळपणें काढूं जातां । तरी देह पडेल तत्वतां । एवं देहाची व्यवस्था । ऐसी असे ॥ २७ ॥ ऐसा हा धड असतां । यथाभूत पाहूं जातां । मग ते दुर्दशा सांगतां । शंका बाधी ॥ २८ ॥ ऐसिया कारागृहीं[1] वस्ती । नवमास भोगिल्या बहु विपत्ती । नवहि द्वारें निरोधिती । वायु कैंचा येथें ॥ २९ ॥ वोकानरकाचे रस झरपती । ते जठराग्नीस्तव तापती । तेणें सर्वहि उकडती । अस्थि मांस ॥३०॥ त्वचेविण गर्भ ओळे[2] तंव मातेसि उठती डोहळे । कटु आम्ल तीक्ष्णें सर्वांग पोळे । तथा बाळकाचें ॥ ३१ ॥ बांधलें चर्माचें मोटाळें[3] । तेथें विष्ठेचें पोटाळें[4] । रसउपाय वंकनाळें[5] । होत असे ॥ ३२ ॥ विष्ठा मूत्र वात पित्त । नाकीं तोंडीं निघती जंत । तेथें निर्बुजलें[6] चित्त । अतिशयेंसी ॥ ३३ ॥ ऐसिये कारागृहीं प्राणी । पडिला अत्यंत दाटणीं[7] । कळवळोनि म्हणे चक्रपाणी । सोडवी येथूनि आतां ॥ ३४ ॥ देवा सोडविसी येथून । तरी मी स्वहित करीन । गर्भवास हा चुकवीन । पुन्हा न ये येथें ॥ ३५ ॥ ऐसी दुखवूनि प्रतिज्ञा केली । तंव जन्मवेळ पुढें आली । माता आक्रंदों लागली । प्रसूतिकाळीं ॥ ३६ ॥ नाकीं तोंडीं बैसलें मांस । मस्तकद्वारें सांडी श्वास । तेंही बुजलें निःशेष । जन्मकाळीं ॥ ३७ ॥ मस्तकद्वार तें बुजलें । तेणें चित्त निर्बुजलें । प्राण तळमळूं लागले । चहूंकडे ॥ ३८ ॥ श्वासोच्छ्वास कोंडला । तेणें प्राणी जाजावला[8] । मार्ग दिसेनासा जाहला । कासावीस ॥ ३९ ॥ चित्त बहु निर्बुजलें । तेणें आडभरीं भरलें । लोक म्हणती आडवें आलें । खांडोनि काढा ॥ ४० ॥ मग तें खांडोनि काढिती । हस्त पाद छेदूनि घेती । हातीं पांपडलें[9] तेंचि कापिती । मुख नासिक उदर ॥ ४१ ॥ ऐसे टवके तोडले । बाळकें प्राण सोडिले । मातेनेंही सांडिलें । कळेवर[10] ॥ ४२ ॥ मृत्यु पावला आपण । मातेचा घेतला प्राण । दुःख भोगिलें दारुण गर्भवासीं ॥ ४३ ॥

---

१. तुरुंगांत. २. गर्भवेष्टनांत, उदरांत. ३. मोटली. ४. सांठा. ५. मातेचे अन्नरस मुलास गर्भांत पोंचविणारें नाळ, त्यानें. ६. घाबरलें. ७. दडपणांत. ८. त्रासला. ९. तुकडे. १०. शरीर.

तथापि सुकृतेंकरूनी । मार्ग सांपडला योनी । तरी अडकला जाऊनी । कंठीं स्कंधीं मागुता ॥ ४४ ॥ तये संकुचित पंथीं । बळेंचि ओढूनि काढिती । तेणें गुणें प्राण जाती । बाळकाचे ॥ ४५ ॥ बाळकाचा जातां प्राण । अंतीं होय विस्मरण । तेणें पूर्वील स्मरण । विसरोनि गेला ॥ ४६ ॥ गर्भीं म्हणे सोहं सोहं[1] । बाहेर पडतां म्हणे कोहं[2] । ऐसा कष्टी जाहला बहु । गर्भवासीं ॥ ४७ ॥ दुःखा परवडी[3] होता जाहला । थोर कष्टीं बाहेर आला । सर्वेंचि कष्ट विसरला । गर्भवासाचे ॥ ४८ ॥ शून्याकार जाहली वृत्ती । कांहीं आठवेना चित्तीं । अज्ञानें पडली भ्रांती । तेणें सुखचि मानिलें ॥ ४९ ॥ देह विकार पावलें । सुखदुःखें झंलंबलें[4] । असो ऐसें गुंडाळलें । मायाजाळीं ॥ ५० ॥ ऐसें दुःख गर्भवासीं । होतें प्राणिमात्रासी । म्हणोनियां भगवंतासी । शरण जावें ॥ ५१ ॥ जो भगवंताचा भक्त । तो जन्मापासून मुक्त । ज्ञानबळें विरक्त । सर्वकाळ ॥ ५२ ॥ ऐशा गर्भवासीं विपत्ती । निरूपिल्या यथामती । सावध होऊनियां श्रोतीं । पुढें अवधान द्यावें ॥ ५३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तृतीयदशके जन्मदुःखनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## प्रथमसंबंध.

श्रीगणेशाय नमः ॥ संसार हाचि दुःखमूळ ॥ लागती दुःखाचे इंगळ ॥ मागां बोलिली तळमळ । गर्भवासाची ॥ १ ॥ गर्भवासीं दुःख झालें । तें बाळक विसरलें । पुढें वाढों लागलें । दिवसेंदिवस ॥ २ ॥ बाळपणीं त्वचा[5] कोंवळी । दुःख होतांचि तळमळी । वाचा नाहीं तये काळीं । दुःख सांगावया ॥ ३ ॥ देहास कांहीं दुःख झालें । अथवा क्षुधेनें पीडिलें । तरी तें परम आक्रंदलें[6] । परी अंतर नेणवे ॥ ४ ॥ माता कुरवाळी वरिवरी । परी जे पीडा जाहली अंतरीं । ते मायेसि न कळे अभ्यंतरीं । दुःख होय बाळकांसी ॥ ५ ॥ मागुतें मागुतें स्फुंदे[7] रडे । माता बुजावी[8] घेऊनि कडे । व्यथा नेणती बापुडें । तळमळी जीवीं ॥ ६ ॥ नाना व्याधींचे[9] उमाळे ।

---

१. तो मी, तो मी. २. कोण मी, कोण मी. ३. व्यास. ४. त्रासलें. ५. चामडी. ६. ओरडलें. ७. हुंदके देई. ८. समजावी. ९. रोगांचे.

तेणें दुःखें आंदोळे । रडे पडे कां पोळे । अग्निसंगें ॥ ७ ॥ शरीर रक्षितां न ये । घडती नाना अपाय । खोडी आधांतरीं होय । अवयवहीन बालक ॥ ८ ॥ अथवा अपाय चुकले । पूर्व पुण्य पुढें ठाकलें । मातेसि वोळखूं लागलें । दिवसेंदिवस ॥ ९ ॥ क्षणभरी मातेसि न देखे । तरी आक्रंदोनि रुदन करी दुःखें । ते समयीं मातेसारिखें । आणिक कांहींच नाहीं ॥ १० ॥ आस करूनि वास पाहे । मातेविण कदा न राहे । वियोग पळमात्र न साहे । स्मरण झालियानंतर ॥ ११ ॥ जरी ब्रह्मादिक देव आले । अथवा लक्ष्मीनें अवलोकिलें । तरी न वचे बुझाविलें । मातेवांचुनी ॥१२॥ कुरूप अथवा कुलक्षण । सकळांहूनि करंटेपण । तरी नाहीं तीसमान । भूमंडळीं कोणी ॥ १३ ॥ ऐसें तें केविलवाणें । मातेविण दिसें उणें । रागें परतें केलें तिणें । तरी आक्रंदोनि मिठी घाली ॥ १४ ॥ सुख पावे मातेजवळी । दुरी करितांचि तळमळी । अति प्रीति तये काळीं । मातेवरी लागली ॥ १५ ॥ तंव ते मातेसि मरण आलें । प्राणी पोरटें जाहलें । दुःखें झुरणी लागलें । आई आई ह्मणोनी ॥ १६ ॥ आई पाहतां दिसेना । दीनरूप पाहे जना । आस लागलीसे मना । आई येईल ह्मणोनी ॥१७॥ माता ह्मणोनि मुख पाहे । तंव ती आपुली माता नोहे । मग हिंवसलेंसें राहे । दैन्यवाणें ॥१८॥ मातावियोगें कष्टलें । तेणें मानसीं दुःख झालें । देहहि क्षीणत्व पावलें । अतिशयेंसी ॥१९॥ अथवा माताहि वांचली । मायलेंकरां भेटी झाली । बाळदशा ते राहिली । दिवसेंदिवस ॥ २० ॥ बाळपण जाहलें उणें । दिवसेंदिवस होय शाहणें । मग तें मायेचें अत्यंत पेखणें । होतें तें राहिलें ॥२१॥पुढें लोभ लागला खेळाचा । कळप मेळवी पोरांचा । आल्या गेल्या डायाचा । आनंद शोक वाहे ॥ २२ ॥ मायबापें शिकविती पोटें । तयाचें दुःख परम वाटे । चट लागली न सुटे । संगति लेंकुरांची ॥ २३ ॥ लेंकुरांमध्यें खेळतां । नाठवे माता आणि पिता । तंव तेथेंहि अवचिता । दुःख पावला । २४ ॥ पडिले दांत फुटला डोळा । मोडला पाय झाला खुळा । गेला माज अवकळा । ठाकोनि आली ॥२५॥ निघाल्या देवी

१. कांपतो. २. मध्येंच. ३. वाट. ४. दूर. ५. हिरमुसलेंसें. ६. भोंदा, लळा. ७. डावांचा. ८. पोटाच्या काळजीमुळें. ९. लंगडा.

आणि गोंवर । उठलें कपाळ लागला ज्वर । पोटशूळ निरंतर । वायगोळा ॥ २६ ॥ लागलीं भुतें जाहली झडपणी । जळींच्या मेसको[1] मायराणी । मुंज्या झोटिंग करणी । ह्मसोबाची ॥ २७ ॥ वेताळ खंकाळ[2] लागला । ब्रम्हग्रह[3] संचरला । नेणों चेडा वोलांडिला । कांहीं कळेना ॥ २८ ॥ एक म्हणती बीरदेव । एक ह्मणती खंडेराव । एक म्हणती सर्व वार्व[4] । हा ब्रह्म-संबंध ॥ २९ ॥ एक म्हणती कोणीं केलें । अंगीं दैवत घातलें । एक ह्मणती चुकलें । सटवाईचें ॥ ३० ॥ एक म्हणती कर्मभोग । अंगीं जडले नाना रोग । वैद्य पंचाक्षरी चांग[5] । बोलावूनि आणिले ॥ ३१ ॥ एक म्हणती हा वांचेना । एक म्हणती हा मरेना । भोग भोगितो यातना । पापास्तव ॥ ३२ ॥ गर्भदुःख विसरला । तो त्रिविधतापें पोळला । प्राणी बहुत कष्टी जाहला । संसारदुःखें ॥ ३३ ॥ इतकेंहि चुकोनि वांचला । तरी मारमारोनि शाहणा केला । लौकिकीं नेटका झाला । नांव राखे ऐसा ॥ ३४ ॥ पुढें मायबापीं लोभास्तव । संभ्रमें मांडिला विवाह । दाऊनियां सकळ वैभव । नोवरी पाहिली ॥ ३५ ॥ वऱ्हाडी वैभव दाटलें । देखोनि परम सुख वाटलें । मन हें रंगोनि गेलें । सासुरवाडीकडे ॥ ३६ ॥ मायबापीं भलतैसें असावें । परी सासुरवाडीकडे नेटकें जावें । द्रव्य नसेल तरी व्यावें[6] । ऋण कळांतरें ॥ ३७ ॥ अंतरभाव ते सासुरवाडी । मायबापें राहिलीं बापुडीं[7] । होताति सर्वस्वें कुडकुडीं[8] । तितुकेंचि कार्य त्यांचें ॥ ३८ ॥ नोवरी आलिया घरा । अति हव्यास वाटे वरा । म्हणे मजसारिखा दुसरा । कोणीच नाहीं ॥ ३९ ॥ माय बाप बंधु बहिणी । नोवरी न देखतां वाटती कांणीं । अत्यंत लोधला[9] पापी प्राणी । अविद्येनें[10] भुलविला ॥ ४० ॥ संभोग नसतां इतुका प्रेमा । योग झालिया उलंघी सीमा । प्रीति वाढविती कामा । करितां प्राणी गुंतला ॥ ४१ ॥ जरी न देखे क्षण एक डोळां । तरी जीव होय उतावळा । प्रीतिपात्र अंतरकळा । होऊनि गेली ॥ ४२ ॥ कोंवळे कोंवळे शब्द मंजुळ । मर्यादा लज्जा मुखकमळ । वक्त्रावलोकनें केवळ । मन ज्याचें मैंदावें[11] ॥ ४३ ॥ कळवळा येतां सांवरेना । शरीरविकलता आवरेना । अन्यत्र

१. जळदेवता. २. उग्र. ३. ब्रह्मराक्षस. ४. व्यर्थ. ५. चांगले. ६. व्याजानें. ७. निकामी. ८. कंटाळवाणीं. ९. लुब्ध झाला. १०. अज्ञानानें. ११. गुंग होतें.

व्यवसायीं क्रमेना[1] । हुरहुर वाटे ॥ ४४ ॥ व्यवसाय करितां बाहेरी । मन लागलेंसें घरीं । क्षणक्षणा अभ्यंतरीं । स्मरण होय कामिनीचें ॥ ४५ ॥ तुह्मी माझिया जिवांतील जीव । म्हणोनि अत्यंत लाघवें[2] । दाऊनियां चित्त सर्व । हिरूनि घेतलें ॥ ४६ ॥ मैंदें[3] सोयरीक काढिती । फांसे घालोनि प्राण घेती । तैसें आयुष्य गेलिया अंतीं । प्राणियास होय ॥ ४७ ॥ प्रीति कामिनीसि लागली । जरी तियेसि कोणी रागेजली । तरी परम क्षिती[4] वाटली । मानसीं गुप्तरूपें ॥४८॥ तये भार्येचेनि कैवारें । मायबापांसी नीच उत्तरें । बोलोनियां तिरस्कारें । वेगळा निघे ॥ ४९ ॥ स्त्रीकारणें लाज सांडिली । स्त्रीकारणें सर्वां सोडिलीं । स्त्रीकारणें बिघडिलीं । सकळही जिवलगें ॥५०॥ स्त्रीकारणें देह विकिला । स्त्रीकारणें सेवक जाहला । स्त्रीकारणें सांडविला । विवेकासी ॥ ५१ ॥ स्त्रीकारणें लोलंगता[6] । स्त्रीकारणें अतिनम्रता । स्त्रीकारणें पराधीनता । अंगिकारिली ॥५२॥ स्त्रीकारणें लोभी जाहला । स्त्रीकारणें धर्म सांडिला । स्त्रीकारणें अंतरला । तीर्थयात्रा स्वधर्म ॥ ५३ ॥ स्त्रीकारणें सर्वथा कांहीं । शुभाशुभ विचारिलें नाहीं । तन मन धन सर्वही । अनन्यभावें अर्पिलें ॥ ५४ ॥ स्त्रीकारणें परमार्थ बुडविला । प्राणी स्वहितासि नागवला । ईश्वरीं[7] कानकोंडा जाहला । स्त्रीकारणें कामबुद्धी ॥ ५५ ॥ स्त्रीकारणें सोडिली भक्ती । स्त्रीकारणें सोडिली विरक्ती । स्त्रीकारणें सायुज्यमुक्ती[8] । तेही तुच्छ मानिली ॥ ५६ ॥ एके स्त्रियेचेनि गुणें । ब्रह्मांड मानिलें उणें । जिवलगें तीं पिसुणें[9] । ऐसीं वाटलीं ॥ ५७ ॥ ऐसी अंतरीं प्रीति जडली । सर्वस्वाची सांडी केली । तंव ते[5] मरोनि गेली । अकस्मात भार्या ॥ ५८ ॥ तेणें मनीं शोक वाटला । म्हणे थोर घात झाला । आतां कैंचा बुडाला संसार माझा ॥ ५९ ॥ जिवलगाचा सोडिला संग । अवचितां झाला घरभंग[10] । आतां करूं देहत्याग । म्हणे दुःखें ॥ ६० ॥ स्त्री वेऊनि आडवी । ऊर बडवी पोट बडवी । लाज सांडोनि गौरवी । लोकां देखतां ॥ ६१ ॥ म्हणे माझें बुडालें घर । आतां न करीं हा संसार । दुःखें[11] आक्रंदे थोर । घोर

१. करमेना. २. दिखाऊ प्रीति. ३. घातकी, फांसेगार. ४. खंती. ५. अंतरलीं. ६. आसक्ति. ७. चोरटा. ८. ब्रह्मनिर्वाण. ९. शत्रु. १०. संसाराची नासाडी. ११. ओरडूं लागला.

घेघें ॥ ६२ ॥ तेणें जीव वारयां[1] वेधलो । संसाराचा उबग[2] आला । तेणें दुःखें झाला । जोगी कां महात्मा ॥ ६३ ॥ कां तें निघोन जाणें चुकलें । पुनः मागुतें लग्न केलें । तेणें अत्यंतचि निमग्न झालें । मन द्वितीयसंबंधीं ॥६४॥ जाहला द्वितीय संबंध । सर्वेचि मानिला आनंद । श्रोतीं व्हावें सावध । पुढिलिये समासीं ॥ ६५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तृतीयदशके प्रथमसंबंधनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. द्वितीयसंबंध.

श्रीगणेशाय नमः ॥ द्वितीय संबंध जाहला । दुःख मागील विसरला । सुख मानोनि राहिला । संसाराचें ॥ १ ॥ झाला अत्यंत कृपण । पोटा न खाय अन्न । रुक्याकारणें[3] सोडी प्राण । एकसरा[4] ॥ २ ॥ कदा कल्पांतीं न वेंची[5]। संचिलेंचि पुनः सांची[6] । अंतरीं असेल कैंची । सद्वासना ॥ ३ ॥ स्वयें धर्म न करी । धर्मकर्त्यासही वारी[7] । सर्वकाळ निंदा करी । साधुजनांची ॥ ४ ॥ नेणे तीर्थ नेणे व्रत । नेणे अतीत अभ्यागत । मुंगीमुखींचें शीत । तेंही वेंचून[8] सांची ॥ ५ ॥ स्वयें पुण्य करवेना । केलें तरी देखवेना । उपहास करी मना । न ये म्हणोनि ॥ ६ ॥ देवां भक्तांस उच्छेदी । अंगबळें सकळांसि खेदी । निष्ठुर शब्दें अंतर भेदी । प्राणिमात्रांचें ॥७॥ नीति सांडोनि मागें । अनीतीनें वर्तो लागे । गर्व धरून फुगे । सर्वकाळ ॥ ८ ॥ पूर्वजांसि सिंतरलें[9] । पक्ष श्राद्ध नाहीं केलें । कुळदैवत टाकिलें । कोणे परी ॥ ९ ॥ अक्षतें[10] भरली[10] भाणी[10] । दुजा ब्राह्मण मेहुणा । आला होता पाहुणा । स्त्रियेसि मूळ ॥१०॥ कदा नावडे हरिकथा । देव नलगे सर्वथा । स्नान संध्या म्हणे वृथा । कासया करावी ॥११॥ अभिलाषें सांची वित्त । स्वयें करी विश्वासघात । मदें मातला उन्मत्त । तारुण्यपणें ॥१२॥ तारुण्य अंगीं भरभरलें । धारिष्ट न वचे धरिलें । करूं नये तेंचि केलें । महापाप॥१३॥ स्त्री केली परी धाकुटी । धीर न धरवे पोटीं । विषयलोभें शेवटीं । वोळखी

---

१. वायुचक्रासारखा भ्रमूं लागला. २. कंटाळा. ३. पैकरितां. ४. एकदम. ५. खर्च करी. ६. सांठवितो. ७. आडवा येतो. ८. निवडून, टिपून. ९. ठकविलें. १०. बहिणीला ओंस भरली, सवाष्ण बोलाविली.

सांडिली ॥ १४ ॥ मायबहिणी न विचारी । जाहला पापी परद्वारी[1] । दंड पावला राजद्वारीं । तरी पालटेना ॥ १५ ॥ परस्त्री देखोन दृष्टीं । अभिलाष उपजे पोटीं । अकर्तव्यें हिंपुटी[2] । पुनः होय ॥ १६ ॥ ऐसें पाप उदंड केलें । शुभाशुभ नाहीं उरलें । तेणें दोषें दुःख भरलें । अकस्मात अंगीं ॥ १७ ॥ व्याधि भरली सर्वांगीं । प्राणी जाहला क्षयरोगी । केले दोष आपुले भोगी । शीघ्रकाळें ॥ १८ ॥ दुःखें सर्वांग फुटलें । नासिक आवघेंचि बैसलें । लक्षण जाऊनि झालें । कुलक्षणें[3] ॥ १९ ॥ देहास क्षीणता आली । नाना व्यथा उद्भवली । तारुण्यशक्ति राहिली । खंगला प्राणी ॥ २० ॥ सर्वांगीं लागल्या कळा । देहास आली अवकळा । प्राणी कांप चळचळा । शक्ति नाहीं॥२१॥ हस्तपादादिक झडले । सर्वांगीं किडे पडले । देखोन थुंकों लागले । लहान थोर ॥ २२ ॥ जाहली विष्टेची सारणी । भोंवतीं उठली वैंढाणी[4] । अत्यंत खंगला प्राणी । जीव न वचे ॥ २३ ॥ आतां मरण दे गा देवा । बहुत कष्ट झाले जीवा । जाहला नाहीं नेणों ठेवा । पातकांचा ॥ २४॥ दुःखे घळघळां रडे । जों जों पाहे अंगाकडे । तों तों दैन्यवाणें बापुडें । तळमळीं जीवीं ॥ २५ ॥ ऐसे कष्ट झाले बहुत । सकळ झालें वाताहत । दरवडा घालूनि वित्त । चोरटीं नेलें ॥२६॥ झालें ऐत्र[5] ना पैरत्र[6] । प्रारब्ध ठाकलें विचित्र । आपलें आपण मळमूत्र । सेविलें दुःखें ॥ २७॥ पापसामुग्री सरली । दिवसेंदिवस व्यथा हरली । वैद्यें औषधें दीधलीं । उपचार झाला ॥ २८ ॥ मरत मरत वांचला । यास पुनः जन्म झाला । लोक म्हणती पडिला । माणसांमध्यें ॥ २९ ॥ येरें स्त्री आणिली । पुन्हा घरवात मांडिली । अति स्वार्थबुद्धि धरिली । पुन्हा मागुति ॥ ३० ॥ कांहीं वैभव मेळविलें । पुन्हा सर्वहि संचिलें । परंतु गृह बुडालें । संतान नाहीं ॥ ३१ ॥ पुत्रसंतान नसतां दुःखी । वांझ नांव पडलें लोकीं । तें न फिटे म्हणोनि लेंकी । तरी हो आतां ॥ ३२ ॥ म्हणोनि नाना सायास । बहुत देवांस केले नवस । तीर्थें व्रतें उपवास । धरणें[7] पारणें मांडिलें ॥ ३३ ॥ विपयसुख तें राहिलें । वांझपणें दुःखी केलें । तंव तें कुळदैवत पावलें । झाली वृद्धि ॥ ३४ ॥ त्या लेंकरावरी

---

१. व्यभिचारी २ विरस. ३. शोभाहीन. ४. दुर्गंधी. ५. इहलोक. ६. परलोक. ७. देवळाच्या दारांत उपाशीं बसून देवावर संकट घालणें.

अतिप्रीती । दोघेंहि क्षण एक न विसंबती । कांहीं झाल्या आक्रंदती । दीर्घ-स्वरें ॥ ३५ ॥ ऐसीं तीं परम दुःखित । पूजित होतीं नाना दैवत । तंव तेंहि मेलें अवचित । पूर्वपापेंकरूनी ॥ ३६ ॥ तेणें बहुत दुःखी झाले । घरीं अंधारें पडिलें । म्हणती आम्हांस कां ठेविलें । देवें वांझ करूनी ॥ ३७ ॥ आम्हां द्रव्य काय करावें । तें जावें परी अपत्य व्हावें । अपत्यालागीं व्यजावें । लागे सर्व ॥ ३८ ॥ वांझपण संदिसें[1] गेलें । तों मरतवांझ नांव पडलें । तें न फिटे कांहीं केलें । तेणें दुःखें आक्रंदती ॥ ३९ ॥ आमुची वेली कां खुंटली । हा हा देवा वृत्ति[2] बुडाली । कुळस्वामिनी कां क्षोभली । विझाला कुळदीप ॥ ४० ॥ आतां लेंकराचें मुख देखेन । तरी आनंदें[3] रांडी चालेन । आणि गळही टोंचीन । कुळस्वामिनीपाशीं ॥ ४१ ॥ आई भुत्या करीन तुझा । नांव ठेवीन केरपुंजा[4] । वेसंनी[5] घालीन माझा । मनोरथ पुरवीं ॥ ४२ ॥ बहुत देवांस नवस केले । बहुत गोसांवी धुंडिले । गटगटां गिळूं[6] लागले । सगळे विंचू ॥ ४३ ॥ केले समंधाचे सायास । रात्रिंदिवस घातलें बहुवस । केलें नारिकेळें[7] ब्राह्मणांस । आम्रदानें[8] दधिलीं ॥ ४४ ॥ केलीं नाना कौटाळें[9] । पुत्रलोभें केलीं ढाळें । तरी अदृष्ट[10] फिरलें । पुत्र नाहीं ॥ ४५ ॥ वृक्षाखालें जाऊनि नाहाती । फळतीं झाडें करपती । ऐसे नाना दोष करिती । पुत्रलोभाकारणें ॥ ४६ सांडोनि सकळ वैभव । त्यांचा वारया वेंधलों[11] जीव । तंव तो पावला खंडेराव । आणि कुळस्वामिनी ॥ ४७ ॥ आतां मनोरथ पुरती । स्त्रीपुरुषें आनंदती । सावध होऊनि श्रोतीं । पुढें अवधान द्यावें ॥ ४८ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तृतीयदशके द्वितीयसंबंधनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. संपत्तिवेध.

श्रीगणेशाय नमः ॥ लेंकुरें उदंड झालीं । तंव ते लक्ष्मी निघोन गेली । बापुडीं भिकेस लागलीं । कांहीं खावयासी मिळेना ॥ १ ॥ लेंकुरें

---

१. नुक्तेच. २. वतन. ३. धगधगीत निखाऱ्यांची खाई. ४. केराचा ढीग, केरोपंत. ५. नथणी ६. अंगांत दैवत आणून बोलविलें. ७. नारळ. ८. मंत्रतंत्र, जारणमारणादि साधनें. ९. क्षुद्र साधनें. १०. नशीब. ११. भ्रमू लागला.

खेळती धाकुटीं । एक रांगती एक पाठीं । ऐसी घरभरी झाली दाटी । कन्या आणि पुत्रांची ।। २ ।। दिवसेंदिवस खर्च वाढला । यावा[1] होता तो खुंटोनि गेला । कन्या उपवर[2] झाल्या त्यांला । उजवावया द्रव्य नाहीं ।।३।। मायबापें होतीं संपन्न । त्यांचें उदंड होतें धन । तेणेंकरितां प्रतिष्ठा मान । जनीं झाला होता ।। ४ ।। भ्रम आहे लोकाचारीं । पहिली नांदणूक नाहीं घरीं । दिवसेंदिवस अभ्यंतरीं । दरिद्र आलें ।। ५ ।। ऐसी घरवात वाढली । खातीं तोंडें मिळालीं । तेणें प्राणियासि लागली । काळजी उद्वेगाची ।। ६ ।। कन्या उपवर[2] झाल्या[2] । पुत्रांस नोवऱ्या आल्या। आतां उजवण्या केल्या। पाहिजेत कीं ।। ७ ।। जरी मुलें तैसींच राहिलीं । तरी पुन्हा लोकलाज लागली । ह्मणती कायसा व्यालीं । जन्मदरिद्रें ।। ८ ।। ऐसी लोकलाज होईल । वडिलांचें नांव जाईल । आतां ऋण कोण देईल । लग्नापुरतें ।। ९ ।। मागें ऋण ज्याचें घेतलें । त्याचें परतोन नाहीं दिधलें । ऐसें आभाळ कोसळलें । उद्वेगाचें ।। १० ।। आपण खातों अन्नासी । अन्न खातें आपणासी । सर्वकाळ मानसीं । चिंतातुर ।। ११ ।। पत अवघीच मोडली । वस्तुभाव गहाण पडली। हा हा देवा वेळ आली । आतां दिवाळ्याची ।। १२ ।। कांहीं केला ताडामोडा । विकिला घरचा रेडापाडा । कांहीं पैका रोकडा । कळांतरें[3] काढिला ।। १३ ।। ऐसें ऋण घेतलें । लौकिकीं दंभ[4] केलें । सकळ ह्मणती नांव राखिलें । वडिलांचें ।। १४ ।। ऐसें ऋण उदंड झालें । ऋणाईतीं[5] वेढूनि घेतलें । मग प्रयाण[6] आरंभिलें । विदेशाप्रती ।। १५ ।। दोन वर्षें बुडी मारिली । नीचसेवा अंगिकारली । शरीरीं आपदा भोगिली । अतिशयेंसी ।। १६ ।। कांहीं मेळविलें विदेशीं । जीव लागला मनुष्यांपाशीं । मग पुसोनियां स्वामीसी । मुरडता झाला ।।१७।। तंव तीं अत्यंत पीडा पावलीं । वाट पाहात बैसलीं । म्हणती दिवसगती कां लागली । काय कारण देवा ।। १८ ।। आतां आम्हीं काय खावें । किती उपवासी मरावें । ऐसीयाचे संगतीस देवें । कां पां घातलें आम्हांसी ।। १९ ।। ऐसें आपुलें सुख पावती । परी त्याचें दुःख

---

१. मिळकत. २. वयांत आल्या. ३. व्याजानें. ४. आव, थाटमाट. ५. सावकारांनीं. ६. गमन, जाणें.

नेणती । आणि शक्ति गेलिया अंतीं । कोणीच कामा न येती ॥ २० ॥ असो ऐसी वाट पाहातां । दृष्टीं देखिला अवचितां । मुलें धांवती ताता ताता । भागलासी म्हणोनी ॥ २१ ॥ स्त्री देखोनि आनंदली । ह्मणती आमुचीं दैन्य फिटलीं । तंव येरें दीधली । गांठोडी हातीं ॥ २२ ॥ सकळांस आनंद झाला । म्हणती आमुचा वडील आला । तेणें तरी आह्मांला । आंगड्या टोप्या आणिल्या ॥ २३ ॥ ऐसा आनंद चारी दिवस ॥ सवेंचि मांडिली कुसमुस । ह्मणती हे गेलिया आह्मांस । पुनः आपदा लागती ॥ २४ ॥ ह्मणोनि आणिलें तें असावें । याणें मागुती विदेशास जावें । आह्मीं हें खाऊं तों यावें । द्रव्य मेळवूनी ॥ २५ ॥ ऐसी वासना सकळांची । अवघीं सोयरीं सुखाचीं । स्त्री अत्यंत प्रीतीची । तेहि सुखा लागली ॥ २६ ॥ विदेशीं बहुत दगदगला । विश्रांति घ्यावया घरीं आला । श्वासहि नाहीं टाकिला । तों जाणें वोढवलें ॥ २७ ॥ पुढें अपेक्षा जोशियाची । केली विवंचना मुहूर्तांची । वृत्ति गुंतली तयाची । जातां प्रशस्त न वाटे ॥ २८ ॥ मार्या मात्रा सिद्ध केली । कांहीं सामुग्री बांधिली । लेंकुरें दृष्टीं पाहिलीं । मार्गस्थ झाला ॥ २९ ॥ स्त्रियेसि अवलोकिलें । वियोगें परम दुःख वाटलें । प्रारब्धसूत्र तुटलें । ऋणानुबंधाचें ॥ ३० ॥ कंठ सद्गदित जाहला । न सांवरेचि गहिंवर आला । लेंकुरें आणि पित्याला । ताडातोडी जाहली ॥ ३१ ॥ जरी ऋणानुबंध असेल । तरी मागुती भेटी होईल । नाहीं तरी संगति पुरेल । येच भेटीनें तुमची ॥ ३२ ॥ ऐसें बोलोनि स्वार होये । मागुती फिरफिरोनि पाहे । वियोगदुःख न साहे । परंतु कांहीं न चले ॥ ३३ ॥ आपुला गांव राहिला मागें । चित्त भ्रमलें संसारउद्वेगें । दुखावला प्रपंचसंगें । अभिमानास्तव । ३४ । ते समयीं माता आठवली । ह्मणे धन्य धन्य ते माउली । मजकारणें बहुत कष्टली । परी मी नेणेंचि मूर्ख ॥ ३५ ॥ आजि जरी ते असती । तरी मला कदा न विसंबती । वियोग होतां आक्रंदती । ते पोटआगी वेगळीच ॥ ३६ ॥ पुत्र वैभवहीन भिकारी । माता तैसाचि अंगिकारी । दगदगला देखोन अंतरीं । त्याच्या दुःखें दुखावे ॥ ३७ ॥ प्रपंचविचारें पाहतां । हें सकळ जोडे न

---

१. कुरकूर. २. मन. ३. द्रव्य. ४. फराळाचें सामान.

जोडे माता । हें शरीर जयेकरितां । निर्माण जाहलें ॥ ३८ ॥ लांव तरी ते माया । काय कराव्या सहस्र जाया[1] । परी भुलोनि गेलों वायां । मकरध्वजाचेनी[2] ॥ ३९ ॥ या एका कामाकारणें । जिवलगांसी द्वंद्व[3] घेणें । सखीं तींच पिशुनें[4] । ऐशीं वाटती ॥ ४० ॥ म्हणोनि धन्य धन्य प्रपंची जन । जे मायबापांचें भजन । करिती न करिती मन । निष्ठुर जिवलगासी ॥ ४१ ॥ संगती स्त्रियाबाळकांची । आहे सांठी[5] जन्मांची । परी मायबापें कैचीं मिळतील पुढें ॥ ४२ ॥ ऐसें पूर्वीं होतें ऐकिलें । परी ते समर्थी नाहीं कळलें । मन हें बुडोन गेलें । रतिसुखाचिया डोहीं ॥ ४३ ॥ हीं सखीं वाटती परी पिशुणें । मिळालीं वैभवाकारणें । रितें जातां लाजिरवाणें । अत्यंत वाटे ॥ ४४ ॥ आतां भलतैसें करावें । परी द्रव्य मिळवून न्यावें । रितें जातां स्वभावें । दुःख आहे ॥ ४५ ॥ ऐसी विवंचना करी । दुःख वाटलें अंतरीं । चिंतेचिया महापुरीं । बुडोनि गेला ॥ ४६ ॥ ऐसा हा देह आपुला । असतांचि पराधीन केला । ईश्वरीं कानकोंडा[6] झाला । कुटुंबकांबाडी[7] ॥ ४७ ॥ या एका कामासाठीं । जन्म गेला आटाआटी । वय वेंचल्या शेवटीं । एकलेंचि जावें ॥ ४८ ॥ ऐसा मनीं पस्तावला । क्षण एक उदास झाला । सर्वेचि प्राणी[8] झेलंबळा[9] । मायाजाळें ॥ ४९ ॥ कन्या पुत्र आठवलीं । मनींहुनि क्षिती[10] वाटली । ह्मणे लेंकुरें अंतरलीं । माझीं मज ॥ ५० ॥ मागिल दुःख आठवलें । जें जें होतें प्राप्त झालें । मग रुदन आरंभिलें । दीर्घ स्वरें ॥ ५१ ॥ अरण्यीं रुदन करितां । कोणी नाहीं बुझाविता[11] । मग होय विचारिता । आपुले मनीं ॥ ५२ ॥ आतां कायसा रडावें । प्राप्त होतें तें भोगावें । ऐसें बोलोनियां जीवें । धारिष्ट केलें ॥ ५३ ॥ ऐसा दुःखें दगदगला । मग विदेशाप्रति गेला । पुढें प्रसंग कैसा वर्तला । तो सावध ऐका ॥ ५४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तृतीयदशके संपत्तिवेधनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

१. बायका. २. कामामुळें. ३. तंटा. ४. शत्रु. ५. सोबत. ६. चोरटा. ७. कुटुंबाचा भार वाहणारा. ८. दगदगीनें. ९. गुंडाळून गेला. १०. खंती. ११. समजावणी करणारा.

## ५. कांताहरण.

श्रीगणेशाय नमः ॥ पुढें गेला विदेशासी । प्राणी लागला आपुल्या व्यासंगासी । आपुल्या जीवें सोसी । नाना श्रम ॥ १ ॥ ऐसा दुस्तर संसार । कष्टतां कष्टला थोर । पुढें दोनी चारी संवत्सर । द्रव्य मिळविलें ॥ २ ॥ सवेंचि आला देशासी । तों अवर्षण पडिलें देशीं । तेणें गुणें मनुष्यांसी । बहुत कष्ट जाहले ॥ ३ ॥ एकांच्या बैसल्या अमृतकळा । एकांस चंद्री[3] लागली डोळां । एक कांपती चळचळां । दैन्यवाणी ॥४॥ एक दीनरूप बैसलीं । एक सुजलीं आणि मेलीं । ऐसीं कन्यापुत्रें देखिलीं । अकस्मात डोळां ॥ ५ ॥ तेणें बहुत दुःखी झाला । देखोनियां उभडें आला । प्राणी आक्रंदों लागला । दैन्यवाणें ॥ ६ ॥ तंव तीं अवघीं सावध झालीं । म्हणती बाबा जेवूं घाली । अन्नालागीं मिटकलीं[6] । झडा घालिती ॥ ७ ॥ गांठोडें सोडोनि पाहती । हातां पडलें तेंचि खाती । कांहीं तोंडीं कांहीं हातीं । प्राण जाती निघोनियां ॥ ८ ॥ तांतडी तांतडी जेऊं घाली । तों जेवितां जेवितां कांहीं मेलीं । कांहीं होतीं धांदावलीं । तींही मेलीं अजीर्णें ॥ ९ ॥ ऐसीं बहुतेक मेलीं । एक दोन मुलें उरलीं । तींही दैन्यवाणीं झालीं । आपुले मातेवांचूनी ॥१०॥ ऐसें अवर्षण आलें । तेणें घरचि बुडालें । पुढें देशीं सुभिक्ष[9] झालें । अतिशयेंसि ॥ ११ ॥ लेंकुरा नाहीं वाढवितें । अन्न करावें लागे आपुलेनि हातें । बहु त्रास घेतला चित्तें । स्वयंपाकाचा ॥ १२ ॥ लोकीं भरीस घातलें । पुनः मागुतें लग्न केलें । द्रव्य होतें तें वेंचिलें । लग्नाकारणें ॥ १३ ॥ पुन्हा विदेशासि गेला । द्रव्य मेळवूनि आला । तंव घरीं कलहो लागला । सावत्र पुत्रांसीं ॥ १४ ॥ स्त्री झाली न्हाती धुती । पुत्र देखों न शकती । भ्रतारांची गेली शक्ती । वृद्ध झाला ॥ १५ ॥ सदा भांडण पुत्रांचें । कोणी नायकती कोणाचें । वनितेंं[10] अतिप्रीतीचें । प्रीतिपात्र ॥ १६ ॥ किंतु[11] बैसला मना । एके ठाईं पटेना । म्हणोनियां पांचजणां । मेळविलें ॥ १७ ॥ पांचजण वांटे करिती । तों ते पुत्र नायकती । निवाडा नव्हेचि अंतीं । भांडण लागलें ॥ १८ ॥ बापलेंकांचें भांडण झालें । लेंकीं बापास मारिलें ।

---

१. उद्योगास. २. गालफडा. ३. ताटकळा आली. ४. गहिंवर. ५. आशाळलेलीं. ६. उत्त [illegible] ईनें. ८. मुकेलेलीं. ९. सुकाळ. १०. बायको. ११. अविश्वास.

तंव तें मातेनें घेतलें । शंखतीर्थ[1] ॥ १९ ॥ ऐकोनि मिळाले लोक । उभे पाहती कौतुक । म्हणती बापास लेंक । कामा आले ॥ २० ॥ ज्यांकारणें केले नवस । ज्यांकारणें केले सायास । ते पुत्र मातापितयांस । मारिती पाहा ॥ २१ ॥ ऐसी आली पापकळी । आश्चर्य मानिलें सकळीं । उभे तोडिती कळी[2] । नागरिक लोक ॥ २२ ॥ पुढें बैसोन पांचजण । वांटे केले तत्समान । बापलेंकांचें भांडण । तोडिलें तीहीं ॥ २३ ॥ बापास वेगळें घातलें । खोंपट बांधोनि दिधलें । मन कांतेचें लागलें । स्वार्थबुद्धीं ॥२४॥ कांता तरुण पुरुष वृद्ध । दोघांस पडिला संबंध । खेद सांडूनि आनंद । मानिला तीहीं ॥ २५ ॥ स्त्री सांपडली सुंदर । गुणवंत आणि चतुर । म्हणे माझें भाग्य थोर । वृद्धपणीं ॥ २६ ॥ ऐसा आनंद मानिला । दुःख सर्व विसरला । तंव तो गलबला झाला । परचक्र आलें ॥ २७ ॥ अकस्मात धाडी आली । कांता बंदीं धरूनि नेली । वस्तभावही गेली । प्राणियाची ॥ २८ ॥ तेणें दुःख जाहलें भारी । दीर्घस्वरें रुदन करी । मनीं आठवे सुंदरी । गुणवंत ॥ २९ ॥ तंव तिची वार्ता आली । तुमची कांता भ्रष्टविली । ऐकोनियां अंग घाली । पृथ्वीवरी ॥ ३० ॥ सव्य अपसव्य लोळे । जळें पाझरती डोळे । आठवितां चित्त पोळे । दुःखानळें[3] ॥ ३१ ॥ द्रव्य होतें मेळविलें । तेंहि लग्नास वेंचिलें । कांतेसहि धरून नेलें । दुराचारीं ॥ ३२ ॥ मजहि वृद्धपण आलें । लेंकीं वेगळें घातलें । आहा देवा ओढवलें अदृष्ट[4] माझें ॥ ३३ ॥ द्रव्य नाहीं कांता नाहीं । ठाव नाहीं शक्ति नाहीं । देवा मज कोणीच नाहीं । तुजवेगळें ॥ ३४ ॥ पूर्वीं देव नाहीं पूजिला । वैभव देखोनि भुलला । सेखीं प्राणी पस्तावला । वृद्धपणीं ॥ ३५ ॥ देह अत्यंत खंगला । सर्वांगें वाळोनि गेला । वात पित्तें उसळला । कंठ दाटला कफें ॥ ३६ ॥ वळे जिव्हेची बोबडी । कफें कंठ घडघडी । दुर्गंधी सुटली तोंडीं । नाकीं श्लेष्मा[5] वाहे ॥ ३७ ॥ मान कांपे चळचळां । डोळे गळती भळभळां । वृद्धपणीं अवकळा । ठाकोनि आली ॥ ३८ ॥ दंतपाटी उखळली । तेणें बोचरखिंडी पडली । मुखीं लाळ गळों लागली । दुर्गंधीची ॥ ३९ ॥ डोळां पाहतां दिसेना । कानीं शब्द ऐकेना । दीर्घस्वरें बोलवेना । दम

---

१. शंख करणें. २. तंटा. ३. दुःखाग्नीनें. ४. दव. ५. शेंबूड.

दाटे ॥ ४० ॥ शक्ति पायांची राहिली । बैसवेना मुरकुंडी घाली । बृहती वाजों लागली । तोंडाच ऐसी ॥ ४१ ॥ क्षुधा लागतां आवरेना । अन्न समर्थी मिळेना । मिळालें तरी चावेना । दांत गेले ॥ ४२ ॥ पित्तें जिरेना अन्न । भक्षितांचि होय वमन । तैसेंच जाय निघोन । अपानद्वारें ॥ ४३ ॥ विष्टा मूत्र आणि बळस । भोंवता वमनें केला नास । दुरोन जातां कोंडे श्वास । विश्वजनांचा[1] ॥ ४४ ॥ नाना दुःखें नाना व्याधी । वृद्धपणीं चळे बुद्धी । तरी पुरेना अवधी । आयुष्याची ॥ ४५ ॥ पापण्या भोंवयांचे केश । पिकोनि झडले निःशेष । सर्वांगीं लोंबे मांस । चिरगुटासारिखें ॥ ४६ ॥ देह सर्व पारिखें झालें । सवंगडे निःशेष राहिले । सकळ प्राणिमात्र बोले । मरेना कां ॥ ४७ ॥ जे जन्मोनि पोशिलीं । तेचि फिरोनि पडिलीं । अंतीं विषम[2] वेळ आली । प्राणियासी ॥ ४८ गेलें तारुण्य गलें बळ । गेलें संसाराचें सळें । वाताहत[3] झालें सकळ । शरीर आणि संपत्ती ॥ ४९ ॥ जन्मवरी स्वार्थ केला । तितुकाही व्यर्थ गेला । कैसा विषम काळ आला । अंतकाळीं ॥ ५० ॥ सुखाकारणें झुरला । सेखीं दुःखें कष्टी झाला । पुढें मागुती धोका आला । यमयातनेचा ॥ ५१ ॥ श्लोक ॥ जन्मदुःखं जरादुःखं नित्यदुःखं पुनः पुनः ॥ संसारसागरे दुःखं तस्माज्जागृहि जागृहि ॥ १ ॥ टीका ॥ जन्म अवघा दुःखमूळ । लागती दुःखाचे विंगळ । म्हणोनियां तात्काळ । स्वहित करावें ॥ ५२ ॥ असो ऐसें वृद्धपण । सकळांस आहे दारुण । म्हणोनियां शरण । भगवंतासि जावें ॥ ५३ ॥ पुढें वृद्धास तत्वतां । गर्भीं पस्तावा होता । तोचि आला मागुता । अंतकाळीं ॥ ५४ ॥ म्हणोनि मागुतें जन्मांतर । प्राप्त मातेचें उदर । संसार[4] हा अति दुर्धर । तोचि ठाकोनि आला ॥ ५५ ॥ भगवद्भजनावांचुनी । चुकेना हे जन्मयोनी । तापत्रयाची जाचणी । सांगिजेल पुढें ॥ ५६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तृतीय दशके कांताहरणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. आध्यात्मिक ताप.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ तापत्रयाचें लक्षण । आतां सांगिजेल निरूपण ।

---

१. सर्व लोकांचा. २. कठीण. ३. भरभराट. ४. जन्ममरण.

श्रोतीं करावें श्रवण। एकाग्र होऊनी ॥ १ ॥ जो तापत्रयीं पोळला। तो संतसंगें निवाला। आर्तभूत तोषला। पदार्थें जेवीं ॥ २ ॥ क्षुधाक्रांतास मिळे अन्न। तृषाक्रांतास जीवन। बंदीं पडिला त्याचें बंधन। तोडितां सुख ॥ ३ ॥ महापुरें जाजावला[1]। तो पैलतीरास नेला। कां तो स्वप्नींचा चेइला[2]। स्वप्नदुःखी ॥ ४ ॥ कोणी एकासि मरण। येतां दधिलें जीवदान संकटास निवारण। केलिया सुख ॥ ५ ॥ रोगियासि औषध। सप्रचीत आणि शुद्ध। तयासि होय आनंद। आरोग्य होतां ॥ ६ ॥ तैसा संसारदुःखें दुखवला। त्रिविधतापें पोळला। तोचि अधिकारी जाहला। परमार्थासी ॥ ७ ॥ ते त्रिविधताप कैसे। आतां बोलिजेती तैसे। त्यांविषयीं एक असे। वाक्याधार ॥ ८ ॥ श्लोक ॥ देहेंद्रियमनःप्राणैः सुखं दुःखं यदाप्यते ॥ इममाध्यात्मिकं तापं विजानीयाद्धि देहिनाम् ॥ १ ॥ सर्वभूतैर्देहयोगात् सुखं दुःखं यदाप्यते ॥ द्वितीयं तं विजानीयात्संतापं चाधिभौतिकम् ॥ २ ॥ शुभाशुभैःकर्मभिस्तैर्देहांते यमयातना ॥ स्वर्नरकादिभोक्तव्यमिदं विद्ध्याधिदैविकम् ॥ ३ ॥ टीका ॥ एक ताप आध्यात्मिक। दुजा तो आधिभौतिक। तिसरा आधिदैविक। ताप जाणावा ॥ ९ ॥ आध्यात्मिक तो कोण। कैसी त्याची वोळखण। आधिभौतिकाचें लक्षण। जाणिजे कैसें ॥ १० ॥ आधिदैविक तो कैसा। कवण तयाची दशा। तेंही विशदे[3] कळे ऐसा। विस्तार कीजे ॥ ११ ॥ हां जी म्हणोनि वक्ता। जाहला कथा विस्तारिता। आध्यात्मिक ताप आतां। सावध ऐका ॥ १२ ॥ देह इंद्रियें आणि प्राण। यांचेनि योगें आपण। सुखदुःखें शिणे जाण। या नांव आध्यात्मिक ॥ १३ ॥ देहामधून जें आलें। इंद्रियप्राणें दुःख झालें। तें आध्यात्मिक बोलिलें। तापत्रयीं ॥ १४ ॥ देहामधूनि काय आलें। प्राण्यास कोण दुःख झालें। आतां हें विशदे[3] केलें। पाहिजे कीं ॥ १५ ॥ खरूज खवडे पुळिया नारू। नखुरड्या मांजरी देवी गोवरू। देहामधील विकारू। या नांव आध्यात्मिक ॥ १६ ॥ काखमांजरी केंसतोड। वोखटे वेर्ण[4] काळफोड। व्याधि मूळव्याधि महाजड। या नांव आध्यात्मिक ॥ १७ ॥ अंगुळवेढें[5] गालफुगी। कंड उठे जे वाउगी।

१. त्रासला. २. जागा झाला. ३. स्पष्ट. ४. व्रण, क्षत. ५. कांडरूं.

हिरडी सुजे भरे वर्णगी[1] । या नांव आध्यात्मिक ॥ १८ ॥ वाउगे फोड उठती । कां ते सुजे अंगकांती । वात आणि तिडका लागती । या नांव आध्यात्मिक ॥ १९ ॥ नायटे अंदु[2] गजकर्ण । पेहांचें[3] पोट विस्तीर्ण । बैसलें टाळें फुटती कर्ण । या नांव आध्यात्मिक ॥ २० ॥ कुष्ठ आणि ओला कुष्ठ । पंडुरोग अतिश्रेष्ठ । क्षयरोगाचे कष्ट । या नांव आध्यात्मिक ॥ २१ ॥ वांटी[4] वटकें[5] वायगोळा । हातीं पायीं लागती कळा । भोवंडी लागे वेळोवेळां । या नांव आध्यात्मिक ॥ २२ ॥ वोलंडा आणि वळ । पोटशूळाची तळमळ । अर्धशिशी उठे कपाळ । या नांव आध्यात्मिक ॥ २३ ॥ दुखे मार्ज[6] आणि मान । पृष्ठी ग्रीवा आणि वदन । अस्थि मांसें दुखती जाण । या नांव आध्यात्मिक ॥ २४ ॥ कुळीकें[9] तरळें[10] कामिणी । मुरुम सुंठरें[11] माळिणी[12] । विदेशीं लागे पाणी । या नांव आध्यात्मिक ॥ २५ ॥ जळशोष आणि हिंवारें[13] । गिरागिरी आणि अंधारें । ज्वर पाचाव आणि शारें[14] । या नांव आध्यात्मिक ॥ २६ ॥ शैत्य उष्ण आणि तृषा । क्षुधा निद्रा आणि दिशा[15] । विषयतृष्णेची दुर्दशा । या नांव आध्यात्मिक ॥ २७ ॥ आळशी मूर्ख आणि अपेशी । भय उपजे मानसीं । विसराळू दुश्चित अहर्निशीं । या नांव आध्यात्मिक ॥ २८ ॥ मूत्रकोंडे[16] आणि परमें । रक्तपिती आणि रक्तपरमे । खडाचढांचेनि[17] श्रमे । या नांव आध्यात्मिक ॥ २९ ॥ मुरडा हगवण । उन्हाळे । दिशीं[18] कोंडतां[18] आंदोळे[19] । एक व्यथा असोन न कळे । या नांव आध्यात्मिक ॥ ३० ॥ गांठ ढळली झाले जंत । पडे आंव आणि रक्त । अन्न तैसेंचि पडत । या नांव आध्यात्मिक ॥ ३१ ॥ उचकी लागली उशीतें[20] गेलें[20] । पित्त उसळलें उलट झाला । खेरें[21] पडसें आणि खोकला । या नांव आध्यात्मिक ॥ ३२ ॥ पोटफुगी आणि तडस । भरला हीर[22] लागला घांस । फोडी ला-

---

१. कण, कसपट. २. हाड्यावर्ण. ३. पोटफुगीचें. ४. गुडघी. ५. लहान मूल दूध पिऊन लहान लहान गोळ्या होऊन ओकतें तो रोग. ६. कंबर. ७. पाठ. ८. गळा. ९. मोडशी. १० हागओक. ११. गळवें. १२. नाकांत फोड होतो तो. १३. हिंवताप. १४. शहारे. १५. हगवण. १६. मूतखडा. १७. पोटांत मळाचा खडा होऊन शौचाचे वेळीं दुःख होतें, त्यानें. १८. मलावरोध होतां. १९. कापूं लागतो. २०. गळ्यांत घांस अडकला. २१. जीभकांटे. २२. लचक.

गतां कासाविस । या नांव आध्यात्मिक ॥ ३३ ॥ उसळला दम आणि धाप । पडजीभ ढांसी[1] । आणि कफ । मोठा वातज्वर आणि संताप । या नांव आध्यात्मिक ॥ ३४ ॥ कोणीं सेंदूर घातला । तेणें प्राणी निर्बुजला[2] । घशामध्यें फोड आला । या नांव आध्यात्मिक ॥ ३५ ॥ गळसोट्या[3] आणि जीभ झडे । सदा मुखीं दुर्गंधी पडे । दंतहीन लागती किडे । या नांव आध्यात्मिक ॥ ३६ ॥ जेरंडी[4] घोळाणां[5] गंडमाळा । अवचितां स्वयें फुटे डोळा । आपणचि कापी अंगुळा । या नांव आध्यात्मिक ॥ ३७ ॥ कळा तिडका लागती । कां ते दंत उन्मळती[6] । अधर जिव्हा रगडती । या नांव आध्यात्मिक ॥ ३८ ॥ कर्णदुःख नेत्रदुःख । नाना दुःखें घडे शोक । गर्भांध आणि नपुंसक । या नांव आध्यात्मिक ॥ ३९ ॥ फुलें[7] वडस आणि पेंडळें[8] । कीड गेतां रातांधळें । दुश्चित अमिष्ट आणि खुळें । या नांव आध्यात्मिक ॥ ४० ॥ मुकें बधिर रांखोंडें[9] । थोंटें चळलें आणि वेडें । पांगुळ कुंव्हें[10] आणि पांवडें[11] । या नांव आध्यात्मिक ॥ ४१ ॥ तारसें[12] धुलें[13] कांनें[14] केरें[15] । गारोळें[16] जांमुन[17] टांपरें[18] । पडांगुळें[19] गेंगाणें[20] विद्रें[21] । या नांव आध्यात्मिक ॥ ४२ ॥ दांतरें बोतरें वाणाळें[22] । घ्राणहीन श्रोत्रहीन बेरळ[23] । अतिकृश अतिस्थूळ । या नांव आध्यात्मिक ॥ ४३ ॥ तोतिरें बोबडें निर्बळ । रोगी कुरूप कुटिळ । मत्सरी खादाड तपिळ । या नांव आध्यात्मिक ॥ ४४ ॥ संतापी अनुतापी मत्सरी । कामिक हेवा तिरस्कारी । पापी अवगुणी विकारी । या नांव आध्यात्मिक ॥ ४५ ॥ उसव ताठा करक । आवटलें[24] आणि चरकें[25] । सुजी आणि चाळकें[26] । या नांव आध्यात्मिक ॥ ४६ ॥ सलें[27] आडवें गर्भपात । स्तन गुंतलें

१. कोरडा खोकला. २. घाबरला. ३. गळ्यापाशीं होणारा रोग. ४. पानथरी. ५. घुणघुणा. ६. हिरड्यांतून सुटतात. ७. मोतीबिंदु. ८. डोळे चांगले असून दिसत नाहीं तो रोग. ९. जन्मतः ओंठतुटकें. १०. कुबडें. ११. पांगळें. १२. तारडोळें. १३. मान धुलकावीत पाहणारें. १४. काणें. १५ तिरवें, चकणें. १६. घारेडोळें. १७. ठेंगणें. १८. ठेंचाळत चालणारें. १९. सहावोटाचें. २०. नाकांतून बोलणारें २१. कुरूप. २२. मोठ्या नाकाचें. २३. बडबडणारें. २४. मान ताठरणें. २५. जबड्याची सूज. २६. पायाचे सांधे धरतात तो रोग. २७. बाढ खुंटलेला पोटांतील गर्भ.

सन्निपात । संसारकोंडें[1] अपमृत्य । या नांव आध्यात्मिक ॥ ४७ ॥ नखविष आणि हिंगुरडें[2] । बाचड आणि बावडें । उगीच दांतखीळ पडे । या नांव आध्यात्मिक ॥ ४८ ॥ झडती पाती[3] सुजती भोंवया । नेत्रीं होती रांजणवाडिया । चाळसी लागे प्राणिया । या नांव आध्यात्मिक ॥ ४९ ॥ वांगे[4] तिळ सुरमे[5] लासें[6] । चामखीळ गलंडे मैंसे[7] । चुकुर[8] होईजे मानसें । या नांव आध्यात्मिक ॥ ५० ॥ नाना फुगे आणि आवाळें । अंगीं दुर्गंधी प्रबळे । चाईचाटी[9] लाळ गळे । या नांव आध्यात्मिक ॥ ५१ ॥ नाना चिंतेची[10] काजळी । नाना दुःखें चित्त पोळी । व्याधीवांचून तळमळी । या नांव आध्यात्मिक ॥५२॥ वृद्धपणींच्या आपदा । नाना रोग होती सदा । देह क्षीण सर्वथा । या नांव आध्यात्मिक ॥ ५३ ॥ नाना व्याधि नाना दुःखें । नाना भोग नाना खांडकें । प्राणी तळमळी शोकें । या नांव आध्यात्मिक ॥ ५४ ॥ ऐसा आध्यात्मिक ताप । पूर्वपापाचा संताप । सांगतां सरेना अमूप[11] । दुःखसागर ॥ ५५ ॥ बहुत काय बोलावें । श्रोतीं संकेतें जाणावें । पुढें बोलिलें स्वभावें । आधिभौतिक ॥ ५६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तृतीयदशके आध्यात्मिकतापनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. आधिभौतिक ताप.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां झालें निरूपण । आध्यात्मिकाचें लक्षण । आतां आधिभौतिक तो कोण । सांगिजेल ॥ १ ॥ श्लोक ॥ सर्वभूतैर्देहयोगात्सुखं दुःखं यदाप्यते ॥ द्वितीयं तं विजानीयात्संतापं चाधिभौतिकम् ॥ १ ॥ टी० ॥ सर्व भूतांचेनि संयोगें । ताप होतां मन भंगे । सुखदुःख उपजों लागे । या नांव आधिभौतिक ॥ २ ॥ तरी आधिभौतिकाचें लक्षण । प्रांजळ करूं निरूपण । जेणें अनुभवास ये पूर्ण । वोळखी तापत्रयाची ॥ ३ ॥ ठेंचा लागती मोडती कांटे । वाजती शस्त्रांचे घायवटे[12] । सलें[13] शिळका आणि

---

१. संसारांतील अडचणी. २. एक तऱ्हेचा फोड. ३. पापण्या. ४. मुरमाच्या पुळ्या. ५. पांढरे चट्टे. ६. लासरू. ७. मांसाचा एक प्रकारचा फुगा. ८. भ्रमिष्ट. ९. केंस झडतात तो रोग. १०. चिंतेनें येणारा काळसरपणा. ११. पुष्कळ. १२. घाव. १३. अंगांत घस अडकून राहणें.

सरांटे । या नांव आधिभौतिक ॥ ४ ॥ आग्या[1] आणि कांचकुहिरी[2] । अवचट[3] लागे शरीरीं । गांधील येऊन दंश करी । या नांव आधिभौतिक ॥ ५ ॥ माशी गोमाशी मोहळमाशी । मुंगी तेलमुंगी डांस दंशी । सोट जळू लागे पायांसीं । या नांव आधिभौतिक ॥ ६ ॥ पिसा पिसोळें चांचणें[4] । कुसळें मुंगळे ढेंकूण । विसीफें[5] भोंवर गोंचीड जाण । या नांव आधिभौतिक ॥ ७ ॥ गोमी विंचू आणि विखार । व्याघ्र लांडगे आणि सूकर[6] । गोसांयाल[7] आणि सांमर । या नांव आधिभौतिक ॥ ८ रानगाई[8] रानह्मैसे[9] । रानशकटें आणि रिसें[10] । रानहस्ती लांवपिसें[11] । या नांव आधिभौतिक ॥ ९ ॥ सुसरीनें ओढून नेलें । कां तें अवचित बुडालें । अथवा खळाळीं पडिलें । या नांव आधिभौतिक ॥ १० ॥ नाना विखारें अजगर । नाना मगर जळचर । नाना वनचरें अपार । या नांव आधिभौतिक ॥ ११ ॥ अश्व वृषभ आणि खेर[12] । श्वान सूकर जंबूक[13] मार्जार । ऐसीं बहुविध क्रूर । या नांव आधिभौतिक ॥ १२ ॥ ऐसीं कर्कशें भयानकें । बहुविध दुःखदायकें । दुःखें दारुण अनेकें । या नांव आधिभौतिक ॥ १३ ॥ भिंती माळवदें[14] पडती । कडे भुयारीं कोसळती । वृक्ष अंगावर मोडती । या नांव आधिभौतिक ॥ १४ ॥ कोणी एकाचा शाप जडे । कोणी एकें केलें चेडें[15] । अर्धांतरीं होती वेडे । या नांव आधिभौतिक ॥ १५ ॥ कोणी एकें चाळविलें । कोणी एकें भ्रष्टविलें । कोणी एकें धरूनि नेलें । या नांव आधिभौतिक ॥ १६ ॥ कोणी एकें दिधलें विष । कोणी एकें लाविले दोष । कोणी एकें घातले पाश । या नांव आधिभौतिक ॥ १७ ॥ अवचितां शेर लागला । नेणो बिबवा चिडला । प्राणी धुरें जाजावला[16] । या नांव आधिभौतिक ॥ १८ ॥ इंगळावरी पाय पडे । शिळेखालीं हात सांपडे । धावतां अडखळोनि पडे । या नांव आधिभौतिक ॥ १९ ॥ वांपी[17]

१. एक पाला, यानें अंगाची आग होते. २. खाजरी कुयरी, हिनें अंगास खाज सुटते. ३. अकस्मात. ४. चिलट. ५. इसब. ६. रानडुकर, ७. साळू पक्ष्याची जात. ८. सांबर. ९. गवे १०. अस्वलें. ११. डंखिणीपासून लागलेलें वेड. १२. गाढव. १३. कोल्हा. १४. धाब्याचें छप्पर. १५. चेटक. १६. कासावीस झाला. १७. विहीर.

कूप[1] सरोवर । गर्ता[2] कडा नदीतीर । अवचितें पडे शरीर । या नांव आधिभौतिक ॥ २० ॥ दुर्गाखालें कोसळती । तेणें दुःखें आक्रंदती । झाडावरूनि पडती । या नांव आधिभौतिक ॥ २१ ॥ शीतें वोंठ तडकती । हात पाय टांचा फुटती । चिखल्यां[3] जिव्हाळया लागती । या नांव आधिभौतिक ॥ २२ ॥ अशनपानांचिये[4] वेळे । उष्णरसें जिव्हा पोळे । दांत करकरे आणि हरंळे । या नांव आधिभौतिक ॥ २३ ॥ पराधीन बाळपणीं । कुशब्दमार जाचणी । अन्नवस्त्रेंविण आळंणी[6] । या नांव आधिभौतिक ॥ २४ ॥ सासुरवास गांलोरे[9] । ठर्णके लोंसिणें चिमोरे[10] । आलें रुदन न धरे । या नांव आधिभौतिक ॥ २५ ॥ चुकतां कान पिळिती । कां डोळां हिंग घालिती । सर्वकाळ धारकीं धरिती । या नांव आधिभौतिक ॥ २६ ॥ नानाप्रकारचे मार । दुर्जन मारिती अपार । दुरी अंतरे माहेर । या नांव आधिभौतिक ॥ २७ ॥ कर्ण नासिक विंधिलें । बळेंचि धरूनि गोंदिलें । खोडी जाया पोळविलें । या नांव आधिभौतिक ॥ २८ ॥ परचक्रीं धरूनि नेलें । नीच यातीस दधिलें । दुर्दशा होऊनि मेलें । या नांव आधिभौतिक ॥ २९ ॥ नाना रोग उद्भवले । जे आध्यात्मिकीं बोलिले । वैद्य पंचाक्षरी आणिले । या नांव आधिभौतिक ॥ ३० ॥ नाना व्यथेचें निरसन । व्हावया औषध दारुण । बलात्कारें देती जाण । या नांव आधिभौतिक ॥ ३१ ॥ नाना वल्लींचे रस । काढे गर्गोडे[11] कर्कश । घेतां होय कासाविस । या नांव आधिभौतिक ॥ ३२ ॥ ढाळ आणि उखाळें[12] देती । पथ्य कठिण सांगती । अनुपान चुकतां विपत्ती । या नांव आधिभौतिक ॥ ३३ ॥ फाड रक्त आणि फांसणी[13] । गुलडागांची[14] जाचणी । तेणें दुःखें दुखवे प्राणी । या नांव आधिभौतिक ॥ ३४ ॥ रुचिकें[15] बिबवे घालिती । नाना दुःखें दडपे देती । शिरा तोडिती जळवा लाविती । या नांव आधिभौतिक ॥ ३५ ॥ बहु रोग बहु औषधें । सांगतां अपार अगाधें । प्राणी दुखवे तेणें खेदें । या नांव आधिभौतिक ॥ ३६ ॥

---

१. कुवा. २. खाडा. ३. पाण्यांत वागण्यानें बोटांच्या मधील जागा सडते, तो रोग. ४. खाण्यापिण्याचे. ५. वेगळा होतो. ६. सुकून जाणें. ७. गालगुचे. ८. ठोसे. ९. डागणें. १०. चिमटे. ११. पुष्कळ वाने घाटून केलेलें पातळ औषध. १२. उलटीचें औषध. १३. शस्त्रानें गांठी चिरणें. १४ चोंचे. १५. रुईचा चीक.

बोलाविला पंचाक्षरी। धूरमार पीडा करी। नाना यातना चतुरीं। आधिभौतिक जाणिजे ॥ ३७ ॥ दरवडे घालूनियां जना। तस्करें[1] करिती यातना। तेणें दुःख होय मना। या नांव आधिभौतिक ॥ ३८ ॥ अग्नी-चेनि ज्वाळें पोळे। तेणें दुःखें आरंबळे[2]। हानि झाली थिवळे। या नांव आधि-भौतिक ॥ ३९ ॥ नाना मंदिरें सुंदरें। नाना रत्नांचीं भांडारें। दिव्यांबरें[3] मनोहरें। दग्ध होती ॥ ४० ॥ नाना धान्यें नाना पदार्थ। नाना पशु नाना स्वार्थ[4]। नाना पात्रें नाना अर्थ[5]। मनुष्यें भस्म होती ॥ ४१ ॥ अग्नि लागतां शेतीं। धान्यें बणग्या[6] खडकुंती[7]। इक्षुदंड[8] जळोनि जाती। अकस्मात ॥ ४२ ॥ ऐसा अग्नि लागला। अथवा कोणीं लाविला। हानि झाली कां पोळला। या नांव आधिभौतिक ॥ ४३ ॥ ऐसे सांगतां बहुत। होती वन्हीचे आघातें[9]। तेणें दुःखें दुखवे चित्त। या नांव आधिभौतिक ॥ ४४ ॥ हारपे विसरे आणि सांडे। नासे गाहाळे फुटे पडे। असाध्य होय कोणी-कडे। या नांव आधिभौतिक ॥ ४५ ॥ प्राणी स्थानभ्रष्ट झाले। नाना पशु ते चुकले। कन्या पुत्र गाहाळले। या नांव आधिभौतिक ॥४६॥ तस्कर अ-थवा दावेदार। अवचितें करिती संहार। लुटती घरें नेती खिल्लारें[10]। या नांव आधिभौतिक॥ ४७ ॥ नाना धान्यें केलीं कापिती। पानमळा[11] मीठ घालिती। ऐसे नाना आघात करिती। या नांव आधिभौतिक ॥ ४८ ॥ मेंद उचले खाणोरी[12]। सुवर्णपथी[13] भुरेरेकरी[14]। ठकु[15] सितरु[16] वरपेकरी[17]। वरपा घालिती ॥ ४९ ॥ गठीसोडे[18] द्रव्य सोडिती। नाना अलंकार काढिती। नाना वस्तु मूषक[19] नेती। या नांव आधिभौतिक ॥ ५० ॥ वीज पडे हिंव पडे। आणि पर्जन्यीं सांपडे। कां तो महापुरीं बुडे। या नांव आधि-भौतिक ॥ ५१ ॥ भोवरे वळणें[20] आणि धार। वोसणें[21] लाटा अपार।

---

१. चोर. २. तळमळतो. ३. उंची वस्त्रें ४. कार्यें. ५. वस्तु ६. भाताची अथवा गवताची गंज. ७. प्रखर उन्हानें जळून गेलेलें शेत. ८. ऊस. ९. धक्के १०. गुरें-ढोरें. ११. पानवेलीच्या मळ्यास. १२. खाणचोर. १३. किमयागार. १४. जादू-गार. १५. ठक. १६. फसविणारा. १७. लुटारु. १८. भामटा. १९. उंदीर. २०. नदीचा बांक, धरण. २१. पुरामधील केरकचरा.

वृश्चिक गोंवी[1] अजगर । वाहूनि जाती ॥ ५२ ॥ तयामध्यें प्राणी सांपडला । खडकीं बेटीं[2] आडकला । बुडत बुडत वांचला । या नांव आधिभौतिक ॥ ५३ ॥ मनासारिखा नसे संसार । कुरूप कर्कश स्त्री क्रूर । विधवा कन्या मूर्ख पूत्र । या नांव आधिभौतिक ॥ ५४ ॥ भूत पिशाच लागलें । अंगावरून वारें गेलें । अबद्ध[3] मंत्रें प्राणी चळलें । या नांव आधिभौतिक ॥ ५५ ॥ ब्राह्मणसंमंध शरीरीं । बहुसाल पीडा करी । शनैश्वराचा[4] धोका धरी । या नांव आधिभौतिक ॥ ५६ ॥ शिंक पिंगळा आणि पाली । बोखटे[5] होला कांक[6] कलाली । चित्तीं काळजी लागली । या नांव आधिभौतिक ॥ ५७ ॥ नाना ग्रह काळ वार । काळतिथि घातचंद्र । काळवेळ घातनक्षत्र । या नांव आधिभौतिक ॥ ५८ ॥ दिवटा सरवदा भाकून गेला । अंतरीं धोका लागला । दुःस्वप्नें जाजावला । या नांव आधिभौतिक ॥ ५९ ॥ भालु[7] भुंके श्वान रडे । पाली अंगावरी पडे । नाना चिन्हें चिंता पवाडे । या नांव आधिभौतिक ॥ ६० ॥ बाहेर निघतां अपशकुन । नाना प्रकारीं विच्छिन्न । तेणें गुणें भंगे मन । या नांव आधिभौतिक ॥ ६१ ॥ प्राणी बंदीं सांपडला । यातने वरपडा[8] जाहला । नाना दुःखें दुखावला । या नांव आधिभौतिक ॥ ६२ ॥ प्राणी राजदंड पावत[9] । जेरबंद चाबुक वेत । दरेमार[10] तळवेमार[11] होत । या नांव आधिभौतिक ॥ ६३ ॥ कोरडे पारंब्या फोक । बहु प्रकारें अनेक । बहु ताडिती आधिभौतिक । या नांव बोलिजे ॥ ६४ ॥ मोगरीमार[12] बुधलेमारें[13] । चौखूंरूनि[14] डंगारणेमारें[15] । बुक्क्या गचांड्या गुडघेमार । या नांव आधिभौतिक ॥ ६५ ॥ लाता चपराका शेणमार । कानखडे दगडमार । नाना प्रकारींचे मार । या नांव आधिभौतिक ॥ ६६ ॥ टांगणें टिपऱ्या[16] पिछोडे[17] । बेडी

१. घोणी. २. झाडाचे बनांत. ३. विसंगत; प्रयोगांत चूक झाली असा. ४. शनिग्रहाचा. ५. वाईट, अपशकुनी. ६. कावळा ७. कोल्हा. ८. प्राप्त होते. ९. प्राप्त झाला. १०. दरीत लोटून मारणें. ११. तापलेल्या तव्यावर अनवाणी उभें करणें. १२. गुदद्वारीं मेख ठोकून मारणें. १३. दारू भरलेल्या बुधल्यास बांधून दारू पेटवून मारणें. १४. चोहों बाजूंनीं ताणून. १५. वडग्यांनीं मारणें. १६. चाप. १७. मुसक्या.

बुधनाल[1] कोलदांडे[2] । रक्षण[3] निग्रह[4] चहूंकडे । या नांव आधिभौतिक ॥ ६७ ॥ नाकवणी[5] चुनवणी[6] । मिठवणी रायवणी[7] । गुळवणी[8] यांची जाचणी । या नांव आधिभौतिक ॥ ६८ ॥ जळामध्यें बुचकळती । हस्तीपुढें बांधून टाकिती । हांकिती छळती यालायाती । या नांव आधिभौतिक ॥ ६९ ॥ कर्णच्छेद घ्राणच्छेद । हस्तच्छेद पादच्छेद । जिव्हाच्छेद अधरच्छेद । या नांव आधिभौतिक ॥ ७० ॥ तीरमार सुळीं देती । नेत्र वृषण काढिती । नखोनखीं सुया मारिती । या नांव आधिभौतिक ॥ ७१ ॥ पारड्यामध्यें[9] घालणें । कां कडेलोट करणें । कां भांड्यामुखीं[10] उडवणें । या नांव आधिभौतिक ॥ ७२ ॥ भोतें[11] आणि बोटांबोटीं[12] । अथवा गळ लागणें कंठीं । सांडस लावूनि आटाआटी । या नांव आधिभौतिक ॥ ७३ ॥ शिसें पाजणें विष देणें । अथवा शिरच्छेद करणें । कां पायांतळीं[13] घालणें । या नांव आधिभौतिक ॥ ७४ ॥ कानीं खुंट्या आदळती । अपानीं[14] मेखा मारिती । साल काढोनि टाकिती । या नांव आधिभौतिक ॥ ७५ ॥ सरंडे[15] मांजरें[16] भरिती । अथवा फांसीं नेऊन देती । नानापरी पीडा करिती । या नांव आधिभौतिक ॥ ७६ ॥ श्वानप्रळय व्याघ्रप्रळय । भूतप्रळय सुसरीप्रळय । शस्त्रप्रळय वीजप्रळय । या नांव आधिभौतिक ॥ ७७ ॥ शिरा वोढोनि घेती । टेंभे लावूनि भाजिती । ऐशा नाना विपत्ती । या नांव आधिभौतिक ॥ ७८ ॥ मनुष्यहानि वित्तहानि । वैभवहानि महत्त्वहानि । पशुहानि पदार्थहानि । या नांव आधिभौतिक ॥ ७९ ॥ बाळपणीं मरे माता । तरुणपणीं मरे कांता । वृद्धपणीं मरण सुता । या नांव आधिभौतिक ॥ ८० ॥ दुःख दारिद्र्य आणि ऋण । विदेशपळणी नागवण[17] । आपदा

---

१. झाडाच्या बुंधाशीं नालाकृति करून बांधून मारणें. २. पायांत हात अडकवून बांधून गुडघ्यांत दांडा घालणें. ३. पाहरा. ४. बंदी. ५. नाकांत ओतावयाचें तीक्ष्ण औषध. ६. पिण्यास देण्याचें चुन्याचें पाणी. ७. मोहऱ्यांचें पाणी. ८. गुळाचें पाणी. ९. मनुष्याचें वजन कमी होत जाईल असे हाल करणें. १०. तोफेचें तोंडीं. ११. नखापासून शेंडीपर्यंत अंगाची चामडी काढणें. १२. चिमटे. १३. इमारतीच्या पायामध्यें जिवंत पुरणें. १४. गुदद्वारीं. १५. विजारींत सरडे घालून ती नसवितात. १६. खवळलेलें मांजर व माणूस एके जागीं कोंडणें. १७. दरवडा.

अनुपत्ती[1] कदान्न[2] । या नांव आधिभौतिक ॥ ८१ ॥ आकांत वाखा प्रळय । युद्धीं होतां पराजय । जिवलगांचा होय क्षय । या नांव आधिभौतिक ॥ ८२ ॥ कठिण काळ आणि दुष्काळ । साशंके[3] आणि वोखटी वेळ । उद्वेग चिंतेची हळहळ । या नांव आधिभौतिक ॥ ८३ ॥ घाणाचरकीं शिरकला । चाकाखालीं सांपडला । नाना वन्हींत पडियेला । या नांव आधिभौतिक ॥ ८४ ॥ नाना शस्त्रें भेदिला । नाना श्वापदें भक्षिला । नाना बंदीं पडियेला । या नांव आधिभौतिक ॥ ८५ ॥ नाना कुवासें निर्बुजे[4] । नाना अपमानें लाजे । नाना शोकें प्राणी झिजे । या नांव आधिभौतिक ॥ ८६ ॥ ऐसे सांगतां अपार । आहेत दुःखाचे डोंगर । श्रोतीं जाणावा विचार । आधिभौतिकाचा ॥ ८७ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तृतीयदशके आधिभौतिकतापनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. आधिदैविक ताप.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां बोलिला आध्यात्मिक । त्या उपरी आधिभौतिक । आतां बोलिजेल आधिदैविक । तो सावध ऐका ॥१॥ श्लोक ॥ शुभाशुभैः कर्मभिस्तैर्देहांते यमयातना । स्वर्नरकादिभोक्तव्यमिदं विद्ध्याधिदैविकम् ॥ १ ॥ टी० ॥ शुभाशुभ कर्मानें जना । देहांतीं यमयातना । स्वर्ग नरक भोग नाना । या नांव आधिदैविक ॥ २ ॥ नाना दोष नाना पातकें । मदांधपणें अविवेकें । केलीं परी तीं दुःखदायकें । यमयातना भोगविती ॥ ३ ॥ अंगबळें द्रव्यबळें । मनुष्यबळें राजबळें । नाना सामर्थ्याचेनि बळें । अकृत्य[5] करिती ॥ ४ ॥ नीति सांडोनियां तत्वतां । करूं नये तेंचि करितां । यमयातना भोगितां । जीव जाय ॥ ५ ॥ डोळे झांकूनि स्वार्थबुद्धी । नाना अभिलाष कुबुद्धी । वृत्तिभूमीसि[6] साधी । द्रव्य दारा पदार्थ ॥ ६ ॥ मातलेपणें उन्मत्त । जीवघात कुटुंबघात । अप्रमाण[7] क्रियां करित । म्हणोनियां यमयातना ॥ ७ ॥ मर्यादा सांडोनियां चालती । ग्राम दंडी ग्रामाधिपती । देश दंडी देशाधिपती । नीतिन्याय सांडितां ॥ ८ ॥ देशाधिपतीसि दंडी

---

१. कंगालपणा. २. हलक्या प्रतीचें अन्न. ३. अडचणीची. ४. घावरतो. ५ दुर्वर्तन. ६. वतन. ७. अशास्त्र, स्वैर.

राव। रायासि दंडिता देव। राजा न करितां नीतिन्याय। म्हणोनियां यमयातना ॥ ९ ॥ अनीतीनें स्वार्थ पाहे। राजा पापी होऊनि राहे । राज्यांतीं नरक आहे । म्हणोनियां ॥१०॥ राजा सांडितां राजनीति । तयासि यम गांजिती । यमें नीति सांडितां धांवती । देवगण ॥ ११ ॥ ऐसी मर्यादा लाविली देवें । म्हणोनि नीतीनें वर्तावें । नीति न्याय सांडितां भोगावें । यमयातनेसी ॥ १२ ॥ देवें प्रेरिले यम । म्हणोनि आधिदैविक नाम । तृतीय ताप दुर्गम । यमयातनेचा ॥ १३ ॥ यमदंड यमयातना । शास्त्रीं बोलिले प्रकार नाना । तो भोग कदापि चुकेना । या नांव आधिदैविक ॥ १४ ॥ यमयातनेचे खेद । शास्त्रीं बोलिले विशद । शरीरीं घालूनि प्रमाद । नानाप्रकारें ॥ १५ ॥ पापपुण्याचीं शरीरें । स्वर्गीं असती कलेवरें[1] । त्यांत घालोनि नानाप्रकारें । पापपुण्यें भोगविती ॥ १६ ॥ नाना पुण्यें नाना विलास । नाना दोषें यातना कर्कश । शास्त्रीं बोलिलें अविश्वास । मानूंचि नये ॥ १७ ॥ वेदाज्ञेनें न चालती । हरिभक्ती न करिती । त्यांस यमयातना करिती । या नांव आधिदैविक ॥ १८ ॥ अक्षोभ नरकीं उदंड जीव । जुनाट किडे करिती रवरव । बांधोनि टाकिती हातपाव । या नांव आधिदैविक ॥ १९ ॥ उदंड पैसें[2] लहान मुख । कुंभाकार कुंड एक । दुर्गंधी उकाडा कुंभिपाक । या नांव आधिदैविक ॥ २० ॥ तप्तभूमिका ताविती[3]। जळत स्तंभ पोटा लाविती । नाना सांडसें[4] लाविती । या नांव आधिदैविक ॥ २१ ॥ यमदंडाचे उदंड मार । यातनेची सामुग्री अपार । भोग भोगिती पापी नर । या नांव आधिदैविक ॥ २२ ॥ पृथ्वीमध्यें मार नाना । त्यांहून कठिण यमयातना । मारितां उसंतेंचि[5] असेना । या नांव आधिदैविक ॥ २३ ॥ चौघे चहूंकडे वोढिती । एक ते झोंकून पाडिती । ताणिती मारिती वोढून नेती । या नांव आधिदैविक ॥ २४ ॥ उठवेना बैसवेना । रडवेना पडवेना । यातनेवरी यातना । या नांव आधिदैविक ॥ २५ ॥ आक्रंदे रडे आणि फुंजे[6] । धकाधकीनें निर्बुजे । झुरझुरोन पंजर[7] होऊनि झिजे । या नांव आधिदैविक ॥ २६ ॥ कर्कश वचन कर्कश मार । यातनेचे नाना

१. शरीरें. २. आंतील अवकाश, जागा. ३. तापवितात. ४. चिमटे. ५. विसावा. ६. उसासे देऊन दुःख करतो. ७. हाडांचा पिंजरा.

प्रकार । त्रास पावती दोषी नर । या नांव आधिदैविक ॥ २७ ॥
बोलिला राजदंड । त्याहूनि यमदंड उदंड । तेथील यातना प्रचंड ।
रूपें कर्कश ॥ २८ ॥ आध्यात्मिक आणि आधिभौतिक । त्याहूनि
आधिदैविक । अल्पसंकेतें कांहींएक । कळावया बोलिलों ॥ २९
श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तृतीयदशके आधिदैविकतापनिरूपण
अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. मृत्यु.

श्रीगणेशाय नमः ॥ संसार म्हणजे सवेंचि स्वार । नाहीं २
उधारें । मापीं लागलें शरीर । घडीनें घडी ॥ १ ॥ नित्य काळाची
न कळे होणाराची गती । कर्मासारिखे प्राणी पडती । नाना देशीं
॥ २ ॥ सरतां संचितांचा शेष । नाहीं क्षणाचा अवकाश । भरतां
निमेष । जाणें लागे ॥ ३ ॥ अवचित काळाचे म्हणियार । मारित
एकसरें । नेऊन घालिती पुढारें । मृत्युपंथें ॥ ४ ॥ होतां मृत्यूची
आटी । कोणी घालूं न शकती पाठीं । सर्वत्रांस कुटाकुटी । मागें पुढें
॥ ५ ॥ मृत्युकाळ काठी निकी । बैसे बळियाचे मस्तकीं । महाराजे
लोकीं । राहों न शकती ॥ ६ ॥ मृत्यु न म्हणे हा क्रूर । मृत्यु न
झुंजार । मृत्यु न म्हणे हा संग्रामशूर । समरांगणीं ॥ ७ ॥ मृत्यु
हा कोपी । मृत्यु न म्हणे हा प्रतापी । मृत्यु न म्हणे हा उग्ररूपी
खळ ॥ ८ ॥ मृत्यु न म्हणे कीं हा बलाढ्य । मृत्यु न म्हणे हा ध
मृत्यु न म्हणे हा आढ्य । सर्व गुणें ॥९॥ मृत्यु न म्हणे हा विख्यात
न ह्मणे हा श्रीमंत । मृत्यु न ह्मणे हा अद्भुत । पराक्रमी ॥ १० ॥
म्हणे हा भूपती । मृत्यु न म्हणे हा चक्रवर्ती । मृत्यु न म्हणे हा क
कैवार्ड जाणे ॥ ११ ॥ मृत्यु न म्हणे हा हयपती । मृत्यु न म्हणे
पती । मृत्यु न म्हणे हा भूपती । विख्यात राजा ॥ १२ ॥ मृत्यु
हा वरिष्ठ जनीं । मृत्यु म्हणे राजकारणी । मृत्यु न ह्मणे हा वे

---

१. भयंकर. २. वायदा. ३. प्रारब्धाचा सांठा. ४. सेवक. ५. ब
६. योद्धा. ७. संपन्न. ८. कारस्थान.

वेतनधर्ता ॥ १३ ॥ मृत्यु न ह्मणे हा देसाई । मृत्यु न ह्मणे हा व्यवसायी[१] । मृत्यु न ह्मणे ठायीं ठायीं । पुंड राजे ॥ १४ ॥ मृत्यु न ह्मणे मुद्राधारी । मृत्यु न ह्मणे व्यापारी । मृत्यु न ह्मणे परनारी । राजकन्या ॥ १५ ॥ मृत्यु न ह्मणे कार्याकारण । मृत्यु न म्हणे वर्णावर्ण । मृत्यु न म्हणे हा ब्राम्हण । कर्मनिष्ठ ॥ १६ ॥ मृत्यु न म्हणे हा व्युत्पन्न[२] । मृत्यु न म्हणे हा संपन्न[३] । मृत्यु न म्हणे हा विद्वज्जन । समुदायीं ॥ १७ ॥ मृत्यु न म्हणे हा धूर्त । मृत्यु न म्हणे हा बहुश्रुत । मृत्यु न म्हणे हा पंडित । महा भला ॥ १८ ॥ मृत्यु न म्हणे हा पुराणिक । मृत्यु न म्हणे हा वैधिक । मृत्यु न म्हणे हा याज्ञिक । अथवा जोशी ॥ १९ ॥ मृत्यु न म्हणे हा अग्निहोत्री । मृत्यु न म्हणे हा श्रोत्री[४] । मृत्यु न म्हणे हा मंत्रयंत्री । पूर्णागमी[५] ॥ २० ॥ मृत्यु न म्हणे हा शास्त्रज्ञ । मृत्यु न म्हणे वेदज्ञ । मृत्यु न म्हणे सर्वज्ञ । सर्व जाणे ॥ २१ ॥ मृत्यु न म्हणे ब्रह्महत्या । मृत्यु न म्हणे गोहत्या । मृत्यु न म्हणे नाना हत्या । स्त्रीबाळकादिक ॥ २२ ॥ मृत्यु न म्हणे रागज्ञानी[६] । मृत्यु न म्हणे तालज्ञानी[६] । मृत्यु न म्हणे तत्वज्ञानी । तत्त्ववेत्ता ॥ २३ ॥ मृत्यु न म्हणे हा योगाभ्यासी । मृत्यु न म्हणे संन्यासी । मृत्यु न म्हणे काळासी । वंचूं[७] जाणे ॥ २४ ॥ मृत्यु न ह्मणे हा सावध । मृत्यु न म्हणे हा सिद्ध । मृत्यु न म्हणे वैद्य प्रसिद्ध । पंचाक्षरी ॥ २५ ॥ मृत्यु न ह्मणे हा गोसावी । मृत्यु न म्हणे हा तपस्वी । मृत्यु न म्हणे हा मनस्वी[८] । उदासीन ॥ २६ ॥ मृत्यु न म्हणे ऋषीश्वर । मृत्यु न म्हणे कवीश्वर । मृत्यु न म्हणे दिगंबर[९] । समाधिस्थ[१०] ॥ २७ ॥ मृत्यु न म्हणे हठयोगी[११] । मृत्यु न म्हणे हा राजयोगी[१२] । मृत्यु न म्हणे हा वीतरागी[१३] । निरंतर ॥ २८ ॥ मृत्यु न म्हणे हा ब्रह्मचारी । मृत्यु न म्हणे हा जटाधारी । मृत्यु न म्हणे हा निराहारी । योगीश्वर ॥ २९ ॥ मृत्यु न म्हणे हा संत । मृत्यु न म्हणे हा महंत । मृत्यु

१. उद्योगी. २. विद्वान्, शास्त्रें पढलेला. ३. धनवान्. ४. श्रोत्रिय, वैदिक, कर्मनिष्ठ. ५. संपूर्ण मंत्रतंत्रशास्त्र जाणणारा. ६. गायनशास्त्र जाणणारा. ७. फसवूं, चुकवूं. ८. मनाचें आकलन करणारा. ९. परमहंस, संन्यासी. १०. समाधींत राहणारा. ११. शरीरशुद्धीच्या मार्गानें चितैक्य साधणारा. १२. विचाराच्या योगानें चितैक्य साधणारा. १३. वैराग्यशील.

न म्हणे हा गुप्त । होत असे ॥ ३० ॥ मृत्यु न म्हणे स्वाधीन । मृत्यु न म्हणे पराधीन । सकळ जीवांसी प्राशन । मृत्युच करी ॥ ३१ ॥ एक मृत्युमार्गी लागले । एकीं अर्धपंथ क्रमिले । एक ते शेवटास गेले । वृद्धपर्णी ॥ ३२ ॥ मृत्यु न म्हणे बाळ तरुण । मृत्यु न म्हणे हा सुलक्षण । मृत्यु न म्हणे हा विचक्षण[१] । बहु बोलका ॥ ३३ ॥ मृत्यु न म्हणे हा धीर । मृत्यु न म्हणे हा उदार । मृत्यु न म्हणे हा सुंदर । चतुरंग जाणे ॥ ३४ ॥ मृत्यु न म्हणे हा पुण्यपुरुष । मृत्यु न म्हणे हा हरिदास । मृत्यु न म्हणे हा विशेष । सुकृती[२] नर ॥ ३५ ॥ आतां असो हें बोलणें । मृत्यूपासूनि सुटिजे कोणें । मागें पुढें विश्वासें[३] जाणें । मृत्युपंथें ॥ ३६ ॥ चौरी[४] खाणी चारी वाणी । चौऱ्यांशीं लक्ष जीवयोनी । जन्मा आले तितुके प्राणी । मृत्यु पावती ॥ ३७ ॥ मृत्युभेणें पळोनि जातां । तरी मृत्यु सोडीना तत्वतां । मृत्यूस न ये कीं चुकवितां । कांहीं केल्या ॥ ३८ ॥ मृत्यु न म्हणे हा स्वदेशी । मृत्यु न म्हणे हा विदेशी । मृत्यु न म्हणे हा उपवासी । निरंतर ॥ ३९ ॥ मृत्यु न म्हणे थोर थोर । मृत्यु न म्हणे हरिहर । मृत्यु न म्हणे अवतार । भगवंताचे ॥ ४० ॥ श्रोतीं कोप न करावा । हा मृत्युलोक सर्वांस ठावा । उपजला प्राणी जाईल बरवा । मृत्युपंथें ॥ ४१ ॥ एथें न मानावा किंत । हा मृत्युलोक विख्यात । प्रकट जाणती समस्त । लहान थोर ॥ ४२ ॥ तथापि किंतु मानिजेल । तरी मृत्युलोक न होईल । या कारणें नासेल । उपजला प्राणी ॥ ४३ ॥ ऐसें जाणोनियां जीवें । याचें सार्थकचि करावें । जनीं मरोनियां उरावें । कीर्तिरूपें ॥ ४४ ॥ येऱ्हवीं प्राणी लहान थोर । मृत्यु पावती निर्धार । बोलिलें हें अन्यथा उत्तर । मानूंचि नये ॥ ४५ ॥ गेले बहुत वैभवाचे । गेले बहुत आयुष्याचे । गेले अगाध महिमेचे । मृत्युपंथें ॥ ४६ ॥ गेले बहुत पराक्रमी । गेले बहुत कपटकर्मी । गेले बहुत संग्रामी[६] । संग्रामशूर ॥ ४७ ॥ गेले बहुत बळाचे । गेले बहुत काळाचे । गेले बहुत कुळांचे । कुळवंत राजे ॥ ४८ ॥ गेले बहुतांचे पालक । गेले बुद्धीचे चाळक[७] । गेले युक्तीचे तार्किक[८] । तर्कवादी ॥ ४९ ॥ गेले विद्येचे सागर । गेले बळाचे

१. हुषार. २. पुण्यवान्. ३. सर्वांस. ४. चार प्रकारची जीवसृष्टि. ५. खोटें. ६. योद्धे. ७. प्रवर्तक. ८. तर्कशास्त्रांत निपुण.

डोंगर । गेले धनाचे कुबेर । मत्युपंथें ॥ ५० ॥ गेले बहुत पुरुषार्थाचे । गेले बहुत विक्रमाचे[1] । गेले बहुत आटोपाचे[2] । कार्यकर्ते ॥ ५१ ॥ गेले बहुत शस्त्रधारी । गेले बहुत परोपकारी । गेले बहुत नानापरी । धर्मरक्षक ॥ ५२ ॥ गेले बहुत प्रतापाचे । गेले बहुत सत्कीर्तीचे । गेले बहुत नीतीचे । नीतिवंत राजे ॥ ५३ ॥ गेले बहुत मतवादी । गेले बहुत कार्यवादी । गेले बहुत विवादी[3] । बहुता परींचे ॥ ५४ ॥ गेलीं पंडितांचीं थाटें । गेलीं शब्दांचीं कचाटें[4] । गेलीं वादकें अचाटें । नाना मतें ॥ ५५ ॥ गेले तापसांचे भार । गेले संन्यासी अपार । गेले विचारकर्ते साचार । मृत्युपंथें ॥ ५६ ॥ गेले बहुत संसारी । गेले बहुत वेषधारी । गेले बहुत नानापरी । नाना छंद करोनि ॥ ५७ ॥ गेले ब्राह्मणसमुदाय । गेले बहुत आचार्य । गेले बहुत सांगों काय । किती म्हणोनि ॥ ५८ ॥ असो ऐसे सकळ गेले । परंतु एकचि राहिले । जे स्वरूपाकार झाले । आत्मज्ञानी ॥ ५९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तृतीयदशके मृत्युनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. वैराग्य लक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ संसार म्हणिजे महापूर । माजीं जलचरें अपार । डंखूं धावती विखार । काळसर्प ॥ १ ॥ आशा ममता देहबेडी । सुसरी करिताती ताडातोडी । नेऊनि दुःखाचे सांगडी— । माजीं घालिती ॥ २ ॥ अहंकार नक्रें उडविलें । नेऊनि पाताळीं बुडविलें । तेथूनियां सोडविले । न वचे प्राणी ॥ ३ ॥ काममगरमिठी[5] सुटेना । तिरस्कार लागला तुटेना । मद मत्सर वोहटेना[6] । भुली पडली ॥ ४ ॥ वासना धामीण पडली गळां । वाळोनि वेंटाळें वैसी गरळा[7] । जिव्हा ळळळळी वेळोवेळां । भयानक ॥ ५ ॥ माथां प्रपंचाचें ओझें । वेऊनि म्हणे माझें माझें । बुडतांहि न सोडी फुंजे[8] । कुळाभिमानें ॥ ६ ॥ पडिलें भ्रांतीचें अंधारें । नागविलें अभिमानचोरें । आलें अहंतेचें कांविरें[9] । भूतबाधा ॥ ७ ॥ बहुतेक आवर्तीं[10]

---

१. पराक्रमाचे. २. उद्योगाचे. ३ वाद करणारे. ४. खटपटी, वैयाकरणी. ५. मगरानें. ६. कमी होईना. ७. ओकते. ८. फुगतो, गर्व करितो. ९. वेड. १०. भोंवऱ्यांत.

पडिले । प्राणी वाहताचि गेले । जिहीं भगवंतासि बोभाइलें[1] । भावार्थ-बळें ॥ ८ ॥ देव आपण घालोनि उडी । तयांसि नेलें पैलथडी । येरें[2] तीं अभाविकें बापुडीं । वाहताचि गेलीं ॥ ९ ॥ भगवंत भावाचा भुकेला । भावार्थ देखोनि भुलला । संकटीं पावे भाविकाला । रक्षित असे ॥ १० ॥ जया भगवंत आवडे । तयांचें देवास सांकडें पडे । संसारदुःख समूळ झडे । निजदासांचें ॥ ११ ॥ जे अंकित ईश्वराचे । तयांस सोहळे निजसुखाचे । धन्य तेचि दैवाचे । भाविक जन ॥ १२ ॥ जैसा भाव जयापाशीं । तैसाचि देव तयापाशीं । जाणे भाव अंतरसाक्षी । प्राणिमात्रांचा ॥ १३ ॥ जरी भाव असला माथिकें[3] । तरी देव होय महाठक । नवल तयाचें कौतुक । जै-शासि तैसा ॥ १४ ॥ जैसें जयाचें भजन । तैसेंचि दे समाधान । भाव होतां किंचित न्यून । आपणहि दुरावे ॥ १५ ॥ दर्पणीं प्रतिबिंब दिसे । जैशासि तैसें भासे । तयाचें सूत्र असे । आपणाचपाशीं ॥ १६ ॥ जैसें आपण करावें । तैसेंचि तेणें व्हावें । जरी डोळे पसरोनि पहावें । तरी तेंहि टव-कारे ॥ १७ ॥ भृकुटीस[4] घालुनियां गांठी । पाहतां तेंहि क्रोधें उठी । आपण हास्य करितां पोटीं । तेंहि आनंदे ॥ १८ ॥ जैसा भाव प्रतिबिंबला । त-याचाचि देव जाला । जो जैसा भजेल त्याला । तैसाचि वोळे[5] ॥ १९ ॥ भावें परमार्थाचिया वाटा । वाहती भक्तीचिया पेंठा । भरला मोक्षाचा चोहटा[6] । सज्जनसंगें ॥ २० ॥ भावें भजनीं जे लागले । ते ईश्वरीं पावन झाले । भावार्थ बळें उद्धरले । पूर्वज तेही ॥ २१ ॥ आपण स्वयें तरले । जनांसि उपयोगा आले । कीर्तिश्रवणें पावन झाले । अभक्त भावार्थी ॥ २२ ॥ धन्य तयांची जननी । जे लागले हरिभजनीं । त्यांहींच एक जन्म जनीं । सार्थक केलें ॥ २३ ॥ तयांची वर्णू काय थोरी । जयांचा भगवंत कैवारी । कांसे ला-वूनि उतरी । पार दुःखाचा ॥ २४ ॥ बहुत जन्माच्या शेवटीं । जेणें चुके आटाआटी[7] । तो नरदेह भेटी । करी भगवंताची ॥ २५ ॥ म्हणोनि धन्य ते भाविक जन । जिहीं जोडिलें हरि निधान[8] । अनंत जन्मांतरींचें पुण्य । फळासि आलें ॥ २६ ॥ आयुष्य हेचि रत्नपेटी । माजी भजनरत्नें गोमटीं[9] । ईश्वरीं

---

१. आळविलें. २. इतर. ३. बाह्यात्कारीं. ४. भिवयांस. ५. पावतो. ६. चव्हाटा. ७. जन्ममरणरूप दगदग. ८. द्रव्याची रास. ९. सुंदर.

अर्पूनियां लुटी । आनंदाची करावी ॥ २७ ॥ हारिभक्त वैभवें कनिष्ठ । परी तो ब्रह्मादिकां वरिष्ठ । सदासर्वदा संतुष्ट । नैराश्यबोधें ॥ २८ ॥ धरूनियां ईश्वराची कांस । केली संसाराची निरास[१] । तया भाविकां जगदीश । सबाह्य[२] सांभाळी ॥ २९ ॥ जया संसाराचें दुःख । विवेकें वाटे परम सुख । संसार-सुखाचेनि पढतमूर्ख । लोधूनि पडती ॥ ३० ॥ जयांचा ईश्वरीं जिव्हाळा । ते भोगिती स्वानंदसोहळा । जयांचा जनावेगळा । ठेवा अक्षयीं ॥ ३१ ॥ ते अक्षयसुखें सुखावले । संसारदुःख विसरलें । विषयरंगीं वोरंगले[३] । श्रीरंगरंगी[४] ॥ ३२ ॥ तयांस फावली नरदेह-पेटी । केली ईश्वरीं साटी[५] । येर अभाविकें करंटीं । नरदेह गेला ॥ ३३ ॥ अवचटें निधान जोडिलें । तें कवडीचे बद्दल नेलें । तैसें आयुष्य निघोन गेलें । अभाविकांचें ॥ ३४ ॥ बहु तपाचा सांठा । तेणें लाधला परिस गोमटा । परी तो ठायींच करंटा । भोगूंचि नेणे ॥३५॥ तैसा संसारासि आला । मायाजाळीं गुंडाळला । अंतीं एकलाच गेला । हात झाडोनी ॥ ३६ ॥ या नरदेहाचे संगतीं । बहुत पावले उत्तम गती । एक बापुडीं थातायाती । वरपडीं[६] जाहलीं[६] ॥ ३७ ॥ या नरदेहाचेनि लागवेगें[७] । सार्थक करावें संत-संगें । नीच योनि दुःख मागें । बहुत भोगिलें आहे ॥ ३८ ॥ कोण समय येईल कैसा । याचा न कळे कीं भरंवसा । जैसे पक्षी दाही दिशा । उडोनि जाती ॥ ३९ ॥ तैसें वैभव हें सकळ । कोण जाणे कैशी वेळ । पुत्रकलत्रादि सकळ । विघडोनि[८] जाती ॥ ४० ॥ पाहिली घडी नव्हे आपुली । वयसा[९] तरी निघोनि गेली । देह पडतांच ठेविली । आहे नीच योनी ॥ ४१ ॥ श्वानसूकरादि नीच याती । भोगणें घडे नाना विपत्ती । तेथें कांहीं उत्तम गती । पाविजेत नाहीं ॥ ४२ ॥ मागें गर्भवासीं आटाआटी । भोगितां झालासि रे हिंपुटी[१०] । तेथोनियां थोर कष्टीं । सुटलासि दैवें ॥ ४३ ॥ दुःख भोगिलें आपुले जीवें । तेथें कैंचीं होती सर्वें । तैसेंचि पुढें एकलें जावें । लागेल बापा ॥ ४४ ॥ कैंची माता कैंचा पिता । कैंची बहीण कैंचा भ्राता । कैंचीं सुहृदें कैंची वनिता । पुत्रकलत्रादिक ॥ ४५ ॥ हीं तूं जाण मावेचीं ।

१. निरसन. २. आंतून व बाहेरून. ३. विटले. ४. श्रीरंगभक्त. ५. संगति. ६. प्राप्त झालीं. ७. आधारानें. ८. अंतरतात. ९. आयुष्य. १०. दुःखी.

अवघीं सोयरीं सुखाचीं । हीं तुझ्या दुःखाचीं । सांगाती नव्हती ॥ ४६ ॥ कैंचा प्रपंच कैंचें कुळ । कासया होतोसि व्याकुळ । धन कण लक्ष्मी सकळ । जाइजणें ॥ ४७ ॥ कैंचें घर कैंचा संसार । कासया करितोसि जोजार । जन्मवरी वाहोनि भार । सेखीं सांडोनि जाशी ॥ ४८ ॥ कैंचें तारुण्य कैंचें वैभव । कैंचे सोहळे हावभाव । हें सकळही जाण माव । मायिक माया ॥ ॥ ४९ ॥ याच क्षणीं मरोन जाशी । तरी रघुनाथासि अंतरलासी । माझें माझें म्हणतोसी । म्हणोनियां ॥ ५० ॥ तुवां भोगिल्या पुनरावृत्ती । ऐशीं मायबापें किती । स्त्री कन्या पुत्र होती । लक्षानुलक्ष ॥ ५१ ॥ कर्मयोगें सकळही मिळालीं । एके स्थळीं जन्मासि आलीं । तीं तुवां आपुलीं मानिलीं । कैसीं रे पढतमूर्खा ॥ ५२ ॥ तुझें तुज नव्हे शरीर । तेथें इतरांचा कोण विचार । आतां एक भगवंत साचार । धरीं भावार्थबळें ॥ ५३ ॥ गुका दुर्भराकारणें । नाना नीचांची सेवा करणें । नाना स्तुति आणि स्तवनें । मर्यादा धरावी ॥ ५४ ॥ जो अन्न देतो उदरासी । शरीर विकावें लागे त्यासी । जेणें घातलें जन्मासी । त्यास कैसें विसरावें ॥ ५५ ॥ अहर्निशीं ज्या भगवंता । सकळ जीवांची लागली चिंता । मेघ वर्षे जयाची सत्ता । सिंधु मर्यादा धरावी ॥ ५६ ॥ भूमि धरिली धराधरें । प्रगट होइजे दिवाकरें । ऐसी सृष्टि सत्तामात्रें । चालवी जो कां ॥ ५७ ॥ ऐसा कृपाळू देवाधिदेव । जो सांभाळी सकळ जीव । नेणवे जयाचें लाघव । कृपाळूपणें ॥ ५८ ॥ ऐसा सर्वात्मा श्रीराम । सांडूनि धरिती विषयकाम । ते प्राणी दुरात्मे अधम । केलें पावती ॥ ५९ ॥ रामेंविण जे जे आस । तितुकी जाणावी निराश । माझें माझें सावकाश । शीणचि उरे ॥ ६० ॥ जयासि वाटे शीण व्हावा । तेणें विषय चिंतीत जावा । विषय न मिळतां जीवा । तळमळ सुटे ॥ ६१ ॥ सांडूनि राम आनंदघन । ज्याचे मनीं विषयचिंतन । त्यासि कैंचें समाधान । लोलंगतांसी ॥ ६२ ॥ जयासि वाटे सुखचि असावें । तेणें रघुनाथभजनीं लागावें । स्वजन सकळहि त्यागावे । दुःखमूळ जे ॥ ६३ ॥ जेणें वासना झोंबोनि पडे । तेणेंचि अपायें दुःख जडे । म्हणोनि विषय-

१. धान्य वगैरे. २. जाणारें, विनाशी. ३. व्याप. ४. फसवणूक. ५. जन्म-रणाचे फेरे. ६ पोटासाठीं ७. शेषानें. ८. सूर्यानें. ९. कौशल्य. १०. विषयासक्तास

वासना मोडे । तो एक सुखी ॥ ६४ ॥ विषयजनित जें जें सुख । तेणेंचि होतें परम दुःख । पूर्वीं गोड अंतीं शोक । नेमस्त आहे ॥ ६५ ॥ गळ गिळितां सुख वाटे । वोढोनि घेतां घसा फाटे । कां तें बापुडें मृग आपटे । चारा वेऊनि पळतां ॥ ६६ ॥ तैसी विषयसुखाची गोडी । गोड वाटे परी ते कुडी । म्हणोनियां आवडी । रघुनाथीं धरावी ॥ ६७ ॥ ऐकोनि बोले भाविक । कैसेनि घडे जी सार्थक । सांगा स्वामी यमलोक । चुकेल जेणें ॥ ६८ ॥ देवासि वास्तव्य कोठें । तो मज कैसेनि भेटे । दुःखमूळ संसार तुटे । कोणेपरी स्वामी ॥ ६९ ॥ घडफुडी भगवत्प्राप्ती । होऊनि चुके अधोगती । ऐसा उपाय कृपामूर्ती । मज दीनासि करावा ॥ ७० ॥ वक्ता म्हणे हो एकभावें । भगवद्भजन करावें । तेणें होईल स्वभावें । समाधान ॥७१॥ कैसें करावें भगवद्भजन । कोठें ठेवावें हें मन । भगवद्भजनाचें लक्षण । मज निरूपावें ॥ ७२ ॥ ऐसा म्लानवदनें बोले । धरिलीं सदृढ पाउलें । कंठ सद्गदित गळाले । अश्रुपात दुःखें ॥ ७३ ॥ देखोनि शिष्याची अनन्यता । भावें बोलिला सद्गुरुदाता । स्वानंद तुंबळेल आतां । पुढिलिये समासीं ॥ ७४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तृतीयदशके वैराग्यलक्षणनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी ५७८.

---

# दशक चवथा.

## १. श्रवणभक्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी गणनाथा । तूं विद्यावैभवसमर्था । अध्यात्मविद्येच्या परमार्था । मज बोलवावें ॥ १ ॥ नमो शारदा वेदजननी । सकळ सिद्धि जयेचेनी । मानस प्रवर्तलें मननीं । स्फूर्तिरूपें ॥ २ ॥ आतां आठवूं सद्गुरु । जो पराचाही परु । जयाचेनि ज्ञानविचारु । कळों लागे ॥

---

१. खचित. २. वाईट, अपायकारक. ३. खरोखर, त्वरित. ४. एकनिष्ठा. ५. मुख्य विषय. ६. थोरांहून थोर.

॥ ३ ॥ श्रोतयांनीं पुसिलें बरवें । भगवद्भजन कैसें करावें । म्हणोनि बोलिलें स्वभावें । ग्रंथांतरीं ॥ ४ ॥ सावध होऊनि श्रोतेजन । ऐका नवविधाभजन । सच्छास्त्रीं बोलिलें पावन । होइजे येणें ॥ ५ ॥ श्लोक ॥ श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ १ ॥ टी० ॥ श्रवण कीर्तन विष्णुस्मरण । पादसेवन अर्चन वंदन । दास्य सख्य आत्मनिवेदन । ऐसें हें नवविधा ॥ ६ ॥ नवविधा भजन बोलिलें । तेंचि पुढें प्रांजळ केलें । श्रोतीं अवधान दीधलें । पाहिजे आतां ॥ ७ ॥ प्रथम भजन ऐसें जाण । हरिकथा पुराणश्रवण । नाना अध्यात्म[1]-निरूपण । ऐकत जावें ॥ ८ ॥ कर्ममार्ग उपासनामार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग । योगमार्ग वैराग्यमार्ग । ऐकत जावे ॥ ९ ॥ नाना व्रतांचे महिमे । नाना तीर्थांचे महिमे । नाना दानांचे महिमे । ऐकत जावे ॥ १० ॥ नाना माहात्म्यें[2] नाना स्थानें । नाना मंत्र नाना साधनें । नाना तपें पुरश्चरणें । ऐकत जावीं ॥ ११ ॥ दुग्धाहारी निराहारी । फळाहारी पर्णाहारी[3] । तृणाहारी नानाहारी । कैसे ते ऐकावे ॥ १२ ॥ उष्णवास[4] जळवास[5] । शीतवास अरण्यवास । भूगर्भ[6] आणि आकाशवास[7] । कैसे ते ऐकावे ॥ १३ ॥ जपी तपी तापस योगी । नाना निग्रही[8] हठयोगी[9] । शाक्तागमी[10] अघोरयोगी[11] कैसे ते ऐकावे ॥ १४ ॥ नाना मुद्रा नाना आसनें । नाना देखणीं लक्षस्थानें[12] । पिंडज्ञानें तत्वज्ञानें । कैसीं तीं ऐकावीं ॥ १५ ॥ नाना पिंडांची रचना । नाना भूगोल रचना । नाना सृष्टींची रचना । कैसी ती ऐकावी ॥ १६ ॥ चंद्र सूर्य तारामंडळें । ग्रहमंडळें तेजमंडळें । एकवीस स्वर्ग सप्त[13] पाताळें । कैसीं तीं ऐकावीं ॥ १७ ॥ ब्रह्मविष्णुमहेशस्थानें । इंद्र देव ऋषिस्थानें । वायु वरुण कुबेरस्थानें । कैसीं तीं ऐकावीं ॥ १८ ॥ नवखंडें चौदा

१. ईश्वरासंबंधीं चर्चा. २. शिवमाहात्म्य, काशीमाहात्म्य, अशासारखे ग्रंथ. ३. पाला खाऊन राहणारे. ४. पंचाग्निसाधन. ५. थंडीच्या दिवसांत गळ्याइतक्या थंड पाण्यांत उभें राहणें. ६. भुयारांत राहणें. ७. वृक्षादिकांवर राहणें. ८. इंद्रियांचें दमन करणारे. ९. प्राणनिरोध करून चित्तैक्य करणारे. १०. देवीउपासकांच्या पंथानें चालणारे. ११. भूतप्रेतांचें साधन करणारे. १२. चित्त एकाग्र करण्याचीं स्थानें. १३. अतळ, वितल, सुतल, तलातळ, रसातळ, महातळ व पाताळ.

भुवनें । अष्ट दिक्पालांचीं[1] स्थानें । नाना उपवनें गहनें[2] । कैसीं तीं ऐकावीं ॥ १९ ॥ गणगंधर्व विद्याधर । यक्ष किन्नर नारद तुंबर । अष्टनायका संगीतविचार । कैसा तो ऐकावा ॥ २० ॥ रागज्ञान तालज्ञान । नृत्यज्ञान वाद्यज्ञान । अमृतवेळा[3] प्रसंगज्ञान । कैसें तें ऐकावें ॥ २१ ॥ चौदा विद्या चौसष्टी कळा । सामुद्रिक लक्षणें सकळ कळा । बत्तीस लक्षणें नाना कळा । कैशा त्या ऐकाव्या ॥ २२ ॥ मंत्र मोहरे[4] तोडगे सिद्धी । नाना वल्ली नाना औषधी । धातु रसायनें बुद्धी । नाडिज्ञानें ऐकावीं ॥ २३ ॥ कोण्या दोषें कोण रोग । कोण्या रोगास कोण प्रयोग[5] । कोण्या प्रयोगास कोण योग[6] । साधे तो ऐकावा ॥ २४ ॥ रवरवादि कुंभीपाक । नाना यातना यमलोक । सुखदुःखादि स्वर्ग नरक । कैसा तो ऐकावा ॥ २५ ॥ कैशा नवविधा भक्ती । कैशा चतुर्विधा मुक्ती । कैसी पाविजे उत्तम गती । ऐसें हें ऐकावें ॥ २६ ॥ पिंडब्रह्मांडाची रचना । नाना तत्वविवेचना । सारासार विचारणा । कैसी ती ऐकावी ॥ २७ ॥ सायुज्यतामुक्ति कैशी होते । कैसें पाविजे मोक्षातें । या कारणें नाना मतें । शोधीत जावीं ॥ २८ ॥ वेदशास्त्र आणि पुराणें । महावाक्यांचीं[7] विवरणें । तनुचतुष्टयनिरसनें[8] । कैशीं तीं ऐकावीं ॥ २९ ॥ ऐसें हें अवघेंचि ऐकावें । परंतु सार शोधूनि घ्यावें । असार तें जाणोनि त्यागावें । या नांव श्रवणभक्ती ॥ ३० ॥ सगुणाचीं चरित्रें ऐकावीं । कां ते निर्गुण अध्यात्में[9] शोधावीं । श्रवणभक्तीचीं जाणावीं । लक्षणें ऐसीं ॥ ३१ ॥ सगुण देवाचीं चरित्रें । निर्गुणाचीं तत्वयंत्रें[10] । हीं दोन्हीं परम पवित्रें । ऐकत जावीं ॥ ३२ ॥ जयंत्या उपोषणें नाना साधनें । मंत्र यंत्र जप ध्यानें । कीर्ति स्तुति स्तवनें भजनें । नानाविधें ऐकावीं ॥ ३३ ॥ ऐसें श्रवण सगुणाचें । अध्यात्मनिरूपण निर्गुणाचें । विभक्ति[11] सांडून भक्तीचें । मूळ शोधावें ॥ ३४ ॥ श्रवणभक्तीचें निरूपण । निरूपिलें असे

१. दिशांचे अधिपति; इंद्र, अग्नि, यम इत्यादि. २. वनें. ३. सर्वोत्कृष्ट मुहूर्त. ४. सर्पाच्या मस्तकांत असणारा औषधी मणि. ५. युक्ति, उपाय. ६. उपचार. ७. चार वेदांतून जीं तत्त्वमस्यादि चार वाक्यें सार म्हणून काढलीं आहेत त्यांचीं. ८. स्थूल, सूक्ष्म, कारण, व महाकारण अशा चार प्रकारच्या शरीरांचा विचारानें नाश करणें. ९. वेदान्तग्रंथ. १०. तत्त्वबोधक साधनें, ग्रंथ वगैरे. ११. भेदबुद्धि.

जाण । पुढें कीर्तनभजनाचें लक्षण । बोलिलें असे ॥३५॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थदशके श्रवणभक्तिनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥१॥

---

## २. कीर्तन भक्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रोतीं भगवद्भजन पुसिलें । तें नवविधा प्रकारें बोलिलें । त्यांत प्रथम श्रवण निरूपिलें । दुसरें कीर्तन ऐका ॥ १ ॥ सगुण हरिकथा करावी । भगवत्कीर्ति वाढवावी । अखंड वागीश्वरी वदवावी । यथायोग्य ॥ २ ॥ बहुत करावें पाठांतर । कंठीं धरावें अर्थांतर । भगवत्कथा निरंतर । करीत जावी ॥ ३ ॥ आपुलिया सुखस्वार्था । केलीच करावी हरिकथा । हरिकथेविण सर्वथा । राहूंचि नये ॥ ४ ॥ नित्य नवा हव्यास धरावा । साक्षेपें अत्यंताचि करावा । हरिकीर्तनें भरावा । ब्रह्मगोळ अवघा ॥ ५ ॥ मनापासोनि आवडी । जीवापासून अत्यंत गोडी । सदा सर्वदा तांतडी । हरिकीर्तनाची ॥ ६ ॥ भगवंतासि कीर्तन प्रिय । कीर्तनें समाधान होय । बहुत जनांसि उपाय । हरिकीर्तन कलियुगीं ॥ ७ ॥ विविध विचित्र ध्यानें । वर्णावीं अलंकार भूषणें । ध्यानमूर्ति अंतःकरणें । लक्षून कथा करावी ॥ ८ ॥ यश कीर्ति प्रताप महिमा । आवडीं वर्णावा परमात्मा । जेणें भगवद्भक्तांचा आत्मा । संतुष्ट होय ॥ ९ ॥ कथान्वय लापणिका । नामघोष करतालिका । प्रसंगें बोलाव्या अनेका । धाटी मातृ नेमस्त ॥ १० ॥ ताल मृदंग हरिकीर्तन । संगीत नृत्य तान मान । नाना कथा अनुसंधान । तुटोंचि न द्यावें ॥ ११ ॥ कारुणाकीर्तनाच्या लोटें । कथा करावी घडघडाटें । श्रोतयांचीं श्रवणपुटें । आनंदें भरावीं ॥ १२ ॥ कंप रोमांच स्फुरणें । प्रेमाश्रुसहित गाणें । देवद्वारीं लोटांगणें । नमस्कार घालावे ॥ १३ ॥ पदें दोहरे श्लोक प्रबंधें । धाटी मुद्रा अनेक छंद । वीरभाटी व विनोद । प्रसंगें करावे ॥ १४ ॥ नाना नवरासिक शृंगारिक । गद्यपद्यांचें कौतुक । नाना वचनें प्रस्ताविकें । शास्त्राधारें बोलावीं ॥ १५ ॥ भक्तिज्ञान-वैराग्यलक्षण । नीतिन्याय स्वधर्मरक्षण । साधनमार्ग अध्यात्मनिरूपण ।

---

१. वाणी. २. प्रयत्न. ३. भाषाचातुर्य. ४. टाळ्या. ५. कल्पित गोष्टी. ६. झालेल्या गोष्टी. ७. कविता. ८. थोर पुरुषांचें वर्णन. ९. उपक्रमरूप.

प्रांजळ बोलावें ॥ १६ ॥ प्रसंगीं हरिकथा करावी । सगुणीं सगुण कीर्ति धरावी । निर्गुणप्रसंगीं वाढवावी । अध्यात्मविद्या ॥ १७ ॥ पूर्वपक्ष[1] त्यागून सिद्धांत । निरूपण करावें नेमस्त । बहुधा बोलणें अस्ताव्यस्त । बोलोंचि नये ॥ १८ ॥ करावें वेदपारायण[2] । सांगावें जनांसि पुराण । मायाब्रह्मींचें विवरण । साकल्यें[3] वदावें ॥ १९ ॥ ब्राह्मण्य रक्षावें आदरें । उपासनेचीं भजनद्वारें । गुरुपरंपरा निर्धारें । चळोंच न द्यावी ॥ २० ॥ करावें वैराग्य-रक्षण । रक्षावें ज्ञानाचें लक्षण । परमदक्ष विचक्षण । सर्वेंहि सांभाळी ॥२१॥ सत्य समाधान तें उडे । नीति न्याय साधन मोडे । जेणें सद्भाव बिघडे । ऐसें न बोलावें ॥ २२ ॥ सगुण हरिकथा या नांव कीर्तन । अद्वैत[4] म्हणजे निरूपण । सगुण रक्षून निर्गुण । बोलत जावें ॥ २३ ॥ असो वक्तृत्वाचा अधिकार । अल्पास न घडे प्रत्युत्तर । वक्ता पाहिजे साचार । अनुभवाचा ॥ २४ ॥ सकळ रक्षून ज्ञान सांगे । जेणें वेदाज्ञा न भंगे । उत्तम सन्मार्गे लागे । प्राणिमात्रांसी ॥ २५॥ असो हें सकळहि सांडून । करावें गुणानुवाद-कीर्तन । या नांव भगवद्भजन । दुसरी भक्ती ॥ २६ ॥ कीर्तनें महा दोष जाती । कीर्तनें होय उत्तम गती । कीर्तनें भगवत्प्राप्ती । यदर्थीं संशय नाहीं ॥ २७ ॥ कीर्तनें वाचा पवित्र । कीर्तनें होय सत्पात्र । कीर्तनें प्राणि-मात्र । सुशील होती ॥ २८ ॥ कीर्तनें अव्यग्रता[5] घडे । कीर्तनें निश्चय सांपडे । कीर्तनें संदेह उडे । श्रोत्या वक्त्यांचा ॥ २९ ॥ सदासर्वदा हरि-कीर्तन । ब्रह्मसुत[6] करी आपण । तेणें नारद तोचि नारायण । बोलिजेत आहे ॥ ३० ॥ म्हणोन कीर्तनाचा अगाध महिमा । कीर्तनें संतोषे पर-मात्मा । सकळ तीर्थें आणि जगदात्मा । हरिकीर्तनीं वसे ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थदशके कीर्तनभजननिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

१. वादामध्यें शंका घेणाराचें जें कांहीं म्हणणें तें. २. समग्र वाचणें, किंवा म्हणणें ३. संपूर्णपणें. ४. 'एक ब्रह्मच सत्य आहे. अज्ञानानें त्यावरच हीं अनेक रूपें भासतात.' हा विचार. ५. एकाग्रता. ६. नारद.

## ३. स्मरणभक्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां निरूपिलें कीर्तन । जें सकळांसि करी पावन । आतां ऐका विष्णुस्मरण । तिसरी भक्ती ॥ १ ॥ स्मरण देवाचें करावें । अखंड नाम जपत जावें । नामस्मरणें पावावें । समाधान ॥ २ ॥ नित्य नेम प्रातःकाळीं । मध्यान्हकाळीं सायंकाळीं । नामस्मरण सर्वकाळीं । करीत जावें ॥ ३ ॥ सुख दुःख उद्वेग चिंता । अथवा आनंदरूप असतां । नामस्मरणेंविण सर्वथा । राहोंचि नये ॥ ४ ॥ हर्षकाळीं विषमकाळीं । पर्वकाळीं प्रस्तावकाळीं । विश्रांतिकाळीं निद्राकाळीं । नामस्मरण करावें ॥५॥ कोडें सांकडें संकट । नाना संसारखटपट । अवस्था लागतां चटपट । नामस्मरण करावें ॥ ६ ॥ चालतां बोलतां धंदा करितां । खातां जेवितां सुखी होतां । नाना उपभोग भोगितां । नाम विसरूं नये ॥ ७ ॥ संपत्ति अथवा विपत्ती । जैसी पडेल काळगती । परी नामस्मरणाची स्थिति । सांडूंच नये ॥८॥ वैभव सामर्थ्य आणि सत्ता । नाना पदार्थ चालतां । उत्कट भाग्यश्री भोगितां । नाम सांडूं नये ॥९॥ आधीं अवदसा मग दशा । अवथा दशे उपरी अवदसा । प्रसंग असो भलतैसा । परंतु नाम सांडूं नये ॥१०॥ नामें संकटें नासती । नामें विघ्नें निवारिती । नामस्मरणें पाविजती । उत्तम पद ॥११॥ भूत पिशाच नाना छंद । ब्रह्मग्रह ब्राह्मणसमंध । मंत्रचळ[१] नाना खेद । नामनिष्ठें नासती ॥ १२ ॥ नामें विषबाधा हरती । नामें चेडें चेटकें नासती । नामें होय उत्तम गती । अंतकाळीं ॥ १३ ॥ बाळपणीं तरुणकाळीं । कठिण काळीं वृद्धापकाळीं । सर्वकाळीं अंतकाळीं । नामस्मरण असावें ॥ १४ ॥ नामांचा महिमा जाणे शंकर । जनां उपदेशी विश्वेश्वर । वाराणसी मुक्तिक्षेत्र । रामनामेंकरूनी ॥ १५ ॥ उफराट्या नामासाठीं । वाल्मीक तरला उठाउठी । भविष्य वदला शतकोटी । चरित्र रघुनाथाचें ॥ १६ ॥ हरिनामें प्रल्हाद तरला । नाना आघातांपासून सुटला । नारायणनामें पावन झाला । अजामेळ ॥ १७ ॥ नामें पाषाण तरले । असंख्यात भक्त उद्धरले । महापापी तेचि झाले । परम पवित्र ॥ १८ ॥ परमेश्वराचीं अनंत नामें । स्मरतां तरिजे नित्य नेमें । नाम स्मरितां यमें । बाधिजेना । १९ ॥ सहस्र नामां-

१. मंत्रप्रयोगांत दोष घडल्यामुळें लागणारें वेड.

मध्यें कोणी एक । म्हणतां होतसे सार्थक । नामस्मरणें पुण्यश्लोक[1] । होइजे स्वयें ॥ २० ॥ कांहींच न करून प्राणी । रामनाम जपे वाणी । तेणें संतुष्ट चक्रपाणी । भक्तांलागीं सांभाळी ॥ २१ ॥ नाम स्मरे निरंतर । तें जाणावें पुण्यशरीर । नाना दोषांचे गिरिवर[2] । रामनामें नासती ॥ २२ ॥ अगाध महिमा न वचे वदला । नामें बहुत जन उद्धरला । हालाहलापासून सुटला । प्रत्यक्ष चंद्रमौळी[3] ॥ २३ ॥ चहूं वर्णांस नामाधिकार । नामीं नाहीं लहान थोर । जड मूढ पैलपार । पावती नामें ॥ २४ ॥ म्हणोनि नाम अखंड स्मरावें । रूप मनीं आठवावें । तिसरे भक्तीचें स्वभावें । लक्षण ऐसें ॥ २५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थदशके नामस्मरणनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. पादसेवनभक्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां जाहलें निरूपण । नामस्मरणाचें लक्षण । आतां ऐका पादसेवन । चौथी भक्ती ॥ १ ॥ पादसेवन तेंचि जाणावें । काया वाचा मनोभावें । सद्गुरुपाय सेवावे । सद्गतीकारणें ॥ २ ॥ या नांव पादसेवन । सद्गुरुपदीं अनन्यशरण । निरसाया जन्ममरण । यातायाती ॥ ३ ॥ सद्गुरुकृपेविण कांहीं । भवतरणोपाय नाहीं । या कारणें लवलाहीं । सद्गुरुपाद सेवावे ॥ ४ ॥ सद्वस्तु[4] दाखवी सद्गुरू । सकळ सारासार विचारू । परब्रह्माचा निर्धारू । अंतरीं बाणे ॥ ५ ॥ ॥ जें वस्तु दृष्टी दिसेना । आणि मनासही भासेना । संगत्यागेंविण[5] येईना । अनुभवासी ॥ ६ ॥ अनुभव घेतां संगत्याग नसे । संगत्यागाविण अनुभव न दिसे । हें अनुभवियासीच भासे । येरां गाथागोंवी ॥ ७ ॥ संगत्याग आणि निवेदन[6] । विदेहस्थिति अलिप्तपण । सहजस्थिति उन्मनी[7] विज्ञान[8] । हे सरहि एकरूपी ॥ ८ ॥ यां हीं वेगळीं नामाभिधानें । समाधानाचीं संकेतवचनें । हें सकळहि पाद-

---

१. ज्याची कीर्ति गाणें पुण्यकारक आहे असा पुरुष. २. मोठमोठे पर्वत. ३. ज्याचे मस्तकीं चंद्र आहे तो, शिव. ४. ब्रह्म. ५. विषयासक्तीचा त्याग. ६. आत्मनिवेदन (द. ४, स. ९ पहा.). ७. समाधिस्थ योग्याची एक अवस्था. ८. ब्रह्मज्ञानाचा अनुभव.

सेवनें । उमजों लागे ॥ ९ ॥ वेदश्रुतिगर्भे वेदांतें । सिद्धभावगर्भे सिद्धांतें । अनुभव अनिर्वाच्य धादांतें । सत्य वस्तू ॥ १० ॥ बहुधा अनुभवाचीं अंगें। सकळ कळती संतसंगें । चौथे भक्तीचे प्रसंगें । गौप्य तें प्रगटे ॥ ११ ॥ प्रकट असोनि नसे । गौप्य असोनि भासे । भासा अभासाहूनि अनारिसे । गुरुगम्य मार्ग ॥ १२ ॥ मार्ग होय परी अंतरिक्ष। येथें सर्वहि पूर्वपक्ष । पाहूं जातां अलक्ष । लक्षवेना ॥ १३ ॥ लक्षें जयासि लक्षावें । ध्यानें जयासि ध्यावें । तैसें तेंचि आपण व्हावें । त्रिविधीं प्रचीतीं ॥ १४ ॥ असो हीं अनुभवाचीं द्वारें । सकळ कळती सारासारविचारें । सत्संगेंकरूनि सत्योत्तरें । प्रत्ययासि येती ॥१५॥ सत्य पाहतां नाहीं असत्य । असत्य पाहतां नाहीं सत्य । सत्यअसत्यांचें कृत्य ॥ पाहणारापासा ॥ १६ ॥ पाहणार पाहणें जया लागलें । तें सद्रूपत्वें प्राप्त जाहलें । तरी मग जाणावें बाणलें । समाधान ॥ १७ ॥ नाना समाधानें पाहतां । बाणती सद्गुरु करितां । सद्गुरूविण सर्वथा । सन्मार्ग नसे ॥ १८ ॥ प्रयोग साधनें सायास । नाना साक्षेप विद्याभ्यास । अभ्यासें कांहीं गुरुगम्यास । पाविजेत नाहीं ॥ १९ ॥ जें अभ्यासें अभ्यासितां न ये । जें साधनें असाध्य होय । तें सद्गुरूविण काय । उमजों जाणे ॥ २० ॥ या कारणें ज्ञानमार्ग । कळाया धरावा सत्संग । सत्संगेंविण प्रसंग । बोलोंचि नये ॥ २१ ॥ सेवावे सद्गुरूचे चरण । या नांव पादसेवन । चौथे भक्तीचें लक्षण । तें हें निरूपिलें ॥ २२ ॥ देव ब्राह्मण महानुभाव । सत्पात्रें भजनाचा ठाव । ऐसिये ठायीं सद्भाव । सदृढ धरावा ॥ २३ ॥ हें प्रवृत्तीचें बोलणें । बोलिलें रक्षाया कारणें । परंतु सद्गुरुपाद सेवणें । या नांव पादसेवन ॥ २४ ॥ पादसेवन चौथी भक्ती । पावन करितसे त्रिजगती । जयेकरितां सायुज्यमुक्ती । साधकांसि होय ॥ २५ ॥ म्हणोनि थोराहूनि थोर । चौथे भक्तीचा निर्धार । जयेकरितां पैलपार । बहुत

१. शास्त्रांतील विचार. २. सिद्ध पुरुषांचा अनुभव. ३. गुरूचा अनुभव. ४. स्वतःचा अनुभव. ५. वेगळे. ६. गुरुकृपेनेंच साध्य. ७. अचिंत्य ब्रह्म. ८. शास्त्राचा, गुरुचा व स्वतःचा अनुभव. ९. पहाणारा व पहाणें हा भेदभाव ज्यावर अधिष्ठित आहे तें ब्रह्म सर्वत्र एकरूप आहे असें कळलें तर. १० महात्मे.

प्राणी पावती ॥ २६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थदशके पादसेवनभक्तिनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. अर्चनभक्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ मागें जाहलें निरूपण । चौथे भक्तीचें लक्षण । आतां ऐका सावधान । पांचवी भक्ती ॥ १ ॥ पांचवी भक्ती ते अर्चन । अर्चन म्हणजे देवतार्चन । शास्त्रोक्त पूजाविधान । केलें पाहिजे ॥ २ ॥ नाना साधनें उपकरणें । वस्त्रें अलंकार भूषणें । मानसपूजा मूर्तिध्यानें । या नांव पांचवी भक्ती ॥ ३ ॥ देव ब्राह्मण अग्निपूजन । संत साधु अतिथिपूजन । यति महानुभाव गायत्रीपूजन । या नांव पांचवी भक्ती ॥ ४ ॥ धातु पाषाण मृत्तिकापूजन । चित्रलेप[1] सत्पात्र पूजन । आपुले गृहींचें देवतार्चन । या नांव पांचवी भक्ती ॥ ५ ॥ शिळा सप्तांकित नवांकित । शाळग्राम शकलें चक्रांकित[2] । लिंगें सूर्यकांत सोमकांत। बाण तांदळे[3] नर्मदे[4] ॥ ६ ॥ भैरव-भगवती मल्लारी । मुंजा नृसिंह बनशंकरी । नाग नागिणी नानापरी । पंचायतनपूजा[5] ॥ ७ ॥ गणेश शारदा विठ्ठलमूर्ती । रंगनाथ जगन्नाथ तांडव-मूर्ती[6] । श्रीहनुमंत गरुडमूर्ती । देवतार्चनीं पूजाव्या ॥ ८ ॥ मत्स्य कूर्म वराहमूर्ती । नृसिंह भार्गव[7] वामनमूर्ती । राम कृष्ण हयग्रीवमूर्ती । देवतार्चनीं पूजाव्या ॥ ९ ॥ केशव नारायण माधवमूर्ती । गोविंद विष्णु मधुसूदनमूर्ती । त्रिविक्रम वामन श्रीधरमूर्ती । हृषीकेश पद्मनाभ ॥ १० ॥ दामोदर संकर्षण वासुदेवमूर्ती । प्रद्युम्न अनिरुद्ध पुरुषोत्तममूर्ती । अधोक्षज नारसिंह अच्युतमूर्ती । जनार्दन आणि उपेंद्र ॥ ११ ॥ हरिहरांच्या अनंत मूर्ती । भगवंत जगदात्मा जगदीशमूर्ती । शिवशक्तींच्या बहुधा मूर्ती । देवतार्चनीं पूजाव्या ॥ १२ ॥ अश्वत्थनारायण सूर्यनारायण । लक्ष्मीनारायण श्रीमल्लनारायण । श्रीहरिनारायण आदिनारायण । शेषशायी परमात्मा

---

१. गोपीचंदनाची किंवा गंधाची मूर्ति. २. चक्राकार चिन्ह असलेली. ३. शेंदूर लावलेले दगड. ४. नर्मदेंत सांपडणारे. ५. विष्णु, गणपति, शंकर, देवी व सूर्य या पाचांची एकत्र पूजा. ६. नृत्य करतेशीं मूर्ति. ७. परशुराम. ८. पिंपळाचे ठायीं असलेला देवाचा अंश. ९. श्रीविष्णु.

॥ १३ ॥ ऐशा परमेश्वराच्या मूर्ती । पाहूं जातां उदंड असती । त्यांचें अर्चन करावें भक्ती । पांचवी ऐसी ॥ १४ ॥ यांहि वेगळे कुळधर्म । सोडूं नये अनुक्रम । उत्तम अथवा मध्यम । करीत जावे ॥ १५ ॥ जाखमाता मायराणी । बाळा बगळा मानवणी । पूजामागणी जोगिणी । कुळधर्म करावे ॥ १६ ॥ नाना तीर्थी क्षेत्रीं जावें । तेथें त्या देवाचें पूजन करावें । नाना उपचारें पूजावें । परमात्मयासी ॥ १७ ॥ पंचामृत गंधाक्षतें । पुष्पें परिमळद्रव्यें[1] बहुतें । धूप दीप असंख्यातें । नीरांजनें कर्पूराचीं ॥ १८ ॥ नाना खाद्य नैवेद्य सुंदर । नाना फळें तांबूल प्रकार । दक्षिणा नाना अलंकार । दिव्यांबरें[2] वनमाला[3] ॥ १९ ॥ शिबिका छत्रें सुखासनें । महा मेघडंबर[4] सूर्यपानें[5] । दिंड्या पताका निशाणें । ताल डोल मृदंग ॥ २० ॥ नाना वाद्यें नाना उत्सव । नाना भक्तसमुदाव । गाती हरिदास सद्भाव । लागला भगवंतीं ॥ २१ ॥ वापी कूप सरोवरें । नाना देवालयें शिखरें । राजांगणें[6] मनोहरें । वृंदावनें भुयारीं ॥ २२ ॥ मठ मंडप धर्मशाळा । देवद्वारीं पडशाळा । नाना उपकरणें नक्षत्रमाळा[7] । नाना वस्त्रसामुग्री ॥ २३ ॥ नाना पडदे मंडप चांदवे[8] । नाना रत्नें घोंस लोंबती बरवे । नाना देवालयीं समर्पावे । हस्ती घोडे शकटें[9] ॥ २४ ॥ अलंकार आणि अलंकारपात्रें । द्रव्य आणि द्रव्यपात्रें । अन्नोदक आणि अन्नोदकपात्रें । नाना प्रकारचीं ॥ २५ ॥ वनें उपवनें पुष्पवाटिका । तापसांच्या पर्णकुटिका[10] । ऐसी पूजा जगन्नायका । यथासांग समर्पावी ॥ २६ ॥ शुक सारिका[11] मयूरें । बदकें चक्रवाकें चकोरें । कोकिळा चितळें[12] सामरें । देवालयीं समर्पावीं ॥ २७ ॥ सुगंधमृगें[13] आणि मार्जारें[14] । गाई महिषी वृषभ वानरें । नाना पदार्थ आणि लेंकुरें । देवालयीं समर्पावीं ॥२८॥ काया वाचा आणि मनें । चित्तें वित्तें आणि प्राणें । सद्भावें भगवदर्चनें । या नांव अर्चनभक्ती ॥ २९ ॥ ऐसेंचि सद्गुरूचें भजन । करूनि असावें अनन्य[15] । या नांव भगवद्भजन । पांचवी भक्ती ॥ ३० ॥ ऐसी

१. सुवासिक पदार्थ. २. उंची वस्त्रें. ३. वन्य पुष्पांची माळ. ४. उंच छत्री. ५. अबदागिरी ६. चौक. ७. सत्तावीस मोत्यांची कंठी. ८. छत. ९. गाडे. १०. झोंपडी. ११. मैना. १२. चित्त. १३. कस्तुरीमृग. १४. जवादी मांजरें. १५. एकनिष्ठ.

पूजा न घडे बरवी । तरी मानसपूजा करावी । मानसपूजा अगत्य व्हावी। परमेश्वरासी ॥ ३१ ॥ मनें भगवंतासि पूजावें । कल्पून सर्वैहि समर्पावें । मानसपूजेचें जाणावें । लक्षण ऐसें ॥ ३२ ॥ जें जें आपणासि पाहिजे । तें तें कल्पून वाहिजे । येणें प्रकारें कीजे मानसपूजा ॥ ३३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थदशके अर्चनभक्तिनिरुपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. वंदनभक्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ मागें झालें निरूपण । पांचवे भक्तीचें लक्षण । आतां ऐका सावधान । सहावी भक्ती ॥ १ ॥ सहावी भक्ती ते वंदन । करावें देवासि नमन । संत साधु आणि सज्जन । नमस्कारीत जावे ॥ २ ॥ सूर्यासि करावे नमस्कार । देवासि करावे नमस्कार । सद्गुरूस करावे नमस्कार । साष्टांग भावें ॥ ३ ॥ साष्टांग नमस्कारासि अधिकारू । नाना प्रतिमा देव गुरू । अन्यत्र नमनाचा विचारू । अधिकारें करावा ॥ ४ ॥ छप्पन्न कोटी वसुमती[१]- । मध्यें विष्णुमूर्ती असती । तयांस नमस्कार प्रीतीं । साष्टांग घालावे ॥ ५ ॥ पशुपती[२] श्रीपती[३] आणि गभस्ती[४] । यांचिया दर्शनें दोष जाती । तैसाचि नमावा मारुती । नित्य नेमें विशेष ॥ ६ ॥ श्लोक ॥ शंकरः शेषशायी च मार्तंडो मारुतिस्तथा । एतेषां दर्शनं पुण्यं नित्यनेमे विशेषतः ॥ १ ॥ भक्त ज्ञानी आणि वीतरागी[५] । महानुभाव तापसी योगी । सत्पात्र देखोनि वेगीं । नमस्कार घालावे ॥ ७ ॥ वेदशास्त्रज्ञ आणि सर्वज्ञ । पंडित पुराणिक आणि विद्वज्जन । याज्ञिक वैदिक पवित्र जन । नमस्कारीत जावे ॥ ८ ॥ जेथें दिसती विशेष गुण । तेंचि सद्गुरूचें अधिष्ठान । या कारणें तयासि नमन । अत्यादरें करावें ॥ ९ ॥ गणेश शारदा नाना शक्ती[६] । हरिहरांच्या अनंत मूर्ती । नाना देव सांगूं किती । पृथगाकारें[७] ॥ १० ॥ सर्व देवांसि नमस्कारिलें । तें एका भगवंतासि पावलें । यदर्थीं वचन बोलिलें । आहे तें ऐका ॥ ११ ॥ श्लोक ॥ आकाशात्पतितं

---

१. पृथ्वी. २. शंकर. ३. विष्णु. ४. सूर्य. ५. आसक्ति नाहीं असे. ६. देवी. ७. निरनिराळ्या रूपानें.

तोयं यथा गच्छति सागरम् । सर्वदेवनमकारः केशवं प्रतिगच्छति ॥ १ ॥ या कारणें सर्व देवांसी । नमस्कारावें अत्यादरेंसी । अधिष्ठान मानितां देवांसी । परम सौख्य वाटे ॥ १२ ॥ नाना देवांचीं अधिष्ठानें । सत्पात्र सद्गुरूचीं स्थानें । या कारणें नमस्कार करणें । उभयमार्गीं ॥ १३ ॥ नमस्कारें लीनता घडे । नमस्कारें विकल्प मोडे । नमस्कारें सख्य घडे । सत्पात्रासी ॥ १४ ॥ नमस्कारें दोष जाती । नमस्कारें अन्याय क्षमिती । नमस्कारें मोडलीं जडती । समाधानें ॥ १५ ॥ सीसापरता नाहीं दंड । ऐसें बोलती उदंड । या कारणें अखंड । देवभक्त वंदावे ॥ १६ ॥ नमस्कारें कृपा उचंबळे । नमस्कारें प्रसन्नता प्रबळे । नमस्कारें गुरुदेव वोळे । साधकावरी ॥ १७ ॥ विशेषें करितां नमस्कार । नासती दोषांचे गिरिवर । आणि मुख्य परमेश्वर । कृपा करी ॥ १८ ॥ नमस्कारें पतित पावन । नमस्कारें संतांसि शरण । नमस्कारें जन्ममरण । दूरी दूरावे ॥ १९ ॥ परम अन्याय करून आला । आणि साष्टांग नमस्कार घातला । तरी तो अन्याय क्षमा केला । पाहिजे श्रेष्ठीं ॥ २० ॥ या कारणें नमस्कारापरतें । आणिक नाहीं अनुसरतें । नमस्कारें प्राणियातें । सद्बुद्धि लागे ॥ २१ ॥ नमस्कारासि वेंचावें नलगे । नमस्कारासि कष्टावें नलगे । नमस्कारासि कांहींच नलगे । उपकरणसामुग्री ॥ २२ ॥ नमस्कारा ऐसें नाहीं सोपें । नमस्कार करावा अनन्यरूपें । नाना साधनीं सांक्षेपें । कासया शिणावें ॥ २३ ॥ साधक भावें नमस्कार घाली । त्याची चिंता साधूस लागली । सुगम पंथें नेऊन घाली । जेथलि तेथें ॥ २४ ॥ या कारणें नमस्कार श्रेष्ठ । नमस्कारें वोळती वरिष्ठ । येथें सांगितली स्पष्ट । सहावी भक्ती ॥ २५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थदशके वंदनभक्तिनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. दास्यभक्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ मागें जाहलें निरूपण । सहावे भक्तीचें लक्षण । आतां ऐका सावधान । सातवी भक्ती ॥ १ ॥ सातवें भजन दास्य जाणावें ।

---

१. देव व गुरु यांस. २. मस्तकापेक्षां. ३. ग्राह्य. ४. परिश्रमानें.

पडिलें कार्य तितुकें करावें । सदा सान्निधचि असावें । देवद्वारीं ॥ २ ॥ देवाचें वैभव सांभाळावें । न्यूनपूर्ण[1] पडूंचि न द्यावें । चढतें वाढतें वाढवावें । पूजन देवाचें ॥ ३ ॥ भंगलीं देवालयें करारीं । मोडलीं सरोवरें[2] बांधावीं । सोपे धर्मशाळा चालवावीं । नूतनचि कार्यें ॥ ४ ॥ नाना रचना जीर्ण जर्जर । त्यांचे करावे जीर्णोद्धार । पडिलें कार्य तें सत्वर । चालवीत जावें ॥ ५ ॥ गज रथ तुरंग[3] सिंहासनें । चौकियां[4] सिबिका सुखासनें । मंचक डोल्हारे विमानें । नूतनचि करावीं ॥ ६ ॥ मेघडंबरें छत्रें चामरें । सूर्यपानें निशाणें अपार । नित्य नूतन अत्यादरें । सांभाळीत जावीं ॥ ७ ॥ नाना प्रकारचीं यानें[5] । बैसावयाचीं उत्तम स्थानें । बहुविध सुवर्णासनें । यत्नें करीत जावीं ॥८॥ भुवनें[6] पेठ्या कोथ्या मांदुसा[7] । राजकोहळी घागरी बहुवसा । संपूर्ण द्रव्यांश ऐसा । अति यत्नें करावा ॥९॥ भुयारीं तळघरें आणि विवरें । नाना स्थळें गुप्तद्वारें । अनर्ध्य[8] वस्तूंचीं भांडारें । यत्नें करीत जावीं ॥१०॥ अलंकार भूषणें दिव्यांबरें । नाना रत्नें मनोहरें । नाना धातु सुवर्णपात्रें । यत्नें करीत जावीं ॥ ११ ॥ पुष्पवाटिका[9] नाना वनें । नाना तरुवरांचीं बनें । पावतीं करावीं जीवनें[10] । तयां वृक्षांसी ॥ १२ ॥ नाना पशूंचिया शाळा । नाना पक्षी चित्रशाळा । नाना वाद्यें नाटकशाळा । गुणी गायक बहुसाल ॥ १३ ॥ स्वयंपाकगृहें भोजनशाळा । सामुग्रीगृहें धर्मशाळा । निद्रिस्तांकारणें पडशाळा । विशाळ स्थानें ॥ १४ ॥ नाना परिमळद्रव्यांचीं स्थळें । नाना खाद्यफळांचीं स्थळें । नाना रसांचीं नाना स्थळें । यत्नें करीत जावीं ॥ १५ ॥ नाना वस्तूंचीं नाना स्थानें । भंगलीं करावीं नूतनें । देवाचें वैभव वचनें । किती म्हणोनि सांगावें ॥ १६ ॥ सर्वांठायीं अतिसादर । आणि दास्यत्वासहि तत्पर । कार्यभागाचा विसर । पडणार नाहीं ॥ १७ ॥ जयंत्या पर्वें महोत्सव । असंभाव्य चालवावें वैभव । जें देखतांचि स्वर्गींचे देव । संतुष्ट होती ॥ १८ ॥ ऐसें वैभव चालवावें । आणि नीच दास्यत्वहि करावें । पडिले प्रसंगीं सावध असावें । सर्वकाळ ॥ १९ ॥ जें जें कांहीं पाहिजे । तें तें तत्काळची दिजे । अत्यंत आवडीं किजे । सकळ सेवा

१. कमजास्त, गैरसोय. २. तलाव. ३. घोडे. ४. चौरंग. ५. वाहनें. ६. मंदिरें. ७. मोठया पेट्या. ८. अमोल. ९. फुलांचे ताटवे. १०. पाणी.

॥ २० ॥ चरणक्षालनें[1] स्नानें आचमनें । गंधाक्षतें वसनें[2] भूषणें । आसनें जीवनें नाना सुमनें । धूप दीप नैवेद्य ॥ २१ ॥ शयनाकारणें उत्तम स्थळें । जळें ठेवावीं सुशीतळें । तांबूल गायनें रसाळें । रागरंगें करावीं ॥२२ ॥ परिमळद्रव्यें आणि फुलें । नाना सुगंधिक तैलें । खाद्य फळें बहुमालें । सन्निधचि असावीं ॥ २३ ॥ सडे संमार्जनें करावीं । उदकपात्रें उदकें भरावीं । वसनें प्रक्षाळून आणावीं । उत्तमोत्तमें ॥ २४ ॥ सकळांचें करावें पारिपत्य[3] । आलियाचें करावें आतिथ्य[4] । ऐसी हे जाणावी सत्य । सातवी भक्ति ॥२५॥ वचनें बोलावीं करुणेचीं । नाना प्रकारें स्तुतीचीं । अंतरें निवती सकळांचीं । ऐसें वदावें ॥ २६ ॥ ऐसी हे सातवी भक्ती । निरूपिली यथामती । प्रत्यक्ष न घडे तरी चित्तीं । मानसपूजा करावी ॥ २७ ॥ ऐसें दास्य करावें देवाचें । येणेंचि प्रकारें सद्गुरूचें । प्रत्यक्ष न घडे तरी मानसपूजेचें । करीत जावें ॥ २८ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थदशके दास्यभक्तिनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. सख्यभक्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ मागें जाहलें निरूपण । सातवे भक्तीचें लक्षण । आतां ऐका सावधान । आठवी भक्ती ॥ १ ॥ देवासी परम सख्य करावें । प्रेमप्रीतीनें बांधावें । आठवे भक्तीचें जाणावें । लक्षण ऐसें ॥ २ ॥ देवास जयाची अत्यंत प्रीति । आपण वर्तावें तेणेंचि रीतीं । येणेंकरितां भगवंतीं । सख्य घडे नेमस्त ॥ ३ ॥ भक्ती भाव आणि भजन । निरूपण आणि कथा कीर्तन । प्रेमळ भक्तांचें गायन । आवडे देवा ॥ ४ ॥ आपण तैसेंचि वर्तावें । आपणासि तेंच आवडावें । मनासारिखें होतांचि स्वभावें । सख्य घडे नेमस्त ॥ ५ ॥ देवाच्या सख्यत्वाकारणें । आपुलें सौख्य सोडून देणें । अनन्यभावें जीवें प्राणें । शरीर तेंहि वेंचावें ॥ ६ ॥ सांडून आपली संसारव्यथा । करीत जावी देवाची चिंता । निरूपण कीर्तन कथा वार्ता । देवाच्याच सांगाव्या ॥ ७ ॥ देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी तुटी । सर्व अर्पावें शेवटीं । प्राण तोहि वेंचावा ॥ ८ ॥ आपुलें अवघेंचि जावें ।

---

१. पाय धुणें. २. वस्त्रें. ३. सोय. ४. आदरसत्कार.

परी देवासि सख्य राहावें। ऐसी प्रीति जीवें भावें। भगवंतीं लागावी ॥ ९ ॥ देव म्हणिजे आपुला प्राण। प्राणासि न करावें निर्वाण[१]। प्रेमप्रीतीचें लक्षण। तें हें ऐसें असे ॥ १० ॥ ऐसें परम सख्य धरितां। देवास लागे भक्ताची चिंता। पांडव लाक्षाजोहरीं[२] जळतां। विवरद्वारें काढिले ॥ ११ ॥ देव सख्यत्वें राहे आपणापासीं। हें तों वर्म आपणाचपासीं। आपण वचनें बोलावीं जैसीं। तैसीं येतीं पडसादें[३] ॥१२॥ आपण असतां अनन्यभावें। देव तात्काळचि पावे। आपण त्रास घेतां जीवें। देवही त्रासे ॥१३॥ ॥ श्लोकार्ध ॥ ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ॥ टीका ॥ जैसें जयाचें भजन। तैसाच देवहि आपण। म्हणोनि हें अवघेंचि जाण। आपणाचिपासीं ॥ १४ ॥ आपुल्या मनासारिखें न घडे। तेणें गुणें निष्ठा मोडे। तरी गोष्टी आपणाकडे। सहजचि आली ॥ १५ ॥ मेघ चातकावरी वोळेना। तरी चातक पाटलेना। चंद्र वेळेसि उगवेना। तरी चकोर अनन्य[४] ॥ १६ ॥ ऐसें असावें सख्यत्व। विवेकें धरावें सत्व[५]। भगवंतावरील ममत्व[६]। सांडूं नये कीं ॥ १७ ॥ सखा मानावा भगवंत। माता पिता गण गोत। विद्या लक्ष्मी[७] धन वित्त। सकळहि परमात्मा ॥ १८ ॥ देवावेगळें कोणी नाहीं। ऐसें बोलती सर्वही। परंतु त्यांची निष्ठा कांहीं। तैसीच नसे ॥ १९ ॥ म्हणोनि ऐसें न करावें। सख्य तरी खरेंच करावें। अंतरीं सदृढ धरावें। परमेश्वरासी ॥ २० ॥ आपुलिया मनोगताकारणें[८]। देवावरी क्रोधासि येणें। ऐसीं नव्हेत कीं लक्षणें। सख्यभक्तीचीं ॥ २१ ॥ देवाचें जें मनोगत। तेंच आपुलें हित निश्चित। इच्छेसाठीं भगवंत। अंतरूं नये कीं ॥ २२ ॥ देवाचे इच्छेनें वर्तावें। देव करील तें मानावें। मग सहजचि भावें। कृपाळु देव ॥ २३ ॥ पाहतां देवाचे कृपेसी। मातेची कृपा कायसी। माता वधी बाळकासी। विपत्तिकाळीं[९] ॥ २४ ॥ देवें भक्त कोण वधिला। कधीं देखिला ना ऐकिला। शरणागतांसि देव झाला। वज्रपंजरू[१०] ॥ २५ ॥ देव भक्तांचा कैवारी। देव पतितांसि तारी। देव होय सहाकारी। अनाथांचा ॥ २६ ॥

---

१. शेवट, नाश. २. लाक्षागृहांत, लाखेच्या घरांत. ३. प्रतिध्वनि. ४. एकनिष्ठ. ५. धीर. ६. प्रेम. ७. ऐश्वर्य. ८. मनोरथ साधण्यासाठीं. ९. संकटाचे वेळीं. १०. वज्रासारखा बळकट आसरा.



देव अनाथांचा कैंपक्षी । नाना संकटांपासून रक्षी । धांविन्नला अंतरसाक्षी गजेंद्राकारणें ॥ २७ ॥ देव कृपेचा सागर । देव करुणेचा जलधर । देवासि भक्तांचा विसर । पडणार नाहीं ॥ २८ ॥ देव प्रीति राखों जाणें । देवासि करावें सौजणें । जीवलगें अवघीं पिसुणें । कामा न येती ॥ २९ ॥ सख्य देवाचें तुटेना । प्रीति देवाची विटेना । देव कदा पालटेना । शरणागतांसी ॥ ३० ॥ म्हणोनि सख्य देवासि करावें । हितगुज तयास सांगावें । आठवे भक्तीचें जाणावें । लक्षण ऐसें ॥३१॥ जैसा देव तैसा गुरु । शास्त्रीं बोलिला हा विचार । म्हणोनि सख्यत्वाचा निर्धारु । सद्गुरूसि असावा ॥ ३२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थदशके सख्यभक्तिनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. आत्मनिवेदन.

श्रीगणेशाय नमः ॥ मागें जाहलें निरूपण । आठवे भक्तीचें लक्षण । आतां ऐका सावधान । नववी भक्ती ॥ १ ॥ नवम निवेदन जाणावें । आत्मनिवेदन करावें । तेंही सांगिजेल स्वभावें । प्रांजळ करूनी ॥२॥ ऐका निवेदनाचें लक्षण । देवासि वाहावें आपण । करावें तत्वविवरण । म्हणिजे कळे ॥३॥ मी भक्त ऐसें म्हणावें । आणि विभक्तिपणें भजावें । हें अवघेंचि जाणावें । विलक्षण ॥४॥ लक्षण असोनि विलक्षण । ज्ञान असोनि अज्ञान । भक्त असोन विभक्तपण । तें हें ऐसें ॥५॥ भक्त म्हणजे विभक्त नव्हे । आणि विभक्त म्हणजे भक्त नव्हे । विचारेंविण कांहींच नव्हे । समाधान ॥ ६ ॥ तस्मात् विचार करावा । देव कोण तो ओळखावा । आपला आपण शोध घ्यावा । अंतर्यामीं ॥ ७ ॥ मी कोण ऐसा निवाडा । पाहों जातां तत्वझाडा । विचार पाहतां उघडा । आपण नाहीं ॥ ८ ॥ तत्वें तत्व जेव्हां सरे । तेव्हां आपण कैंचा उरे । आत्मनिवेदन तेणें प्रकारें । सहजचि झालें ॥ ९ ॥ तत्वरूप सकळ भासे । विवेक पाहतां निरसे । प्रकृति निरसे आत्मा

---

१. कैवारी. २. मनोभाव जाणणारा. ३. मेघ. ४. मैत्री. ५. देव आपणांहून भिन्न आहे, अशा भावनेनें. ६. मनाशीं. ७. पंचतत्त्वें वेगळीं काढून पाहणें. ८. आपण नाहीं, सर्व ईश्वरच आहे, अशी भावना. ९. माया.

असे । आपण कैंचा ॥ १० ॥ एक मुख्य परमेश्वर । दुसरी प्रकृति जगदाकार । तिसरा कैंचा आपण चोर । आणिला मध्यें ॥ ११ ॥ ऐसें हें सहजचि असतां । नाथिलीच[1] लागे देहअहंता । परंतु विचारें पाहतां । कांहींच नाहीं ॥ १२ ॥ पाहतां तत्वविवंचना[2] । पिंडें[3] ब्रह्मांडरचना । विश्वाकारें[4] व्यक्ति नाना । तत्वें[5] विस्तारलीं ॥ १३ ॥ तत्वें साक्षित्वें[6] वोसरती । साक्षित्व निरसे आत्मप्रतीती[7] । आत्मा असे आदि अंतीं । आपण कैंचा ॥ १४ ॥ आत्मा एक स्वानंदघन[8] । आणि अहंआत्मा[9] हें वचन । तरी मग आपण कैंचा भिन्न । उरला तेथें ॥१५॥ सोहं हंसा हें उत्तर । याचें पहावें अर्थांतर । पाहतां आत्मयाचा विचार । आपण कैंचा तेथें ॥ १६ ॥ आत्मा निर्गुण[10] निरंजन[11] । तयासि असावें अनन्य[12] । अनन्य म्हणजे नाहीं आन । आपण कैंचा तेथें ॥१७॥ आत्मा म्हणिजे तो अद्वैत[13] । जेथें नाहीं द्वैताद्वैत । तेथें मीपणाचा हेत । उरेल कैंचा ॥ १८ ॥ आत्मा पूर्णत्वें परिपूर्ण । तेथें नाहीं गुणागुण[14] । निखळ[15] निर्गुणीं आपण । कोण कैंचा ॥ १९ ॥ त्वंपद[16] तत्पद[16] असिपद[16] । निरसूनि सकळ भेदाभेद । वस्तु ठायींच अभेद । आपण कैंचा ॥२०॥ निरसितां जीव शिव उपाधी । जीवशिवाचि कैंचे आधीं । स्वरूपीं होतां दृढबुद्धी । आपण कैंचा ॥ २१ ॥ आपण मिथ्या साच देव । देव भक्त अनन्य[17]भाव । या वचनाचा अभिप्राय । अनुभवी जाणती ॥२२॥ या नांव आत्मनिवेदन । ज्ञानियांचें समाधान । नववे भक्तीचें लक्षण । निरूपिलें ॥ २३॥ पंचभूतांमध्यें आकाश । सकळ देवांमध्यें जगदीश । नवविधा भक्तीमध्यें विशेष । भक्ति नववी ॥२४॥ नववी भक्ति आत्मनिवेदन । न होतां न चुके जन्ममरण । हें वचन सत्य प्रमाण । अन्यथा नव्हे ॥ २५ ॥ ऐसी हे

---

१. नाहीं तोंच. २. तत्वांचा विचार. ३. शरीर. ४. आकार. ५. आकाशादि पांच तत्वें. ६. मी तत्वांचा साक्षी आहें अर्थात् मी त्यांहून भिन्न आहें, या विचारानें. ७. आत्मसाक्षात्कार झाल्यावर. ८. आनंदानें पूर्ण भरलेला. ९. मीच आत्मा आहें. १०. गुणधर्मरहित. ११. मलरहित. १२. मी त्याहून अन्य नाहीं अशा रीतीनें. १३. दुसरें म्हणून नाहींच असा; केवळ एकच. १४. गुणदोष. १५. शुद्ध. १६. 'तत्त्वमसि' (तें तूं आहेस.) या महावाक्यांतील हीं तीन पदें. १७. एकरूप.

नवविधा भक्ती। केलिया पाविजे सायुज्यमुक्ती। सायुज्यमुक्तीस कल्पांतीं चळण नाहीं ॥ २६ ॥ तिन्ही मुक्तींस आहे चळण। सायुज्यमुक्ती अचळ जाण। त्रैलोक्यास होतां निर्वाण[1]। सायुज्यमुक्ती चळेना ॥ २७ ॥ अवघिया चत्वार मुक्ती। वेदशास्त्रें बोलती। त्यांमध्यें तीन नासती। चौथी ते अविनाश ॥ २८ ॥ पहिली मुक्ति ते सलोकता[2]। दुसरी ते समीपता[3]। तिसरी ते स्वरूपता[4]। चौथी सायुज्यता[5] मुक्ती ॥२९॥ ऐसिया चारि मुक्ती। भगवद्भजनें प्राणी पाविजेती। हें निरूपण प्रांजळ श्रोतीं। सावध पुढें परिसावें ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थदशके आत्मनिवेदननिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. मुक्तिचतुष्टय.

श्रीगणेशाय नमः ॥ मूळ ब्रह्म निराकार। तेथें स्फूर्तिरूप अहंकार। तो पंचभूतांचा विचार। ज्ञानदशकीं[6] बोलिला ॥ १ ॥ तो अहंकार वायुरूप। तयावरी तेजाचें स्वरूप। तया तेजाच्या आधारें आपँ[7]। आवर्णोदक दाटलें ॥ २ ॥ तया आवर्णोदकाच्या आधारें। धरा[8] धरिली फणिवरें[9]। वरती छप्पन्नकोटी विस्तारें। वसुंधरा हे ॥ ३ ॥ इयेवरी पैरिघ[10] सप्त सागर। मध्यें मेरु महा थोर। अष्ट दिक्पाळ परिवार। अंतरें वेष्टित राहिले ॥ ४ ॥ तो सुवर्णाचा महामेरू। पृथ्वी तयाचा आधारू। चौऱ्यांशीं सहस्र विस्तारू। रुंदी तयाची ॥ ५ ॥ उंच तरी मर्यादेवेगळा। भूमीमध्यें सहस्र सोळा। तया भोंवता वेष्टित पाळा[11]। लोकालोक पर्वतांचा ॥ ६ ॥ तया ऐलीकडे हिमाचळ। जेथें पांडव गळाले सकळ। धर्म आणि तमालनीळ[12]। पुढें गेले ॥ ७ ॥ तेथें जावया मार्ग नाहीं। मार्गी पसरले महा अहीं[13]। शीतसुखें[14] सुखावले तेही। पर्वतरूप भासती ॥ ८ ॥ तया ऐलीकडे शेवटीं जाण। बद्रिकाश्रम बद्रिनारायण। तेथें महातापसी निर्वाणें[15]। देहत्यागार्थ जाती

---

१. नाश. २. देवलोकीं राहणें. ३. देवासंन्निध राहणें. ४. देवाप्रमाणें आपलें सामर्थ्य होणें. ५. देवाशीं मिळून जाणें. ६. द. ८, स. ४ व ५ पहा. ७. पाणी. ८. पृथ्वी. ९. शेषानें. १०. घेर. ११. वेढा. १२. श्रीकृष्ण. १३. सर्प. १४. थंड हवेच्या सुखानें. १५. शेवटीं.

॥ ९ ॥ तया ऐलीकडे बद्रिकेदार । पाहून येती लहान थोर । ऐसा हा अवघा विस्तार । मेरु पर्वताचा ॥ १० ॥ तया मेरु पर्वता पाठारीं । तीन शृंगें विषम हारी । परिवारें राहिले तयावरी । ब्रह्मा विष्णु महेश ॥ ११ ॥ ब्रह्मशृंग तो पर्वताचा । विष्णुशृंग तो मार्गजांचा । शिवशृंग तो स्फटिकाचा । कैलास नाम त्याचें ॥ १२ ॥ वैकुंठ नाम विष्णुशृंगाचें । सत्यलोक नाम ब्रह्मशृंगाचें । अमरावती इंद्राचें । स्थळ खालतें ॥ १३ ॥ तेथें गण गंधर्व लोकपाळ । तेहेतीस कोटी देव सकळ । चौदा लोक सुवर्णाचळ । वेष्टित राहिले ॥ १४ ॥ तेथें कामधेनूंचीं खिल्लारें । कल्पतरूचीं बनें अपारें । अमृताचीं सरोवरें । ठायीं ठायीं उचंबळती ॥ १५ ॥ तेथें उदंड चिंतामणी । हिरे परिसांचिया खाणी । तेथें सुवर्णमय धरणी । लखलखायमान ॥ १६ ॥ परम रमणीय फांकती कळा । नवरत्नांचिया पाषाणशिळा । तेथें अखंड हर्षवेळा । आनंदमय ॥ १७ ॥ तेथें अमृताचीं भोजनें । दिव्य गंधें दिव्य सुमनें । अष्टनायका गंधर्व गायनें । निरंतर ॥ १८ ॥ तेथें तारुण्य वोसरेना । रोग व्याधीहि असेना । वृद्धपण आणि मरण येईना । कदाकाळीं ॥ १९ ॥ तेथें एकाहूनि एक सुंदर । एकाहूनि एक चतुर । धीर उदार आणि शूर । मर्यादेवेगळे ॥ २० ॥ तेथें दिव्यदेह ज्योतिरूपें । विद्युल्लतेसारिखीं स्वरूपें । तेथें यश कीर्ति प्रतापें । सीमा सारिली ॥२१॥ ऐसें तें स्वर्गभुवन । सकळ देवांचें वसतिस्थान । तया स्थळाचें महिमान । बोलिजे तितुकें थोडें ॥ २२ ॥ येथें ज्या देवाचें भजन करावें । तेथें त्या देवलोकीं राहावें । सलोकता मुक्तीचें जाणावें । लक्षण ऐसें ॥ २३ ॥ लोकीं राहावें ते सलोकता । समीप असावें ते समीपता । स्वरूपीच व्हावें सरूपता । तिसरी मुक्ती ॥ २४ ॥ देवस्वरूप जाहला देही । श्रीवत्स कौस्तुभ लक्ष्मी नाहीं । स्वरूपतेचें लक्षण पाहीं । ऐसें असे ॥ २५ ॥ सुकृत आहे तें भोगिती । सुकृत सरतां लोटून देती । आपण देव ते असती । जैसे तैसे ॥ २६ ॥ म्हणोनि तिन्ही मुक्ती नाशवंत । सायुज्यमुक्ती ते शाश्वत । तेही निरूपिली सावचित्त । ऐक आतां ॥ २७ ॥ ब्रह्मांड नासेल कल्पांतीं । पर्वतांसहित जळेल

---

१. ओळीनें नव्हेत अशी. २. पाचेचा. ३. मेरु. ४. चिंतिलेलें देणारा मणी. ५. तेज. ६. अमर्याद. ७. मनुष्य. ८. पुण्य.

क्षिती । तेव्हां अवघेचि देव जाती । मुक्ती कैंच्या तेथें ॥ २८ ॥ तेव्हां निर्गुण परमात्मा निश्चळ । निर्गुण भक्ति ते अचळ। सायुज्यमुक्ति ते केवळ । जाणिजे ऐसी ॥ २९ ॥ निर्गुणीं अनन्य असतां । तेणें होय सायुज्यता । सायुज्यता म्हणजे स्वरूपता । निर्गुण भक्ती ॥ ३० ॥ सगुण भक्ति ते चळे । निर्गुण भक्ती ते न चळे । हें अवघें प्रांजळ कळे । सद्गुरु केलिया ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थदशके मुक्तिचतुष्टयनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी २९६.

# दशक पांचवा.

## १. गुरुनिश्चय.

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी सद्गुरु पूर्णकामा । परमपुरुषा आत्मया-रामा । अनिर्वाच्य तुमचा महिमा । वर्णिला न वचे ॥ १ ॥ जें वेदासि सांकडें । जें शब्दासि कानडें । तें सच्छिष्यासि रोकडें । अलभ्य लाभे ॥ २ ॥ जें योगियांचें निज वर्म । जें शंकराचें निजधाम । जें विश्रांतीचें निज-विश्राम । परम गुह्य अगाध ॥ ३ ॥ तें ब्रह्म तुमचेनि योगें। स्वयें आपणाचि होइजे अंगें । दुर्घट संसाराचेनि पांगें । पांगिजेना सर्वथा ॥ ४ ॥ आतां स्वामिचेनि लडिवाळपणें । गुरुशिष्यांचीं लक्षणें । सांगिजेती तेणेंप्रमाणें । मुमुक्षें शरण जावें ॥ ५ ॥ गुरु तो सकळांसि ब्राह्मण । जरी तो जाहला क्रियाहीन । तरी तयासि शरण । अनन्यभावें असावें ॥ ६ ॥ अहो या ब्राह्मणांकारणें । अवतार घेतला नारायणें । विष्णूनें श्रीवत्स मिरवणें । तेथें इतर ते किती ॥ ७ ॥ ब्राह्मणवचनें प्रमाण । होती शूद्राचे ब्राह्मण । धातु-पाषाणीं देवपण । ब्राह्मणाचेनि मंत्रें ॥ ८ ॥ मुंजीबंधनाविरहित । तो शूद्रचि निश्रांत । द्विजन्मा म्हणोनि सतत । द्विज ऐसें नाम त्याचें ॥ ९ ॥ सकळांसि पूज्य ब्राह्मण । हे मुख्य वेदाज्ञा प्रमाण । वेदविरहित तें अप्र-माण । अप्रिय भगवंता ॥ १० ॥ ब्राह्मणीं योग याग व्रतें दानें । ब्राह्मणीं

१. पृथ्वी. २. एकनिष्ठ. ३. जाणण्यास कठीण. ४. अवघड. ५. गुह्य गोष्ट. ६. मळानें मळत नाहीं. ७. आचारभ्रष्ट. ८. प्रमाण नव्हे.

सकळ तीर्थाटणें । कर्ममार्ग ब्राह्मणाविणें । होणार नाहीं ॥ ११ ॥ ब्राह्मण वेद मूर्तिमंत । ब्राह्मण तोचि भगवंत । पूर्ण होती मनोरथ । विप्रवाक्यें-करोनि ॥ १२ ॥ ब्राह्मणपूजनें शुद्धवृत्ति । होऊनि जडे भगवंतीं । ब्राह्मण-तीर्थें उत्तम गती । पावती प्राणी ॥ १३ ॥ लक्षभोजनीं पूज्य ब्राह्मण । अन्य यातीस पुसे कोण । परी भगवंतासि भाव प्रमाण । येरां चाड नाहीं ॥ १४ ॥ असो ब्राह्मणास सुरवर वंदिती । तेथें मानव बापुडें किती । जरी ब्राह्मण मूढमती । तरी तो जगद्वंद्य ॥ १५ ॥ अंत्यज शब्दज्ञाता बरवा । परी तो नेऊनि काय करावा । ब्राह्मणासन्निध पूजावा । हें तों घडेना कीं ॥ १६ ॥ जें जें जनावेगळें केलें । तें तें वेदें अव्हेरिलें । म्हणोनि तयास नाम ठेविलें । पांखाड मत ॥ १७ ॥ असो जो हरिहरदास । तयास ब्राह्मणीं विश्वास । ब्राह्मणभजनें बहुतांस । पावन केलें ॥ १८ ॥ ब्राह्मणें पाविजे देवाधिदेवा । तरी किमर्थ सद्गुरु करावा । ऐसें म्हणाल तर निजठेवा । सद्गुरूविण नाहीं ॥ १९ ॥ स्व-धर्मकर्मीं पूज्य ब्राह्मण । परी ज्ञान नव्हे सद्गुरूविण । ब्रह्मज्ञान नसतां शीण । जन्ममृत्यु चुकेना ॥ २० ॥ सद्गुरूविण ज्ञान कांहीं । सर्वथा होणार नाहीं । अज्ञान प्राणी प्रवाहीं । वाहताचि गेले ॥ २१ ॥ ज्ञानविरहित जें जें केलें । तें तें जन्मासि मूळ झालें । म्हणोनि सद्गुरूचीं पाउलें । सदृढ धरावीं ॥ २२ ॥ जयास वाटे देव व्हावा । तेणें सत्संग धरावा । सत्संगेंवीण देवाधिदेवा । पाविजेत नाहीं ॥ २३ ॥ नाना साधनें बापुडीं । सद्गुरूविण करिती वेडीं । गुरुकृपेविण कुडकुडीं । व्यर्थचि होती ॥ २४ ॥ कार्तिकस्नानें माघस्नानें । व्रतें उद्यापनें दानें । गोरांजनें धूम्रपानें । साधिती पंचाग्नी ॥ २५ ॥ हरि-कथा पुराणश्रवण । आदरें करिती निरूपण । सर्व तीर्थें परम कठिण । क-रिती प्राणी ॥ २६ ॥ झळफळीत देवतार्चनें । स्नान संध्या दर्भासनें । टिळे माळा गोपीचंदनें । ठसे श्रीमुद्रांचे ॥ २७ ॥ अर्घ्यपात्रें संपुष्ट गोकर्णें । मंत्र-यंत्रांचीं ताम्रपर्णें । नानाप्रकारीं उपकरणें । साहित्यशोभा ॥ २८ ॥ घंटा

१. इतरांची गरज. २. महारमांग. ३. स्वरूपाची प्राप्ति. ४. निरुपयोगी. ५. ईश्वरप्राप्तिसाठीं स्वतःला जाळून घेणें. ६. झाडाला टांगून घेऊन खालीं केलेला धूर पिणें. ७. सभोंवार चार अग्नि पेटवून मस्तकावर सूर्याचें ऊन घेणें. ८. तांब्याचे पत्र्यावर कांहीं रेषाकृति काढून मंत्र साधणें. ९. पूजेच्या सामुग्रीचा थाट.

घणघणा वाजती । स्तोत्रें स्तवनें आणि स्तुती । आसनें मुद्रा ध्यानें करिती । प्रदक्षिणा नमस्कार ॥ २९ ॥ पंचायतनपूजा केली । मृत्तिकेचीं लिंगें ला-खोली । फळें नारिकेळें अरलीं । संपूर्ण सांग पूजा ॥ ३० ॥ उपोषणें निष्ठा नेम । परम सायासीं केलें कर्म । फळचि पावती वर्म । चुकले प्राणी ॥३१॥ यज्ञादिक कर्मे केलीं । हृदयीं फळाशा कल्पिली । आपुले इच्छेनें घेतली । सूति जन्माची ॥ ३२ ॥ करूनि नाना सायास । केला चौदा विद्यांचा अभ्यास । ऋद्धिसिद्धी सावकाश । बोळल्या जरी ॥ ३३ ॥ तरी सद्गुरु-कृपेविरहित । सर्वथा न घडे स्वहित । यमपुरीचा अनर्थ । चुकेना येणें ॥ ॥ ३४ ॥ जंव नाहीं ज्ञानप्राप्ती । तंव चुकेना यातायाती । गुरुकृपेविण अधोगती । गर्भवास चुकेना ॥ ३५ ॥ ध्यान धारणा मुद्रा आसन । भक्ति-भाव आणि भजन । सकळही फोल ब्रह्मज्ञान । जंव तें प्राप्त नाहीं ॥३६॥ सद्गुरुकृपा न जोडे। आणि भलतीकडे वावडे। जैसें आंधळें चांचरूनि पडे। गारीं आणि गडदरां ॥ ३७ ॥ जैसें नेत्रीं घालितां अंजन । पडे दृष्टीस नि-धान । तैसें सद्गुरुवचनें ज्ञान-। प्रकाश होय ॥ ३८ ॥ सद्गुरुविण जन्म निर्फळ । सद्गुरुविण दुःख सकळ । सद्गुरुविण तळमळ । जाणार नाहीं ॥ ॥ ३९ सद्गुरूचेनि अभयकरें । प्रकट होईजे ईश्वरें । जन्मदुःखें अपारें । ना-सोनि जाती ॥ ४० ॥ मागां झाले थोर थोर । संत महंत मुनीश्वर । तयां सहि ज्ञानविचार । सद्गुरूचेनि ॥ ४१ ॥ श्रीराम कृष्णादि करूनी । अति-तत्पर गुरुभजनीं । सिद्धसाधु आणि सज्जनीं । गुरुदास्य केलें ॥ ४२ ॥ सकळ सृष्टीचे चाळक । हरिहरब्रह्मादिक । तेहि सद्गुरुपदीं रंक । महत्वा चढती ॥ ४३ ॥ असो जयास मोक्ष व्हावा । तेणें सद्गुरु करावा । सद्गुरु-विणें मोक्ष पावावा । हें कल्पांतीं न घडे ॥ ४४ ॥ आतां सद्गुरु ते कैसे । नव्हेत इतर गुरुऐसे । जयांचे कृपेनें प्रकाशे । शुद्धज्ञान ॥ ४५ ॥ त्या सद्गुरूची वोळखण । पुढिले समासीं निरूपण । बोलिलें असे श्रवण । अनु-क्रमें करावें ॥ ४६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचमदशके गुरु-निश्चयनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

१. विस्तार. २. जन्ममरण. ३. भटकतो. ४. खळग्यांत. ५. आडांत, विहि-रींत. ६. पुरून ठेवलेलें द्रव्य.

## २. सद्गुरुलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ जे करामती दाखविती । तेहि गुरु म्हणजेती । परंतु सद्गुरु नव्हेती । मोक्षदाते ॥ १ ॥ संभामोहन[1] भुरके[2] चेटके । साबरी[3] मंत्रकौटाळे[4] अनेके । नाना चमत्कार कौतुकें । असंभाव्य सांगती ॥ २ ॥ सांगती औषधीप्रयोग । कां सुवर्णधातूचा मार्ग[5] । दृष्टिबंधन[6] लाघवेग[7] । अभिलाषाचा ॥ ३ ॥ साहित्य[8] संगीत रागज्ञान । गीत नृत्य तानमान । नाना वाद्यें शिकविती जन । तेहि एक गुरु ॥ ४ ॥ विद्या शिकविती पंचाक्षरी । तोडे[9] तोटगे[10] नानापरी । कां पोट भरे जयावरी । ते विद्या शिकविती ॥ ५ ॥ जे यातीचा जो व्यापार । शिकविती भरावया उदर । तेहि गुरु परी साचार । सद्गुरु नव्हेती ॥ ६ ॥ आपुली माता आणि पिता । तेहि गुरुचि तत्वतां । परी पैलदार पावविता । तो सद्गुरु वेगळाची ॥ ७ ॥ गायत्रीमंत्राचा उच्चारु । सांगे तो साचार कुळगुरु । परी ज्ञानेंविण पैलपारु । पाविजेत नाहीं ॥ ८ ॥ जो ब्रह्मज्ञान उपदेशी । अज्ञान अंधार निरसी । जीवात्मया शिवात्मयाशीं । ऐक्यता करी ॥ ९ ॥ विघडे[11] देव आणि भक्त । जीवशिवपणें द्वैत[12] । तयां देवभक्तां एकांत[13] । करी तो सद्गुरु ॥१०॥ भवव्याघ्रें घालूनि उडी । गोवत्सांत ताडातोडी । केली देखोनि शीघ्र सोडी । तो सद्गुरु जाणावा ॥ ११ ॥ वासनानदी महापुरीं । प्राणी बुडतां ग्लानी[14] करी । तेथें उडी घालूनि तारी । तो सद्गुरु जाणावा ॥ १२॥ प्राणी मायाजाळां पडिले । संसारदुःखें दुखवले । ऐसे जेणें मुक्त केले । तो सद्गुरु जाणावा ॥ १३ ॥ गर्भवास अतिसांकडी । इच्छाबंधनाची बेडी । ज्ञान देऊनि शीघ्र सोडी । तो सद्गुरु जाणावा ॥ १४ ॥ फोडूनि शब्दाचें अंतर[15] । वस्तु[16] दाखवी निजसार । तोचि सद्गुरु माहेर । अनाथांचें ॥ १५ ॥ जीव एकदेशी[17] बापुडें । तयासि ब्रह्मचि करी रोकडें । फेडी संसारसांकडें । वचनमात्रें ॥१६॥ जें वेदांचे अभ्यंतरीं । तें काढूनि आपल्यापरी । शिष्यश्रवणीं कवळ[18]

१. नजरबंद. २. करणी करणार. ३. चेटकविद्या जाणणारे. ४. मंत्रानें जारण-मारण करणारे. ५. किमया. ६. भुरळ घालणें. ७. लगबग. ८. अलंकारशास्त्र. ९. मारलेले दोरे वगैरे. १०. मंत्र. ११. वेगळे झालेले. १२. भेद. १३. ऐक्य. १४. कासाविसपणा. १५. अर्थ. १६. ब्रह्म. १७. मर्यादित, एवढेंसें. १८. घांस.

भरी। उदारवचनें ॥ १७ ॥ वेदशास्त्र महानुभाव[1]। पहातां एकचि अनुभव। तोचि एक गुरुराव। ऐक्यरूपें ॥ १८ ॥ संदेह निःशेष जाळी। स्वधर्म आदरें प्रतिपाळी। वेदविरहित टवाळी। करूंचि नेणे ॥ १९ ॥ जें जें मन अंगीकारी। तें तें स्वयें मुक्त करी। तो गुरु नव्हे भिकारी। झेंडे[2] आला ॥ २० ॥ शिष्यांसि न लाविती साधन। न करविती इंद्रियदमन। ऐसे गुरु अडक्याचे तीन। मिळाले तरी टाकावे ॥२१॥ जो कोणी ज्ञान बोधी। समूळ अविद्या[3] छेदी। इंद्रियदमन प्रतिपादी। तोचि सद्गुरु जाणावा ॥२२॥ एक द्रव्याचे विकिले। एक शिष्याचे आंखिले[4]। ऐसे दुराशेनें केले। दीनरूप ॥२३॥ जें जें रुचे शिष्याचे मनीं। तैसीच करी मनधरणी। ऐसी कामना पापिणी। पडिली गळां ॥ २४ ॥ जो गुरु भीडसारू। तो अधमाहूनि अधम थोरु। चोरटा मैंद[5] पामरु। द्रव्यभोंदू ॥ २५ ॥ जैसा वैद्य दुराचारी। केली सर्वस्वें बोहरी[6]। आणि शेखीं भीड करी। घात वेणार ॥२६॥ तैसा सद्गुरु नसावा। जेणें अंतर पडे देवा। भीड करूनियां गोंवा[7]। घाली बंधनाचा ॥ २७ ॥ जेथें शुद्ध ब्रह्मज्ञान। आणि स्थूळ क्रियेचें साधन। तोचि सद्गुरु निधान। दाखवी डोळां ॥ २८॥ देखणीं दाखविती आदरें। मंत्र फुंकिती कर्णद्वारें। इतुकेंच ज्ञान तीं पामरें। अंतरलीं भगवंता ॥ २९ ॥ बाणे तिहींची[8] खूण[9]। तोचि गुरु सुलक्षण। तेथेंचि रिघावें शरण। अत्यादरें मुमुक्षीं ॥ ३० ॥ अद्वैतनिरूपणीं अगाध वक्ता। परी विषयीं लोलंगता[10]। ऐसिया गुरूचेनि सार्थकता। होणार नाहीं ॥ ३१ ॥ जैसा निरूपणसमय। तैसेंचि मनहि करी वायें[11]। कृतबुद्धीचा निश्चय। जाहलाचि नाहीं ॥ ३२ ॥ निरूपणीं सामर्थ्यसिद्धी। श्रवण होतां दुराशा बाधी। नाना चमत्कारें बुद्धी। डळमळूं लागे ॥ ३३ ॥ पूर्वी ज्ञाते विरक्त भक्त। जयांस सादृश्यें[12] भगवंत। आणि सामर्थ्यहि अद्भुत। सिद्धीचेनि योगें ॥ ३४ ॥ ऐसें तयांचें सामर्थ्य। आमुचें ज्ञान नुसतें व्यर्थ। ऐसा सामर्थ्याचा स्वार्थ[13]। हृदयीं वसे ॥ ३५ ॥ निःशेष दुराशा तुटे। तरीच भगवंत भेटे। दुराशा धरिती ते खोटे। शब्द-

---

१. सत्पुरुष. २. काकुळतीस. ३. अज्ञान. ४. अंकित. ५. घातका. ६. राखरांगोळी. ७. फांस. ८. शास्त्र, सद्गुरु व आपण स्वतः यांची. ९. अनुभव. १०. आसक्ति. ११. व्यर्थ. १२. बरोबरी. १३. हांव.

ज्ञाते कामिक ॥ ३६ ॥ बहुत ज्ञातीं नागवलीं । कामनेनें वेडीं केलीं । कामना इच्छितांच मेलीं । बापुडीं मूर्खं ॥ ३७ ॥ निःशेष कामनारहित । ऐसा तो विरळा संत । अवघियांवेगळें मत । अक्षय ज्याचें ॥ ३८ ॥ अक्षय ठेवा सकळांचा । तरी पांग[1] फिटेना शरीराचा । तेणें मार्ग ईश्वराचा । चुकोनि जातो ॥ ३९ ॥ सिद्धि आणि सामर्थ्य जाहलें । सामर्थ्यें देहास महत्व आलें । पुढें बेंचाड[2] बळकाविलें । देहबुद्धीचें ॥ ४० ॥ सांडूनि अक्षय सुख । सामर्थ्य इच्छिती ते मूर्ख । कामनेसारिखें दुःख । आणिक नाहीं ॥ ४१ ॥ ईश्वरेंविण जे कामना । तेणें गुणें नाना यातना । पावती होती[3] पतना । वरपडे[3] प्राणी ॥ ४२ ॥ होतां शरीराचा अंत । सामर्थ्यहि निघोन जात । शेखीं अंतरला भगवंत । कामनागुणें ॥ ४३ ॥ म्हणोनि निष्कामना-विचारु । दृढबुद्धीचा निर्धारु । तोचि सद्गुरु पैलपारु । पाववी भवाचा ॥ ४४ ॥ मुख्य सद्गुरूचें लक्षण । आधीं पाहिजे विमळ ज्ञान । निश्चयाचें समाधान । स्वरूपस्थिती[4] ॥ ४५ ॥ याहिवरी वैराग्य प्रबळ । वृत्ति उदासीन केवळ । विशेष आचारें निर्मळ । स्वधर्मविषयीं ॥ ४६ ॥ याहिवरी अध्यात्मश्रवण । हरिकथानिरूपण । जेथें परमार्थविवरण । निरंतर ॥ ४७ ॥ जेथें सारासार विचार । तेथें होय जगदुद्धार । नवविध भक्तीचा आधार । बहुत जनांसी ॥ ४८ ॥ म्हणोनि नवविधा भजन । जेथें प्रतिष्ठिलें साधन । हें सद्गुरूचें लक्षण । श्रोतीं ओळखावें ॥ ४९ ॥ अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान । बाह्य निष्ठेचें भजन । तेथें बहुत भक्तजन । विश्रांति पावती ॥ ५० ॥ नाहीं उपासनेचा आधार । तो परमार्थ निराधार । कर्मेंविणें[5] अनाचार । भ्रष्ट होती ॥ ५१ ॥ म्हणोनि ज्ञान वैराग्य आणि भजन । स्वधर्म कर्म आणि साधन । कथानिरूपण श्रवण मनन । नीति न्याय मर्यादा ॥ ५२ ॥ यांमध्यें एक उणें असे । तेणें तें विलक्षण दिसे । म्हणोनि सर्वेहि विलसे । सद्गुरूपासीं ॥ ५३ ॥ जो बहुतांचें पाळणकर्ता । त्यास बहुतांची असे चिंता । नाना साधनें समर्था । सद्गुरूपासीं ॥५४॥ साधनेंविण परमार्थ प्रतिष्ठे[6] । तो मागुता सर्वेचि भ्रष्टे । या कारणें दूरदृष्टे[7] । महानुभाव ॥५५ ॥ आचार उपा-

---

१. क्षोभ. २. झुंबाड. ३. प्राप्त होतात. ४. स्वरूपाची जागृति राहणें. ५. चित्तशुद्धि करणारीं कर्में सोडल्यावर. ६. स्थापितो. ७. दूरवर नजर पोंचविणारे.

सना सोडिती । ते भ्रष्ट अभक्त दिसती । जळो तयांची महंती । कोण पुसे ॥ ५६ ॥ कर्म उपासनेचा अभाव । तेथें भकाधेसें झाला ठाव । तो कानकोंडा समुदाव । प्रपंची हासती ॥ ५७ ॥ नीच यातीचा गुरु । तोही कानकोंडा विचारु । ब्रह्मसभेसि जैसा चोरु । तैसा दुडे ॥ ५८ ॥ ब्रह्मसभे देखतां । तयाचें तीर्थ न ये घेतां । अथवा प्रसाद सेवूं जातां । प्रायश्चित्त पडे ॥ ५९ ॥ तीर्थप्रसादाची सांडी केली । तेथें नीचता दिसोन आली । गुरुभक्ति ते सटवैली । एकाएकीं ॥ ६० गुरूची मर्यादा राखतां । ब्राह्मण क्षोभती तत्वतां । येथें ब्राह्मण्य रक्षूं जातां । गुरुक्षोभ घडे ॥ ६१ ॥ ऐसीं सांकडीं दोहींकडे । तेथें प्रस्तावा घडे । नीच यातीस सद्गुरुत्व न घडे । या कारणें ॥ ६२ ॥ तथापि आवडी घेतली जीवें । तरी आपणचि भ्रष्टावें । बहुत जनांस भ्रष्टावें । हें दूषणचि कीं ॥ ६३ ॥ आतां असो हा विचारु । स्वयातीचा पाहिजे गुरु । नाहीं तरी भ्रष्टाकारु । नेमस्त घडे ॥ ६४ ॥ जे जे कांहीं उत्तम गुण । तें तें सद्गुरूचें लक्षण । तथापि सांगों वोळखण । होय जेणें ॥ ६५ ॥ एक गुरु एक मंत्रगुरु । एक यंत्रगुरु एक तंत्रगुरु । एक वस्तादगुरु एक राजगुरु । म्हणती जनीं ॥ ६६ ॥ एक कुळगुरु एक मानिला गुरु । एक विद्यागुरु एक कुविद्यागुरु । एक असद्गुरु एक यातिगुरु । दंडकर्ते ॥ ६७ ॥ एक मातागुरु एक पितागुरु । एक राजगुरु एक देवगुरु । एक बोलिज जगद्गुरु । सकळ कळा ॥ ६८ ॥ ऐसे हे सत्रा गुरु । याहिवेगळे आणिक गुरु । ऐक तयांचा विचारु । सांगिजेल ॥ ६९ ॥ एक स्वप्नगुरु एक दीक्षागुरु । एक म्हणती प्रतिमागुरु । एक म्हणती स्वयें गुरु । आपुला आपण ॥७०॥ जे जे यातींचा जो व्यापार । ते ते यातीचे तितुके गुरु । याचा पाहतां विचारु । उदंड आहे ॥ ७१ ॥ असो ऐसे उदंड गुरु । नाना मतांचा विचारु । परि मोक्षदाता सद्गुरु । तो वेगळाचि असे ॥ ७२ ॥ नाना सद्विद्येचे गुण । याहिवरी कृपाळूपण । सद्गुरूचें हें लक्षण । जाणिजे श्रोतीं ॥ ७३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचमदशके सद्गुरुलक्षणनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

१. बहकण्यास. २. तोंड लपविणारा. ३. सटवाईची बाधा होऊन झिजूं लागली. ४. पश्चात्ताप. ५. खचित. ६. स्वप्नांत येऊन उपदेश देणारा.

## ३. सच्छिष्यलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां सद्गुरूचें लक्षण । विशद केलें निरूपण । आतां सच्छिष्याची वोळखण । सावध ऐका ॥ १ ॥ सद्गुरूविण सच्छिष्य । तो वायां जाय निःशेष । कां सच्छिष्येंविण विशेष । सद्गुरु शिणे ॥२॥ उत्तम भूमि शोधिली शुद्ध । तेथें बीज पेरिलें किडखाद[1] । कां तें उत्तम बीज परी संबंध । खडकेसि पडिला ॥३॥ तैसा सच्छिष्य तो सत्पात्र । परी गुरु सांगे मंत्रतंत्र । तेथें अरत्र[2] ना परत्र[3] । कांहींच नाहीं ॥ ४ ॥ अथवा गुरु पूर्ण कृपा करी । परी शिष्य अनधिकारी । भाग्यपुरुषाचा भिकारी । पुत्र जैसा ॥ ५॥ तैसें एकाविण एक । होतसे निरर्थक । परलोकींचें जें सार्थक । तें दूरि दुरावे ॥६॥ म्हणोनि सद्गुरु आणि सच्छिष्य । तेथें न लागती सायास । त्या उभयतांचा हव्यास । पुरे एकसरां ॥ ७ ॥ सुभूमि आणि उत्तम कण । उगवेना पर्जन्येंविण । तैसें अध्यात्मनिरूपण । नसतां होय ॥ ८ ॥ शेत पेरिलें आणि उगवलें । परंतु निगेविण गेलें । साधनेंविण तैसें झालें । साधकासी ॥ ९ ॥ जोंवरी पीक आपणासि भोगे[4] । तोंवरी अवघेंचि करणें लागे । पीक आलियाहि उगें । राहूंच नये ॥ १० ॥ तैसें आत्मज्ञान झालें । तरी साधन पाहिजे केलें । एक वेळ उदंड जेविलें । तरी सामुग्री पाहिजे ॥ ११ ॥ म्हणोनि साधन अभ्यास आणि सद्गुरु । सच्छिष्य आणि सच्छास्त्रविचारु । सत्कर्म आणि सद्वासना पारु । पाववी भवाचा ॥ १२ ॥ सदुपासना आणि सत्कर्म । सच्छिष्य सत्क्रिया आणि स्वधर्म । सत्संग आणि नित्यनेम । निरंतर ॥ १३ ॥ ऐसें हें अवघेंचि मिळे । तरीच विमळ ज्ञान निवळे[5] । नाहीं तरी पाषांड संचरे बळें । समुदायीं ॥ १४ ॥ येथें शब्द[6] नाहीं शिष्यासी । हें अवघें सद्गुरूपाशीं । सद्गुरु पालटी अवगुणांसी । नाना यत्नेंकरूनी ॥ १५ ॥ सद्गुरूचेनि असच्छिष्य पालटे । परंतु सच्छिष्यें असद्गुरु न पालटे । कां जे थोरपण तुटे । म्हणोनियां ॥ १६ ॥ या कारणें सद्गुरु पाहिजे । तरीच सन्मार्ग लाहिजे[7] । नाहीं तरी होइजे । पाषांडा वरपडे[8] ॥ १७ ॥ येथें सद्गुरूचें कारण । येर सर्व निष्कारण । तथापि सांगतों

१. किडयांनीं खाल्लेलें. २. इहलोक. ३. परलोक. ४. पाहिजे. ५. परिपक्क होतें. ६. बोल, दोष. ७. लाभतो. ८. स्वैराचारास. ९. प्राप्त.

वोळखण । सच्छिष्याची ॥ १८ ॥ मुख्य सच्छिष्याचें लक्षण । सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण । अनन्यभावें शरण । त्या नांव सच्छिष्य ॥ १९ ॥ शिष्य पाहिजे निर्मळ । शिष्य पाहिजे आचारशीळ । शिष्य पाहिजे केवळ । विरक्त अनुतापी ॥ २० ॥ शिष्य पाहिजे निष्ठावंत । शिष्य पाहिजे शुचिष्मंत । शिष्य पाहिजे नेमस्त[1] । सर्व प्रकारीं ॥ २१ ॥ शिष्य पाहिजे साक्षेपी[2] विशेष । शिष्य पाहिजे परमदक्ष । शिष्य पाहिजे अलक्ष्य[3] । लक्षी[4] ऐसा ॥ २२ ॥ शिष्य पाहिजे अतिधीर । शिष्य पाहिजे अति उदार । शिष्य पाहिजे अतितत्पर । परमार्थविषयीं ॥ २३ ॥ शिष्य पाहिजे परोपकारी । शिष्य पाहिजे निर्मत्सरी । शिष्य पाहिजे अर्थांतरीं । प्रवेशकर्ता ॥ २४ ॥ शिष्य पाहिजे परम शुद्ध । शिष्य पाहिजे परम सावध । शिष्य पाहिजे अगाध । उत्तम गुणांचा ॥ २५ ॥ शिष्य पाहिजे प्रज्ञावंत[5] । शिष्य पाहिजे प्रेमळ भक्त । शिष्य पाहिजे नीतिवंत । मर्यादेचा ॥ २६ ॥ शिष्य पाहिजे युक्तिवंत । शिष्य पाहिजे बुद्धिवंत । शिष्य पाहिजे सतत । विचार घेता ॥ २७ ॥ शिष्य पाहिजे धारिष्टाचा । शिष्य पाहिजे दृढव्रताचा[6] । शिष्य पाहिजे उत्तम कुळींचा । पुण्यशीळ ॥ २८ ॥ शिष्य असावा सात्विक । शिष्य असावा भजक । शिष्य असावा साधक । साधनकर्ता ॥ २९ ॥ शिष्य असावा विश्वासी । शिष्य असावा कायाक्लेशी[7] । शिष्य असावा परमार्थासी । वाढवूं जाणे ॥ ३० ॥ शिष्य असावा स्वतंत्र । शिष्य असावा जगन्मित्र । शिष्य असावा सत्पात्र । सर्व गुणें ॥ ३१ ॥ शिष्य असावा सद्विद्येचा । शिष्य असावा सद्भावाचा । शिष्य असावा अंतरींचा । परम शुद्ध ॥ ३२ ॥ शिष्य नसावा अविवेकी । शिष्य नसावा गर्भसुखी । शिष्य असावा संसारदुःखी । संतप्तदेही ॥ ३३ ॥ जो संसारदुःखें दुखवला । जो त्रिविधतापें पोळला । तोचि अधिकारी झाला । परमार्थासी ॥ ३४ ॥ बहुत दुःख भोगिलें जेणें । तयासीच परमार्थ बाणे । संसारदुःखाचेनि गुणें । वैराग्य उपजे ॥ ३५ ॥ जयास संसाराचा त्रास । तयासीच उपजे विश्वास । विश्वासबळें दृढ कांस । धरिली सद्गुरूची ॥३६॥ अविश्वासें कांस सोडिली ।

---

१. नियमितपणें वागणारा. २. उद्योगी. ३. लक्षांत घेण्यास कठीण, ब्रह्म. ४. लक्षांत घेई. ५. बुद्धिमान्. ६. निश्चयी. ७. देहकष्ट सहन करणारा.

ऐसीं बहुतेक भवीं बुडालीं । नाना जळचरीं तोडिलीं । मध्येंच सुखदुःखें[1] ॥ ३७ ॥ या कारणें दृढ विश्वास । तोचि जाणावा सच्छिष्य । मोक्षाधिकारी विशेष । अग्रगण्य ॥ ३८ ॥ जो सद्गुरुवचनें निवाला । तो सायुज्यतेचा आंखिला[2] । संसारपांगें[3] पांगिला[4] । न वचे कदा ॥ ३९ ॥ सद्गुरूहूनि देव मोठा । जयास वाटे तो शिष्य करंटा । सुटला वैभवाचा फांटा । सामर्थ्यपिसें ॥ ४० ॥ सद्गुरुस्वरूप तें संत[5] । आणि देवास मांडे कल्पांत । तेथें कैंचें उरेल सामर्थ्य । हरिहरांचें ॥ ४१ ॥ म्हणोनि सद्गुरुसामर्थ्य अधिक । जेथें अटती[6] ब्रह्मादिक । अल्पबुद्धि मानव रंक । तयासि हें कळेना ॥ ४२ ॥ गुरुदेवां बरोबरी । करी तो शिष्य दुराचारी । भ्रांति बैसली अभ्यंतरीं । सिद्धांत नेणवे ॥ ४३ ॥ देव मनुष्यीं भाविला[7] । मंत्रीं देवपणासि आणिला । सद्गुरु तो नवचे कल्पिला । ईश्वराचेनी ॥ ४४ ॥ म्हणोनि सद्गुरु पूर्णपणें । देवाहूनि अधिक कोटिगुणें । जयास वर्णितां भांडणें । वेदशास्त्रां लागलीं ॥ ४५ ॥ असो सद्गुरुपदापुढें । दुजें कांहींच न चढे । देवसामर्थ्य तें केवढें । मायाजनित ॥ ४६ ॥ असो सद्गुरुकृपा जयासी । सामर्थ्य न चले तयापाशीं । ज्ञानबळें वैभवासी । तृणतुल्य केलें ॥ ४७ ॥ सद्गुरुकृपेचेनि बळें । अपरोक्ष[8] ज्ञानाचेनि उसाळें । मायेसहित ब्रह्मांड सगळें । दृष्टीस न ये ॥ ४८ ॥ ऐसें सच्छिष्याचें वैभव । सद्गुरुवचनीं दृढ भाव । तेणें गुणें देवराव । स्वयेंचि होती ॥ ४९ ॥ अंतरीं अनुतापें तापले । तेणें अंतर शुद्ध झाले । पुढें सद्गुरुवचनें निवाले । सच्छिष्य ऐसे ॥ ५० ॥ लागतां सद्गुरुवचनपंथें । झालें ब्रह्मांड पालथें । तरी जयांच्या शुद्ध भावार्थें । पालट न धरिजे ॥ ५१ ॥ शरण सद्गुरूसि गेले । ते सच्छिष्य ऐसे निवडले । क्रियापालटें झाले । पावन ईश्वरीं ॥ ५२ ॥ ऐसा सद्भाव अंतरीं । तेचि मुक्तीचे वांटेकरी । येर मायिक वेषधारी । असच्छिष्य ॥ ५३ ॥ वाटे विषयाचें सुख । परमार्थ संपादणें लौकिक । देखोदेखीं पढतमूर्ख । शरण गेले ॥ ५४ ॥ झाली विषयीं वृत्ति अनावर । दृढ धरिला संसार । परमार्थचर्चेचा विचार । मलिन जाहला ॥ ५५ ॥ मोड घेतला परमार्थाचा । हव्यास धरिला प्रपंचाचा । भारवाही

---

१. सुखदुःखरूपी जळचरांनीं. २. सेवक. ३. संसारांतील दैन्यानें. ४. दीन केला. ५. नित्य. ६. मंदावतात. ७. कल्पिला. ८. अनुभवाचें.

कुटुंबाचा । कावाडी जाहला ॥ ५६ ॥ मानिला प्रपंचीं आनंद । केला परमार्थीं विनोद । भ्रांत मूढ मतिमंद । लोधला[1] कामीं ॥ ५७ ॥ सूकर पूजिलें विलेपनें । झैसा मर्दिला चंदनें । तैसा विषयी ब्रह्मज्ञानें । विवेकें बोधिला ॥ ५८ ॥ रासभ[2] उकरडां लोळे । तयास परिमळसोहळे । उलूक[3] अंधारीं पळे । तया केवीं हंसपंगती ॥ ५९ ॥ तैसा विषयदरीचा बराडी[4] । घाली अधःपतनीं[5] उडी । तयास भगवंतीं आवडी । सत्संग कैंचा ॥ ६० ॥ वरती करून दांताळी । श्वानपुत्र हाडें चघळी । तैसा विषयी तळमळी । विषयसुखाकारणें ॥ ६१ ॥ तया श्वानमुखीं परमान्न[6] । मर्कटासि सिंहासन । तैसें विषयासक्तास ज्ञान । जिरेल कैचें ॥ ६२ ॥ रासभें राखतां जन्म गेला । तो पंडितांमध्यें प्रतिष्ठिला । न वचे तैसा अभक्ताला । परमार्थ नाहीं ॥६३॥ मिळाला राजहंसांचा मेळा । तेथें आला डोंबकावळा । लक्षूनियां विष्ठेचा गोळा । हंस म्हणवी ॥ ६४ ॥ तेसे सज्जनाचे संगतीं । विषयी सज्जन म्हणविती । विषय अमेध्य[7] चित्तीं । गोळा लक्षिला ॥ ६५ ॥ कांखे घेऊनियां दारा । म्हणे मज संन्यासी करा । तैसा विषयी सैरावैरा । ज्ञान बडबडी ॥ ६६ ॥ असो ऐसे पढतमूर्ख । ते काय जाणती अद्वैतसुख[8] । नरकीं प्राणी नरक । भोगिती स्वइच्छें ॥ ६७ ॥ वेश्येची करील सेवा । तो कैसा मंत्री म्हणावा । तैसा विषयदास मानावा । भक्तराज केवीं ॥ ६८ ॥ तैसे विषयी बापुडे । तयांस ज्ञान कोणीकडे । वाचाळ शाब्दिक बडबडे । वरपडे जाहले ॥ ६९ ॥ ऐसे शिष्य परम नष्ट । कनिष्ठांमध्यें कनिष्ठ । हीन अविवेकी आणि दुष्ट । खळ खोटे दुर्जन ॥ ७० ॥ ऐसे जे कां पापरूप । दीर्घदोषी पापी वज्रलेप । तयांस प्रायश्चित्त अनुताप । उद्भवतां आहे ॥ ७१ ॥ तिहीं पुनः शरण जावें । सद्गुरूसि संतोषवावें । कृपादृष्टि जाहलिया व्हावें । पुन्हा शुद्ध ॥ ७२ ॥ स्वामिद्रोह जयास घडे । तो यावच्चंद्रसूर्य नरकीं पडे । तयासि उपावचि न घडे । स्वामी तुष्टल्यावांचूनी ॥ ७३ ॥ स्मशानवैराग्य आलें । म्हणोन लोटांगण घातलें । तेणें गुणें उपतिष्ठलें[9] । नाहींच ज्ञान ॥ ७४ ॥ भाव आणिला जायाचा[10] । मंत्र घेतला गुरूचा ।

---

१. लुब्ध झाला. २ गाढव. ३. घुबड. ४. आशाळभूत. ५. नरकांत. ६. दूध. ७. अपवित्र. ८. ब्रह्मानंद. ९. प्राप्त झालें. १०. उसना.

शिष्य झाला दों दिवसांचा। मंत्राकारणें ॥ ७५ ॥ ऐसे केले गुरु उदंड। शब्द शिकला पाषांड। झाला तोंडाळ तेरमुंड[1]। महा पाषांडी ॥ ७६ ॥ घडी एक रडे आणि पडे। घडी एक वैराग्य चढे। घडी एक अहंभाव जडे। ज्ञातेपणाचा ॥७७॥ घडी एक विश्वास धरी। सर्वेचि घडी एक गुरगुरी। ऐसे नाना छंद करी। पिसाट जैसा ॥७८॥ काम क्रोध मद मत्सर। लोभ मोह नाना विकार। अभिमान कापट्य विकार। हृदयीं नांदती ॥ ७९ ॥ अहंकार आणि देहपांग[2]। अनाचार आणि विषयसंग। संसार प्रपंच उद्वेग। अंतरीं वसे ॥ ८० ॥ दीर्घदोषी कृतघ्न पापी। कृत्रिम कुतर्की विकल्पी। भक्त अभावी शीघ्रकोपी। निष्ठुरपणें घातकी ॥ ८१ ॥ हृदयशून्य[3] आणि आळसी। अविवेकी आणि अविश्वासी। अधीर अविचार संदेहासी। दृढ धर्ता[4] ॥ ८२ ॥ आशा ममता कल्पना। कुबुद्धि दुर्बुद्धि दुर्वासना। अल्पबुद्धि विषयकामना। हृदयीं वसे ॥ ८३ ॥ ईषणा[5] असूया[6] तिरस्कारें। निंदेसि प्रवर्ते आदरें। देहाभिमानी डुंबरे। जाणतपणें ॥ ८४ ॥ क्षुधा तृषा आवरेना। निद्रा सहसा धरवेना। कुटुंबचिंता वोसरेना। भ्रांति पडिली ॥ ८५ ॥ शाब्दिक बोले उदंड वाचा। लेश नाहीं वैराग्याचा। अनुताप धारिष्ट साधनांचा। मार्ग न धरी ॥८६॥ भक्ति विरक्ति ना शांती। सद्वृत्ति लीनता न नांदती। कृपा दया ना तृप्ती। सद्बुद्धि असेचि ना ॥ ८७ ॥ काया क्लेशी शरीरहनि। धर्माविषयीं परमकृपण। क्रिया पालटेना कठिण। हृदय जयाचें ॥ ८८ ॥ आर्जव[8] नाहीं जनांसी। जो अप्रिय सज्जनांसी। जयाचे जीवीं अहर्निशीं। परन्यून[9] वसे ॥ ८९ ॥ सदा सर्वकाळ लटिका। बोले मायिकें[10] लापणिका[11]। क्रिया विचार पाहतां एका। वचनीं सत्य नाहीं ॥ ९० ॥ परपीडेविषयीं तत्पर। जैसा विंचू आणि विखार। तैसा कुशब्दें जिव्हार[12]। भेदी सकळांचें ॥ ९१ ॥ आपुले झांकी अवगुण। पुढिलांसि बोले कठिण। मिथ्या गुण दोषेंविण। दोष लावी ॥ ९२ ॥ स्वयें पापात्मा अंतरीं। पुढिलांची कणव[13] न करीं।

---

१. मद्यंत तोंड घालणारा. २. देहाचा लोभ. ३. प्रेमशून्य. ४. धारण करणारा. ५. वासना. ६. मत्सर. ७. चढून जातो. ८. सरळपणा. ९. दुसऱ्याचें उणें. १०. कपटाची. ११. वाणी. १२. अंतःकरण. १३. दया.

जैसा हिंसक दुराचारी । परदुःखें शिणेना ॥ ९३ ॥ दुःख पराचें नेणती । दुर्जन गांजिलेचि गांजिती । श्रम पावतां आनंदती । आपले मनीं ॥ ९४ ॥ स्वदुःखें झुरे अंतरीं । आणि परदुःखें हास्य करी । तयास प्राप्त यमपुरी । यमदूत झोडिती ॥ ९५ ॥ असो ऐसे मदांध बापुडे । तयांस भगवंत कैंचा जोडे । जयांस सुबुद्धि नावडे । पूर्वपातकेंकरूनी ॥ ९६ ॥ तयांस देहाच्या अंतीं । गात्रें क्षीणता पावती । जिवलगें वोसंडिती । जाणवेल तेव्हां ॥ ९७ ॥ असो ऐसे गुणा वेगळे । ते सच्छिष्य आगळे । दृढभावार्थें सोहळे । भोगिती स्वानंदाचे ॥ ९८ ॥ जये स्थळीं विकल्प जागे । कुळाभिमान पाठीं लागे । ते प्राणी प्रपंचसंगें । हिंपुटी होती ॥ ९९ ॥ जेणेंकरितां दुःख जाह्लें । तेंचि मनीं सदृढ धरिलें । तेणें गुणें प्राप्त झालें । दुःख विशेष ॥ १०० ॥ संसारसंगें दुःख न जाह्लें । ऐसें देखिलें ना ऐकिलें । ऐसें जाणोनि अनहित केलें । ते दुःखी होती स्वयें ॥ १ ॥ संसारीं सुख मानिती । ते प्राणी मूढमती । जाणोनि डोळे झांकिती । ते पढतमूर्ख ॥ २ ॥ प्रपंच सुखें करावा । परी कांहीं परमार्थ वाढवावा । परमार्थ अवघाच बुडवावा । हें विहित नव्हे ॥ ३ ॥ मागां झालें निरूपण । गुरुशिष्यांची ओळखण । आतां उपदेशाचें लक्षण । सांगिजेल ॥ १०४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचमदशके शिष्यलक्षणनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. उपदेशलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका उपदेशाचीं लक्षणें । बहुविधा कोणकोणें । सांगतां तें असाधारणें । परी कांहींएक सांगों ॥ १ ॥ बहुत मंत्र उपदेशिती । कोणी नाममंत्र सांगती । एक ते जप करविती । ओंकाराचा ॥२॥ शिवमंत्र भवानीमंत्र । विष्णुमंत्र महालक्ष्मीमंत्र । अवधूतमंत्र गणेशमंत्र । मार्तंडमंत्र सांगती ॥ ३ ॥ मत्स्य कूर्म वराहमंत्र । नृसिंहमंत्र वामनमंत्र । भार्गवमंत्र रघुनाथमंत्र । कृष्णमंत्र सांगती ॥ ४ ॥ भैरवमंत्र मल्लारिमंत्र । हनुमंतमंत्र यक्षिणीमंत्र । नारायणमंत्र पांडुरंगमंत्र । अघोरमंत्र सांगती

---

१. कसाइ. २. सोडून जातात. ३. कष्टी. ४. योग्य. ५. पुष्कळ.

॥ ५ ॥ शेषमंत्र गरुडमंत्र । वायुमंत्र वेताळमंत्र । झोटिंगमंत्र बहुधा मंत्र । किती म्हणोनि सांगावे ॥ ६ ॥ बाळामंत्र बगळामंत्र । काळीमंत्र कंकाळीमंत्र । बेडूकमंत्र नाना मंत्र । नाना शक्तींचे ॥ ७ ॥ पृथगाकारें[1] स्वतंत्र । जितुके देव तितुके मंत्र । सोपे अवघड विचित्र । खेचर दारुण बीजांचे ॥ ८ ॥ पाहूं जातां पृथ्वीवरी । देवांची गणना करी । तितुके मंत्र वैखरी[2]। किती ह्मणोनि वदावे ॥ ९ ॥ असंख्यात मंत्रमाळा । एकाहूनि एक आगळा । विचित्र मायेची कळा । कोण जाणे ॥ १० ॥ कित्येक मंत्रीं भुतें जाती । कित्येक मंत्रीं व्यथा नासती । कित्येक मंत्रीं उतरती । सितें[3] विंचू विखार ॥ ११ ॥ ऐसे नानापरीचे मंत्री । उपदेशिती कर्णपात्रीं । जप ध्यान पूजा यंत्री । विधानयुक्त[4] सांगती ॥ १२ ॥ एक शिव शिव सांगती । एक हरिहर म्हणविती । एक उपदेशिती । विठ्ठल विठ्ठल ह्मणोनि ॥ १३ ॥ एक सांगती कृष्ण कृष्ण । एक सांगती विष्णु विष्णु । एक नारायण नारायण । ह्मणोनि उपदेशिती ॥ १४ ॥ एक म्हणती अच्युत अच्युत । एक म्हणती अनंत अनंत । एक सांगती दत्त दत्त । म्हणत जावें ॥ १५ ॥ एक सांगती राम राम । एक सागती ओम् ओम् । एक म्हणती मेघश्याम । बहुतां नामीं स्मरावा ॥ १६ ॥ एक सांगती गुरु गुरु । एक सांगती परमेश्वरु । एक म्हणती विघ्नहरु । चिंतीत आवा ॥ १७ ॥ एक सांगती सोमराज । एक सांगती गरुडध्वज । एक सांगती अधोक्षज । म्हणत जावें ॥ १८ ॥ एक सांगती देव देव । एक म्हणती केशव केशव । एक म्हणती भार्गव भार्गव । म्हणत जावें ॥ १९ ॥ एक विश्वनाथ म्हणविती । एक मल्लारी सांगती । एक ते जप कराविती । तुकाई तुकाई म्हणोनि ॥ २० ॥ हें किती म्हणोनि सांगावें । शिवशक्तीचीं अनंत नांवें । इच्छेसारिखें स्वभावें । उपदेशिती ॥ २१ ॥ एक सांगती मुद्रा[6] चारी । खेचरी[7] भूचरी[7] चाचरी[7] अगोचरी । एक आसनें[8] परोपरी । उपदेशिती ॥ २२ ॥ एक दाखविती देखणीं[9] । एक अनुहतध्वनी[10] । एक गुरु पिंडज्ञानी । पिंडज्ञान[11] सांगती ॥ २३ ॥ एक

१. अनेक प्रकारचे. २. वाणीनें. ३. हिंव. ४. रीतीसह्रां. ५. शिव. ६. दृष्टि एकाग्र करण्याचें हठयोगांतील एक साधन. ७. हे मुद्रांचे चार प्रकार. ८. योगमार्गांतील चौऱ्यायशीं आसनें. ९. चमत्कारिक देखावे. १०. शरीरांत स्वभावतः होत असलेला एक ध्वनि; अनाहतध्वनि. ११. देहासंबंधीं तात्त्विक ज्ञान.

सांगती कर्ममार्ग । एक सांगती उपासनामार्ग । एक सांगती अष्टांग[1] योग । नाना चक्रें[2] ॥ २४ ॥ एक तपें सांगतीं । एक अजपाजप[3] निरूपिती । एक तत्वें विस्तारिती । तत्वज्ञान ॥ २५ ॥ एक सांगती सगुण । एक निरूपिती निर्गुण । एक उपदेशिती तीर्थाटण । फिरत जावें ॥ २६ ॥ एक महावाक्य[4] सांगती । त्याचा जप करावा म्हणती । एक उपदेश करिती । सर्व ब्रह्म म्हणोनि ॥ २७ ॥ एक शाक्तमार्ग सांगती । एक मुक्तमार्ग[5] प्रतिष्ठिती । एक इंद्रियें[6] पूजन करविती । एक भावें ॥ २८ ॥ एक सांगती वशीकरण[7] । स्तंभन[8] मोहन उच्चाटण[9] । नाना चेटकें आपण । स्वयें निरूपिती ॥ २९ ॥ ऐशी उपदेशाची स्थिती । पुरे जातां सांगों किती । ऐसे हे उपदेश असती । असंख्यात ॥ ३० ॥ ऐसे उपदेश अनेक । परी ज्ञानेंविण निरर्थक । ये विषयीं असे एक । भगवद्वचन ॥ ३१ ॥ श्लोक ॥ नानाशास्त्रं पठेल्लोको नानादैवतपूजनम् । आत्मज्ञानं विना पार्थ सर्वकर्म निरर्थकम् ॥ १ ॥ शैवशाक्तागमाद्या ये अन्ये च बहवो मताः । अपभ्रंशसमास्तेऽपि जीवानां भ्रांतिचेतसाम् ॥ २ ॥ न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिदमुत्तमम् ॥ ३ ॥ टीका ॥ या कारणें ज्ञानासमान । पवित्र उत्तम न दिसे आनें[10] । यास्तव आधीं आत्मज्ञान । साधिलें पाहिजे ॥ ३२ ॥ सकळ उपदेशीं विशेष । आत्मज्ञानाच्या उपदेश । एतद्विषयीं जगदीश । बहुतां ठायीं बोलिला ॥ ३३ ॥ श्लोक ॥ यस्य कस्य च वर्णस्य ज्ञानं देहे प्रतिष्ठितम् । तस्य दासस्य दासोऽहं भवे जन्मनि जन्मनि ॥ १ ॥ आत्मज्ञानाचा महिना । नेणें चतुर्मुख ब्रह्मा । प्राणी बापुडा जीवात्मा । काय जाणे ॥ ३४ ॥ सकळ तीर्थांची संगती । स्नानदानांची फळश्रुती[11] । त्याहूनि ज्ञानाची स्थिती । विशेष कोटिगुणें ॥ ३५ ॥

---

१. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि या अष्ट अंगांनीं युक्त. २. शरीरांत सात चक्राकार रचना मानतात त्या. ३. श्वासोच्छ्वासाबरोबर उमटणाऱ्या सोहं या ध्वनीचा जप. ४. तत्वमसि, अयमात्मा ब्रह्म, प्रज्ञानं ब्रह्म, अहं ब्रह्मास्मि, हीं चार वेदांतील चार सारवाक्यें. ५. मनःपूत वर्तन. ६. इंद्रियांच्या देवता. ७. लोकांस वश करण्याचे मंत्र. ८. इंद्रियांचे व्यापार बंद पाडण्याचा मंत्र. ९. गांव वगैरे सोडून जाण्याची बुद्धि होईल असा मंत्र. १०. अन्य. ११. पुण्य.

॥ श्लोक ॥ पृथिव्यां यानि तीर्थानि स्नानदानेषु यत्फलम्। तत्फलं कोटिगुणितं ब्रह्मज्ञानसमं हि न ॥ ४ ॥ टीका ॥ म्हणोन जें आत्मज्ञान। तें गहनाहून गहन। ऐक तयाचें लक्षण। सांगिजेल ॥ ३६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्य-संवादे पंचमदशके उपदेशलक्षणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. बहुधाज्ञान.

श्रीगणेशाय नमः ॥ जंव तें ज्ञान नाहीं प्रांजळ[1]। तंव सर्व कांहीं निष्फळ। ज्ञानरहित तळमळ। जाणार नाहीं ॥ १ ॥ ज्ञान म्हणतां वाटे भ्रम। काय रे बा असेल वर्म। म्हणोनि हा अनुक्रम। सांगिजेल ॥ २ ॥ भूत भविष्य वर्तमान। ठाउकें आहे परिच्छिन्न। त्यासीच म्हणिजेलें ज्ञान। परि तें ज्ञान नव्हे ॥ ३ ॥ बहुत केलें विद्यापठण। संगीतशास्त्र रागज्ञान। वैदिक शास्त्र वेदाध्ययन। हेंहि ज्ञान नव्हे ॥ ४ ॥ नाना व्यवसायांचें[2] ज्ञान। नाना दीक्षेचें ज्ञान। नाना परीक्षेचें ज्ञान। हें ज्ञान नव्हे ॥ ५ ॥ नाना वनितांची[3] परीक्षा। नाना मनुष्यांची परीक्षा। नाना व्यवहारांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ६ ॥ नाना अश्वांची परीक्षा। नाना गजांची परीक्षा। नाना श्वापदांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ७ ॥ नाना पशूंची परीक्षा। नाना पक्ष्यांची परीक्षा। नाना भूतांची[4] परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ८ ॥ नाना यानांची[5] परीक्षा। नाना वस्त्रांची परीक्षा। नाना शस्त्रांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ९ ॥ नाना धातूंची परीक्षा। नाना नाण्यांची परीक्षा। नाना रत्नांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १० ॥ नाना पाषाणपरीक्षा। नाना काष्ठांची परीक्षा। नाना वाद्यांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ११ ॥ नाना भूमींची परीक्षा। नाना जळांची परीक्षा। नाना सतेजं[6] परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १२ ॥ नाना रसांची परीक्षा। नाना बीजांची परीक्षा। नाना अंकुरपरीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १३ ॥ नाना पुष्पांची परीक्षा। नाना फळांची परीक्षा। नाना वल्लींची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १४ ॥ नाना दुःखांची परीक्षा। नाना रोगांची परीक्षा। नाना चिन्हांची परीक्षा। हें

१. संपूर्ण. २. धंद्यांचें. ३. स्त्रियांची. ४. सृष्ट पदार्थांची. ५. वाहनांची. ६. तेजस्वी पदार्थ.

ज्ञान नव्हे ॥ १५॥ नाना मंत्रांची परीक्षा । नाना यंत्रांची परीक्षा । नाना मूर्तींची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १६ ॥ नाना क्षेत्रांची[1] परीक्षा । नाना गृहांची परीक्षा । नाना पात्रांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १७ ॥ नाना होणार परीक्षा । नाना समयांची परीक्षा । नाना तर्कांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १८ ॥ नाना अनुमानपरीक्षा । नाना नेमस्त परीक्षा । नाना प्रकारीं परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १९ ॥ नाना विद्यांची परीक्षा । नाना कळांची परीक्षा । नाना चातुर्यपरीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २० ॥ नाना शब्दांची परीक्षा । नाना अर्थांची परीक्षा । नाना भाषांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २१ ॥ नाना स्वरांची परीक्षा । नाना वर्णांची परीक्षा । नाना लेखनपरीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २२ ॥ नाना मतांची परीक्षा । नाना ज्ञानांची परीक्षा । नाना वृत्तींची[2] परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २३ ॥ नाना रूपांची परीक्षा । नाना रसनांची[3] परीक्षा । नाना सुगंधांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २४ ॥ नाना सृष्टींची परीक्षा । नाना विस्तारपरीक्षा । नाना पदार्थपरीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २५ ॥ नेमकेंचि बोलणें । तत्काळचि प्रतिवचन[4] देणें । शीघ्रचि कवित्व करणें । हें ज्ञान नव्हे ॥ २६ ॥ नेत्रपल्लवी[5] नादकळा[6] । करपल्लवी[7] भेदकळा । स्वरपल्लवी संकेतकळा[8] । हें ज्ञान नव्हे ॥२७॥ काव्यकुशल संगीतकळा । गीत प्रबंध[9] नृत्यकळा । सभाचातुर्य शब्दकळा । हें ज्ञान नव्हे ॥ २८ ॥ वाग्विलास[10] मोहनकळा । रम्य रसाळ गायनकळा । हास्य विनोद काव्यकळा । हें ज्ञान नव्हे ॥ २९ ॥ नाना लाघवें चित्रकळा । नाना वाद्यें संगीतकळा । नाना प्रकारें विचित्रकळा । हें ज्ञान नव्हे ॥ ३० ॥ आदिकरूनि चौसष्ट कळा । यांहि वेगळ्या नाना कळा । चौदा विद्या सिद्धि सकळा । हें ज्ञान नव्हे ॥ ३१ ॥ असो सकळकळाप्रवीण । विद्यामात्र परिपूर्ण । परी तें कौशल्य ज्ञान । म्हणोंचि नये ॥ ३२ ॥ हें ज्ञान होयसें भासे । परंतु मुख्य ज्ञान तें अनारिसें[11] । जेथें प्रकृतीचें[12] पिसें । समूळ वाव ॥ ३३ ॥

१. शेताची. २. मनोविकारांची. ३. स्वादांची. ४. उत्तर. ५. पापण्यांच्या खुणांची भाषा. ६. वाद्यें वाजविण्याचें कौशल्य. ७. बोटांच्या खुणांची भाषा. ८. खुणांनीं मनोगत कळविण्याची कला. ९. कविता, निबंध. १०. वाणीचें माधुर्य. ११. वेगळें. १२. मायेचें.

जाणावें दुसऱ्याचे जीवींचें । हें ज्ञान वाटे साचें । परंतु हें आत्मज्ञानाचें । लक्षण नव्हे ॥ ३४ ॥ महानुभाव महा भला । मानसपूजा करितां चुकला । कोणी एकें पाचारिला । ऐसें नव्हे म्हणोनी ॥ ३५ ॥ ऐसी जाणे अंतरस्थिती । तयास परम ज्ञाता म्हणती । परंतु जेणें मोक्षप्राप्ती । तें हें ज्ञान नव्हे ॥ ३६ ॥ बहुत प्रकारींचीं ज्ञानें । सांगों जातां असाधारणें[1] । सायुज्यप्राप्ती होय जेणें । तें ज्ञान वेगळें ॥ ३७ ॥ तरी तें कैसें आहे ज्ञान । कैसें समाधानाचें लक्षण । ऐसें हें विशद[2] करून । मज निरूपावें ॥ ३८ ॥ ऐसें शुद्ध ज्ञान पुसिलें । तें पुढिलिये समासीं निरूपिलें । श्रोतीं अवधान दीधलें । पाहिजे पुढें ॥ ३९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचमदशके बहुधाज्ञाननिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. शुद्धज्ञानलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐक ज्ञानाचें लक्षण । ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान । पाहावें आपणास आपण । या नांव ज्ञान ॥ १ ॥ मुख्य देवास जाणावें । सत्य स्वरूप ओळखावें । नित्यानित्य विचारावें । या नांव ज्ञान ॥ २ ॥ जेथें दृश्यप्रकृति[3] सरे । पांचभौतिकें[4] हें वोसरे । समूळ द्वैत[5] निवारे । या नांव ज्ञान ॥ ३ ॥ मनोबुद्धि अगोचर[6] । न चले तर्काचा विचार । उल्लेख[7] परेहूनि पर[8] । या नांव ज्ञान ॥ ४ ॥ जेथें नाहीं दृश्यभान[9] । जेथें जाणीव हें अज्ञान । विमळ शुद्ध स्वरूपज्ञान । यासि बोलिजे ॥ ५ ॥ सर्वसाक्षिणी अवस्था तुर्या[10] । ज्ञान ऐसें म्हणती तया । परी तें जाणिजे वायां । पदार्थज्ञान ॥ ६ ॥ दृश्य पदार्थ जाणिजे । त्यास पदार्थज्ञान बोलिजे । शुद्ध स्वरूप जाणिजे । या नांव स्वरूपज्ञान ॥ ७ ॥ जेथें सर्वचि नाहीं ठायींचें । तेथें सर्वसाक्षित्व कैंचें । म्हणोनि शुद्ध ज्ञान तुर्येचें । मानूंचि नये ॥ ८ ॥ ज्ञान म्हणजे अद्वैत[11] । तुर्या[10] प्रत्यक्ष द्वैत । म्हणोनि शुद्ध ज्ञान तें सतत । वेगळेंचि असे ॥

---

१. पुष्कळ. २. स्पष्ट. ३. दिसणारें मायामय जग. ४. पंचभूतांचा विस्तार. ५. भेदबुद्धि. ६. मनास व बुद्धीस अगम्य. ७. जाणीव. ८. परा वाणीच्याही पलीकडील, शब्दातीत. ९. जगाचा भास. १०. एक समाधीचा प्रकार; यांत, मी जड नव्हे जडाचा साक्षी आहे, हा मनाचा निश्चय असतो. ११. अखंड एकरूपता.

९ ॥ ऐसें शुद्ध ज्ञानाचें लक्षण । शुद्ध स्वरूपीच आपण । या नांव स्वरूपज्ञान । जाणिजे श्रोतीं ॥ १० ॥ महावाक्य उपदेश भला । परी त्याचा जप नाहीं बोलिला । तेथींचा तो विचार केला । पाहिजे साधकें॥ ११ ॥ महावाक्य उपदेशसार । परी घेतला पाहिजे विचार । त्याच्या जपें अंधकार । न फिटे भ्रांतीचा ॥ १२ ॥ महावाक्याचा अर्थ घेतां । आपण वस्तु[1]चि तत्वतां । त्याचा जप करितां । वृथा शिण होय ॥ १३ ॥ महावाक्याचें विवरण । हें मुख्य ज्ञानाचें लक्षण । शुद्ध लक्ष्यांशें[2] आपण । वस्तुचि आहे ॥ १४ ॥ आपला आपणासि लाभ । हें ज्ञान परम दुर्लभ । जें आदि अंतीं स्वयंभ[3] । स्वरूपचि स्वयें ॥ १५ ॥ जेथूनि हें सर्वहि प्रगटे । आणि सकळहि जेथें ऑटे[4] । तें ज्ञान झालिया फिटे । भ्रांतिबंधन ॥ १६ ॥ मतें आणि मतांतरें । जेथें होतीं निर्विकारें[5] । अति सूक्ष्म विचारें । पाहतां ऐक्य ॥ १७ ॥ जें या चराचरा[6]चें मूळ । शुद्ध स्वरूप निर्मळ । या नांव ज्ञान केवळ । वेदांत मतें ॥ १८ ॥ शोधितां आपुलें मूळस्थान । सहजचि उडे अज्ञान । या नांव म्हणिजे ब्रह्मज्ञान । मोक्षदायक ॥ १९ ॥ आपणासि ओळखों जातां । अंगीं बाणे सर्वज्ञता । तेणें एकदेशी वार्ता । निःशेष उडे ॥ २० ॥ मी कोण ऐसा हेत । धरूनि पाहतां देहा[7]तीत । अवलोकितां नेमस्त । स्वरूपचि होय ॥ २१ ॥ ऐसे पूर्वीं थोर थोर । जेणें ज्ञानें पैलपार । पावले ते साचार । ऐक आतां ॥ २२ ॥ व्यास वसिष्ठ महामुनी । शुक नारद समाधानी । जनकादिक महाज्ञानी । येणेंचि ज्ञानें ॥ २३ ॥ वामदेवादिक योगीश्वर । वाल्मीक अत्रि ऋषीश्वर । शौनकादि अध्यात्मसार । वेदांत मतें ॥२४॥ सनकादिक मुख्य करूनी । आदिनाथ मीनं[8] गोरक्षमुनी । आणिक बोलतां वचनीं । अगाध असती ॥ २५ ॥ सिद्ध मुनि महानुभाव । सकळांचा जो अंतर्भाव । जेणें सुखें महादेव । डुल्लतो सदा ॥ २६ ॥ जें वेदशास्त्राचें सार । सिद्धांत धादांत विचार । ज्याची प्राप्ती भावानुसार । भाविकांसि होय ॥

---

१. ब्रह्म. २. ज्या संबंधानें कांहीं बोलतां येतें तो पदार्थ वाच्यांश होय, व जो त्या पदार्थासंबंधीं कांहीं बोलतो पण ज्याचेसंबंधीं कांहीं बोलण्याला त्याहून अन्य कोणी नाहीं, तो लक्ष्यांश,—या विचाराच्या योगें. ३. स्वतःसिद्ध. ४. लय पावतें. ५. निर्मळ. ६. जीव व जड पदार्थ या दोहोंचें. ७. देहाहून भिन्न. ८. मत्स्येंद्रनाथ.

२७ ॥ साधु संत आणि सज्जन । भूत भविष्य वर्तमान । सर्वत्रांचें गुह्य-ज्ञान । सांगिजेल आतां ॥ २८ ॥ तीर्थें व्रतें तपें दानें । जें न जोडे धूम्र-पानें । पंचाग्नि गोरांजनें[1] । जें प्राप्त नव्हे ॥ २९ ॥ सकळ साधनांचें फळ । ज्ञानचि सांगें केवळ । जेणें संशयाचें मूळ । निःशेष तुटे ॥ ३० ॥ छप्पन्न भाषा तितुके ग्रंथ । आदिकरूनि वेदांत । या इतुक्यांचा गर्हनार्थ[2] । एकचि असे ॥ ३१ ॥ जें नेणवे पुराणीं । जेथें शिणल्या वेदवाणी । तेंचि आतां येच क्षणीं । बोधीन गुरुकृपें ॥ ३२ ॥ पाहिलें नसतां संस्कृतीं । रीग नाहीं महाराष्ट्र ग्रंथीं । हृदयीं वसिल्या कृपामूर्ती । सद्गुरु स्वामी ॥ ३३ ॥ आतां नलगे संस्कृत । अथवा ग्रंथ प्राकृत । माझा स्वामी कृपेसहित । हृदयीं वसे ॥ ३४ ॥ न करितां वेदाभ्यास । अथवा श्रवणसायास । प्रयत्नेंविण सुरस । सद्गुरुकृपा ॥ ३५ ॥ ग्रंथमात्र महाराष्ट्र । त्याहून संस्कृत श्रेष्ठ । त्या संस्कृतामध्यें श्रेष्ठ । थोर तो वेदान्त ॥ ३६ ॥ त्या वेदान्तापरतें कांहीं । सर्वथा श्रेष्ठ नाहीं । जेथें वेदगर्भ[3] सर्वही । प्रगट जाहला ॥ ३७ ॥ असो ऐसा जो वेदान्त । त्याचाचि मथितार्थ[4] । अति गहन जो परमार्थ । तो तूं ऐक आतां ॥ ३८ ॥ अरे गहनाचेंहि गहन । तें तूं जाण सद्गुरुवचन । सद्गुरुवचनें समाधान । नेमस्त[5] आहे ॥ ३९ ॥ सद्गुरुवचन तोचि वेदान्त । सद्गुरुवचन तोचि सिद्धांत । सद्गुरुवचन तोचि धादांत । सप्रचीत आतां ॥ ४० ॥ जें अत्यंत गहन । माझे स्वामीचें वचन । जेणें माझें समाधान । अत्यंत जाहलें ॥ ४१ ॥ तें हें माझे जीवींचें गुज । मी सांगेन म्हणतों तुज । जरी अवधान देशी मज । तरी आतां येच क्षणीं ॥ ४२ ॥ तंव शिष्य म्लानवदनें बोले । धरिलीं सदृढ पाउलें । मग बोलों आरंभिलें । गुरुदेवें ॥ ४३ ॥ अहंब्रह्मास्मि[6] महावाक्यें । तेथींचा अर्थ अतर्क्यें । तोहि सांगतों ऐक्यें । गुरुशिष्यैं[7] जेथें ॥ ४४ ॥ ऐक शिष्या येथींचें वर्म । स्वयें तूंचि आहेसि ब्रह्म । येविषयीं संदेह भ्रम । धरूंच नको ॥ ४५ ॥ नवविधा प्रकारें भजन । त्यांत मुख्य आत्मनिवेदन । तें समग्र प्रकारें कथन । कीजेल आतां ॥ ४६ ॥ निर्माण पंचभूतें इंद्रियें । कल्पांतीं नासती

१. स्वतःला जाळून घेणें. २. सार. ३. वेदांचा सारांश. ४. निर्णय. ५. खचित. ६. मी ब्रह्म आहे. (हें यजुर्वेदांत आहे.) ७. गुरुशिष्यांच्या मनांचें ऐक्य.

यथान्वयें[1] । प्रकृतिपुरुषें[2] जियें । तेहि ब्रह्म होती ॥ ४७ ॥ दृश्य पदार्थ आटतां[3] । आपणहि नुरे तत्वतां । ऐक्यरूपें ऐक्यता । मुळींच आहे ॥ ४८ ॥ सृष्टीची नाहीं वार्ता । तेथें सर्वहि ऐक्यता । पिंडब्रह्मांड[4] पाहों जातां । दिसेल कोठें ॥४९॥ ज्ञानवन्हि[5] प्रगटे । तेणें दृश्य केर आटे । तदाकारें मूळ तुटे । भिन्नत्वाचें ॥ ५० ॥ मिथ्यात्वें[6] वृत्ति फिरे[6] । तों दृश्य असतांच वोसरे । सहजचि येणें प्रकारें । झालें आत्मनिवेदन[7] ॥५१॥ ऐसी सद्गुरूचे ठायीं अनन्यता[8] । तरी तुज कायसी रे चिंता । वेगळेपणें अभक्तां । उरोंचि नेदी ॥ ५२ ॥ आतां हेंचि दृढीकरण । व्हावया करीं सद्गुरुभजन । सद्गुरुभजनें समाधान । नेमस्त पावसी ॥ ५३ ॥ या नांव शिष्या आत्मज्ञान । येणें पाविजे समाधान । भवभयाचें बंधन । समूळ मिथ्या ॥ ५४ ॥ देह मी वाटे ज्या नरा । तो जाणावा आत्महत्यारा[9] । देहाभिमानें येरझारा । भोगिल्याच भोगी ॥ ५५ ॥ असे चहूं[10] देहां[10] वेगळा । जन्मकर्मां निराळा । सकळ अंबळ[11] गोंबळा[11] । सबाह्य[12] तूं ॥ ५६ ॥ कोणासीच नाहीं बंधन । भ्रांतीस्तव भुलले जन । दृढ घेतला देहाभिमान । म्हणोनियां ॥ ५७ ॥ शिष्या एकांतीं बैसावें । स्वरूपीं[13] विश्रांतीस जावें[13] । तेणें गुणें दृढ व्हावें । परमार्थ सदा ॥ ५८ ॥ अखंड घडे श्रवण मनन । तरीच पाविजे समाधान । पूर्ण झालिया ब्रह्मज्ञान । वैराग्य भरे अंगीं ॥ ५९ ॥ शिष्या मुक्तपणें[14] अनर्गळ[15] । करिसी इंद्रियें बरळ[16] । तेणें तुझी तळमळ । जाणार नाहीं ॥ ६० ॥ विषयीं वैराग्य उपजलें । तयासीच पूर्ण ज्ञान झालें । मणी टाकितां लाधलें । राज्य जेवीं ॥ ६१ ॥ ऐक शिष्या सावधान । आतां भविष्य मी सांगेन । जया पुरुषास जें ध्यान । तयासि तेंचि प्राप्त ॥ ६२ ॥ म्हणोनि जे अविद्या । सांडूनि धरावी सुविद्या । तेणें गुणें जगद्वंद्या । पाविजे शीघ्र ॥ ६३ ॥

---

१. यथानुक्रमानें. २. दृश्य माया व तिचा भोक्ता जीव हीं दोन्ही. ३. लयास जातां. ४. देह आणि जग. ५. ज्ञानरूपी अग्नि. ६. दृश्य मिथ्या असल्यामुळें त्याचा विचार संपतो. ७. आत्मरूपाचें ज्ञान. ८. एकनिष्ठा. ९. आत्मघातकी. १०. स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण असे चार देह एकांत एक आहेत, त्यांहून भिन्न. ११. दृश्य पसारा. १२. भिन्न. १३. स्वरूप जाणून स्वस्थ राहावें. १४. स्वतःला मुक्त समजून. १५. स्वैर. १६. चंचल.

सन्निपाताचेनि दुःखें । भयानक दृष्टीस देखे । औषध घेतांचि सुखें । आनंद पावे ॥ ६४ ॥ तैसें अज्ञानसन्निपातें । मिथ्या दृष्टीस दिसतें । ज्ञान औषध घेतां चित्तें । जें मुळींच नाहीं ॥ ६५ ॥ मिथ्या स्वप्नें वोसण झाला । तो जागृतीस आणिला । तेणें पूर्वदशा पावला । निर्भय जे ॥ ६६ ॥ मिथ्याच परी सत्य वाटलें । तेणें गुणें दुःख झालें । मिथ्यात्वें सत्य निरसलें । हें तों घडेना ॥ ६७ ॥ मिथ्या आहे जागृतासी । परी वेड लाविलें निद्रितासी । जागा झालिया तयासी । भयचि नाहीं ॥६८॥ परी अविद्याझोंप येते भरें । भरे सर्वांगीं कावरें । पूर्ण जागृति श्रवणद्वारें । मननें करावी ॥ ६९ ॥ जागृतीची वोळखण । ऐक तयाचें लक्षण । जो विषयीं विरक्त पूर्ण । अंतरापासुनी ॥ ७० ॥ जेणें विरक्तीस न यावें । तो साधक ऐसें जाणावें । तेणें साधन करावें । थोरीव सांडूनी ॥ ७१ ॥ साधन न माने जयाला । तो सिद्धपणें बद्ध झाला । त्याहुनि मुमुक्षु भला । ज्ञानाधिकारी ॥ ७२ ॥ तंव शिष्यें केला प्रश्न । कैसें बद्धमुमुक्षूचें लक्षण । साधक सिद्ध ओळखण । कैसी जाणावी ॥ ७३ ॥ याचें उत्तर श्रोतयांसी । दीधलें पुढिले समासीं । सावध श्रोतीं कथेसी । अवधान द्यावें ॥ ७४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचमदशके शुद्धज्ञाननिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. बद्धलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ सृष्टी जे कां चराचर । जीव दाटले अपार । परी ते अवघे चार । बोलिजेती ॥ १ ॥ ऐक तयांचें लक्षण । चार ते कोण कोण । बद्ध[४] मुमुक्षु[५] साधक[६] जाण । चौथा तो सिद्ध[७] ॥ २ ॥ या चौघां विरहित कांहीं । चराचरीं पांचवा नाहीं । आतां असो हीं सर्वही । विशद करूं ॥ ३ ॥ बद्ध म्हणिजे तो कोण । कैसें मुमुक्षूचें लक्षण । साधक सिद्ध वोळखण । कैसी जाणावी ॥ ४ ॥ श्रोतीं व्हावें सावध । प्रस्तुत ऐका बद्ध । मुमुक्षु साधक आणि सिद्ध । पुढें निरूपिजेल ॥ ५ ॥ आतां बद्ध तो जाणिजे ऐसा । अंधारींचा अंध जैसा । चक्षूविण[८] दाही दिशा । शून्याकार

---

१. ज्वराच्या. २. भयभीत. ३. वेड. ४. संसारांत गढलेला. ५. संसारांतून सुटूं इच्छिणारा ६. सुटण्याचा मार्ग चालणारा. ७. मुक्त. ८. डोळ्यावांचून.

॥ ६ ॥ भक्त ज्ञाता तापसी । योगी वीतरागी[1] संन्यासी । पुढें देखतां दृष्टीसी । येणार नाहीं ॥ ७ ॥ न दिसे नेणे कर्माकर्म । न दिसे नेणे धर्माधर्म । न दिसे नेणे सुगम । परमार्थपंथ ॥ ८ ॥ तयास न दिसे सच्छास्त्र । सत्संगति सत्पात्र । सन्मार्ग जो कां पवित्र । तोहि न दिसे ॥ ९ ॥ न कळे सारासार विचार । न कळे स्वधर्म आचार । न कळे कैसा परोपकार । दान पुण्य ॥ १० ॥ नाहीं पोटीं भूतदया । नाहीं शुचिष्मंत[2] काया । नाहींच जनांसि निववावया । वचन मृदु ॥ ११ ॥ न कळे भक्ती न कळे ज्ञान । न कळे वैराग्य न कळे ध्यान । न कळे मोक्ष न कळे साधन । या नांव बद्ध ॥ १२ ॥ न कळे देव निश्चयात्मक । न कळे संतांचा विवेक । न कळे मायेचें कौतुक । या नांव बद्ध ॥ १३ ॥ न कळे परमार्थाची खुण । न कळे अध्यात्मनिरूपण । न कळे आपणासि आपण । या नांव बद्ध ॥ १४ ॥ न कळे जीवाचें जन्ममूळ । न कळे साधनांचें फळ । न कळे तत्त्व केवळ । या नांव बद्ध ॥१५॥ न कळे कैसें तें बंधन । न कळे मुक्तीचें लक्षण । न कळे वस्तु[3] विलक्षण । या नांव बद्ध ॥१६॥ न कळे शास्त्रार्थ बोलिला । न कळे निजस्वार्थ आपुला । न कळे संकल्पें[4] बांधिला । या नांव बद्ध ॥ १७ ॥ जयास नाहीं आत्मज्ञान । हें मुख्य बद्धाचें लक्षण । तीर्थें व्रतें दान पुण्य । कांहींच नाहीं ॥१८॥ दया नाहीं करुणा नाहीं । आर्जव नाहीं मैत्री नाहीं । शांति नाहीं क्षमा नाहीं । या नांव बद्ध ॥ १९ ॥ जें ज्ञानाविषयीं उणें । तेथें कैंचीं ज्ञानाचीं लक्षणें । बहुसाल कुलक्षणें । या नांव बद्ध ॥ २० ॥ नानाप्रकारचे दोष । करितां वाटे परम संतोष । बाष्कळपणाचा हव्यास । या नांव बद्ध ॥ २१ ॥ बहु काम बहु क्रोध । बहु गर्व बहु मद । बहु द्वंद्वें[5] बहु खेद । या नांव बद्ध ॥२२॥ बहु दर्प बहु दंभ । बहु विषय बहु लोभ । बहु कर्कश बहु अशुभ । या नांव बद्ध ॥ २३ ॥ बहु ग्रामणी[6] बहु मत्सर । बहु असूया[7] तिरस्कार । बहु पापी बहु विकार । या नांव बद्ध ॥ २४ ॥ बहु अभिमान बहु ताठा । बहु अहंकार बहु फांटा[8] । बहु कुकर्मांचा सांठा । या नांव बद्ध ॥ २५ ॥ बहु

१. वैराग्यशील. २. शुद्ध. ३. जिचें लक्षण करितां येत नाहीं अशी वस्तु; ब्रह्म. ४. चिंतेनें. ५. कलह. ६. हरामखोरी. ७. मत्सर. ८. निरर्थक कल्पना.

कापट्य वादविवाद । बहु कुतर्क भेदाभेद । बहु क्रूर कृपामंद । या नांव बद्ध ॥ २६ ॥ बहु निंदा बहु द्वेष । बहु अधर्म बहु अभिलाष । बहु प्रकारींचे दोष । या नांव बद्ध ॥२७॥ बहु भ्रष्ट अनाचार । बहु नष्ट ऐकाकार[1] । बहु अनीति अविचार । या नांव बद्ध ॥ २८ ॥ बहु निष्ठुर बहु घातकी । बहु हत्यारी[2] बहु पातकी । बहु तपिळ[3] कुविद्या अनेकी । या नांव बद्ध ॥२९॥ बहु दुराशा बहु स्वार्थी । बहु कळह बहु अनर्थी[4] । बहु डाईक[5] दुर्मती । या नांव बद्ध ॥ ३० ॥ बहु कल्पना बहु कामना । बहु तृष्णा बहु वासना । बहु ममता बहु भावना । या नांव बद्ध ॥३१॥ बहु विकल्पी बहु विषादी । बह प्रपंची बहु उपाधी[6] । बहु कुविद्येची बुद्धी । या नांव बद्ध ॥ ३२ ॥ बहु वाचाळ बहु पाखांडी । बहु दुर्जन बहु थोतांडी । बहु पैशून्य[7] बहु खोडी । या नांव बद्ध ॥ ३३ ॥ बहु अभाव[8] बहु भ्रम । बहु भ्रांति बहु तम[9] । बहु विक्षेप[10] बहु विराम[11] । या नांव बद्ध ॥ ३४ ॥ बहु कृपण बहु खंदस्ती[12] । बहु अदेखणा[13] बहु मस्ती । बहु असत्क्रिय अव्यवस्थी । या नांव बद्ध ॥ ३५ ॥ परमार्थविषयीं अज्ञान । प्रपंचाचें उदंड ज्ञान । नेणे स्वयें समाधान । या नांव बद्ध ॥ ३६ ॥ परमार्थाचा अनादर । प्रपंचाचा अत्यादर । संसारभार जोजार । या नांव बद्ध ॥ ३७ ॥ सत्संगाची नाहीं गोडी । संतनिंदेची आवडी । देहबुद्धीची[14] घातली बेडी । या नांव बद्ध ॥३८॥ हातीं द्रव्याची जपमाळ । कांताध्यान सर्वकाळ । सत्संगाचा दुष्काळ । या नांव बद्ध ॥३९॥ नेत्रीं द्रव्य दारा पाहावी । श्रवणीं द्रव्य दारा ऐकावी । चिंतनीं द्रव्य दारा चिंतावी । या नांव बद्ध ॥ ४० ॥ काया वाचा आणि मन । चित्त वित्त जीव प्राण । द्रव्य दारेचें करी भजन । या नांव बद्ध ॥४१॥ इंद्रियें करूनि निश्चळ । चंचळ होऊं नेदी पळ । द्रव्य दारेसि लावी सकळ । या नांव बद्ध ॥ ४२ ॥ द्रव्य दारा तेंचि तीर्थ । द्रव्य दारा तोचि परमार्थ । द्रव्य दारा सकळ स्वार्थ । या नांव बद्ध ॥४३॥ व्यर्थ जाऊं नेदी काळ । संसारचिंता सर्वकाळ । कथा वार्ता तेचि सकळ । या नांव बद्ध ॥ ४४ ॥ नाना

---

१. हेकेखोर. २. घातकी. ३. तापट. ४. अनर्थ करणारा. ५. दावा धरणारा. ६. उठाठेवी. ७. चहाडी करणें. ८. अविश्वास. ९. अज्ञान. १०. चांचल्य. ११. सुस्तपणा. १२. दांडगाई. १३. मत्सरी. १४. स्थूल देह म्हणजे मी, अशा भावनेची.

चिंता नाना उद्वेग । नाना दुःखांचे संसर्ग । करी परमार्थाचा त्याग । या नांव बद्ध ॥ ४५ ॥ घटिका निमेष पळभरी । दुश्चित नव्हतां अंतरीं । सर्वकाळ ध्यान धरी । द्रव्य दारा प्रपंचाचें ॥ ४६ ॥ तीर्थयात्रा दान पुण्य । हरिकथानिरूपण । मंत्र पूजा जप ध्यान । सर्वेहि द्रव्य दारा ॥ ४७ ॥ जागृतीं स्वप्नीं रात्रंदिवस । ऐसा लागला विषयीं ध्यास । नाहीं क्षणाचा अवकाश । या नांव बद्ध ॥ ४८ ॥ ऐसें बद्धाचें लक्षण । मुमुक्षुपणीं पालटे जाण । ऐक तेहि वाळखण । पुढिले समासीं ॥ ४९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचमदशके बद्धलक्षणनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. मुमुक्षुलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ संसारमदाचेनि गुणें । नाना हीनें कुलक्षणें । जयाचें मुखावलोकनें । दोषचि लागे ॥ १ ॥ ऐसा प्राणी जो कां बद्ध । संसारीं वर्ततां अबद्ध[1] । तयास प्राप्त झाला खेद । काळांतरीं ॥२॥ संसारदुःखें दुखवला । त्रिविध तापें पोळला । निरूपणें[2] पालटला । अंतर्यामीं ॥ ३ ॥ झाला प्रपंचीं उदास । मनें घेतला विषयत्रास । ह्मणे आतां पुरे सोस । संसाराचा ॥ ४ ॥ प्रपंच जाईल सकळ । एथील श्रम तो निष्फळ । आतां कांहीं आपुला काळ । सार्थक करूं ॥ ५ ॥ ऐसी बुद्धि प्रस्तावली । पोटीं अवस्था[3] लागली । ह्मणे माझी वयसा[4] गेली । व्यर्थच अवघी ॥ ६ ॥ पूर्वी नाना दोष केले । ते अवघेच आठवले । पुढें येऊनि उभे ठेले । अंतर्यामीं ॥ ७ ॥ आठवे यमाची यातना । तेणें भयचि वाटे मना । नाहीं पापाची गणना । म्हणोनियां ॥ ८ ॥ नाहीं पुण्याचा विचार । झाले पापाचे डोंगर । आतां दुस्तर हा संसार । कैसा तरूं ॥ ९ ॥ आपले दोष आच्छादिले । भल्यांस गुणदोष लाविले । देवा म्यां व्यर्थची निंदिले । संत साधु सज्जन ॥ १० ॥ निंदे ऐसे नाहीं दोष । ते मज घडले विशेष । माझे अवगुणीं आकाश । बुडों पाहे ॥ ११ ॥ नाहीं वोळखिले संत । नाहीं अर्चिला[5] भगवंत । नाहीं अतीत अभ्यागत । संतुष्ट केले ॥ १२ ॥ नाहीं कष्टविलें शरीर । नाहीं केला परोपकार । नाहीं रक्षिला आचार । काममदें

---

१. स्वैर. २. उपदेशानें. ३. आस्था. ४. वय. ५. पूजिला.

॥ १३ ॥ पूर्वपाप वोढवलें । मज पुण्य नाहीं घडलें । मन अर्व्हाटीं[1] पडिलें। सर्वकाळ ॥ १४ ॥ भक्तिमाता हे बुडविली। भ्रांतिविश्रांति मोडिली ।मूर्खपणें म्यां बिघडिली । सद्बुद्धि सद्वासना ॥ १५ ॥ आतां कैसेनि घडेल सार्थक । दोष केले निरर्थक । पाहों जातां विवेक । उरला नाहीं ॥ १६ ॥ कोण उपाय करावा । कैसा परलोक पावावा । कोण्या गुणें देवाधिदेवा । पाविजेल ॥ १७ ॥ नाहीं सद्भाव उपजला। अवघा लौकिक संपादिला। दंभ वरपंगें केला । खटाटोप कर्मांचा ॥ १८ ॥ कीर्तन केलें पोटासाठीं । देव मांडिले हाटवटीं[2] । आहा देवा बुद्धि खोटी । माझी मीच जाणें ॥ १९ ॥ पोटीं धरूनि अभिमान । शाब्दिक बोलिलों निरभिमान । अंतरीं वांछूनियां धन । ध्यानस्थ जाहलों ॥ २० ॥ व्युत्पत्तीनें[3] लोक भोंदले । पोटासाठीं संत निंदिले । माझे पोटीं दोष भरले । नाना प्रकारीं ॥ २१ ॥ सत्य तेंचि उच्छेदिलें । मिथ्या तेंचि प्रतिपादिलें । ऐसें नाना कर्म केलें । उदर भरावया कारणें ॥ २२ ॥ ऐसा पोटीं प्रस्तावला । निरूपणें पालटला । तोचि मुमुक्षु बोलिला । ग्रंथांतरीं ॥ २३ ॥ सन्मार्ग पोटीं धरी । सत्संगाची वांछा करी । विरक्त झाला संसारी । या नांव मुमुक्षु ॥ २४ ॥ गेले राजे चक्रवर्ती । माझें वैभव तें किती । म्हणे धरू सत्संगाची गती । या नांव मुमुक्षु ॥ २५ ॥ आपले अवगुण देखे । विरक्तिबळें वोळखे । आपणासि निंदी दुःखें । या नांव मुमुक्षु ॥ २६ ॥ म्हणे मी काय दंभधारी[4] । म्हणे मी काय अनाचारी । म्हणे मी काय अनुपकारी[5] । या नांव मुमुक्षु ॥ २७॥ म्हणे मी पतित चांडाळ। म्हणे मी दुराचारी खळ । म्हणे मी पापी केवळ। या नांव मुमुक्षु ॥ २८ ॥ म्हणे मी अभक्त दुर्जन । म्हणे मी हीनाहूनी हीन । म्हणे मी जन्मलों पाषाण । या नांव मुमुक्षु ॥ २९ ॥ म्हणे मी दुरभिमानी । म्हणे मी तपिळ[6] जनीं । म्हणे मी नानाव्यसनीं । या नांव मुमुक्षु ॥ ३० ॥ म्हणे मी आळशी अंगचोर । म्हणे मी कपटी कांतरें[7] । म्हणे मी मूर्ख अविचार । या नांव मुमुक्षु ॥ ३१ ॥ म्हणे मी निकामी वाचाळ । म्हणे मी पाषांडी तोंडाळ । म्हणे मी कुबुद्धि कुटिळ । या नांव मुमुक्षु ॥

१. आडवाटेंत. कुमार्गांत. २. बाजारांत. ३. विद्वत्तेनें. ४. ढोंगी. ५. निरुपयोगी. ६. तामसी. ७. भितरा.

३२ ॥ म्हणे मी कांहींच नेणें । म्हणे मी सकळांहूनि उणें । आपलीं वर्णी कुलक्षणें । या नांव मुमुक्षु ॥ ३३ ॥ म्हणे मी कुश्चिळ[1] अघोरी । म्हणे मी नीच नानापरी । म्हणे मी अनधिकारी । या नांव मुमुक्षु ॥ ३४ ॥ म्हणे मी काय आपस्वार्थी । म्हणे मी काय अनर्थी । म्हणे मी नव्हे परमार्थी । या नांव मुमुक्षु ॥ ३५ ॥ म्हणे मी अवगुणांची राशी । म्हणे मी कुकर्मी आळशी । म्हणे मी भार झालों भूमीशीं । या नांव मुमुक्षु ॥ ३६ ॥ आपणास निंदी सावकाश । पोटीं संसाराचा त्रास । धरी सत्संगाचा हव्यास । या नांव मुमुक्षु ॥ ३७ ॥ नाना तीर्थें धुंडाळिलीं । शमदमादि[2] साधनें केलीं । नाना ग्रंथांतरें पाहिलीं । शोधूनियां ॥ ३८ ॥ तेणें नव्हे समाधान । वाटे अवघाच अनुमान । म्हणे रिघूं संतांस शरण । या नांव मुमुक्षु ॥३९॥ देहाभिमान कुलाभिमान । द्रव्याभिमान मानाभिमान । सांडूनि संतचरणीं अनन्य[3] । या नांव मुमुक्षु ॥ ४० ॥ अहंता सांडूनि दुरी । आपणासी निंदी नानापरी । मोक्षाची अपेक्षा करी । या नांव मुमुक्षु ॥ ४१ ॥ ज्याचें मन थोरपणा लाजे । जो परमार्थाकारणें झिजे । संतपायीं विश्वास उपजे । या नांव मुमुक्षु ॥ ४२ ॥ स्वार्थ सांडूनि प्रपंचाचा । हव्यास धरिला परमार्थाचा । अंकितें[4] होईन सज्जनांचा । या नांव मुमुक्षु ॥ ४३ ॥ ऐसा मुमुक्षु जाणिजे । संकेतचिन्हें[5] ओळाखिजे । पुढें श्रोतीं अवधान दीजे । साधकलक्षणीं ॥ ४४ ॥ इतिश्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचमदशके मुमुक्षुलक्षणानिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. साधकलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां मुमुक्षूचें लक्षण । संकेतें केलें कथन । आतां परिसा सावधान । साधक तो कैसा ॥ १ ॥ अवगुणांचा करूनि त्याग । जेणें धरिला संतसंग । तयासि बोलिजे मग । साधक ऐसा ॥ २ ॥ जो संतांसी शरण गेला । संतजनीं आश्वासिला । मग तो साधक बोलिला । ग्रंथांतरीं ॥ ३ ॥ उपदेशिलें आत्मज्ञान । तुटलें संसारबंधन । दृढतेकारणें

१. अमंगळ. २. मन व इंद्रियें यांस जिंकणें. ३. एकनिष्ठ. ४. दास. ५. संक्षेपतः.

करी साधन । या नांव साधन ॥ ४ ॥ धरी श्रवणाची आवडी । अद्वैत-निरूपणाची गोडी । मननें अर्थांतर[1] काढी । या नांव साधक ॥ ५ ॥ होतां सारासार विचार । ऐके होऊनि तत्पर । संदेह छेदूनि दृढोत्तर[2] । आत्मज्ञान पाहे ॥ ६ ॥ नानासंदेहनिवृत्ती[3] । व्हावया धरी सत्संगती । आत्मशास्त्रगुरु-प्रतीती । ऐक्यतेसि आणि ॥ ७ ॥ देहबुद्धी विवेकें वारी । आत्मबुद्धी दृढ धरी । श्रवण मनन केलेंचि करी । या नांव साधक ॥ ८ ॥ विवंचूनि[4] दृश्य-भान । दृढ धरी आत्मज्ञान । विचारें राखे समाधान । या नांव साधक ॥ ९ ॥ तोडूनि द्वैताची उपाधी[5] । अद्वैतवस्तु[6] साधनें साधी । लावी ऐक्य-तेची समाधी । या नांव साधक ॥ १० ॥ आत्मज्ञान जीर्ण जर्जर । त्याचा करी जीर्णोद्धार । विवेकें पावे पैलपार । या नांव साधक ॥ ११ ॥ उत्तम साधूंचीं लक्षणें । अंगिकारी निरूपणें । बळेंचि स्वरूपाकार होणें । या नांव साधक ॥ १२ ॥ असत्क्रिया ते सोडिली । आणि सत्क्रिया ते वाढविली । स्वरूपस्थिति[7] बळावली । या नांव साधक ॥ १३ ॥ अवगुण त्यागी दिवसें-दिवस । करी उत्तम गुणांचा अभ्यास । स्वरूपीं लावी निजध्यास । या नांव साधक ॥ १४ ॥ दृढनिश्चयाचेनि बळें । दृश्य असतांच नाडळे[8] । सदा स्वरूपीं मिसळे । या नांव साधक ॥ १५ ॥ प्रत्यक्ष माया अलक्ष करी । अलक्ष्य[9] वस्तु लक्षी अंतरीं । आत्मस्थितीची धारणा धरी । या नांव साधक ॥ १६ ॥ जें या जनास चोरलें । मनासि न वचे अनुमानलें । तेंचि जेणें दृढ केलें । या नांव साधक ॥ १७ ॥ जें बोलतांच वाचा धरी[10] । जें पाहतांचि अंध करी । तेंचि साधी नानापरी । या नांव साधक ॥ १८ ॥ जें साधूं जातां साधवेना । जें लक्षूं जातां लक्षवेना । तेंचि अनुभवें आणी मना । या नांव साधक ॥ १९ ॥ जेथें मनाचि मावळे । जेथें तर्कचि पांगुळे । तेंचि अनुभवा आणी बळें । या नांव साधक ॥ २० ॥ स्वानुभवाचेनि योगें । वस्तु साधी लागवेगें । तेचि वस्तु होय अंगें । या नांव साधक ॥ २१ ॥ अनुभवाचीं अंगें जाणे । योगियांचे खुणे बाणे । कांहींच नसोन असणें ।

---

१. अर्थांतील मर्म. २. दृढतर, निश्चयात्मक. ३. शंकांचें निवारण. ४. मनन करून. ५. संबंध. ६. ब्रह्म. ७. स्वरूपासंबंधीं जागृति. ८. भासत नाहीं. ९. अचिंत्य ब्रह्म. १०. कुंठित करितें.

या नांव साधक ॥ २२ ॥ परती सारूनि उपाधी[1] । असाध्य वस्तु साधनें साधी । स्वरूपीं करी दृढ बुद्धी । या नांव साधक ॥ २३ ॥ देवभक्तांचें मूळ। शोधूनि पाहे सकळ । साध्यचि होय तत्काळ । या नांव साधक ॥ २४ ॥ विवेकबळें गुप्त झाला । आपेंआप मावळला । दिसेतो[2] परी देखिला[3] । नाहींच कोणीं ॥ २५ ॥ मीपण मागें सांडिलें । स्वयें आपणासि धुंडिलें । तुर्येसहित ओलांडिलें । या नांव साधक ॥ २६ ॥ पुढें उन्मनीच्या[4] शेवटीं । आपली आपणास अखंड भेटी । अखंड अनुभवीं ज्याची दृष्टी । या नांव साधक ॥ २७ ॥ द्वैताचा तडका तोडिला । भासाचा भास[5] मोडिला । देहीं असोनि विदेही झाला । या नांव साधक ॥ २८ ॥ जयास अखंड स्वरूपस्थिती । नाहीं देहाची अहंकृती । सकळ संदेह निवृत्ती । या नांव साधक ॥ २९ ॥ पंचभूतांचा विस्तार । जयास वाटे स्वप्नाकार । निर्गुणीं जयाचा निर्धार । या नांव साधक ॥ ३० ॥ स्वप्नीं भय जें वाटलें । तें जागृतीस नाहीं आलें । सकळ मिथ्या निर्धारिलें । या नांव साधक ॥ ३१ ॥ मायेचें जें प्रत्यक्षपण जनास वाटे हें प्रमाण । स्वानुभवें अप्रमाण । साधकें केलें ॥ ३२ ॥ निद्रा सांडूनि चेईरा[6] झाला । तो स्वप्नभयापासूनि सुटला । माया सांडूनि तैसा गेला । साधक स्वरूपीं ॥ ३३ ॥ ऐसी अंतरस्थिति बाणली । बाह्य निस्पृहता अवलंबिली । संसारउपाधी त्यागिली । या नांव साधक ॥ ३४ ॥ कामापासूनि सुटला । क्रोधापासूनि पळाला । मदमत्सर सांडिला । एकीकडे ॥ ३५ ॥ कुळाभिमानासि सांडिलें । लोकलाजेसी लाजविलें । परमार्थासी माजविलें । विवेकबळें ॥ ३६ ॥ अविद्येपासूनि फडकला । प्रपंचापासूनि निसटला । लोभाचे हातींचा गेला । अकस्मात ॥ ३७ ॥ थोरपणासि पाडिलें । वैभवासि लिथाडिलें[7] । महत्त्वासि झिंजाडिलें[8] । विरक्तिबळें ॥ ३८ ॥ भेदाचा मडघा[9] मोडिला । अहंकार झोडूनि पाडिला । पायीं धरूनि आपटिला । संदेहशत्रू ॥ ३९ ॥ विकल्पाचा केला वधू । थांपें[10] मारिला भवसिंधू । सकळ भूतांचा विरोधू । तोडूनि टाकिला ॥ ४० ॥ भवभयासि

१. मायेचा संबंध. २. देह दिसतो. ३. तो स्वतः दिसत नाहीं. ४. निर्विकल्प समाधि; एथें मनाचा लय होतो. ५. कल्पना. ६. जागृत. ७. लाथ मारिली ८. झिडकारिलें. ९. बिऱ्हाड. १०. चापट, थापड.

भडकाविलें । काळाचें टांगें[1] मोडिलें । मस्तक हाणोनि पाडिलें । जन्ममृत्यूचें ॥ ४१ ॥ देहसंबंधावरी लोटला । संकल्पावरी उठावला । कल्पनेचा घात केला । अकस्मात ॥ ४२ ॥ अपधाकासि ताडिलें। लिंगदेहासि विभांडिलें[2] । पाषांडासि पछाडिलें । विवेकबळें ॥ ४३ ॥ गर्वावरी गर्व केला । स्वार्थ अनर्थी घातला । अनर्थ तोहि निर्दाळिला । नीतिन्यायें ॥ ४४ ॥ मोहासि मध्येंचि तोडिलें । दुःखासि दुधडें[3]चि केलें । शोकासि खंडूनि सांडिलें । एकीकडे ॥ ४५ ॥ द्वेष केला देशधडी । अभावाची चेपिली नरडी । धाकें उदर तडाडी । कुतर्काचें ॥ ४६ ॥ ज्ञानें विवेक माजला । तेणें निश्चय बळावला । अवगुणांचा संहार केला । वैराग्यबळें ॥ ४७ ॥ अधर्मास स्वधर्मे टाकिलें । कुकर्मास सत्कर्में झुगाडिलें । लोटूनि वाटा लाविलें । विचारें अविचारासी ॥ ४८ ॥ तिरस्कार तो चिराडिला । द्वेष खिरडून[4] सांडिला । विषाद[5] अविषादें[6] घातला । पायांतळीं ॥ ४९ ॥ कोपावरी घालणें घातलें । कापट्य अंतरीं कुटिलें । सख्य आपुलें मानिलें । विश्वजनीं ॥ ५० ॥ प्रवृत्तींचा[7] केला त्याग । सुहृदांचा[8] सोडिला संग । निवृत्तिपंथें[9] ज्ञानयोग । साधिता झाला ॥ ५१ ॥ विषयमैंदासि[10] सिंतरिलें[11] । कुविद्येसि वेडाविलें । आपणासि सोडविलें । आप्ततस्करापासूनी ॥ ५२ ॥ पराधीनतेवरी कोपला । ममतेवरी संतापला । दुराशेचा त्याग केला । एकाएकीं ॥ ५३ ॥ स्वरूपीं घातलें मना । यातनेसि केली यातना । साधन आणि प्रयत्ना । प्रतिष्ठिलें ॥ ५४ ॥ अभ्यासाचा संग धरिला । साक्षेपासरिसा निघाला । प्रयत्न सांगातीं घेतला । साधनपंथें ॥ ५५ ॥ सावध दक्ष तो साधक । पाहे नित्यानित्यविवेक । संग त्यागूनि एक । सत्संग धरी ॥ ५६ ॥ बळेंचि सारिला संसार । विवेकें टाकिला जोजार । शुद्धाचारें अनाचार । भ्रष्टविला ॥ ५७ ॥ विसरास विसरला । आळसाचा आळस केला । सावध नाहीं दुश्चित झाला । दुश्चितपणासी ॥ ५८ ॥ आतां असो हें बोलणें । अवगुण सांडी निरूपणें । तो साधक ऐसा येणें । प्रमाणें बुझावा[12] ॥ ५९ ॥ बळेंचि अवघा त्याग कीजे ।

---

१. तंगडी. २. फोडिलें. ३. दुभंग. ४. चुरडून. ५. खेद. ६. समाधानानें. ७. कर्में करण्याच्या इच्छेचा. ८. जिवलगांचा. ९. चित्ताला अंतर्मुख करण्याचे मार्गानें. १०. विषयरूप फांसेगारास. ११. चुकविलें. १२. जाणावा.

म्हणोनि साधक बोलिजे । आतां सिद्ध तोचि जाणिजे । पुढिले समासीं ॥ ६० ॥ येथें संशय उठिला । निस्पृह तोचि साधक झाला । त्याग न घडे संसारिकाला । तरी तो साधक नव्हे कीं ॥ ६१ ॥ ऐसें श्रोतयांचें उत्तर । त्याचें कैसें प्रत्युत्तर । पुढिले समासीं तत्पर । होऊनि ऐका ॥ ६२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचमदशके साधकलक्षणनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. सिद्धलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ मागें बोलिला संसारिक । त्यागेंविण नव्हे कीं साधक । ऐका याचा विवेक । ऐसा असे ॥ १ ॥ सन्मार्ग तोचि जीवीं धरणें । असन्मार्गाचा त्याग करणें । संसारिका त्याग येणें । प्रकारें ऐसा ॥ २ ॥ कुबुद्धित्यागाविणें कांहीं । सुबुद्धि लागणार नाहीं । सांसारिका त्याग पाहीं । ऐसा असे ॥ ३ ॥ प्रपंचीं वीट मानिला । मनें विषयत्याग केला । तरीच पुढें अवलंबिला । परमार्थमार्ग ॥ ४ ॥ त्याग घडे अभावाचा[१] । त्याग घडे संशयाचा । त्याग घडे अज्ञानाचा । शनैःशनैः[२] ॥ ५ ॥ ऐसा सूक्ष्म अंतरत्याग[३] । उभयतांस घडे सांगे[४] । निस्पृहास बाह्यत्याग[५] । विशेष घडे ॥ ६ ॥ संसारिका ठायीं ठायीं । बाह्यत्याग घडे कांहीं । नित्यनेम श्रवण नाहीं । त्यागेंविण ॥ ७ ॥ फिटली आशंका स्वभावें । त्यागेंविण साधक नव्हे । पुढें कथेच्या अन्वयें । सावध ऐका ॥ ८ ॥ मागां झालें निरूपण । साधकाची वोळखण । आतां सांगिजेल खूण । सिद्ध लक्षणाची ॥ ९ ॥ साधु वस्तु[६] होऊनि ठेला । संशय ब्रह्मांडाबाहेरि गेला । निश्चय चळेना ऐसा झाला । या नांव सिद्ध ॥ १० ॥ बद्धपणाचे अवगुण । मुमुक्षुपणीं नाहीं जाण । मुमुक्षुपणाचें लक्षण । साधकपणीं नाहीं ॥ ११ ॥ साधकास संदेहवृत्ती । पुढें होतसे निवृत्ती[७] । याकारणें निःसंदेह श्रोतीं । साधु वोळखावा ॥ १२ ॥ संशयरहित जें ज्ञान । तेंचि साधूचें लक्षण । सिद्धाअंगीं संशय जाण । लागेल कैसा ॥ १३ ॥ कर्ममार्ग संशयें भरला । साधनीं संशय कालवला ।

---

१. अश्रद्धेचा. २. हळुहळु. ३. आसक्तीचा त्याग. ४. समग्र. ५. विषयांचा प्रत्यक्ष त्याग. ६. ब्रह्म. ७. संशयाचें निवारण.

सर्वांमध्यें संशय भरला । साधु तो निःसंदेह ॥ १४ ॥ संशयाचें ज्ञान खोटें । संशयाचें वैराग्य पोरटें । संशयाचें भजन खोटें । निष्फळ होय ॥ १५॥ व्यर्थ संशयाचा देव । व्यर्थ संशयाचा भाव । व्यर्थ संशयाचा स्वभाव । निश्चयेंविण ॥ १६ ॥ व्यर्थ संशयाचें व्रत । व्यर्थ संशयाचें तीर्थ । व्यर्थ संशयाचा परमार्थ । निश्चयेंविण ॥ १७ ॥ व्यर्थ संशयाची भक्ती । व्यर्थ संशयाची प्रीती । व्यर्थ संशयाची संगती । संशय वाढवी ॥ १८ ॥ व्यर्थ संशयाचें जिणें । व्यर्थ संशयाचें धरणें । व्यर्थ संशयाचें करणें । सर्व कांहीं ॥ १९ ॥ व्यर्थ संशयाची पोथी । व्यर्थ संशयाची व्युत्पत्ती[1] । व्यर्थ संशयाची गती । निश्चयेंविण ॥ २० ॥ व्यर्थ संशयाचा दक्ष । व्यर्थ संशयाचा पक्ष । व्यर्थ संशयाचा मोक्ष । होणार नाहीं ॥ २१ ॥ व्यर्थ संशयाचा संत । व्यर्थ संशयाचा पंडित । व्यर्थ संशयाचा बहुश्रुत । निश्चयेंविण ॥२२॥ व्यर्थ संशयाची श्रेष्ठता । व्यर्थ संशयाची व्युत्पन्नता[1] । व्यर्थ संशयाचा ज्ञाता । निश्चयेंविण ॥२३॥ निश्चयेंविण सर्व कांहीं । अणुमात्र तें प्रमाण नाहीं । व्यर्थचि पडिले प्रवाहीं । संदेहाचे ॥ २४ ॥ निश्चयेंविण जें बोलणें । तें अवघेंचि कंटाळवाणें । बाष्कळ बोलिजे वाचाळपणें । निरर्थक ॥ २५ ॥ असो निश्चयेंविण जे वल्गना । ते अवघी विटंबना । संशयें कांहीं समाधाना । उरी नाहीं ॥ २६ ॥ म्हणोनि संदेहरहित ज्ञान । निश्चयाचें समाधान । तेंचि सिद्धांचें लक्षण । निश्चयेंसी ॥ २७ ॥ तंव श्रोता करी प्रश्न । निश्चय करावा कवण । मुख्य निश्चयाचें लक्षण । मज निरूपावें ॥ २८ ॥ ऐक निश्चय तो ऐसा । मुख्य देव आहे कैसा । नाना देवांचा वेळसा[2] । करूंचि नये ॥ २९ ॥ जेणें निर्मिलें चराचर । त्याचा करावा विचार । शुद्ध विवेकें परमेश्वर । वोळखावा ॥ ३० ॥ मुख्य देव तो कोण । भक्ताचें कैसें लक्षण । असत्य सांडून वोळखण । सत्याची धरावी ॥ ३१ ॥ आपल्या देवास वोळखावें । मग मी कोण हें पाहावें । संग त्यागून राहावें । वस्तुरूप ॥ ३२ ॥ तोडावा बंधनाचा संशय । करावा मोक्षाचा निश्चय । पहावा भूतांचा अन्वय । व्यतिरेक ॥ ३३ ॥ पूर्वपक्षेंसि सिद्धांत । पहावा प्रकृतीचा अंत । मग पावावा निवांत । निश्चय देवाचा ॥ ३४ ॥ देहाचेनि योगें संशय ।

१. विद्वत्ता. २. घोंटाळा.

करी समाधानाचा क्षय । तरी चळों न द्यावा निश्चय । आत्मत्वाचा ॥ ३५॥ सिद्ध असतां आत्मज्ञान । संदेह वाढवी देहाभिमान । याकारणें समाधान । आत्मनिश्चयें राखावें ॥ ३६ ॥ आठवतां देहबुद्धी । उडे विवेकाची शुद्धी । या कारणें आत्मबुद्धी । सदृढ धरावी ॥ ३७ ॥ आत्मबुद्धि निश्चयाची । तेचि दशा मोक्षश्रीची । अहमात्मा[1] हें कधींचि । विसरूं नये ॥ ३८ ॥ निरूपिलें निश्चयाचें लक्षण । परी हें न कळे सत्संगेंविण । संतांसि गेलिया शरण । संशय तुटती ॥ ३९ ॥ आतां असो हें बोलणें । ऐका सिद्धाचीं लक्षणें । मुख्य निःसंदेहपणें । सिद्ध बोलिजे ॥ ४० ॥ सिद्धस्वरूपीं नाहीं देहो । तेथें कैंचा हो संदेहो । याकारणें सिद्ध पाहा हो । निःसंदेही ॥ ४१ ॥ देहसंबंधाचेनि गुणें । लक्षणांसि काय उणें । देहातीताचीं[2] लक्षणें । काय म्हणोनि सांगावीं ॥ ४२ ॥ जें लक्षवेना चक्षूंसी । त्याचीं लक्षणें सांगावीं कैसीं । निर्मळ वस्तु सिद्ध त्यासी । लक्षणें कैंचीं ॥ ४३ ॥ लक्षणें म्हणिजे केवळ गुण । वस्तु ठायींच निर्गुण । तेंचि सिद्धाचें लक्षण । वस्तुरूपें ॥ ४४ ॥ तथापि ज्ञानदशकीं[3] बोलिलें । म्हणोनि वक्तृत्व आटोपिलें । न्यूनपूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ॥ ४५ ॥ इतिश्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचमदशके सिद्धलक्षणनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी ५७२.

---

# दशक सहावा.

## १. देवशोधन.

श्रीगणेशाय नमः ॥ चित्त सुचित करावें । बोलिलें तें जीवीं धरावें । सावध होऊन बैसावें । निमेष एक ॥ १ ॥ कोणी एके ग्रामीं अथवा देशीं । राहणें आहे आपणाशीं । न भेटतां तेथिल्या प्रभूशीं । सौख्य कैंचें ॥ २ ॥ म्हणोन ज्यास जेथें राहणें । तेणें त्या प्रभूची भेटी घेणें । म्हणिजे होय श्लाघ्यवाणें[4] । सर्व कांहीं ॥ ३ ॥ प्रभूची भेटी न घेतां । तेथें कैंची मान्यता । आपुलें महत्त्व जातां । वेळ नाहीं ॥ ४ ॥ म्हणोन रायापासून रंक । कोणी एक तरी नायक । त्यास भेटणें हा विवेक । विवेकी जाणती ॥ ५ ॥ त्यास

१. मी आत्मा आहें, देह नव्हे. २. देहाहंभाव गळलेल्या साधूचीं. ३. आठव्या दशकांत. ४. चांगलें.

न भेटतां त्याचे नगरीं । राहतां धरितील बेगारी[1] । तेथें न करितां चोरी । अंगीं लागे ॥ ६ ॥ या कारणें जो शाहणा । तेणें प्रभूस भेटावें जाणा । ऐसें न करितां दैन्यवाणा । संसार त्याचा ॥ ७ ॥ ग्रामीं थोर ग्रामाधिपती । त्याहून थोर देशाधिपती । देशाधिपतीहून नृपती । थोर जाणावा ॥ ८ ॥ राष्ट्राचा प्रभु तो राजा । बहुराष्ट्र तो महाराजा । महाराजाचाही राजा । तो चक्रवर्ती[2] ॥ ९ ॥ एक नरपति एक गजपति । एक हयपति एक भूपती । सकळांमध्यें चक्रवर्ती । थोर राजा ॥ १० ॥ असो ऐसिया समस्तां । एक ब्रह्मा निर्माणकर्ता । त्या ब्रम्ह्यासहि निर्मिता । कोण आहे ॥ ११ ॥ ब्रह्मा विष्णु आणि हर । त्यांसि निर्मिता तोचि थोर । तो वोळखावा परमेश्वर । नाना यत्नें ॥ १२ ॥ तो देव ठायीं पडेना[3] । तरी यमयातना चुकेना । ब्रह्मांडनायक चोजवेना[4] । हें बरें नव्हे ॥ १३ ॥ जेणें संसारीं घातलें । अवघें ब्रह्मांड निर्माण केलें । त्यासि नाहीं वोळखिलें । तोचि पतित ॥ १४ ॥ म्हणोनि देव वोळखावा । जन्म सार्थकचि करावा । न कळे तरी सत्संग धरावा । म्हणजे कळे ॥ १५ ॥ जो जाणेल भगवंत । तया नांव बोलिजे संत । जो शाश्वत आणि अशाश्वत । निवाडा करी ॥ १६ ॥ चळेना डळेना देव । ऐसा ज्याचा अंतर्भाव । तोचि जाणिजे महानुभाव[5] । तोचि साधु ॥ १७ ॥ जो जनांमध्यें वागे । परी जनांवेगळी गोष्टी सांगे । ज्याचे अंतरीं ज्ञान जागे । तोचि साधु ॥ १८ ॥ जाणिजे परमात्मा निर्गुण । त्यासीच म्हणावें ज्ञान । त्यावेगळें तें अज्ञान । सर्व कांहीं ॥ १९ ॥ पोट भरावयाकारणें । नाना विद्या अभ्यास करणें । त्यास ज्ञान म्हणती परी तेणें । सार्थक नव्हे ॥ २० ॥ देव वोळखावा एक । तेंचि ज्ञान तेंचि सार्थक । येर अवघेंचि निरर्थक । पोटविद्या ॥ २१ ॥ जन्मवरी पोट भरिलें । देहाचें संरक्षण केलें । पुढें अवघेंचि व्यर्थ गेलें । अंतकाळीं ॥ २२ ॥ एवं[6] पोट भरायाची विद्या । तयेसि म्हणों नये सद्विद्या । सर्वव्यापक वस्तु सद्या[7] । पाविजे तें ज्ञान ॥ २३ ॥ ऐसें जयापाशीं ज्ञान । तोचि जाणावा सज्ञान । तयापाशीं समाधान । पुसिलें पाहिजे ॥ २४ ॥ अज्ञानास भेटतां अज्ञान । तेथें कैचें सांप-

---

१. वेठीस. २. सार्वभौम. ३. हातीं येईना. ४. जाणवेना. ५. थोर पुरुष. ६. याप्रकारें. ७. प्रत्यक्ष.

डेल ज्ञान। करंड्यास करंड्याचें दर्शन । होतां भाग्य कैंचें ॥ २५ ॥ रोग्यापाशीं रोगी गेला । तेथें कैंचें आरोग्य त्याला । निर्बळापाशीं निर्बळाला । पाठीं[1] कैंची ॥ २६ ॥ पिशाच्चापाशीं पिशाच्च गेलें । तेथें कोण सार्थक झालें । उन्मत्तास[2] उन्मत्त भेटलें । त्यास उमजवी कवण ॥ २७ ॥ भिकाऱ्यापाशीं मागतां भिक्षा । दीक्षाहीनापाशीं दीक्षा । उजेड पाहतां कृष्णपक्षा[3] । पाविजे कैचा ॥ २८ ॥ अबुद्धापाशीं गेला अबुद्ध[4] । तो कैसेनि होईल सुबुद्ध । बद्धास भेटतां बद्ध[5] । सिद्ध[6] नव्हे ॥ २९ ॥ देह्यापाशीं गेला देही । तो कैसेनि होईल विदेही[6] । म्हणोनि ज्ञात्यावांचूनि नाहीं । ज्ञानमार्ग ॥ ३० ॥ या कारणें ज्ञाता पहावा । त्याचा अनुग्रह घ्यावा । सारासारविचारें जीवा । मोक्ष प्राप्त ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके देवशोधननिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. ब्रह्मप्रतिपादन.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका उपदेशाचीं लक्षणें । सायुज्यप्राप्ति होय जेणें । नानामतांचें पेखणें । कामा नये सर्वथा ॥ १ ॥ ब्रह्मज्ञानाविण उपदेश । तो म्हणों नये विशेष । धान्येंविण जैसें भूस । खातां नये ॥ २ ॥ नाना कांबाड[8] बडविलें । ना तरी तक्रचि घुसळिलें । अथवा धुवणचि सेविलें । सावकाश ॥ ३ ॥ नाना साली भक्षिल्या । अथवा चोइट्या चोखिल्या । खोबरें सांडून खादल्या । नरोट्या जैशा ॥४॥ तैसें ब्रह्मज्ञानाविण । नाना उपदेशांचा शिण । सार सांडून असार कोण । शाहणा सेवी ॥ ५ ॥ आतां ब्रह्म जें कां निर्गुण । तेंचि केलें निरूपण । सुचित करावें अंतःकरण । श्रोतेजनीं ॥ ६ ॥ सकळ सृष्टीची रचना । तें हें पांचभौतिक[10] जाणा । परंतु हें तगेना । सर्वकाळ ॥ ७ ॥ आदि अंतीं ब्रह्म निर्गुण । तेंचि शाश्वताची खूण । येर पांचभौतिक सगुण । नाशवंत ॥ ८ ॥ येरवीं हीं पाहतां भूतें । देव कैसें म्हणावें त्यांतें । भूत म्हणतां मनुष्यातें । विषाद वाटे ॥ ९ ॥ मीं[11] तो जगन्नायक परमात्मा । त्यासि आणी भूत उपमा । ज्याची कळेना महिमा ।

---

१. आधार. २. वेड्यास. ३. काळोख्याचे दिवसांत. ४. अज्ञानी. ५. संसारी. ६. मुक्त. ७. उपदेश. ८. पाहणें. ९. पाचोळा. १०. जड सृष्टि. ११. मग.

ब्रह्मादिकांसी ॥ १० ॥ भूतांऐसा जगदीश । म्हणतां उत्पन्न होतो दोष या कारणें महापुरुष । सर्व जाणती ॥ ११ ॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश यां सबाह्य[1] जगदीश । पंचभूतांस आहे नाश । आत्मा अविनाशरूपी ॥ १२ ॥ जें जें रूप आणि नाम । तो तो अवघाच भ्रम । नामरूपातीत वर्म । अनुभवें जाणावें ॥ १३ ॥ पंचभूतें आणि त्रिगुण । ऐसी अष्टधा प्रकृति जाण । अष्टधा प्रकृतीस नामाभिधान । दृश्य ऐसें ॥ १४ ॥ तें हें दृश्य नाशवंत । ऐसें वेदश्रुती बोलत । निर्गुण ब्रह्म शाश्वत । जाणती ज्ञानी ॥ १५ ॥ जें शस्त्रें तोडितां तुटेना । जें पावकें[2] जाळितां जळेना । जें कालवितां कालवेना । आपें[3]करूनी ॥ १६ ॥ जें वायूचेनि उडेना । जें पडेना ना[4] झडेना । जें घडेना ना दडेना । परब्रह्म तें ॥ १७ ॥ ज्यासि वर्णचि नसे । जें सर्वांहूनि अनारिसें[5] । परंतु असतचि जसे । सर्वकाळ ॥ १८ ॥ दिसेना तरी काय झालें । परंतु सर्वत्र संचलें । सूक्ष्मचि कोंदाटलें । जेथें तेथें ॥ १९ ॥ दृष्टीस लागली सवे । जें दिसेल तेंचि पाहावें । परंतु गुज तें जाणावें । गौप्य आहे ॥ २० ॥ प्रगट तें जाणावें असार । आणि गुप्त तें जाणावें सार । गुरुमुखें हा विचार । उमजों लागे ॥ २१ ॥ उमजेना तें उमजवावें । दिसेना तें पाहावें । जें कळेना तें जाणावें । विवेकबळें ॥ २२ ॥ गुप्त तेंचि प्रगटवावें । असाध्य तेंचि साधावें । कानडें[6]चि अभ्यासावें । सावकाश ॥ २३ ॥ वेद विरंचि[7] आणि शेष । जेथें शिणले निःशेष । तेंचि साधावें विशेष । परब्रह्म ॥ २४ ॥ तरी तें कोण परिसावें । तेंचि बोलिलें स्वभावें । अध्यात्मश्रवणें पावावें । परब्रह्म तें ॥ २५ ॥ पृथ्वी नव्हे आप नव्हे । तेज नव्हे वायु नव्हे । वर्णव्यक्ति ऐसें नव्हे । अव्यक्त[8] तें ॥ २६ ॥ तयास म्हणावें देव । वरकड लोकांचा स्वभाव । जितुके गांव तितुके देव । जनाकारणें ॥ २७ ॥ ऐसा देवाचा निश्चय झाला । देव निर्गुण प्रत्यया आला । आतां आपणचि आपला । शोध घ्यावा ॥ २८ ॥ माझें शरीर ऐसें म्हणतो । तरी तो जाण देहावेगळाचि होतो । मन माझें ऐसें जाणतो । तरी तो मनहि नव्हे ॥ २९ ॥ पाहतां देहाचा विचार । अवघा तत्वांचा विस्तार । तत्वें तत्व झाडितां सार ।

---

१. अंतर्बाह्य. २. अग्नीनें. ३. उदकानें. ४. अथवा. ५. निराळें. ६. अवघड तेंच. ७. ब्रह्मदेव. ८. अदृश्य.

आत्माचि उरे ॥३०॥ आपणासि ठावचि नाहीं । तेथे पहाणें नलगे कांहीं । तत्वें ठायींच्या ठायीं । विभागूनि गेलीं ॥३१॥ बांधली आहे ती गांठोडी । जो कोणी विचारें सोडी । विचार पाहतां गांठोडी । आढळेना ॥ ३२ ॥ तत्वांचें गांठोडें शरीर । याचा पाहतां विचार । एक आत्मा निरंतर । आपण नाहीं ॥ ३३ ॥ आपणासि ठावचि नाहीं । जन्ममृत्य कैंचे काई । पाहतां वस्तूच्या ठायीं । पाप पुण्य नसे ॥ ३४ ॥ पाप पुण्य यमयातना । हें निर्गुणीं तों असेना । आपण तोचि तरी जन्ममरणा । ठाव कैंचा ॥ ३५ ॥ देहबुद्धीनें बांधला । तो विवेकें मोकळा केला । देहातीत होतां पावला । मोक्षपद ॥ ३६ ॥ झालें जन्माचें सार्थक । निर्गुण आत्मा आपण एक । परंतु हा विवेक । पाहिलाचि पाहावा ॥ ३७ ॥ जागें होतां स्वप्न सरे । विवेक पाहतां दृश्य वोसरे । स्वरूपानुसंधानें तरे । प्राणिमात्र ॥ ३८ ॥ आपणास निवेदावें । आपण विवेकें नुरावें । आत्मनिवेदन जाणावें । यांचें नांव ॥ ३९ ॥ आधीं अध्यात्मश्रवण । मग सद्गुरुपादसेवन । पुढें आत्मनिवेदन । सद्गुरुप्रसादें ॥ ४० ॥ आत्मनिवेदनाउपरी । निखळ[1] वस्तु निरंतरी । आपण आत्मा हा अंतरीं । बोध जाहला ॥ ४१ ॥ त्या ब्रह्मबोधें ब्रह्मचि झाला । संसारखेद तो उडाला । देह प्रारब्धीं टाकिला[2] । सावकाश ॥ ४२ ॥ यासि म्हणिजे आत्मज्ञान । येणें पाविजे समाधान । परब्रह्मीं अभिन्न[3] । भक्तचि जाहला ॥ ४३ आतां होणार तें होइना कां । आणि जाणार तें जाइना कां । तुटली मनांतील आशंका । जन्ममृत्यूची ॥ ४४ ॥ संसारीं बुडावें चुकलें । देवां भक्तां ऐक्य झालें । मुख्य देवास वोळखिलें । सत्संगेंकरूनी ॥ ४५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके ब्रह्मप्रतिपादननिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. मायोद्भव.

श्रीगणेशाय नमः ॥ निर्गुण आत्मा तो निर्मळ । जैसें आकाश अंतराळ । घनदाट निर्मळ निश्चळ । सदोदित ॥ १ ॥ जे खंडलेंचि नाहीं अखंड । जें उदंडाहूनि उदंड । जें गगनाहूनि वाड[4] । अति सूक्ष्म ॥ २ ॥ जें दिसेना ना

---

१. शुद्ध. २. देहसुखाचा प्रयत्न सोडिला, हा अर्थ. ३. एकरूप. ४. मोठें.

भासेना । जें उपजेना ना नासेना । जें येईना ना जाईना । परब्रह्म तें ॥ ३ ॥ जें चळेना ना ढळेना । जें तुटेना ना फुटेना । जें रचेना ना खचेना । परब्रह्म तें ॥ ४ ॥ जें सन्मुखचि सर्वकाळ । जें निष्कलंक आणि निखळ । सर्वांतर आकाश पाताळ । व्यापूनि असे ॥ ५ ॥ अविनाश तें ब्रह्म निर्गुण । नासे ते माया सगुण । सगुण आणि निर्गुण । कालवलें ॥ ६ ॥ या कर्दमाचा[1] विचार । करूं जाणती योगेश्वर । जैसें क्षीरें[2] आणि नीरें[3] । राजहंस निवडिती ॥ ७ ॥ जड सकळ पांचभौतिक । त्यामध्यें आत्मा व्यापक । तो नित्यानित्य विवेक । पाहतां कळे ॥ ८ ॥ ऊंसामधील घेइजे रस । येर तें सांडिजे बाकस[4] । तैसा जगामध्यें जगदीश । विवेकें वोळखावा ॥ ९ ॥ रस नाशवंत पातळ । आत्मा शाश्वत निश्चळ । रस अपूर्ण आत्मा केवळ । परिपूर्ण जाणावा ॥ १० ॥ आत्म्यासारिखें एक असावें । मग तें दृष्टांतासि द्यावें । दृष्टांतमिषें समजावें । कैसें तरी ॥ ११ ॥ ऐसी आत्मस्थिति संचली । तेथें माया कैसी झाली । जैशी आकाशीं वाहिली । झुळूक वायूची ॥ १२ ॥ वायूपासून तेज झालें । तेजापासून आप निपजलें । आपापासून आकारलें । भूमंडळ ॥ १३ ॥ भूमंडळापासून उत्पत्ती । जीव नेणों झाले किती । परंतु ब्रह्म आदि अंतीं । व्यापूनि आहे ॥ १४ ॥ जें जें कांहीं निर्माण झालें । तें तें अवघेंचि नासलें । परी मूळीं ब्रह्म तें संचलें । जैसें तैसें ॥ १५ ॥ घटापूर्वीं आकाश असे । घटामध्येंहि आकाश भासे । घट फुटतां न नासे । आकाश जैसें ॥ १६ ॥ तैसें परब्रह्म केवळ । अचळ आणि अढळ । मध्यें होत जात सकळ । चराचर ॥ १७ ॥ जें जें कांहीं निर्माण झालें । तें तें आधीं ब्रह्में व्यापिलें । सर्व नासतां उरलें । अविनाश ब्रह्म ॥ १८ ॥ ऐसें ब्रह्म अविनाश । तेंचि सेविती ज्ञाते पुरुष । तत्वनिरसनें आपणास । आपण लाभे ॥१९॥ तत्वें तत्व मेळविलें । त्यासि देह ऐसें नाम ठेविलें । तें जाणते पुरुषीं शोधिलें । तत्वें तत्व ॥ २० ॥ तत्वझाडा निःशेष होतां । तेथें निमाली[5] देहअहंता[6] । निर्गुण ब्रह्मीं ऐक्यता । विवेकें जाहली ॥ २१ ॥ विवेकें देहाकडे पाहिलें । तों तत्वें तत्व वोसरलें । आपण कांहीं नाहीं आलें । प्रत्य-

१. सगुणनिर्गुणाच्या मिश्रणाचा. २. दूध. ३. उदक. ४. चिपाड. ५. आत्मरूपाचें ज्ञान झालें. ६. देहच मी अशी भावना.

यासी ॥ २२ ॥ आपला आपण शोध घेतां । आपली तों मायिक वार्ता । तत्वांतीं उरलें तत्वता । निर्गुण ब्रह्म ॥ २३ ॥ आपणाविणें निर्गुण ब्रह्म । हेंचि निवेदनाचें वर्म । तत्वासारिसा[1] गेला भ्रम । मीतूंपणाचा ॥ २४ ॥ मीपण पाहतां आढळेना । निर्गुण ब्रह्म तें चळेना । आपण तेंचि परी कळेना । सद्गुरूविण ॥२५॥ सारासार अवघें शोधिलें । तों असार तें निघून गेलें । पुढें सार तें उरलें । निर्गुण ब्रह्म ॥ २६ ॥ आधीं ब्रह्म निरूपिलें । तेंचि सकळांमध्यें व्यापिलें । सकळ अवघेंचि नासलें । उरलें तें केवळ ब्रह्म ॥ २७ ॥ होतां विवेकें संहार । तेथें निवडे सारासार । आपला आपणासि विसर । ठायीं पडे ॥ २८ ॥ आपण कल्पिलें मीपण । मीपण शोधितां नुरे जाण । मीपण गेलिया निर्गुण । आत्माचि स्वयें ॥ २९ ॥ झालिया तत्वांचें निरसन । निर्गुण आत्माचि आपण । कां दाखवावें मीपण । तत्वनिरसनाउपरि ॥ ३० ॥ तत्वांमध्यें मीपण गेलें । तरी निर्गुण सहजचि उरलें । सोहंभावें[2] प्रत्यया आलें । आत्मनिवेदन[3] ॥ ३१ ॥ आत्मनिवेदन होतां । देवभक्तांस ऐक्यता । साचार भक्त विभक्तता । सांडूनि जाहला ॥ ३२ ॥ निर्गुणासि नाहीं जन्ममरण । निर्गुणासि नाहीं पापपुण्य । निर्गुणीं अनन्य होतां आपण । मुक्त जाहला ॥ ३३ ॥ तत्वीं वेंटाळूनि घेतला । प्राणी संशयें गुंडाळला । आपणास आपण भुलला । कोहं[4] म्हणे ॥ ३४ ॥ तत्वीं गुंतला म्हणे कोहं । विवेकें पाहतां म्हणे सोहं[5] । अनन्य होतां अहं सोहं । मावळलीं ३५ ॥ याउपरी उर्वरितं[6] । तेंचि सत्स्वरूप संत । देहीं असोनि देहातीत । जाणिजे ऐसा ॥ ३६ ॥ संदेहवृत्ति ते न भंगे । म्हणोनि बोलिलेंच बोलावें लागे । आम्हांसि हें घडलें प्रसंगें । श्रोतीं क्षमा केली पाहिजे ॥ ३७ ॥ इतिश्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके मायोद्भवनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. ब्रह्मनिरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ कृतयुग सत्रा लक्ष अठ्ठावीस सहस्र । त्रेतायुग

---

१. तत्वांच्या निरसनाबरोबर. २. देव म्हणजे मीच, या भावनेनें. ३. आत्मरूपाचें ज्ञान. ४. मी कोण आहे ? ५. तो देवच मी. ६. बाकी राहिलेलें.

बारा लक्ष शहाण्णव सहस्र। द्वापर आठ लक्ष चौसष्ट सहस्र। आतां कलियुग ऐका ॥ १ ॥ कलियुग चार लक्ष बत्तीस सहस्र। चतुर्युगें बेचाळीस लक्ष वीस सहस्र। ऐशीं चतुर्युगें सहस्र। तो ब्रह्मयाचा एक दिवस ॥ २ ॥ ऐसे ब्रह्मे सहस्र देखा। तेव्हां विष्णूची एक घटिका। विष्णु सहस्र होतां ऐका। पळ एक ईश्वराचें ॥ ३ ॥ ईश्वर जाय सहस्रवेळ। तें शक्तीचें अर्ध पळ। ऐसी संख्या बोलिली सकळ। शास्त्रांतरीं ॥ ४ ॥ ऐशा अनंत शक्ति होती। अनंत रचना होती जाती। तरी अखंड खंडेना स्थिती। परब्रह्माची ॥ ५ ॥ परब्रह्मासि कैंची स्थिती। परी ही बोलावयाची रीती। वेदश्रुती नेतिनेती[1] परब्रह्मीं ॥ ६ ॥ चार सहस्र सातशें साठी। इतुकी कलियुगाची राहटी[2]। उरल्या कलियुगाची गोष्टी। ऐसी असे ॥ ७ ॥ चार लक्ष सत्तावीस सहस्र। दोनशें चाळीस संवत्सर। पुढें अन्योन्य वर्णसंकर। होणार आहे ॥ ८ ॥ ऐसे रचलें चराचर। येथें एकाहूनि एक थोर। पाहतां येथींचा विचार। अंत न लागे ॥ ९ ॥ एक म्हणती विष्णु थोर। एक म्हणती रुद्र थोर। एक म्हणती शक्ति[3] थोर। सकळांमध्यें ॥ १० ॥ ऐसे आपुलालेपरी बोलती। परंतु अवघेंचि नासेल कल्पांतीं। यद्दृष्टं[4] तन्नष्टं हे श्रुती। बोलतसे ॥ ११ ॥ आपुलाली उपासना। अभिमान लागला जनां। याचा निश्चय निवडेना। साधूविण ॥ १२ ॥ साधु निश्चय करिती एक। आत्मा सर्वत्र व्यापक। येर हें अवघेंचि मायिक। चराचर ॥ १३ ॥ चित्रीं लिहिली सेना। त्यांत कोण थोर कोण साना। हें कां तुह्मी विचाराना। आपुले ठायीं ॥ १४ ॥ स्वप्नीं उदंड देखिलें। लहान थोरहि कल्पिलें। परंतु जागें झालिया झालें। कैसें पाहा ॥ १५ ॥ पाहतां जागृतीचा विचार। कैचें लहान कैचें थोर। झाला अवघा विचार। स्वप्नरचनेचा ॥ १६ ॥ अवघाचि मायिक विचार। कैचें लहान कैचें थोर। लहानथोर हा निर्धार। जाणती ज्ञानी ॥ १७ ॥ जो जन्मास प्राणी आला। तो मी थोर ह्मणतांच मेला। परी याचा विचार राहिला। पाहिजे श्रेष्ठीं ॥ १८ ॥ जयांस झालें आत्मज्ञान। तेचि थोर महाजन। वेदशास्त्रपुराण। साधु संत बोलिले ॥ १९ ॥ एवं सकळांमध्यें

१. हें ब्रम्ह नव्हे, तें ब्रम्ह नव्हे, असें सांगतात; हें ब्रम्ह होय, असें सांगत नाहींत. २. मर्यादा ३. देवी. ४. जें दिसतें तें नाशवंत.

थोर । तो एकचि परमेश्वर । तयामध्यें हरिहर । होती जाती ॥ २० ॥ तो निर्गुण निराकार । तेथें नाहीं उत्पत्ति स्थिति संहार । स्थानमानांचा विचार । ऐलीकडे ॥ २१ ॥ नांव रूप स्थान मान । हा तो अवघाचि अनुमान । तथापि होईल निदानें[1] । ब्रह्मप्रळेयीं[2] ॥ २२ ॥ ब्रह्म प्रलयावेगळें । ब्रह्म नांवरूपा वेगळें । ब्रह्म कोणी एक्या काळें । जैसें तैसें ॥ २३ ॥ करिती ब्रह्मनिरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण । तेचि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद ॥ २४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके ब्रह्मनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. मायाब्रह्म.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रोते पुसती ऐसें । मायाब्रह्म तें कैसें । श्रोत्यावक्त्याचे मिषें । निरूपण ऐका ॥ १ ॥ ब्रह्म निर्गुण निराकार । माया सगुण साकार । ब्रह्मासि नाहीं पारावार । मायेसि आहे ॥२॥ ब्रह्म निर्मळ निश्चळ । माया चंचळ चपळ । ब्रह्म निरुपाधि केवळ । माया उपाधिरूप ॥ ३ ॥ माया दिसे ब्रह्म दिसेना । माया भासे ब्रह्म भासेना । माया नासे ब्रह्म नासेना । कल्पांतकाळीं ॥ ४ ॥ माया रचे ब्रह्म रचेना । माया खचे ब्रह्म खचेना । माया रुचे ब्रह्म रुचेना । अज्ञानासी ॥ ५ ॥ माया उपजे ब्रह्म उपजेना । माया मरे ब्रह्म मरेना । माया धरे ब्रह्म धरेना । धारणेसी ॥ ६ ॥ माया फुटे ब्रह्म फुटेना । माया तुटे ब्रह्म तुटेना । माया विटे ब्रह्म विटेना । अविट तें ॥ ७ ॥ माया विकारी ब्रह्म निर्विकारी । माया करी ब्रह्म कांहींच न करी । माया नानारूपें धरी । ब्रह्म तें अरूप ॥ ८ ॥ माया पांचभौतिक अनेक । ब्रह्म तें शाश्वत एक । मायाब्रह्माचा विवेक । विवेकी जाणती ॥ ९ ॥ माया लहान ब्रह्म थोर । माया असार ब्रह्म सार । माया अर्तां[3] पारावार । ब्रह्मास नाहीं ॥ १० ॥ सकळ माया विस्तारली । ब्रह्मस्थिति आच्छादिली । परी ते निवडून घेतली । साधुजनीं ॥ ११ ॥ गोंडाळें[4] सांडून नीरें[5] घेइजे । नीर सांडून क्षीरें[6] सेविजे । माया सांडून अनु-

---

१. शेवट. २. ब्रह्मदेवाचीं शंभर वर्षे भरलीं म्हणजे होणाऱ्या प्रलयांत. ३. मर्यादित. ४. पाण्याचे पृष्ठावर वाढणारी एक वनस्पती. ५. पाणी. ६. दूध.

भाविजे । परब्रह्म तैसें ॥ १२ ॥ ब्रह्म आकाशाऐसें निवळ । माया वसुंधरा डहुळे[1] । ब्रह्म सूक्ष्म केवळ । माया स्थूळरूप ॥ १३ ॥ ब्रह्म तें अप्रत्यक्ष असे । माया ते प्रत्यक्ष दिसे । ब्रह्म तें समचि असे । माया ते विषम-रूप ॥ १४ ॥ माया लक्ष्य[2] ब्रह्म अलक्ष । माया साक्ष[3] ब्रह्म असाक्ष । माये-मध्यें दोनी पक्ष । ब्रह्मीं पक्षचि नाहीं १५॥ माया पूर्वपक्ष[4] ब्रह्म सि-द्धांत । माया असत् ब्रह्म सत । ब्रह्मासि नाहीं कारणें हेत । मायेसि आहे ॥ १६ ॥ ब्रह्म अखंड घनदाट । माया पांचभौतिक पोंचट । ब्रह्म तें निरंतर निघोट[5] । माया ते जुनी जर्जरी ॥ १७ ॥ माया घडे ब्रह्म घडेना । माया पडे ब्रह्म पडेना । माया विघडे ब्रह्म विघडेना । जैसें तैसें ॥ १८ ॥ ब्रह्म असतचि असे । माया निरसतांच निरसे । ब्रह्म संकल्पांत नसे । माये-सि असे संकल्प ॥ १९ ॥ माया कठिण ब्रह्म कोमळ । माया अल्प ब्रह्म विशाळ । माया नसे सर्वकाळ । ब्रह्मचि असे ॥ २० ॥ वस्तु नव्हे बोलिजे ऐशी । माया जैशी बोलिजे तैसी । काळ पावेना वस्तूसी । मायेसि झडपी ॥ २१ ॥ नाना रूप नाना रंग । तितुका मायेचा प्रसंग[6] । माया भंगे ब्रह्म अभंग । जैसें तैसें ॥ २२ ॥ आतां असो हा विस्तार । चालत जातें सच-राचर । तितुकी माया परमेश्वर । सबाह्य अभ्यंतरीं ॥ २३ ॥ सकळ उपाधीवेगळा । तो परमात्मा निराळा । जळीं असोन नातळे जळा । आ-काश जैसें ॥ २४ ॥ मायाब्रह्माचें विवरण । करितां चुके जन्ममरण । संतांसि गेलिया शरण । मोक्ष लाभे ॥ २५ ॥ अरे या संतांचा महिमा । बोलावया नाहीं सीमा । जयाचेनि जगदात्मा । अंतरींच होय ॥ २६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके मायाब्रह्मनिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. सृष्टिकथन.

श्रीगणेशाय नमः ॥ सृष्टिपूर्वींच ब्रह्म असे । तेथें सृष्टि मुळींच नसे । आतां सृष्टि दिसत असे । ते सत्य कीं मिथ्या ॥ १ ॥ तुम्ही सर्वज्ञ गोसांवी ।

१. गढूळ. २. लक्षांत आणण्यास योग्य. ३. प्रत्यक्ष. ४. पूर्वपक्षाप्रमाणें खंडित होणारी. ५. घनदाट. ६. संबंध.

माझी आशंका फेडावी । ऐसा श्रोता विनवी । वक्तयासी ॥ २ ॥ आतां ऐका प्रत्युत्तर । कथेसि व्हावें तत्पर । वक्ता सर्वज्ञ उदार । बोलता जाहला ॥ ३ ॥ जीवभूतः सनातनं[1] । ऐसें गीतेचें वचन । येणें वाक्यें सत्यपण । सृष्टीस आलें ॥ ४ ॥ यद्दृष्टं तन्नष्टं[2] येणें । वाक्यें सृष्टि मिथ्यापणें । सत्य मिथ्या ऐसें कोणें । निवडावें ॥ ५ ॥ सत्य म्हणों तरी नासे । मिथ्या म्हणों तरी दिसे । आतां जैसें आहे तैसें । बोलिजेल ॥ ६ ॥ सृष्टीमध्यें बहु जन । अज्ञान आणि सज्ञान । म्हणोनियां समाधान । होत नाहीं ॥ ७ ॥ ऐका अज्ञानाचें मत । सृष्टि आहे ते शाश्वत । देव धर्म तीर्थ व्रत । सत्यचि आहे ॥ ८ ॥ बोले सर्वज्ञाचा राजा । मूर्खस्य[3] प्रतिमापूजा । ब्रह्मप्रलयाच्या पैजा । घालूं पाहे ॥ ९ ॥ तंव बोले तो अज्ञान । तरी कां करिशी संध्या स्नान । गुरुभजन तीर्थाटण । कासया करावें ॥ १० ॥ श्लोक ॥ तीर्थे तीर्थे निर्मलं ब्रह्मवृंदं वृंदे वृंदे तत्वचिंतानुवादः । वादे वादे जायते तत्वबोधो बोधे बोधे भासते चंद्रचूडः ॥ १ ॥ ऐसें चंद्रचूडाचें[4] वचन । सद्गुरूचें उपासन । गुरुगीतानिरूपण । बोलिलें हरें ॥ ११ ॥ गुरूसि कैसें भजावें । आधीं तयासि ओळखावें । त्याचें समाधान[5] घ्यावें । विवेकें स्वयें ॥ १२ ॥ श्लोक ॥ ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् । एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ १ ॥ गुरुगीतेचें वचन । ऐसें सद्गुरूचें ध्यान । तेथें सृष्टि मिथ्या भान । उरेल कैंचें ॥ १३ ॥ ऐसें सज्ञान बोलिला । सद्गुरु तो वोळखिला । सृष्टि मिथ्या ऐसा केला । निश्चितार्थ ॥ १४ ॥ श्रोता ऐसें न मानी कदा । अधिक उठिला विवादा । म्हणे कैसा रे गोविंदा । अज्ञान म्हणतोसी ॥ १५ ॥ जीवभूतः सनातनं[1] । ऐसें गीतेचें वचन । तयासि तूं अज्ञान । म्हणतोसि कैसा ॥ १६ ॥ ऐसा श्रोता आक्षेप[6] करी । विषाद मानिला अंतरीं । याचें प्रत्युत्तर चतुरीं । सावध परिसावें ॥ १७ ॥ गीतेंत बोलिला गोविंद । त्याचा न कळे तुज भेद । म्हणोनियां व्यर्थ खेद । वाहतोसी ॥ १८ ॥ श्लोक ॥ अश्वत्थः सर्ववृक्षाणां...॥ टी० ॥

---

१. जीव हा माझा अंश असून शाश्वत आहे. २. दिसतें तितकें नाहींसें होतें. ३. मूर्खानें प्रतिमेची पूजा करावी. ४. शिवाचें. ५. संशयाचें निरसन. ६. शंका.

माझी विभूती पिंपळ । ह्मणोनि बोलिला गोपाळ । वृक्ष तोडितां तात्काळ । तुटत आहे ॥ १९ ॥ श्लोक ॥ नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः । न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २ ॥ टीका ॥ शस्त्रांचेनि तुटेना । अग्नीचेनि जळेना । उदकामध्यें कालवेना । स्वरूप माझें ॥ २० ॥ पिंपळ तुटे शस्त्रानें । पिंपळ जळे पावकानें । पिंपळ कालवे उदकानें । नाशवंत ॥ २१ ॥ तुटे जळे बुडे उडे । आतां ऐक्य कैसें घडे । म्हणोनि हें उजेडे । सद्गुरुमुखें ॥ २२ ॥ इंद्रियाणां मनश्चास्मि । कृष्ण म्हणे मन तो मी । तरी कां आवरावी ऊर्मी[1] । चचंळ मनाची ॥२३॥ ऐसें कृष्ण कां बोलिला । साधनमार्ग दाखविला । खडे मांडूनि शिकविला । ओंनामा जेंवी ॥२४॥ ऐसा आहे वाक्यभेद । सर्व जाणे तो गोविंद । देहबुद्धीचा विवाद । कामा न ये ॥२५॥ वेद शास्त्र श्रुति स्मृती । तेथें वाक्यभेद[2] पडती । ते सर्वहि निवडती । सद्गुरूचेनि वचनें ॥ २६ ॥ वेदशास्त्रांचें भांडण । शस्त्रें तोडीं ऐसा कोण । हें निवडेना साधूविण । कदा कल्पांतीं ॥ २७ ॥ पूर्वपक्ष आणि सिद्धांत । शास्त्रीं बोलिला संकेतें[3] । याचा होय निश्चितार्थ । साधुमुखें ॥ २८ ॥ येऱ्हवीं वादाचीं उत्तरें । एकाहूनि एक थोरें । बोलूं जातां अपारें । वेदशास्त्रें ॥२९॥ म्हणोनि वादविवाद । सांडूनि कीजे संवाद[4] । तेणें होय ब्रह्मानंद । स्वानुभवें ॥ ३० ॥ एके कल्पनेचि पोटीं । होती जाती अनंत सृष्टी । तया सृष्टीची गोष्टी । साच कैंवी ॥ ३१ ॥ कल्पनेचा केला देव । तेथें झाला दृढभाव । देवालागीं येता खेंवें[5] । भक्त दुःखें दुखावला ॥ ३२ ॥ पाषाणाचा देव केला । एके दिवशीं भंगोनि गेला । तेणें भक्त दुखावला । रडे पडे आक्रंदे ॥ ३३ ॥ देव हरपला घरचे घरीं । एक देव नेला चोरीं । एक देव दुराचारीं । फोडिला बळें ॥ ३४ ॥ एक देव जापाणिला[6] । एक देव उदकीं टाकिला । एक देव नेऊन घातला । पायांतळीं ॥ ३५ ॥ काय सांगों तीर्थमहिमा । मोडोनि गेला दुरात्मा । थोर सत्व होतें तें मा[7] । काय जाहलें कळेना ॥ ३६ ॥ देव घडिला सोनारीं । देव वोतिला वोतारीं । एक देव घडिला पार्थरीं[8] । पाषाणाचा ॥ ३७ ॥ नर्मदा गंडिका तीरीं । देव पडिले लक्षवरी । त्यांची

---

१. लहर. २. निरनिराळे निर्णय. ३. अभिप्राय. ४. सरळ भाषण. ५. धोका. ६. फेंकून दिला. ७. मग. ८. पाथरवटांनीं.

संख्या कोण करी । असंख्यात गोटे ॥ ३८ ॥ चक्रतीर्थीं[1] चक्रांकित । देव असती असंख्यात । नाहीं मनीं निश्चितार्थ । एक देव ॥ ३९ ॥ बाण तांदळे ताम्रनाणें । स्फटिक देव्हारां पूजणें । ऐसे देव कोण जाणे । खरे कीं खोटे ॥ ४० ॥ देव रेशिमाचा केला । तोहि तुटोनिया गेला । आतां नवा नेम धरिला । मृत्तिकेच्या लिंगाचा ॥४१॥ आमचा देव बहु सत्य । आह्मांस आकांतीं पावत । पूर्ण करी मनोरथ । सर्वकाळ ॥४२॥ आतां याचें सत्व गेलें । प्राप्त होतें तें झालें । प्राक्तन न वचे पालटिलें । ईश्वराचेनि[2] ॥ ४३ ॥ धातु पाषाण मृत्तिका । चित्रलेप काष्ठ देखा । तेथें देव कैंचा मूर्खा । भ्रांति पडिली ॥४४॥ हे आपुलाली कल्पना । प्राक्तनाऐसीं फळें जाणा । परी त्या देवाचिया खुणा । वेगळ्याचि ॥४५॥ श्लोक ॥ नानाशास्त्रविदो लोका नानादैवतपूजकाः ॥ आत्मज्ञानं विना पार्थ सर्वकर्म निरर्थकम् ॥ १ ॥ म्हणोनि हें मायाभ्रमणें । सृष्टि मिथ्या कोटिगुणें । वेद शास्त्र पुराणें । ऐसेंचि बोलती ॥४६॥ साधु संत महानुभाव । त्यांचा ऐसाच अनुभव । पंचभूतातीत देव । सृष्टि मिथ्या ॥४७॥ सृष्टीपूर्वीं सृष्टि चालतां । सृष्टि अवघी संहारतां । शाश्वत देव तत्वतां । आदि अंतीं ॥४८॥ ऐसा सर्वांचा निश्चय । यदर्थीं नाहीं संशय । व्यतिरेकें[3] आणि अन्वय[4] । कल्पनारूप ॥ ४९ ॥ एके कल्पनेचे पोटीं । बोलिजेती अष्ट सृष्टी । तये सृष्टीची गोष्टी । सावध ऐका ॥५०॥ एक कल्पनेची सृष्टी । दुसरी शाब्दिक[5] सृष्टी । तिसरी प्रत्यक्ष सृष्टी । जाणती सर्व ॥ ५१ ॥ चौथी चित्रलेप[6] सृष्टी । पांचवी स्वप्नसृष्टी[7] । सहावी गंधर्वसृष्टी[8] । ज्वरसृष्टी[9] सातवी ॥ ५२ ॥ आठवी दृष्टिबंधन[10] । ऐशा अष्ट सृष्टी जाण । यांमध्यें श्रेष्ठ कोण । कोण सत्य मानावी ॥ ५३ ॥ म्हणोनि सृष्टी नाशवंत । जाणती संत महंत । सगुण भजावें निश्चित । निश्चयालागीं ॥ ५४ ॥ सगुणाचेनि आधारें । निर्गुण पाविजे निर्धारें । सारासार विचारें । संतसंगें ॥ ५५॥ आतां असो हें बहुत । संतसंगें केलें नेमस्त । येरवीं चित्त दुश्चित । संशयीं पडे

१. गोमती नदींत. २. सर्व प्रकारें. ३. हें ब्रह्म नव्हे, तें ब्रह्म नव्हे, हा विचार. ४. हें ब्रम्ह होय, तें ब्रम्ह होय, हा विचार. ५. शब्दात्मक व्यवहार. ६. चित्रांतील व्यवहार. ७. स्वप्नांतील व्यवहार. ८. आकाशांत भासणारे अनेक आकार. ९. ज्वरानें बेशुद्ध झालेल्यास भासणारे देखावे. १०. नजरबंदीचे खेळ.

॥ ५६ ॥ तंव शिष्यें आक्षेपिलें । सृष्टि मिथ्या ऐसें कळलें । परी हें दृश्य अवघें नाथिलें[1] । तरी दिसतें कां ॥ ५७ ॥ दृश्य प्रत्यक्ष दिसतें । म्हणोनि सत्यचि वाटतें । यासि काय करावें तें । सांगा स्वामी ॥ ५८ ॥ याचें प्रत्युत्तर भलें । पुढिले समासीं बोलिलें । श्रोतीं श्रवण केलें । पाहिजे पुढें ॥५९॥ एवं सृष्टि मिथ्या जाण । जाणोन रक्षावें सगुण । ऐसी हे अनुभवाची खूण । अनुभवी जाणती ॥ ६० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके सृष्टिकथननिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. सगुणभजन.

श्रीगणेशाय नमः ॥ ज्ञानें दृश्य मिथ्या झालें । तरी कां पाहिजे भजन केलें । तेणें काय प्राप्त झालें । हें मज निरूपावें ॥ १ ॥ ज्ञानाहून थोर असेना । तरी कां पाहिजे उपासना । उपासनेनें जना । काय प्राप्त ॥ २ ॥ मुख्य सार तें निर्गुण । तेथें दिसेचिना सगुण । भजन केलियाचा गुण । मज निरूपावा ॥ ३ ॥ जें प्रत्यक्ष नाशवंत । त्यासि भजावें किंनिमित्त । सत्य सांडून असत्य । कोणें भजावें ॥ ४ ॥ असत्याचा प्रत्यय आला । तरी मग नेम कां लागला । सत्य सांडून गलबला । कासया करावा ॥ ५ ॥ निर्गुणानें मोक्ष होतो । प्रत्यक्ष प्रत्यय येतो । सगुण काय देऊं पाहतो । सांगा स्वामी ॥ ६ ॥ सगुण नाशवंत ऐसें सांगतां । पुनः भजन करावें म्हणतां । तरी कासयासाठीं आतां । भजन करूं ॥ ७ ॥ स्वामीचे भिडेनें बोलवेना । येऱ्हवीं[2] कांहींच मानेना । साध्यचि झालिया साधना । कां प्रवर्तावें ॥ ८ ॥ ऐसें श्रोतयाचें बोलणें । शब्द बोले निबुजलेपणें[3] । याचें उत्तर ऐकणें । म्हणे वक्ता ॥ ९ ॥ गुरूचें वचन प्रतिपाळण । हें मुख्य परमार्थाचें लक्षण । वचनभंग करितां विलक्षण । सहजचि जाहलें ॥ १० ॥ म्हणोनि आज्ञेसि वंदावें । सगुण भजन मानावें । श्रोता म्हणे हें देवें । कां प्रयोजिलें ॥ ११ ॥ काय मानिला उपकार । कोण झाला साक्षात्कार । किंवा प्रारब्धाचें अक्षर । पुसिलें देवें ॥ १२ ॥ होणार हें तों पालटेना । भजनें काय करावें जना । हें तों पाहतां अनुमाना । कांहींच न ये ॥ १३ ॥ स्वामींची

---

१. नसलेलें. २. एकंदरीत. ३. गोंधळून जाऊन.

आज्ञा प्रमाण । कोण करील अप्रमाण । परंतु याचा काय गुण । मज निरूपावा ॥ १४ ॥ वक्ता म्हणे सावधपणें । सांग ज्ञानाचीं लक्षणें । तुज कांहीं लागे करणें । किंवा नाहीं ॥ १५ ॥ करणें लागे भोजन । करणें लागे उदकप्राशन । मळमूत्रत्याग लक्षण । तेंहि सुटेना ॥ १६ ॥ जनाचें समाधान राखावें । आपुलें पैरिखें वोळखावें । आणि भजनचि मोडावें । हें कोण ज्ञान ॥ १७ ॥ ज्ञानें विवेकें मिथ्या झालें । परंतु अवघें नाहीं टाकिलें । तरी मग भजनेंचि काय केलें । सांग बापा ॥ १८ ॥ साहेबास लोटांगणीं जावें । नीचासारखें व्हावें । आणि देवास न मानावें । हें कोण ज्ञान ॥ १९ ॥ हरिहर ब्रह्मादिक । हे जयाचे आज्ञाधारक । तूं एक मानवी रंक । भजसि ना तरी काय गेलें ॥ २० ॥ आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथ आमुचा परमार्थ । जो समर्थाचाहि समर्थ । देवां सोडविता ॥ २१ ॥ त्याचे आम्ही सेवकजन । सेवा करितां झालें ज्ञान । तेथें अभावें धरितां पतन । पाविजेल कीं ॥ २२ ॥ गुरु सांगतां सारासार । त्यास कैसें म्हणावें असार । तुज काय सांगणें विचार । शाहणे जाणती ॥ २३ ॥ समर्थाचे मनींचें तुटे । तेंचि जाणावें अदृष्ट खोटें । राज्यपदापासूनि करंटें । चेवलें जैसें ॥ २४ ॥ मी थोर वाटे मनीं । तो नव्हे ब्रह्मज्ञानी । विचार पाहतां देहाभिमानी । प्रत्यक्ष दिसे ॥ २५ ॥ वस्तुभजन करीना । ना न करी एसेंहि म्हणेना । तरी हे जाणावी कल्पना । दडोन राहिली ॥ २६ ॥ ना तें ज्ञान ना तें भजन । उगाचि आला देहाभिमान । येथें नाहीं कीं अनुमान । प्रत्यय तुझा ॥ २७ ॥ तरी आतां ऐसें न करावें । रघुनाथभजनीं लागावें । तेणेंचि ज्ञान बोलावें । चळेना ऐसें ॥ २८ ॥ करी दुर्जनांचा संहार । भक्तजनांचा आधार । ऐसा हा तों चमत्कार । रोकडा चाले ॥ २९ ॥ मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघेंचि नासोनि जातें । कृपा केलिया रघुनाथें । प्रतीत येते ॥ ३० ॥ रघुनाथभजनें ज्ञान झालें । रघुनाथभजनें महत्व वाढलें । म्हणोनि तुवां केलें । पाहिजे आधीं ॥ ३१ ॥ हें तों आहे सप्रतीत । आणि तुज वाटेना प्रतीत । साक्षात्कारें नेमस्त । प्रत्यय करावा ॥ ३२ ॥ रघुनाथ स्मरोन कार्य करावें । तें तात्काळचि सिद्धि पावे ।

१. दुसऱ्याचें. २. अविश्वास. ३. मनांतून उतरणें. ४. दैव. ५. भ्रष्ट झालें. ६. ब्रम्हाचें ध्यान, किंवा देवाचें भजन.

कर्ता राम हें असावें। अभ्यंतरीं ॥ ३३ ॥ कर्ता राम मी नव्हे आपण। ऐसें सगुण निवेदन। निर्गुणीं तें अनन्य। निर्गुणचि होइजे ॥ ३४ ॥ मी कर्ता ऐसें म्हणतां। कांहींच घडेना सर्वथा। प्रतीत पाहसी तरी आतां। शीघ्रचि आहे ॥ ३५ ॥ मी कर्ता ऐसें म्हणसी। तेणें तूं कष्टी होसी। राम कर्ता म्हणतां पावसी। यश कीर्ति प्रताप ॥ ३६ ॥ एके भावने-साठीं। देवासि पडे तुटी। कां ते होय कृपादृष्टी। देव कर्ता भावितां ॥ ३७ ॥ आपण आहे दों दिवसांचा। आणि देव बहुता काळांचा। आपण थोडे वोळखीचा। देवास त्रैलोक्य जाणे ॥ ३८ ॥ याकारणें रघुनाथ-भजन। त्यासि मानिती बहुत जन। ब्रह्मादिक आदिकरून। रामभजनीं तत्पर ॥ ३९ ॥ ज्ञानबळें उपासना। आम्हीं भक्त जरी मानूं ना। तरी या दोषाचिया पतना। पावों अभक्तपणें ॥ ४० ॥ देव उपेक्षी थोरपणें। तरी मग त्याचें तोचि जाणे। अप्रमाण तें श्लाघ्यवाणें[१]। नव्हेचि कीं श्रेष्ठा ॥ ४१ ॥ देहास लागली उपासना। आपण विवेकें उरेना। ऐशी स्थिति सज्जना-। अंतरींची ॥ ४२ ॥ सकळ मिथ्या होऊन जातें। हें रामभजनें कळों येतें। दृश्य ज्ञानियांचेनि मतें। स्वप्न जैसें ॥४३॥ मिथ्या स्वप्नविवंच-ना। तैसी हे सृष्टिरचना। दृश्य मिथ्या साधुजनां। कळों आलें ॥ ४४ ॥ आक्षेप झाला श्रोतयांसी। मिथ्या तरी कां दिसतें आम्हांसी। याचें उत्तर पुढिले समासीं। बोलिलें असे ॥ ४५ ॥ इतिश्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके सगुणभजननिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. दृश्यनिरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां श्रोतीं पुसिलें होतें। दृश्य मिथ्या तरी कां दिसतें। त्याचें उत्तर बोलिजेतें। तें सावध ऐका ॥ १ ॥ देखिलें तें सत्यचि मानावें। हें ज्ञात्याचें देखणें नव्हे। जड मूढ अज्ञान जीवें। हें सत्य मानिजे ॥ २ ॥ एका देखिल्यासाठीं। लटिक्या कराव्या ग्रंथकोटी[२]। संत महंतांच्या गोष्टी। त्याहि मिथ्या मानाव्या ॥ ३ ॥ माझें दिसतें हेंचि खरें। तेथें चालेना दुसरें। ऐशिया संशयाच्या भरें। भरोंचि नये ॥ ४ ॥ मृगें देखिलें मृगजळ[३]।

---

१. भूषण. २. असंख्य ग्रंथ. ३. प्रखर उन्हांत अरण्यांत पाण्याचा भास होतो तो.

तेथें धांवें तें बरळे[1]। जळ नव्हे मिथ्या सकळ। त्या पशूसि काय म्हणावें ॥ ५ ॥ रात्रौ स्वप्न देखिलें। बहुत द्रव्य सांडपलें। बहुत जनासि वेव्हारिलें। तें खरें कैसेनि ॥ ६ ॥ कुशल चितारी विचित्र। तेणें निर्माण केलें चित्र। देखतां उठे प्रीतिमात्र। परंतु तेथें मृत्तिका ॥ ७ ॥ नाना वनितों[2] हस्ती-घोडे। रात्रौ देखतां मन बुडे। दिवसा पाहतां कातडें। कंटाळवाणें ॥ ८ ॥ काष्ठी पाषाणी पुतळ्या। नाना प्रकारें निर्मिल्या। परम सुंदर वाटल्या। परंतु तेथें पाषाण ॥ ९ ॥ नाना गोपुरीं[3] पुतळ्या असती। वक्रांगें वक्रदृष्टीं पाहाती। लाघव देखतां भरे वृत्ती। परंतु तेथें विभास[4] ॥ १० ॥ खेळतां नेटकें दशावतारीं। तेथें येती सुंदर नारी। नेत्र मोडती कळाकुसरीं। परी ते अवघे धटिंगण ॥ ११ ॥ सृष्टि बहुरंगीं असत्य। बहुरूप्याचें हें कृत्य। तुज वाटे दृश्य सत्य। परी हीं जाण अविद्या ॥ १२ ॥ मिथ्या साचासारिखें देखिलें। परी तें पाहिजे विचारिलें। दृष्टि तरळतां भासलें। तें साच कैसें मानावें ॥ १३ ॥ वरी पाहतां पालथें आकाश। उदकीं पाहतां उताणें आकाश। मध्यें चांदण्याचाहि प्रकाश। परी तें अवघें मिथ्या ॥ १४ ॥ नृपतीनें चितारी आणले। ज्याचे त्या ऐसे पुतळे केले। पाहतां तेचि ऐसें गमलें। परी तें अवघें मायिक ॥ १५ ॥ नेत्रीं कांहीं बाहुली नसे। जेव्हां जें पाहावें तेव्हां तें भासे। डोळां प्रतिबिंब दिसे। तें साच कैसेनी ॥ १६ ॥ जितुके बुडबुडे उठती। तितुक्यामध्यें रूपें दिसती। क्षणामध्यें फुटोन जाती। रूपें मिथ्या ॥ १७ ॥ लघुदर्पणें[5] दोनी चारी हातीं। तितुकीं रूपें प्रति-बिंबती। परी तें मिथ्या अंतीं। एकचि मुख ॥ १८ ॥ नदीतीरीं भार[6] जातां। दुसरा भार दिसे पालथा। कां पडसादाचा[7] अवचिता। गजर उठे ॥ १९ ॥ वापी सरोवरांचें नीर। तेथें पशु पक्षी नर वानर। नाना पत्रें वृक्षविस्तार। दिसे दोहीं सवां[8] ॥ २० ॥ एक शस्त्र झाडूं जातां। दोन दिसती तत्वतां। नाना तंतु टणत्कारितां। द्विधा[9] भासती ॥ २१ ॥ कां ते दर्पणांचे[10] मंदिरीं। बैसली सभा दिसे दुसरी। बहुत दीपांचिये हारीं। बहुत छाया दीसती ॥

१. भ्रमिष्ट. २. पडद्यावर काढलेला चित्र; स्त्रिया, हत्ती, घोडे इत्यादि. ३. देवालयांतील उंच उंच मजल्यांवर. ४. आभास. ५. लहान आरसे. ६. जमाव. ७. प्रतिशब्दाचा. ८. बाजूंस. ९. दोन. १०. आरसेमहालांत.

२२ ॥ ऐसें हें बहुविध भासे । साचासारिखें दिसे । परी हें सत्य म्हणोन कैसें । विश्वासावें ॥ २३ ॥ माया मिथ्या बाजीगिरी[1] । दिसे साचाचियेपरी। परी हे जाणत्यानें खरी । मानूंचि नये ॥ २४ ॥ लटिकें साचाऐसें भावावें । तरी मग पारखी कासया असावें । एवं ये अविद्येचे गोवे । ऐसेचि असती ॥ २५ ॥ मनुष्यांची बाजीगिरी । बहुत जनां वाटे खरी । शेवट पाहतां निर्धारीं । मिथ्या होय ॥ २६ ॥ तैशीच माव राक्षसांची । देवांसहि वाटे साची । पंचवटिकेसी मृगाची । पाठी घेतली रामें ॥ २७ ॥ पूर्वकाया पालटिती । एकाचेचि बहुत होती । रक्तबिंदीं[2] जन्मती । रजनीचरें[3] ॥ २८ ॥ नानापदार्थ फळेंचि झाले । द्वारकेमध्यें प्रवेशले । कृष्णें दैत्य किती वधिले। कपटरूपी ॥ २९ ॥ कैसें कपट रावणाचें । शिर केलें मावेचें[4] । काळनेमीच्या[5] आश्रमाचें । अपूर्व[6] कैसें ॥ ३० ॥ नाना दैत्य कपटमती । जे देवांसहि नाटोपती । मग निर्माण होऊन शक्ती । संहार केला ॥ ३१ ॥ ऐसी राक्षसांची माव । जाणों न शकती देव। कपटविद्येचें लाघव । अघटित ज्यांचें ॥ ३२ ॥ मनुष्यांची बाजीगिरी । राक्षसांची वोडंबरी । भगवंताची नानापरी । विचित्र माया ॥ ३३ ॥ हे साचासारिखीच दिसे । विचारितांचि निरसे । मिथ्याच परी आभासे । निरंतर ॥ ३४ ॥ साच म्हणावी तरी हे नासे । मिथ्या म्हणावी तरी हे दिसे । दोहीं पदार्थीं अविश्वासे । सांगतां मन ॥ ३५ ॥ परंतु हे नव्हे साचार । मायेचा मिथ्या विचार । दिसतें हें स्वप्नाकार । जाण बापा ॥ ३६ ॥ तथापि अझून तुजला । भासचि सत्य वाटला । तरी येथें चुका पडिला । ऐक बापा ॥ ३७ ॥ दृश्य भास अविद्यात्मक । तुझाहि देह तदात्मक । म्हणोनि हा अविवेक । तेथें संचरला ॥ ३८ ॥ दृष्टीनें दृश्य देखिलें । मन भासावरि बैसलें । तरी तें लिंगदेह झालें । अविद्यात्मक ॥ ३९ ॥ अविद्येनें अविद्या देखिली । म्हणोन गोष्टी विश्वासली । तुझी काया अवघी संचली । अविद्येची ॥ ४० ॥ तेचि काया मी आपण । हें देहबुद्धीचें लक्षण । येणें करितां झालें प्रमाण । दृश्य अवघें ॥

१. गारुड. २. प्रत्येक रक्तबिंदूपासून अनेक दैत्य उत्पन्न झाले. ( सप्तशती पहा.) ३. राक्षस. ४. खोटें. ५. कालनेमी राक्षस ऋषीचें सोंग घेऊन कपटानें आश्रम स्थापून होता, त्या प्रकाराचें. ( रामायण पहा. ). ६. चमत्कार. ७. माया.

४१ ॥ इकडे सत्य मानिला देह । तिकडे दृश्य सत्य हा निर्वाह । दोहीं-मध्यें महा संदेह । पैसावला[1] बळें ॥ ४२ ॥ देहबुद्धि केली बळकट । आणि ब्रह्म पाहों गेला धीट। तों दृश्यानें रोधिली वाट । परब्रह्माची ॥ ४३ ॥ तेथें साच मानिलें दृश्याला । निश्चयचि बाणोनि गेला । पाहा हो केव्हढा चुका पडिला । अकस्मात् ॥ ४४ ॥ आतां असो हें बोलणें । ब्रह्म न पाविजे मी-पणें । देहबुद्धीचीं[2] लक्षणें । दृश्य भाविती ॥ ४५ ॥ अस्थींच्या देहीं मांसाचा डोळा । पाहेन ह्मणे ब्रह्मींचा सोहळा । तो ज्ञाता नव्हे आंधळा । केवळ मूर्ख ॥ ४६ ॥ दृष्टीस दिसे मनास भासे । तितुकें काळांतरीं नासे । म्हणोनि दृश्यातीत असे । परब्रह्म तें ॥ ४७ ॥ परब्रह्म तें शाश्वत । माया तेचि अशाश्वत । ऐसा बोलिला निश्चितार्थ । नानाशास्त्रीं ॥ ४८ ॥ आतां पुढें निरूपण । देहबुद्धीचें लक्षण । चुका पडिला तो मी कोण । बोलिलें असे ॥ ४९ ॥ मी कोण हें जाणावें । मीपण त्यागून अनन्य[3] व्हावें । मग समाधान तें स्वभावें । अंगीं बाणे ॥ ५० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठ-दशके दृश्यनिरसनं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. सारशोधन.

श्रीगणेशाय नमः ॥ गुप्त आहे उदंड धन । काय जाणती सेवकजन । तयांस आहे तें ज्ञान । बाह्याकाराचें ॥ १ ॥ गुप्त ठेविले उदंड अर्थ । आणि प्रगट दिसती पदार्थ । शाहणे शोधिती स्वार्थ । अंतरीं असे ॥ २ ॥ तैसें दृश्य[4] हें मायिक । पहात असती सकळ लोक । परी जयांस ठाउका विवेक । ते अंतर जाणती ॥ ३ ॥ द्रव्य ठेवून जळ सोडिलें । लोक म्हणती सरोवर भरलें । तयाचें अभ्यंतर कळलें । समर्थ जनांसी ॥४॥ तैसे ज्ञाते जे समर्थ । तिहीं ओळखिला परमार्थ । इतर ते करिती स्वार्थ । दृश्य पदार्थांचा ॥ ५ ॥ काबाडी वहाती काबाड । श्रेष्ठ भोगिती रत्नें जाड । हें जयाचें त्यास गोड । कर्मयोगें ॥ ६ ॥ एक काष्ठस्वार्थ करिती । एक शुभ्रां[5] एकवटिती । तैसे नव्हे कीं नृपती । सारभोक्ते ॥ ७ ॥ जयांस आहे विचार । ते सुखासनीं झाले

---

१. पसरला. २. देहबुद्धीच्या लक्षणांमुळें ब्रम्ह दृश्य असेल अशी कल्पना होते. [३]. ब्रम्हरूप. ४. जग. ५. गोंवऱ्या.

स्वार । इतर ते जवळील भार । वाहातचि मेले ॥ ८ ॥ एक दिव्यान्नें भक्षिती । एक विष्टा सांवडिती[१] । आपण वर्तल्याचा घेती । साभिमान ॥ ९ ॥ सार सेविजे श्रेष्टीं । असार घेइजे वृथापुष्टीं[२] । सारासारांची गोष्टी । सज्ञान जाणती ॥ १० ॥ गुप्त परिस चिंतामणी[३] । प्रगट खडे कांचमणी । गुप्त हेमें[४] रत्नखाणी । प्रगट पाषाण मृत्तिका ॥ ११ ॥ अव्हों[५] शंख अव्हां[६] वेल । गुप्त वनस्पती अमूल्य । एरंड धोत्रे बहुसाल । प्रगट शिंपी ॥ १२ ॥ कोठें दिसेना कल्पतरू । उदंड शेरांचा विस्तारू । पाहतां नाहीं मैलागरू[७] । बोरी बाभळी उदंड ॥ १३ ॥ कामधेनु जाणिजे इंद्रें । सृष्टींत उदंड खिल्लारें । महद्भाग्य भोगिजे नृपवरें । इतरां कर्मानुसार ॥ १४ ॥ नाना व्यापार करिती जन । अवघेच म्हणती सकांचन[८] । परंतु कुबेराचें महिमान । कोणासीच न ये ॥ १५ ॥ तैसा ज्ञानी योगीश्वर । गुप्तार्थ लाभाचा ईश्वर । इतर ते पोटाचे किंकर । नाना मतें धुंडिती ॥ १६ ॥ तस्मात् सार तें दिसेना । आणि असार तें दिसे जना । सारासार विवंचना । साधु जाणती ॥ १७ ॥ इतरांस हें काय सांगणें । खरें खोटें कोण जाणे । साधुसंतांचिये खुणे । साधुसंत जाणती ॥ १८ ॥ दिसेना जें गुप्त धन । तयास करणें लागे अंजन । गुप्त परमात्मा सज्जन- । संगती शोधावा ॥ १९ ॥ रायाचे सन्निध होतां । सहजचि लाभे श्रीमंतता । तैसा हा सत्संग धरितां । सद्वस्तु लाभे ॥ २० ॥ सद्वस्तूंस[९] लाभे सद्वस्तु । अव्यवस्थासि अव्यवस्तु । पाहतां प्रशस्तासि प्रशस्तु । विचार लाभे ॥ २१ ॥ म्हणोनि हें दृश्यजात । अवघेंचि आहे अशाश्वत । परमात्मा अच्युत अनंत । तो या दृश्यावेगळा ॥ २२॥ दृश्यावेगळा दृश्या अंतरीं । सर्वात्मा चराचरीं । विचार पाहतां अंतरीं । निश्चय बाणे ॥ २३ ॥ संसारत्याग न करितां । प्रपंच उपाधि न सांडतां । जनांमध्यें सार्थकता । विचारेंचि होय ॥ २४ ॥ हें प्रचीतीचें बोलणें । विवेकें प्रचीत बाणे । प्रचीत पाहतील ते शाहणे । अन्यथा नव्हे ॥ २५ ॥ प्रचीत आणि अनुमान । उधार आणि रोकडें धन । मानस-

१. गोळा करितात. २. व्यर्थ पोसलेले जे त्यांनीं. ३. चिंतिलेलें देतो असा एक मणि. ४. सोनें. ५. दक्षिणावर्त शंख. ६. दक्षिणावर्ति वेल. ७. मलयागिरी चंदन. ८. श्रीमंत. ९. सज्जनास.

पूजा प्रत्यक्ष दर्शन । यांस महदंतर ॥ २६ ॥ पुढें जन्मांतरीं होणार । हा तों अवघाच उधार । तैसें नव्हे सारासार । तात्काळ लाभे ॥ २७ ॥ तात्काळचि लाभ होतो । प्राणी संसारीं सुटतो । संशय अवघाचि तुटतो । जन्ममरणांचा ॥ २८ ॥ याचि जन्में येणेंचि काळें । संसारीं होइजे निराळें । मोक्ष पाविजे निश्चळें । स्वरूपाकारणें ॥ २९ ॥ ये गोष्टीस करी अनुमान । तो शीघ्रचि पावेल पतन । मिथ्या वदेल त्यास आण । उपासनेची ॥ ३० ॥ हें यथार्थचि आहे बोलणें । विवेकें शीघ्रचि मुक्त होणें । असोनि कांहींच नसणें । जनांमध्यें ॥ ३१ ॥ देवपद आहे निर्गुण । देवपदीं अनन्यपण । हाचि अर्थ पाहतां पूर्ण । समाधान बाणे ॥ ३२ ॥ देहींच विदेह[1] होणें । करून कांहींच न करणें । जीवन्मुक्तांचीं लक्षणें । जीवन्मुक्त जाणती ॥ ३३ ॥ येरवीं हें खरें न वाटे । अनुमानेंचि संदेह वाटे । संदेहाचें मूळ तुटे । सद्गुरुवचनें ॥ ३४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके सारशोधननिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. अनिर्वाच्यनिरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ समाधान पुसतां कांहीं । म्हणती बोलिजे ऐसें नाहीं । तरी तें कैसें आहे सर्वही । मज निरूपावें ॥ १ ॥ मुक्यानें गूळ खादला । गोडी न ये सांगायाला । याचा अभिप्राय मजला । निरूपण कीजे ॥ २ ॥ अनुभवहि पुसों जातां । म्हणती न ये कीं सांगतां । तरी कोणापाशीं पुसों आतां । समाधान ॥ ३ ॥ जे ते अगम्य सांगती । न ये माझिये प्रचीती । विचार बैसे माझे चित्तीं । ऐसें करावें ॥ ४ ॥ ऐसें श्रोतयाचें उत्तर । याचें कैसें प्रत्युत्तर । निरूपिजेल तत्पर । होऊन ऐका ॥ ५ ॥ जें समाधानाचें स्थळ । कीं तो अनुभवचि केवळ । तेंचि स्वरूप प्रांजळ । बोलून दावूं ॥ ६ ॥ जें बोलास आकळेना । बोलिल्याविणहि कळेना । जयास कल्पितां कल्पना । हिंपुटी होय ॥ ७ ॥ तें जाणावें परब्रह्म । जें वेदांचें गुह्य परम । धरितां संतसमागम । सर्वहि कळे ॥ ८ ॥ तेंचि आतां सांगिजेल । जें समाधान सखोल । ऐक अनुभवाचे बोल । अनिर्वाच्य[2] वस्तू

---

१. देहरहित. २. बोलून दाखविण्यास अशक्य.

॥ ९ ॥ सांगतां न ये तें सांगणें । गोडी कळाया गूळ देणें । ऐसें हें सद्गुरूविणें । होणार नाहीं ॥ १० ॥ सद्गुरुकृपा वळे त्यासी । जो शोधील आपणाशीं । पुढें कळेल अनुभवासी । आपेंआप वस्तु ॥ ११ ॥ दृढ करूनियां बुद्धी । आधीं घ्यावी आपुली शुद्धी । तेणें लागे समाधी । अकस्मात ॥ १२ ॥ आपुलें मूळ बरें शोधितां । आपुली तों मायिक वार्ता । पुढें वस्तुच तत्वता । समाधान ॥ १३ ॥ आत्मा आहे सर्वसाक्षी । हें बोलिजे पूर्वपक्षीं । जो कोणी सिद्धांत लक्षी । तोचि साधु ॥ १४ ॥ सिद्धांत वस्तु लक्षूं जातां । सर्वसाक्षिणी ते अवस्था । आत्मा त्याहून परता । अवस्थातीत[1] ॥ १५ ॥ पदार्थज्ञान जेव्हां सरे । द्रष्टा द्रष्टेपणे नुरे । ते समयीं फुंजे[2] उतरे । मीपणाचा ॥ १६ ॥ जेथें मुरालें मीपण । तेचि अनुभवाची खुण । अनिर्वाच्य[3] समाधान । या कारणें बोलिजे ॥१७॥ अत्यंत विचाराचे बोल । तरी ते मायिकचि फोल । शब्दा सबाह्य[4] सखोल । अर्थचि अवघा ॥ १८ ॥ शब्दाकरितां कळे अर्थ । अर्थ पाहतां शब्द व्यर्थ । शब्द सांगे यथार्थ । परी आपण मिथ्या ॥ १९ ॥ शब्दाकरितां वस्तु भासे । वस्तु पाहतां शब्द नासे । शब्द फोल अर्थ असे । घनदाटपणें ॥ २० ॥ भुसाकरितां धान्य निपजे । धान्य घेऊन भूस टाकिजे । तैसा भूस शब्द जाणिजे । अर्थ धान्य ॥ २१ ॥ पोंचटांमध्यें घनवट । घनवटीं उडे पोंचट । तैसा शब्द हा फलगट । परब्रह्मीं ॥ २२ ॥ शब्द बोलूनि राहे । अर्थ शब्दापूर्वींच आहे । या कारणें न साहे । उपमा तया अर्थासी ॥ २३ ॥ भूस सांडून कण घ्यावा । तैसा वाच्यांश त्यजावा । कण लक्ष्यांश लक्षावा । शुद्ध स्वानुभवें ॥ २४ ॥ दृश्य वेगळें बोलिजे । त्यास वाच्यांश म्हणिजे । त्याचा अर्थ तो जाणिजे । शुद्ध लक्ष्यांश ॥ २५ ॥ ऐसा जो शुद्ध लक्ष्यांश । तोचि जाणावा पूर्वपक्ष । स्वानुभव तो अलक्ष । लक्षिला न वचे ॥ २६ ॥ जेथें गाळून सांडिलें नभा । जो अनुभवाचा गाभा । ऐसा तोहि उभा । कल्पित केला ॥ २७ ॥ मिथ्या कल्पनेपासून झाला । खरेपण कैसें असेल त्याला । म्हणोनि तेथें अनुभवाला । ठा-

---

१. जागृति, स्वप्न, सुषुप्ति आणि तुर्या ( केवळ साक्षित्व ) या चार अवस्थांहून भिन्न. २. अभिमान. ३. ब्रह्मानुभवाचे वेळीं 'मी' ही स्फूर्तिच नसल्यामुळें तो अनुभव कोण सांगणार ? अर्थात् तें समाधान अनिर्वाच्य होय. ४. आंतबाहेर.



व नाहीं ॥ २८ ॥ दुजेविण अनुभव । हें बोलणेंचि तों वाव । या कारणें नाहीं ठाव । अनुभवासी ॥ २९ ॥ अनुभवें त्रिपुटी[1] उपजे । अद्वैतीं द्वैताचि लाजे । म्हणोनियां बोलणें साजे । अनिर्वाच्य ॥ ३० ॥ दिवसरजनीचें[2] परिमित । करावया मूळ आदित्य । तो आदित्य गेलिया उर्वरित[3] । त्यासि काय म्हणावें ॥ ३१ ॥ शब्द मौनाचा विचार । व्हावया मूळ ओंकार । तो ओंकार गेलिया उच्चार । कैसा करावा ॥ ३२ ॥ अनुभव आणि अनुभविता । सकळ ये मायेचिकरितां । ते माया मुळींच नसतां । त्यास काय ह्मणावें ॥३३॥ वस्तु एक आपण एक । ऐशी असती वेगळिक । तरी अनुभवाचा विवेक । बोलों येता सुखें ॥ ३४ ॥ वेगळेपणाची मार्ता[4] । ते लटिकी वंध्येची[5] सुता । म्हणूनिया अभिन्नता[6] । मुळींच आहे ॥ ३५ ॥ अजन्मा[7] होता निजला । तेणें स्वप्नीं स्वप्न देखिला । सद्गुरूसि शरण गेला । संसारदुःखें ॥ ३६ ॥ सद्गुरुकृपेस्तव । झाला संसार वाव । ज्ञान झालिया ठाव । पुसे अज्ञानाचा ॥ ३७ ॥ आहे तितुकें नाहीं झालें । नाहीं नाहींपणें निमालें । आहे नाहीं जाऊन उरलें । नसोन कांहीं ॥ ३८ ॥ शून्यत्वातीत[8] शुद्ध ज्ञान । तेणें झालें समाधान । ऐक्यरूपें अभिन्न । सहजस्थिती ॥ ३९ ॥ अद्वैतनिरूपण[9] होतां । निमाली द्वैताची वार्ता । ज्ञानचर्चा बोलों जातां । जागृति आली ॥ ४० ॥ श्रोतीं व्हावें सावधान । अर्थीं घालावें मन । खुणे पावतां समाधान । अंतरीं कळे ॥ ४१ ॥ तेणें जितुकें ज्ञान कथिलें । तितुकें स्वप्नावरी गेलें । अनिर्वाच्य सुख उरलें । शब्दातीत[10] ॥ ४२ ॥ तेथें शब्देंविण ऐक्यता । अनुभव ना अनुभविता । ऐसा निवांत तो मागुता । जागृती आला ॥ ४३ ॥ तेणें स्वप्नीं स्वप्न देखिला । जागा होऊन जागृतीस आला । तेथें तर्क कुंठित जाहला । अंत नलगे ॥ ४४ ॥ या निरूपणाचें मूळ । केलेंच करूं प्रांजळ । तेणें अंतरीं निवळ । समाधान कळे ॥ ४५ ॥ तंव शिष्यें विनविलें । जी हें आतां निरूपिलें । तरी पाहिजे बोलिलें । मागुतें स्वामी ॥ ४६ ॥ मज क-

१. अनुभव घेणारा, अनुभव घेण्याचा पदार्थ, व येणारा अनुभव हें त्रय. २. दिवस व रात्र ही कालगणना. ३. बाकी राहिलेलें. ४. गोष्ट. ५. वांझेची मुलगी. ६. एकरूपता. ७. ज्याचा जन्मच झाला नाहीं तो; अर्थात् जीव. ८. शून्य नव्हे असें. ९. भेदभावना सत्य नाहीं, हा विचार. १०. सांगतां न येणारें.

ळाया कारण । केलेंच करावें निरूपण । तेथील जे कां निजखुण । ते मज अनुभवावी ॥ ४७ ॥ अजन्मा तो सांग कवण । तेणें देखिला कैसा स्वप्न । येथें कैसें निरूपण । बोलिलें आहे ॥ ४८ ॥ जाणोनि शिष्याचा आदर । स्वामी देती प्रत्युत्तर । तेंचि आतां अतितत्पर । श्रोतीं येथें परिसावें ॥ ४९ ॥ ऐक शिष्या सावधान । अजन्मा तो तूंचि जाण । तुवां देखिला स्वप्नीं स्वप्न । तोहि आतां सांगतों ॥ ५० ॥ स्वप्नीं स्वप्नाचा विचार । तो तूं जाण हा संसार । तेथें तुवां सारासार । विचार केला ॥ ५१ ॥ रिघोनि सद्गुरूसि शरण । काढून शुद्ध निरूपण । याची करिसी ऊणखुण[1] । प्रत्यक्ष आतां ॥ ५२ ॥ याचाचि घेतां अनुभव । बोलणें तितुकें होतें वाव । निवांत विश्रांतीचा ठाव । ते तूं जाण जागृती ॥ ५३ ॥ ज्ञानगोष्टीचा गलबला । सरोन अर्थ प्रगटला । याचा विचार घेतां आला । अंतरीं अनुभव ॥ ५४ ॥ तुज वाटे हे जागृती । मज झाली अनुभवप्राप्ती । या नांव केवळ भ्रांती । फिटलीच नाहीं ॥ ५५ ॥ अनुभव अनुभवीं विराला । अनुभवेंविण अनुभव आला । हाहि स्वप्नींचा चेइला[2] । नाहींस वापा ॥ ५६ ॥ जागा झालिया स्वप्नऊर्मी । स्वप्नीं म्हणसी अजन्मा तो मी । जागेपणें स्वप्नऊर्मी । गेलीच नाहीं ॥ ५७ ॥ स्वप्नीं वाटे जागेपण । तैसी अनुभवाची खूण । आली परी तें सत्य स्वप्न । भ्रमरूप[3] ॥ ५८ ॥ जागृति या पलीकडे । तें सांगणें केवीं घडे । जेथें धारणाचि[4] मोडे । विवेकाची ॥ ५९ ॥ म्हणोनि तें समाधान । बोलतांचि न ये असें जाण । निःशब्दाची ऐसी खूण । ओळखावी ॥ ६० ॥ ऐसें आहे समाधान । बोलतांच न ये जाण । इतुकेन बाणली खूण । निःशब्दाची ॥ ६१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके अनिर्वाच्यनिरूपणं नाम दशमः समासः ॥१० ॥

---

१. अनुभव. २. जागृत झाला. ३. स्वप्नांत जसें जागृत आहोंसें वाटतें, त्याप्रमाणें तुला अनुभव आला असें वाटतें; पण खऱ्या जागृताला, मी स्वप्नांत नाहीं, जागा आहे, असें स्मरण असण्याचें कारण नाहीं, त्याप्रमाणें खऱ्या अनुभवाचे वेळीं 'अनुभव आला' हें स्फुरण रहाणें शक्य नाहीं. ४. स्थिति. ५. जेथें शब्दाचें कार्य नाहीं अशा ब्रम्हाची.

# दशक सातवा.

## १. मंगलाचरण.

श्रीगणेशाय नमः ॥ विद्यावंताचा पूर्वज[1] । गजानन एकद्विज[2] । त्रिनयन चतुर्भुज । परशुपाणी ॥ १ ॥ कुबेरापासून अर्थ[3] । वेदांपासून परमार्थ । लक्ष्मीपासून समर्थ । भाग्यासि आले ॥ २ ॥ तैशी मंगळमूर्ती आद्या । तियेपासून झाली सकळ विद्या । तेणें लाघव[4] कविपद्या । सत्पात्रें जाहलीं ॥ ३ ॥ जैशीं समर्थाचीं लेंकुरें । नाना अलंकारीं सुंदरें । मूळपुरुषाचेनि द्वारें । तैसे कवी ॥ ४ ॥ नमूं ऐसिया गणेंद्रा । विद्याप्रकाशपूर्णचंद्रा । जयाचेन बोधसमुद्रा[5] । भरितें दाटे ॥ ५ ॥ जो कर्तृत्वास आरंभ । मूळपुरुष मूळारंभ । जो परात्पर[6] स्वयंभ । आदिअंतीं ॥ ६ ॥ तयापासून प्रमदा[7] । इच्छाकुमारी शारदा[8] । आदित्यापासून गोदा । मृगजळ वाहे ॥ ७ ॥ जे मिथ्या म्हणतांच गोंवी । मायिकपणें लाघवी । वक्तयास वेढा लावी । वेगळेपणें ॥ ८ ॥ जे द्वैताची जननी । कीं ते अद्वैताची खाणी । मूळमाया गवसणी । अनंत ब्रम्हांडांची ॥ ९ ॥ कीं ते औदुंबरी वेली । अनंत ब्रम्हांडें लगडलीं । मूळपुरुषाची साउली । दुहिता[9] रूपें ॥ १०॥ वंदूं ऐशी वेदमाता । आदिपुरुषाची जे सत्ता । आतां आठवीन समर्था । सद्गुरूसी ॥ ११ ॥ जयाचेनि कृपादृष्टी । होय आनंदाची वृष्टी । तेणें गुणें सर्व सृष्टी । आनंदमय ॥ १२ ॥ कीं तो आनंदाचा जनक । सायुज्यमुक्तीचा नायक । कैवल्यपददायक । अनाथबंधू ॥ १३ ॥ मुमुक्षुचातकीं सुस्वर । करुणा पाहिजे अंबर[10] । वोळे कृपेचा जलधर । साधकांवरी ॥ १४ ॥ कीं तें भवार्णवींचें तारूं । बोधें पाविजे पैलपारू । महा आवर्तीं[11] आधारू । भाविकासी ॥ १५ ॥ कीं तो काळाचा नियंता । नाना संकटीं सोडविता । कीं ते भाविकांची माता । परम स्नेहाळ ॥ १६ ॥ कीं तो परत्रींचा आधारू । कीं तो विश्रांतीचा थारू । नातरी सुखाचें माहेरू । सुखरूप ॥ १७ ॥ ऐसा सद्गुरु पूर्णपणीं ।

---

१. आदि पुरुष. २. एकदंत. ३. संपत्ति. ४. चातुर्य. ५. ज्ञानरूप सागरास. ६. थोरांहून थोर. ७. स्त्री. ८. सरस्वती. ९. कन्या. १०. मुमुक्षुरूप चातक पक्ष्यांनीं प्रेमानें आकाशाकडे पाहावें. ११. संकटांत.

तुटे भेदाची कडसणी[1] । देहेंविण लोटांगणी । तया प्रभूसी ॥ १८ ॥ साधु-संत आणि सज्जन । वंदूनियां श्रोतेजन । आतां कथानुसंधान । सावध ऐका ॥ १९ ॥ संसार हाचि दीर्घ स्वप्न । लोभें वोसणती[2] जन । माझी कांता माझें धन । कन्या पुत्र माझे ॥ २० ॥ ज्ञानसूर्य मावळला । तेणें प्रकाश लोपला । अंधकारें पूर्ण झाला । ब्रह्मगोळ अवघा ॥ २१ ॥ नाहीं सत्वाचें[3] चांदणें । कांहीं मार्ग दिसे जेणें । सर्व भ्रांतीचेनि गुणें । आपेंआप न दिसे ॥ २२ ॥ देहबुद्धि अहंकार । निजले घोरती घोर । दुःखें आक्रंदती थोर । विषयसुखाकारणें ॥ २३ ॥ निजले असतां मेले । पुनः उपजतांच निजले । ऐसे आले आणि गेले । बहुत लोक ॥ २४ ॥ निद्रेसुरेपणेंचि[4] सैरावैरा । बहुतीं केल्या येरझारा । नेणोनियां परमेश्वरा । भोगिले कष्ट ॥२५॥ तया कष्टाचें निरसन । व्हावया पाहिजे आत्मज्ञान । म्हणोनि हें निरूपण । अध्यात्मग्रंथीं ॥ २६ ॥ सकळ विद्येमध्यें सार । अध्यात्मविद्येचा विचार । दशमाध्यायीं शार्ङ्गधर । भगवद्गीतेंत बोलिला ॥ २७ ॥ श्लोक ॥ अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ या कारणें अद्वैतग्रंथ । अध्यात्मविद्येचा परमार्थ । पावावया तोचि समर्थ । जो सर्वांगें श्रोता ॥ २८ ॥ जयाचें चंचळ हृदय । तेणें ग्रंथ सोडूंचि नये । सोडितां अलभ्य होय । अर्थ येथींचा ॥ २९ ॥ जयास जोडला परमार्थ । तेणें पाहावा हा ग्रंथ । अर्थ शोधितां परमार्थ-[5]। निश्चय बाणे ॥ ३० ॥ जयास नाहीं परमार्थ । तयास न कळे येथींचा अर्थ । नेत्रेंविण निधानस्वार्थ । अंधास न कळे ॥ ३१ ॥ एक म्हणती मराठें काय । हें तों भल्यानें ऐकों नये । तीं मूर्खें नेणती सोय । अर्थान्वयाची ॥ ३२ ॥ लोहाची मांदूस[6] केली । नाना रत्नें सांठविलीं । तीं अभाग्यांन त्यागिली । लोखंड म्हणोनी ॥ ३३ ॥ तैसी भाषा प्राकृत । अर्थवाद आणि सिद्धांत । नेणोनि त्यागिती भ्रांत । मंदबुद्धीस्तव ॥ ३४ ॥ आहांच[7] सांपडतां धन । त्याग करणें मूर्खपण । द्रव्य घ्यावें सांठवण । पाहोंचि नये ॥ ३५ ॥ परिस देखिला अंगणीं । मार्गीं सांपडला चिंतामणी । अव्हावेल[8] महागुणी । कूपामध्यें ॥ ३६ ॥ तैसें प्राकृतीं अद्वैत । सुगम आणि

---

१. दोरी. २. शीण पावतात. ३. सात्विक वृत्तिरूपी. ४. झोंपेंतच. ५. ठेव्याचा लाभ. ६. पेटी. ७. आपोआप. ८. दक्षिणवर्ती वेल.

सप्रचीत । अध्यात्म लाभे अकस्मात । तरी अवश्य घ्यावें ॥ ३७ ॥ न करितां व्युत्पत्तीचा[1] श्रम । सकळ शास्त्रार्थ होय सुगम । सत्समागमाचें वर्म । तें हें ऐसें असे ॥ ३८ ॥ जें व्युत्पत्तीनें न कळे । तें सत्समागमें कळे । सकळ शास्त्रार्थ आकळे । स्वानुभवासी ॥ ३९ ॥ म्हणोनि कारण सत्समागम । तेथें नलगे व्युत्पत्तिश्रम । जन्मसार्थकाचें वर्म । वेगळेंचि असे ॥ ४० ॥ श्लोक ॥ भाषाभेदाश्च वर्तंते ह्यर्थ एको न संशयः । पात्रद्वये यथा खाद्यं स्वादभेदो न विद्यते ॥ १ ॥ टीका ॥ भाषापालटे कांहीं । अर्थ वायां जात नाहीं । कार्यसिद्धि ते सर्वही । अर्थाचपाशीं ॥ ४१ ॥ तथापि प्राकृताकरितां । संस्कृताची सार्थकता । येऱ्हवीं त्या गुप्तार्था । कोण जाणे ॥ ४२ ॥ आतां असो हें बोलणें । भाषा त्यागून अर्थ घेणें । उत्तम घेऊन त्याग करणें । साली टरफलांच्या ॥ ४३ ॥ अर्थ सार भाषा पोंचट । अभिमानें करावी खटपट । नाना अहंतेनें वाट । रोधिली मोक्षाची ॥ ४४ ॥ शोध घेतां लक्ष्यांशाचा । तेथें आधीं वाच्यांश कैंचा । अगाध महिमा भगवंताचा । कळला पाहिजे ॥ ४५ ॥ मुकेपणाचें बोलणें । हें जयाचें तोचि जाणे । स्वानुभवाचिये खुणे । स्वानुभवी पाहिजे ॥ ४६ ॥ अर्थ जाणे अध्यात्माचा । ऐसा श्रोता मिळेल कैंचा । जयासि बोलतां वाचेचा । हव्यासचि पुरे ॥४७॥ परीक्षावंतापुढें रत्न । ठेवितां होय समाधान । तैसें ज्ञानियापुढें ज्ञान । बोलावें वाटे ॥ ४८ ॥ मायाजाळें दुश्चित होय । तें निरूपणीं कामा न ये । संसारिकां कळे काय । अर्थ येथींचा ॥ ४९ ॥ श्लोक ॥ व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन । बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ १ ॥ टीका ॥ व्यवसायीं[2] जो मलिन । त्यासि न कळे निरूपण । येथें पाहिजे सावधपण । अतिशयेंसी ॥ ५० ॥ नाना रत्नें नाना नाणीं । दुश्चितपणें घेतां हाणी । परीक्षा नेणता प्राणी । ठकला तेथें ॥ ५१ ॥ तैसें निरूपणीं जाणा । आहाचें[3] पाहतां कळेना । मराठेंचि उमजेना । कांहीं केल्या ॥५२॥ जेथें निरूपणाचे बोल । आणि अनुभवाची वोल । तें संस्कृतापरीस खोल । अध्यात्मश्रवण ॥ ५३ ॥ मायाब्रम्ह वोळखावें । तयास अध्यात्म म्हणावें । तरी तें मायेचें जाणावें । स्वरूप आधीं ॥ ५४ ॥ माया सगुण साकार ।

---

१. शास्त्रें पढण्याचा. २. निश्चितपणामध्यें. ३. वरवर.

माया सर्व विकार । माया जाणिजे विस्तार । पंचभूतांचा ॥ ५५ ॥ माया दृश्य दृष्टीस दिसे । माया भास मनास भासे । माया क्षणभंगुर नासे । विवेकें पाहतां ॥ ५६ ॥ माया अनेक विश्वरूप । माया विष्णूचें स्वरूप । मायेची सीमा अमूप । बोलिजे तितुकी थोडी ॥ ५७ ॥ माया बहुरूप बहुरंग । माया ईश्वराचा संग । माया पाहतां अभंग । अखिल वाटे ॥ ५८ ॥ माया सृष्टीची रचना । माया आपुली कल्पना । माया तोडितां तुटेना । ज्ञानेंविण ॥ ५९ ॥ ऐसी माया निरूपिली । स्वल्प संकेतें बोलिली । पुढें वृत्ति सावध केली । पाहिजे श्रोतीं ॥ ६० ॥ पुढें ब्रम्हनिरूपण । निरूपिलें ब्रम्हज्ञान । जेणें तुटे मायाभान । एकसरें ॥ ६१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके मंगलाचरणनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. ब्रह्मनिरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्रह्म निर्गुण निराकार । ब्रह्म निःसंग निर्विकार । ब्रह्मास नाहीं पारावार । बोलती साधु ॥ १ ॥ ब्रह्म सर्वांस व्यापक । ब्रह्म अनेकीं एक । ब्रह्म शाश्वत हा विवेक । बोलिला शास्त्रीं ॥२॥ ब्रह्म अच्युत[1] अनंत । ब्रह्म सदोदित संत[2] । ब्रह्म कल्पनेरहित । निर्विकल्प ॥ ३ ॥ ब्रह्म दृश्यावेगळें । ब्रह्म शून्यत्वा निराळें । ब्रह्म इंद्रियांच्या मेळें । चोजवेना[3] ॥ ४ ॥ ब्रह्म दृष्टीस दिसेना । ब्रह्म मूर्खास असेना । ब्रह्म गुरुविण येईना । अनुभवासी ॥ ५ ॥ ब्रह्म सकळांहूनि थोर । ब्रह्माऐसें नाहीं सार । ब्रह्म सूक्ष्म अगोचरें[4] । ब्रह्मादिकांसी ॥ ६ ॥ ब्रह्म शब्दीं ऐसें तैसें । बोलिजे त्याहूनि अनारिसें[5] । परी तें श्रवणअभ्यासें । पाविजे ब्रह्म ॥ ७ ॥ ब्रह्मास नामें अनंत । परी तें ब्रह्म नामातीत । ब्रह्मास हे दृष्टांत । देतां न शोभती ॥८॥ ब्रह्मासारिखें दुसरें । पाहतां काय आहे खरें । ब्रह्मीं दृष्टांतउत्तरें[6] । कदा न साहे ॥९॥ जेथें वाचा निवर्तती[7] । मनास नाहीं ब्रह्मप्राप्ती । ऐसी बोलिली श्रुती । सिद्धांतवचनीं ॥ १० ॥ कल्पनारूप मन पाहीं । ब्रह्मीं कल्पनाचि नाहीं । म्हणोनि हें वाक्य कांहीं । अन्यथा नव्हे ॥ ११ ॥ आतां मनासि

---

१. चळत नाहीं असें. २. असणारें. ३. जाणवेना. ४. अदृश्य. ५. निराळें. ६. दृष्टांतांनीं युक्त भाषणें. ७. परत वळते.

जें अप्राप्त । तें कैसेनि होईल प्राप्त । ऐसें म्हणाल तरी कृत्य । सद्गुरूविण नाहीं ॥ १२ ॥ भांडारगृहें भरलीं । परी असती अडकलीं । हातास न येतां किल्ली । सर्वही अप्राप्त ॥ १३ ॥ तरी ते किल्ली ते कवण । मज करावी निरूपण । ऐसा श्रोता पुसे खुण । वक्तयासी ॥ १४ ॥ सद्गुरुकृपा तेचि किल्ली । जेणें बुद्धि प्रकाशली । द्वैतकपाटें[१] उघडलीं । एकसरां ॥ १५ ॥ ते सुख असे थोड[२] । नाहीं मनासि पवाड[३] । मनेंविण कैवाड[४] । साधनाचा ॥ १६ ॥ त्याची मनाविण प्राप्ती । कीं वासनेविण तृप्ती । तेथें न चले व्युत्पत्ती । कल्पनेची ॥ १७ ॥ तें परेहूनि[५] पर । मन बुद्धि अगोचर । संग[६] सोडितां सत्वर । पाविजे तें ॥ १८ ॥ संग सोडावा आपुला । मग पाहावें तयाला । अनुभवितां या बोला । सुखावेल गा ॥ १९ ॥ आपण म्हणिजे मीपण । मीपण म्हणजे जीवपण । जीवपण म्हणिजे अज्ञान । संग जडला ॥ २० ॥ सोडितां तया संगासी । ऐक्य होय निःसंगासी । कल्पनेविण प्राप्तीसी । अधिकार ऐसा ॥ २१ ॥ मी कोण ऐसें नेणिजे । तया नांव अज्ञान बोलिजे । अज्ञान गेलिया पाविजे । परब्रह्म तें ॥ २२ ॥ देहबुद्धीचें[७] थोरपण । परब्रह्मीं न चले जाण । तेथें होतसे निर्वाण[८] । अहंभावासी ॥२३॥ उंच नीच नाहीं परी । राया रंका एकच तरी । झाला पुरुष अथवा नारी । एकाचि पद ॥ २४ ॥ ब्राह्मणाचें ब्रह्म तें सोंवळें । शूद्राचें ब्रह्म तें वोवळें । ऐसें वेगळें आगळें । तेथें असेचि ना ॥ २५ ॥ उंच ब्रह्म तें रायासी । नीच ब्रह्म तें परिवारासी । ऐसा भेद तयापासीं । मुळींच नाहीं ॥ २६ ॥ सकळांस मिळोन ब्रह्म एक । तेथें नाहीं अनेक । रंक अथवा ब्रम्हादिक । तेथेंचि जाती ॥ २७ ॥ स्वर्ग मृत्यु आणि पाताळ । तिही लोकींचे ज्ञाते सकळ । सकळांसि मिळोनि एकचि स्थळ । विश्रांतीचें ॥ २८ ॥ गुरु शिष्यां एकचि पद । तेथें नाहीं भेदाभेद । परी या देहाचा संबंध । तोडिला पाहिजे ॥ २९ ॥ देहबुद्धीच्या अंतीं । सकळांसि एकचि प्राप्ती । एकं ब्रम्ह द्वितीयं[९] नास्ति । हें श्रुतीचें वचन ॥ ३० ॥ साधु दिसती वेगळाले । परी ते

१. ब्रम्हास झांकून ठवणारें द्वैतमय जग हींच कपाटें. २. पुष्कळ. ३. शिरकाव. ४. नाना प्रकार. ५. परा वाणीच्या पलीकडील. ६. विषयांची आसक्ति. ७. मी म्हणजे देह ही समजूत तिच्यासंबंधीं. ८. लय. ९. दुसरें नाहीं.

स्वस्वरूपीं मिळाले । अवघे मिळोनि एकचि झाले । देहातीतें[1] वस्तु[2] ॥३१॥
ब्रम्ह नाहीं नवें जुनें। ब्रम्ह नाहीं अधिक उणें । उणें भावील तें सुणें[3]। देह-
बुद्धीचें ॥३२॥ देहबुद्धीचा निश्चय। करी समाधानाचा क्षय। चुके समाधान-
समय । देहबुद्धियोगें ॥ ३३ ॥ देहाचें जें थोरपण । तेंचि देहबुद्धीचें
लक्षण । मिथ्या जाणोन विचक्षण । निंदिती देह ॥३४॥ देह पावे जंववरी
मरण । तंववरी धरी देहाभिमान । पुन्हा दाखवी पुनरागमन[4] । देहबुद्धी
मागुती ॥३५॥ देहाचेनि थोरपणें । समाधानासि आणिलें उणें । देह पडेल
कोण्या गुणें । हेंहि कळेना ॥ ३६ ॥ हित आहे देहातीतें[1] । म्हणोनि निरू-
पिती संत। देहबुद्धीनें अनहित । होऊंचि लागे ॥३७॥ सामर्थ्यबळें देहबुद्धी ।
योगियांस तेहि बाधी । देहबुद्धीची उपाधी । पैसावों लागे ॥ ३८ ॥
म्हणोन देहबुद्धि झडे । तरीच परमार्थ घडे । देहबुद्धीनें बिघडे । ऐक्य-
ता ब्रम्हींची ॥ ३९ ॥ विवेक वस्तूकडे वोढी । देहबुद्धि तेथूनि पाडी ।
अहंता लावूनि निवडी । वेगळेपणें ॥ ४० ॥ विचक्षणें या कारणें । देह-
बुद्धि त्यजावी श्रवणें । सत्यब्रम्हीं साचारणपणें । मिळोन जावें ॥ ४१ ॥
सत्यब्रम्ह तें कवण । ऐसा श्रोता करी प्रश्न । प्रत्युत्तर दे आपण । व-
क्ता श्रोतयासी ॥ ४२ ॥ म्हणे ब्रम्ह एकचि असे । परी तें बहुविध भासे ।
अनुभव देहीं अनारिसे । नानामतीं ॥ ४३ ॥ जें जें जया अनुभवलें। तेंचि
तयासि मानलें । तेथेंचि त्याचें विश्वासलें। अंतःकरण ॥४४॥ ब्रह्म नामरूपा-
तीत । असोनि नामें बहुत। निर्मळ निश्चळ निवांत । निजानंद ॥४५॥ अरूप
अलक्ष अगोचर । अच्युत[5] अनंत अपार । अदृश्य अतर्क्य अपार। ऐसीं नामें
॥४६॥ नादरूप ज्योतिरूप । चैतन्यरूप सत्तारूप। स्वस्वरूप साक्षरूप। ऐसीं
नामें ॥४७॥ शून्य आणि सनातन । सर्वेश्वर आणि सर्वज्ञ । सर्वात्मा[6] जगज्जी-
वन । ऐसीं नामें ॥ ४८ ॥ सहज[7] आणि सदोदित[8] । शुद्ध बुद्ध[9] सर्वातीत[10]।
शाश्वत आणि शब्दातीत[11] । ऐसीं नामें ॥ ४९ ॥ विशाळ विस्तीर्ण विश्वंभर।
विमळ वस्तु व्योमाकार । आत्मा परमात्मा परमेश्वर । ऐसीं नामें ॥ ५० ॥
परमात्मा ज्ञानघन। एकरूप पुरातन। चिद्रूप चिन्मात्र जाण। नामें अनाम्या-

---

१. देहाहून वेगळें. २. ब्रम्ह. ३. क्षुद्र. ४. पुन्हा जन्मास येणें. ५. न ढळणारें. ६. सर्वांस व्यापून राहतो तो. ७. कृत्रिम नव्हे. ८. सदैव प्रकाशित असणारें. ९. ज्ञानमय. १०. सर्वांहून भिन्न. ११. वाणीच्या पलीकडचें.

चीं ॥ ५१ ॥ ऐसीं नामें असंख्यात । परी तो परेश नामातीत । त्याचा करावया निश्चितार्थं । ठेविलीं नामें ॥५२॥ तो विश्रांतीचा विश्राम । आदिपुरुष आत्माराम । तें एकचि परब्रम्ह । दुसरें नाहीं ॥ ५३ ॥ तेंचि कळायाकारणें । चौदा ब्रह्मांचीं लक्षणें । सांगिजेती तेणें श्रवणें । निश्चय बाणे ॥ ५४ ॥ खोटें निवडितां एकसरें । उरलें तें जाणिजे खरें । चौदा ब्रह्में शास्त्राधारें । बोलिजेती ॥ ५५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके ब्रह्मनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. चतुर्दश ब्रह्म.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रोतीं व्हावें सावधान । आतां सांगतों ब्रह्मज्ञान । जेणें होय समाधान । साधकांचें ॥ १ ॥ रत्नें साधायाकारणें । मृत्तिका लागे एकवटणें । चौदा ब्रम्हांचीं लक्षणें । जाणिजे तैसीं ॥ २ ॥ पदार्थेंविण संकेत । द्वैतावगळा दृष्टांत । पूर्वपक्षेंविण सिद्धांत । बोलतांचि नये ॥ ३ ॥ आधीं मिथ्या उभारावें । मग तें वोळखोन सांडावें । पुढें सत्य तें स्वभावें । अंतरीं बाणे ॥ ४ ॥ म्हणोन चौदा ब्रह्मांचा संकेत । बोलिला कळावया सिद्धांत । येथें श्रोतीं सावचित्त । क्षण एक असावें ॥ ५ ॥ पहिलें तें शब्दब्रह्म । दुजें ओमित्येकाक्षरं[1] ब्रह्म । तिसरें खंब्रह्म[2] । बोलिली श्रुती ॥ ६ ॥ चौथें जाण सर्व[3] ब्रह्म । पांचवें चैतन्य[4] ब्रह्म । साहावें सत्ता[5] ब्रह्म । साक्षि ब्रह्म सातवें ॥ ७ ॥ आठवें सगुण ब्रह्म । नववें निर्गुण ब्रह्म । दाहावें वाच्य[6] ब्रह्म । जाणावें पै ॥ ८ ॥ अनुभव तें अक्रावें । आनंदब्रह्म तें बारावें । तदाकार तें तेरावें । चौदावें अनिर्वाच्यं[7] ॥ ९ ॥ ऐसीं हीं चौदा ब्रम्हें । यांचीं निरूपिलीं नामें । आतां स्वरूपाचीं वर्मे । संकेतें दावूं ॥ १० ॥ अनुभवेंविण भ्रम । या नांव शद्बब्रम्ह । आतां ओमित्येकाक्षरं ब्रम्ह । तें एकाक्षर ॥११॥ खं शब्दें आकाशब्रम्ह । महदाकाश व्यापक ब्रम्ह । आतां बोलिजेल सूक्ष्मब्रम्ह । सर्व ब्रम्ह ॥ १२ ॥ पंचभूतांचें कोडें । जें जें तत्व दृष्टीस पडे । तें तें ब्रम्हचि रोकडें । बोलिजेत आहे ॥ १३ ॥ या नांव सर्व ब्रम्ह । श्रुतिआश्रयाचें

---

१. ॐ असें एक अक्षर. २. आकाशरूप. ३. सर्व दृश्य हेंच ब्रह्म. ४. ज्ञानरूप. ५. अस्तित्वमात्र. ६. वाणीरूप. ७. शब्दानें सांगण्यास अशक्य.

वर्म । आतां चैतन्यब्रम्ह । बोलिजेल ॥ १४ ॥ पंचभूतादि मायेतें । चैतन्यचि चेतवितें । म्हणोनियां चैतन्यातें । चैतन्य ब्रम्ह बोलिजे ॥ १५ ॥ चैतन्यास ज्याची सत्ता । तें सत्ताब्रम्ह तत्वतां । तये सत्तेस जाणतां । या नांव साक्षिब्रम्ह ॥ १६ ॥ साक्षित्व जयापासूनी । तेंहि आकळिलें गुणीं । सगुण ब्रह्म हे वाणी । तयासि वदे ॥ १७ ॥ जेथें नाहीं गुणवार्ता । तें निर्गुण ब्रह्म तत्वतां । वाच्यब्रम्ह तेंहि आतां । बोलिजेल ॥ १८ ॥ जें वाचे बोलतां आलें । तें वाच्य ब्रम्ह बोलिलें । अनुभवासि कथिलें । न वचे सर्वथा ॥१९॥ या नांव अनुभवब्रह्म । आनंदवृत्तीचा धर्म । परंतु याचेंहि वर्म । बोलवेना ॥ २० ॥ ऐसें हें ब्रह्म आनंद । तदाकार तें अभेद । अनिर्वाच्य संवाद । तुटोनि गेला ॥ २१ ॥ ऐसीं हीं चौदा ब्रह्में । निरूपिलीं अनुक्रमें । साधकें पाहतां भ्रमें । बाधिजेना ॥ २२ ॥ ब्रम्ह जाणावें शाश्वत । माया तेचि अशाश्वत । चौदा ब्रम्हांचा सिद्धांत । होईल आतां ॥२३॥ शब्दब्रम्ह तें शाब्दिक । अनुभवेंविण मायिक । शाश्वताचा विवेक । तेथें नाहीं ॥२४॥ जेथें क्षर[1] ना अक्षर[2] । तेथें कैंचें ओमित्येकाक्षर । शाश्वताचा विचार । तेथें न दिसे ॥ २५ ॥ खंब्रम्ह ऐसें वचन । तरी शून्यातें नाशी ज्ञान । शाश्वताचें अधिष्ठान । तेथें न दिसे ॥ २६ ॥ सर्वत्रांस होतो अंत । हें तों प्रगटचि दिसत । प्रळय बोलिला निश्चित । वेदांतशास्त्रीं ॥२७॥ ब्रम्हप्रळय मांडेल जेथें । भूतान्वय[3] कैंचा तेथें । म्हणोनियां सर्वब्रम्हातें । नाश आहे ॥२८॥ अचळासि आणी चळण । निर्गुणास लावितां गुण । आकारास विचक्षण । मानातिना ॥२९॥ जें निर्माण पंचभूत । तें प्रत्यक्ष नाशवंत । सर्वब्रम्ह हे मात । घडे केंवी ॥३०॥ असो आतां हें बहुत । सर्व ब्रह्म नाशवंत । वेगळेपणास अंत । पाहणें कैचें ॥ ३१ ॥ आतां जयास चेतवावें । तेंचि मायिक स्वभावें । तेथें चैतन्याच्या नांवें । नाश आला ॥ ३२ ॥ परिवारेंविण सत्ता । ते सत्ता नव्हे तत्वतां । पदार्थेंविण साक्षता । तेंहि मिथ्या ॥ ३३ ॥ सगुणास नाश आहे । प्रत्यक्षास प्रमाण काये । सगुण ब्रह्म निश्चयें । नाशवंत ॥ ३४ ॥ निर्गुण ऐसें जें नांव । त्या नांवास कैंचा ठाव । गुणेंविण गौरव । येईल कैचें ॥ ३५ ॥ माया जैसें मृगजळ । ऐसें बोलती सकळ । कां तें कल्पनेचें आभाळ । नाथिलेंचि ॥

१. विनाशी. २. अविनाशी. ३. पंचभूतांचा संबंध.

३६ ॥ ग्रामो नास्ति कुतः सीमा । जन्मेंविण जीवात्मा । अद्वैतासि उपमा । द्वैताची ॥ ३७ ॥ मायेविरहित सत्ता । पदार्थाविण जाणता । अविद्येविण चैतन्यता । कोणास आली ॥ ३८ ॥ सत्ता चैतन्यता साक्षी । सर्वहि गुणांचियेपाशीं । ठायींचें निर्गुण त्यासी । गुण कैंचे ॥ ३९ ॥ ऐसें जें गुणरहित । तेथें नामाचा संकेत । तोचि जाणावा अशाश्वत । निश्चयेंसी ॥ ४० ॥ निर्गुणब्रह्मासि संकेतें । नामें ठेविलीं बहुतें । तें वाच्यब्रह्म त्यातें । नाश आहे ॥ ४१ ॥ आनंदाचा अनुभव । हाहि वृत्तीचाच भाव । तदाकारीं ठाव । वृत्तीस नाहीं ॥ ४२ ॥ अनिर्वाच्य याकारणें । संकेतवृत्तीच्या गुणें । तया संकेतास उणें । वृत्तीनें आणिलें ॥ ४३ ॥ अनिर्वाच्य ते निवृत्ती । तेचि उन्मनीची स्थिती । निरुपाधी विश्रांती । योगियांची ॥ ४४ ॥ वस्तु जे कां निरुपाधी । तेचि सहजसमाधी । जेणें तुटे आधिव्याधी । भवदुःखाची ॥ ४५ ॥ जो उपाधीचा अंत । तोचि जाणावा सिद्धांत । सिद्धांत आणि वेदांत । धादांत आत्मा ॥ ४६ ॥ असो ऐसें जें शाश्वत ब्रह्म । जेथें नाहीं मायाभ्रम । अनुभवी जाणे वर्म । स्वानुभवें ॥ ४७ ॥ आपुलेनि अनुभवें । कल्पनेसी मोडावें । मग सुकाळीं पडावें । अनुभवाचे ॥ ४८ ॥ निर्विकल्पासि कल्पावें । कल्पना मोडे स्वभावें । मग नसोनि असावें । कल्पकोटी ॥ ४९ ॥ कल्पनेचें एक बरें । मोहारितांचें मोहेरे । स्वरूपीं घालितां भरे । निर्विकल्पीं ॥ ५० ॥ निर्विकल्पास कल्पितां । कल्पनेची नुरे वार्ता । निःसंगास भेटों जातां । निःसंग होइजे ॥ ५१ ॥ पदार्थाऐसें ब्रम्ह नव्हे । मा तें हातीं धरूनि द्यावें । असो हें अनुभवावें । सद्गुरुमुखें ॥ ५२ ॥ पुढें कथेचा अन्वये । केलाचि करूं निश्चये । जेणें अनुभवास ये । केवळ ब्रम्ह ॥ ५३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके चतुर्दशब्रम्हनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥३॥

---

## ४. विमल ब्रह्म.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्रम्ह नभाहूनि निर्मळ । पाहतां तैसेंचि पोकळ ।

१. गांवच नाहीं तर शींव कशाची ? तद्वत् द्वैतच नाहीं, तर अद्वैत म्हणून तरी काय सांगावें ? २. एकरूपतेंत. ३. मनाच्या लयाची. ४. अंतर्बाह्य पीडा. ५. फिरविलांत फिरते. ६. मग. ७. संबंध. ८. आकाशाहून.

अरूप[1] आणि विशाळ । मर्यादेवेगळें ॥ १ ॥ एकवीस स्वर्ग सप्त पाताळ । मिळोन एक ब्रह्मगोळ । ऐसें अनंत तें निर्मळ । व्यापून असे ॥ २ ॥ अनंत ब्रम्हांडाखालतें । अनंत ब्रम्हांडावरुतें । तेणेंविण स्थळ रितें । अणुमात्र नाहीं ॥ ३ ॥ जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं । ऐसी वदे लोकवाणी । तेणेंविण रिता प्राणी । एकहि नाहीं ॥ ४ ॥ जळचरांस जैसें जळ । बाह्य अभ्यंतरीं निखळ । तैसें ब्रह्म हें केवळ । जीवमात्रांसी ॥ ५ ॥ जळावेगळा ठाव आहे । ब्रह्मा-बाहेरि जातां न ये । म्हणोनि उपमा न साहे । जळाची तया ॥ ६ ॥ आका-शाबाहेरि पळों जातां । पुढें आकाशचि तत्वतां । तैसा तया अनंता । अंतचि नाहीं ॥ ७ ॥ परी जें अखंड भेटलें । सर्वांगास लिगडिलें । अतिनिकट-पणीं चोरलें । सकळांसि जें ॥ ८ ॥ तयामध्येंचि असिजे । परी तयासि नेणिजे । उमजे भास[2] नुमजे । परब्रह्म तें ॥ ९ ॥ आकाशामध्यें आभाळ । तेणें आकाश वाटे डहुळ । परी तें मिथ्या निवळ । आकाशचि असे ॥ १० ॥ न्याहार[3] देतां आकाशीं । चक्रें दिसती डोळयांशीं । तैसें दृश्य ज्ञानि-याशीं । मिथ्यारूप ॥ ११ ॥ मिथ्याचि परी आभासे । निद्रितासी स्वप्न जैसें । जागा झालिया आपैसें । बुझों लागे ॥ १२ ॥ तैसें आपुलेनि अनु-भवें । ज्ञानें जागृतीस यावें । मग मायिक स्वभावें । कळों लागे ॥ १३ ॥ आतां असो हें कुवाडें[4] । जें ब्रह्मांडा पैलीकडे । तेंचि आतां निवाडें । उमजोनि दावूं ॥ १४ ॥ ब्रह्म ब्रह्मांडीं कालवलें । पदार्थमात्रासि व्यापूनि ठेलें । सर्वां[5]-मध्यें विस्तारलें । अंशमात्रें ॥ १५ ॥ ब्रह्मामध्यें सृष्टि भासे । सृष्टीमध्यें ब्रह्म असे । अनुभव घेतां आभासे । अंशमात्रें ॥ १६ ॥ अंशमात्रें सृष्टीभीतरीं । बाहेरि मर्यादा कोण करी । सगळें ब्रह्म ब्रह्मांडोदरीं । मायील कैसें ॥ १७ ॥ अमूर्तीमध्यें आकाश । सगळें सांठवतां प्रयास । म्हणोन तयाचा अंश । बोलिजे तो ॥ १८ ॥ ब्रह्म तैसें कालवलें । परी तें नाहीं हालवलें । सर्वांत परी संचलें । संचलेपणें ॥ १९ ॥ पंचभूतीं असे मिश्रित । परंतु तें पंच-भूतातीत । पंकीं[6] आकाश अलिप्त । असोनि जैसें ॥ २० ॥ ब्रह्मास दृष्टांत न घडे । बुझावया देणें घडे । पारि दृष्टांतीं साहित्य[7] पँडे[8] । विचारितां आ-

१. रूपरहित. २. परब्रह्मावरील भास, जग. ३. नजर. ४. कोडें. ५. तीर्थ ठेवण्याचें भांडें, त्यांत. ६. चिखलांत. ७. अलंकारशास्त्र. ८. अपुरतें होतें.

काश ॥ २१ ॥ खंब्रह्म ऐसी श्रुती । गगनसदृशं हे स्मृती । म्हणोन ब्रह्मास दृष्टांतीं । आकाश घडे ॥ २२ ॥ कालिमा नसतां पितळ । मग तें सोनेंचि केवळ । शून्यत्व नसतां निर्मळ । आकाश ब्रह्म ॥ २३ ॥ म्हणोन ब्रह्म जैसें गगन । आणि माया जैसा पवन । आढळे परी दर्शन । नव्हे त्याचें ॥ २४ ॥ शब्दसृष्टीची रचना । होत जात क्षणक्षणा । परंतु ते स्थिरावेना । वायूऐसी ॥ २५ ॥ असो ऐसी माया मायिक । शाश्वत तें ब्रम्ह एक । पाहों जातां अनेक । व्यापून असे ॥ २६ ॥ पृथ्वीसि भेदूनि राहे । परी तें ब्रम्ह कठिण नव्हे । दुजी उपमा न साहे । तया मृदुत्वासी ॥ २७ ॥ पृथ्वीहूनि मृदु जळ । जळाहूनि तो अनळ[1] । अनळाहूनि कोमळ । वायु जाणावा ॥२८॥ वायूहूनि तें गगन । अत्यंतचि मृदु जाण । गगनाहूनि मृदु पूर्ण । ब्रम्ह जाणावें ॥ २९ ॥ वज्रास असे भेदिलें । परी मृदुत्व नाहीं गेलें । उपमेरहित संचिलें । कठिण ना मृदु ॥ ३० ॥ पृथ्वीमध्यें व्यापूनि असे । पृथ्वी नासे तें न नासे । जळ शोषे तें न शोषे । जळीं असोनी ॥ ३१ ॥ तेजीं असे परी जळेना । पवनीं[2] असे परी चळेना । गगनीं असे परी ढळेना । परब्रम्ह तें ॥ ३२ ॥ शरीरीं अवघें व्यापिलें । परी तें नाहीं आढळलें । जवळींच दुरावलें । नवल कैसें ॥ ३३ ॥ सन्मुखचि चहूंकडे । तयामध्यें राहणें घडे । बाह्याभ्यंतरीं रोकडें । सिद्धचि आहे ॥ ३४ ॥ तयामध्येंचि आपण । सबा[3]ह्य तें जाण । दृश्यावेगळी खुण । गगनासारिखी ॥ ३५ ॥ कांहीं नाहींसें वाटलें । तेथेंचि तें कोंदाटलें । जैसें न दिसे आपुलें । आपणासि धन ॥ ३६ ॥ जो जो पदार्थ दृष्टीस पडे । तें त्या पदार्था पैलीकडे । अनुभवें हें कुवाडें[4] । उकलावें ॥ ३७ ॥ मागें पुढें आकाश । पदार्थेविण जो पैस[5] । पृथ्वीविण भकास[6] । एकरूप ॥ ३८ ॥ जें जें रूप आणि नाम । तो तो नाथि[7]लाचि भ्रम । नामरूपातीत वर्म । अनुभवी जाणती ॥ ३९ ॥ नभीं धूम्राचे डोंगर । उचलती थोर थोर । तैसें दावी वोडंबर[8] । माया देवी ॥ ४० ॥ ऐशी माया अशाश्वत । ब्रम्ह जाणावें शाश्वत । सर्वांठायीं सदोदित । भरलें असे ॥ ४१ ॥ पोथी वाचूं जातां पाहे । मातृकांमध्यें[9] भरलें आहे ।

१. अग्नि. २. वायूमध्यें. ३. आंत बाहेर. ४. कोडें ५. अवकाश. ६. ओसाड. ७. नसलेला. ८. गारुड. ९ अक्षरांमध्यें.

नेत्रीं रिघोनियां राहे । मृदुपणें ॥ ४२ ॥ श्रवणें शब्द ऐकतां । मनें विचार पाहतां । मना सबाह्य[1] तत्वतां । परब्रम्ह तें ॥ ४३ ॥ चरणें चालतां मार्गीं । जें आढळे सर्वांगीं । करें घेतां वस्तुलागीं । आडवें ब्रम्ह ॥ ४४ ॥ असो इंद्रियसमुदाय । तयामध्यें वर्ते सर्व । जाणों जातां मोडे हांव । इंद्रियांची ॥ ४५ ॥ जें जवळींच असे । पाहों जातां न दिसे । न दिसोन वसे । कांहीं एक ॥ ४६ ॥ जें अनुभवेंचि जाणावें । सृष्टीचेनि अभावें । आपुलेनि स्वानुभवें । पाविजे ब्रम्ह ॥ ४७ ॥ ज्ञानदृष्टीचें देखणें । चर्मदृष्टी[2] पाहों नेणे । अंतरवृत्तीचिये खुणे । अंतरवृत्ति साक्ष ॥ ४८ ॥ जाणे ब्रम्ह जाणे माया । जाणे अनुभवाच्या ठाया । ते एक जाणावी तुर्या । सर्वसाक्षणी ॥ ४९ ॥ साक्षित्व वृत्तीचें कारण । उन्मनी[3] ते निवृत्ती जाण । तेथें विरे जाणपण । विज्ञान तें ॥ ५० ॥ जेथें अज्ञान सरे । ज्ञान तेंहि तुरे । विज्ञानवृत्ति मुरे । परब्रम्हीं ॥ ५१ ॥ ऐसें ब्रम्ह शाश्वत । जेथें कल्पनेसि अंत । योगिजनांचा एकांत । अनुभवें जाणावें ॥ ५२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके विमलब्रम्हनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. द्वैतकल्पनानिरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ केवळ ब्रह्म जें बोलिलें । तें अनुभवास आलें । आणि मायेचें लागलें । अनुसंधान ॥ १ ॥ ब्रह्म अंतरीं प्रकाशे । आणि मायाही प्रत्यक्ष दिसे । आतां हें द्वैत निरसे । कवणेपरी ॥ २ ॥ तरी आतां सावधान । एकाग्र करूनियां मन । माया ब्रह्म हें कवण । जाणताहे ॥ ३ ॥ सत्य ब्रम्हाचा संकल्प । मिथ्या मायेचा विकल्प । ऐशिया द्वैताचा जल्प[4] । मनचि करी ॥ ४ ॥ जाणे ब्रम्ह जाणे माया । ते एक जाणावी तुर्या[5] । सर्व जाणे म्हणोनियां । सर्वसाक्षिणी ॥ ५ ॥ ऐक तुर्येचें लक्षण । जेथें सर्व जाणपण । सर्वचि नाहीं कवण । जाणेल गा ॥ ६ ॥ संकल्पविकल्पांची सृष्टी । झाली मनाचिये पोटीं । तें मनचि मिथ्या शेवटीं । साक्षी कवण ॥ ७ ॥ साक्षित्व चैतन्य सत्ता । हे गुण ब्रम्हाचिया माथां । आरोपिले जाण वृथा । मायागुणें

---

१. दिसत नाहीं पण आहे. २. डोळ्यानें. ३. मनाच्या लयाची अवस्था. ४. तर्क. ५. सविकल्प समाधि.

॥ ८ ॥ घटमठाचेनि गुणें । त्रिविध[1] आकाश हें बोलणें । मायेचेनि खरेपणें । गुण ब्रम्हीं ॥ ९ ॥ जंव खरेपण मायेसी । तंवचि साक्षित्व ब्रम्हासी । माया-अविद्येचे निरासीं[2] । द्वैत कैचें ॥ १० ॥ म्हणोनि सर्वसाक्षी मन । तेंचि झालिया उन्मन[3] । मग तुर्यारूप ज्ञान । तें मावळोन गेलें ॥ ११ ॥ जयास द्वैत भासलें । तें मन उन्मन झालें । द्वैताद्वैतांचें तुटलें । अनुसंधान ॥१२॥ एवं द्वैत आणि अद्वैत । होय वृत्तीचा संकेत । वृत्ति झालिया निवृत्त । द्वैत कैंचें ॥ १३ ॥ वृत्तिरहित जें ज्ञान । तेंचि पूर्ण समाधान । जेथें तुटे अनुसंधान । मायाब्रम्हाचें ॥ १४ ॥ मायाब्रम्ह ऐसा हेत । मनें कल्पिला संकेत । ब्रम्ह कल्पनेरहित । जाणती ज्ञानी ॥ १५ ॥ जें मनबुद्धि अगोचर । जें कल्पनेहूनि पर । तें अनुभवितां साचार । द्वैत कैंचें ॥ १६ ॥ द्वैत पाहतां ब्रम्ह नसे । ब्रम्ह पहातां द्वैत नासे । द्वैताद्वैत भासे । कल्पनेसी ॥१७॥ कल्पना माया निवारी । कल्पना ब्रम्ह थावरी[4] । संशय धरी आणि वारी । तेहि कल्पना ॥ १८ ॥ कल्पना करी बंधन । कल्पना दे समाधान । ब्रम्हीं लावी अनुसंधान । तेहि कल्पना ॥ १९ ॥ कल्पना द्वैताची माता । कल्पना ज्ञप्ति[5] तत्वता । बद्धता आणि मुक्तता । कल्पनागुणें ॥ २० ॥ कल्पना अंतरीं सबळ । नसते दावी ब्रह्मगोळ । क्षणएकांत निर्मळ । स्वरूप कल्पी ॥ २१ ॥ क्षणएक धोका वाहे । क्षणएक स्थिर राहे । क्षणएक पाहे । विस्मित होउनी ॥ २२ ॥ क्षणएकांत उमजे । क्षणएक निबुजे[6] । नाना विकार करिजे । ते कल्पना जाणावी ॥ २३ ॥ कल्पना जन्माचें मूळ । कल्पना भक्तीचें फळ । कल्पना तेचि केवळ । मोक्षदात्री ॥ २४ ॥ असो ऐसी हे कल्पना । साधनें दे समाधाना । येऱ्हवीं हे पतना[7] । मूळचि कीं ॥ २५ ॥ म्हणोनि सर्वांचें मूळ । ते हे कल्पनाचि केवळ । इचें केलिया निर्मूळ । ब्रह्मप्राप्ती ॥ २६ ॥ श्रवण आणि मनन । निजध्यासें समाधान । मिथ्या कल्पनेचें भान । उडोनि जाय ॥ २७ ॥ शुद्धब्रह्माचा निश्चय । करी कल्पनेचा जय । निश्चितार्थें संशय । तुटोनि जाय ॥२८॥ मिथ्या कल्पनेचें कोडें ।

---

१. घटानें मर्यादित, मठानें मर्यादित, व अमर्याद असें त्रिविध. २. निरसन झाल्यावर. ३. संकल्पविकल्परहित. ४. स्थापित करी. ५. ज्ञान. ६. समजत नाहींसें होतें. ७. नाशास कारण.

कैसें राहे साचापुढें । जैसें सूर्याचेनि उजेडें । नासे तम ॥ २९ ॥ तैसें ज्ञानाचेनि प्रकाशें। मिथ्या कल्पना हे नासे । मग हें तुटे आपैसें । द्वैतानु-संधान[1] ॥ ३० ॥ कल्पनेनें कल्पना उडे । जैसा मृगें मृग सांपडे । कां शरें शर आतुडे[2] । आकाशमार्गीं ॥ ३१ ॥ शुद्ध कल्पनेचें बळ । झालिया नासे सबळें[3] । हेंचि वचन प्रांजळ । सावध ऐका ॥ ३२ ॥ शुद्ध कल्पनेची खूण । स्वयें कल्पिजे निर्गुण । स्वस्वरूपीं विस्मरण । पडोंचि नेदी ॥ ३३ ॥ सदा स्वरूपानुसंधान । करी द्वैताचें निरसन । अद्वैत निश्चयाचें ज्ञान । तेचि शुद्ध कल्पना ॥ ३४ ॥ अद्वैत कल्पी ते शुद्ध । द्वैत कल्पी ते अशुद्ध । अ-शुद्ध तेचि प्रसिद्ध । सबळ जाणावी ॥ ३५ ॥ शुद्ध कल्पनेचा अर्थ । अद्वै-ताचा निश्चितार्थ । आणि सबळ ते व्यर्थ । द्वैत कल्पी ॥ ३६ ॥ अद्वैत क-ल्पना प्रकाशे । तेच क्षणीं द्वैत नासे । द्वैतासरसी निरसे । सबळ कल्पना ॥ ३७ ॥ कल्पनेनें कल्पना सरे । ऐसें जाणावें चतुरें । सबळ गेलियानंतरें । शुद्ध उरली ॥ ३८ ॥ शुद्ध कल्पनेचें रूप । तेंचि कल्पी स्वरूप । कल्पितां तद्रूप । होय आपण ॥ ३९ ॥ कल्पनेसि मिथ्यात्व आलें । सहजचि तद्रूप झालें । आत्मनिश्चयें नाशिलें । कल्पनेसी ॥ ४० ॥ जेचि क्षणीं निश्चय चळे । तेचि क्षणीं द्वैत उफाळे[4] । जैसा अस्तमानीं प्रबळे । अंधकार ॥ ४१ ॥ तैसें ज्ञान होतां मलिन । अज्ञान प्रबळे जाण । या कारणें श्रवण । अखंड असावें ॥ ४२ ॥ आतां असो हें बोलणें झालें । आशंका फेडूं एका बोलें । जयास अद्वैत भासलें । तें तूं नव्हेसी सर्वथा[5] ॥ ४३ ॥ मागील आशंका फिटली । इतुकेन हे कथा संपली । पुढें वृत्ति सावध केली । पाहिजे श्रोतीं ॥ ४४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके द्वैतकल्पनानिरसननिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. बद्धमुक्त.

श्रीगणेशाय नमः ॥ अद्वैत ब्रह्म निरूपिलें । जें कल्पनारहित संचलें । क्षणएक तदाकार केलें । मज या निरूपणें ॥ १ ॥ परी म्यां तदाकार व्हावें ।

---

१. जगताचा भास. २. तुटून पडता. ३. शबल, औपाधिक. ४. उसळतें. ५. कल्पनेला अद्वैत भासतें, ती कल्पना कांहीं स्वरूप नव्हे.

ब्रम्हाचि होऊन असावें । पुनः संसारास न यावें । चंचळपणें सर्वथा ॥ २ ॥ कल्पनेरहित जें सुख । तेथें नाहीं संसारदुःख । म्हणोनि तेंचि एक । होऊन असावें ॥ ३ ॥ बम्हचि होइजे श्रवणें । पुन्हा वृत्तीवरी[1] लागे येणें । ऐसें सदा येणें । चुकेना कीं ॥ ४ ॥ मनें अंतरीं जावें । क्षणएक ब्रम्हचि व्हावें । पुन्हा तेथून कोसळावें । वृत्तिवरी माागुती ॥ ५ ॥ प्रत्यावृत्ति सैरावैरा[2] । किती करूं येरझारा । पायीं लावूनियां दोरा । कीटक जैसा ॥ ६ ॥ उपदेश-काळीं तदाकार । होतां पडे हें शरीर । अथवा नेणे आपपर । ऐसें झालें पाहिजे ॥ ७ ॥ ऐसें नसतां जें बोलणें । तेंचि वाटे लाजिरवाणें । ब्रम्ह हो-ऊन संसार करणें । हेंहि विपरीत दिसे ॥ ८ ॥ जो स्वयें ब्रम्हचि झाला । तो मागुता कैसा आला । ऐसें ज्ञान माझें मजला । प्रशस्त न वाटे ॥ ९ ॥ ब्रम्ह होऊन जावें । कां ते संसारींच असावें । दोहींकडे भरंगळावें । किती म्हणोनी ॥ १० ॥ निरूपणीं ज्ञान प्रबळे। उठोन जातां तें मावळे । मागुता कामक्रोध खवळे । ब्रम्हरूपासी[3] ॥ ११ ॥ ऐसा कैसा ब्रम्ह झाला । दोहींकडे अंतरला । वोडगस्तपणेंचि गेला । संसार त्याचा ॥ १२॥ घेतां ब्रम्हसुखाची गोडी । संसारिक मार्गे वोढी । संसार करितां आवडी। ब्रम्हीं उपजे ॥१३॥ ब्रम्हसुख नेलें संसारें । संसार नेला ज्ञानद्वारें । दोन्हीं अपुरीं पुरें । एकहि नाहीं ॥ १४ ॥ याकारणें माझें चित्त । चंचळ झालें दुश्चित । याकारणें निश्चितार्थ । एकहि नाहीं ॥ १५ ॥ ऐसा श्रोता करी विनंती । आतां राहावें कोणे रीती । म्हणे अखंड माझी मती । ब्रह्माकार नाहीं ॥ १६ ॥ आतां याचें प्रत्युत्तर । वक्ता देईल सुंदर । श्रोतीं व्हावें निरुत्तर । क्षणएक आतां ॥ १७ ॥ ब्रह्मचि होऊन जे पडिले । तेचि मुक्तिपदास गेले । येर ते काय बुडाले । व्यासादिक ॥ १८ ॥ श्रोता विनंती करी पुढती । शुको मुक्तो वामदेवो वा[4] हे श्रुती । दोघेचि मुक्त आदि अंतीं । बोलत असे ॥ १९ ॥ वेदें बद्ध केले सर्व । मुक्त शुक्त वामदेव । वेदवचनीं अभावें[5] । कैसा धरा-वा ॥ २० ॥ ऐसा श्रोता वेदाधारें । देता झाला प्रत्युत्तरें । दोघेचि मुक्त अत्यादरें । प्रतिपाद्य केले ॥ २१ ॥ वक्ता बोले याउपरी । दोघेचि मुक्त सृ-

१. देहभानावर. २. पुन्हा पुन्हा. ३. ब्रम्हरूप झालेल्या मला. ४. ‘ शुक मुक्त किंवा वामदेव मुक्त.’ ५. अविश्वास.

ष्टीवरी । ऐसें बोलतां उरी । कोणास आहे ॥ २२ ॥ बहु ऋषी बहु मुनी । सिद्ध योगी आत्मज्ञानी । झाले पुरुष समाधानी । असंख्यात ॥ २३ ॥ श्लोक ॥ प्रल्हादनारदपराशरपुंडरीकव्यासांबरीषशुकशौनकभीष्मदाल्भ्यान् ॥ रुक्मांगदार्जुनवसिष्ठबिभीषणादीन्पुण्यानिमान्परमभागवतान्स्मरामि ॥ १ ॥ कविर्हरिरंतरिक्षः प्रबुद्धः पिप्पलायनः ॥ आविर्होत्रोऽथ द्रुमिलश्चमसः करभाजनः ॥ २ ॥ यांही वेगळे थोर थोर । ब्रम्हा विष्णु महेश्वर । आदिकरून दिगंबर[2] । विदेहादिकें[3] ॥ २४ ॥ शुक वामदेव मुक्त झाले । येर हे अवघेच बुडाले । या वचनें विश्वासले । ते पढतमूर्ख ॥ २५ ॥ तरी वेद कैसा बोलिला । तो काय तुम्हीं मिथ्या केला । ऐकोन वक्ता देता झाला । प्रत्युत्तर ॥ २६ ॥ वेद बोलिला पूर्वपक्ष । मूर्ख तेथेंचि लावी लक्ष । साधु आणि व्युत्पन्न दक्ष । त्यास हें न माने ॥ २७ ॥ तथापि हें जरी मानलें । तरी वेदसामर्थ्य बुडालें । वेदाचेनि उद्धरिलें । न वचे कोणा ॥ २८ ॥ वेदाअंगीं सामर्थ्य नसे । जरी या वेदासि कोण पुसे । म्हणोनि वेदीं सामर्थ्य असे । जन उद्धरावया ॥ २९ ॥ वेदाक्षर घडे ज्यासी । तो बोलिजे पुण्यराशी । म्हणोनि वेदीं सामर्थ्यासी । काय उणें ॥ ३० ॥ वेद शास्त्र पुराण । भाग्यें झालिया श्रवण । तेणें होइजे पावन । हें बोलती साधु ॥ ३१ ॥ श्लोक अथवा श्लोकार्ध । नाहीं तरी श्लोकपाद[4] । श्रवण होतां एक शब्द । नाना दोष जाती ॥ ३२ ॥ वेदशास्त्रीं पुराणीं । ऐशा वाक्यांच्या अयनीं[5] । अगाध महिमा व्यासवाणी । वदोनि गेली ॥ ३३ ॥ एकाक्षर होतां श्रवण । तात्काळांचि होइजे पावन । ऐसें ग्रंथाचें महिमान । ठायीं ठायीं बोलिलें ॥ ३४ ॥ दोहीं-वेगळा तिजा नुद्धरे । तरी महिमा कैंचा उरे । असें हें जाणिजे चतुरें । येर-गाथागोवी ॥ ३५ ॥ वेदशास्त्रें पुराणें । कैशीं होती अप्रमाणें । दोघांवांचूनि तिसरा कोणें । उद्धरावा ॥ ३६ ॥ म्हणसी काष्ठ होऊनि पडिला । तोचि एक मुक्त झाला । शुक तोहि अनुवादला । नाना निरूपणें ॥ ३७ ॥ शुक मुक्त ऐसें वचन । वेद बोलिला हें प्रमाण । परी तो नव्हता अचेतन[6] । ब्रम्हाकार ॥ ३८ ॥ अचेतन ब्रम्हाकार । असता शुक योगीश्वर । तरी सारासार विचार ।

१. बाकी कोण उरलें? मुक्त कोणीच नाहीं असें झालें. २. संन्यासी. ३. जनकादिक. ४. श्लोकाचा एक चरण. ५. ठिकाणीं ६. जड, सुस्त.

बोलणें न घडे ॥ ३९ ॥ जो ब्रम्हाकार झाला । तो काष्ठ होऊन पडिला । शुक भागवत बोलिला । परीक्षितीपुढें ॥ ४० ॥ निरूपण हें सारासार । बोलिला पाहिजे विचार । धांडोळावें चराचर । दृष्टांताकारणें ॥ ४१ ॥ क्षणएक ब्रम्हचि व्हावें । क्षणएक दृश्य धांडोळावें । नाना दृष्टांतीं संपादावें । वक्तृत्वासी ॥ ४२ ॥ असो भागवतनिरूपण । शुक बोलिला आपण । तया अंगीं बद्धपण । लावूं नये कीं ॥ ४३ ॥ म्हणोनि बोलतां चालतां । निचेष्टित पडिलें नसतां । मुक्ति लाभे सायुज्यता । सद्गुरुबोधें ॥ ४४ ॥ एक मुक्त एक नित्यमुक्त । एक जाणावे जीवन्मुक्त । एक योगी विदेहमुक्त । समाधानी ॥ ४५ ॥ सचेतन ते जीवन्मुक्त[१] । अचेतन ते विदेहमुक्त[२] । दोहीं वेगळे नित्यमुक्त । योगीश्वर जाणावे ॥ ४६ ॥ स्वरूपबोधें स्तब्धता[३] । ते जाणावी तटस्थता । तटस्थता आणि स्तब्धता । हा देहसंबंध ॥ ४७ ॥ येथें अनुभवासीच कारण । येर सर्व निष्कारण । तृप्ति पावावी आपण । आपुल्या स्वानुभवें ॥ ४८ ॥ कंठमर्याद जेविला । त्यास म्हणती भुकेला । तेणें शब्दें जाजावला । हें तों घडेना ॥ ४९ ॥ स्वरूपीं नाहीं देह । तेथें कायसा संदेह । बद्ध मुक्त ऐसा भाव । देहाचकडे ॥ ५० ॥ देहबुद्धी धरून चित्तीं । मुक्त ब्रम्हादिक नव्हती । तेथें शुकाची कोण गती । मुक्तपणाची ॥ ५१ ॥ मुक्तपणें येणेंचि बद्ध । मुक्त बद्ध हे अबद्ध[४] । स्वस्वरूप स्वतःसिद्ध । बद्ध ना मुक्त ॥ ५२ ॥ मुक्तपणाची पोटीं शिळा । बांधतां जाइजे पाताळा । देहबुद्धीची अगळा[५] । स्वरूपीं न[६] संटे ॥ ५३ ॥ मीपणापासून सुटला । तोचि एक मुक्त जाहला । मुका अथवा बोलिला । तरी तो मुक्त ॥ ५४ ॥ जयास बांधावें तें वावं[७] । तेथें कैंचा मुक्तभाव । पाहों जातां सकळ वाव । गुणवार्ता[८] ॥ ५५ ॥ श्लोक ॥ बद्धो मुक्त इति व्याख्या गुणतो मे न वस्तुतः ॥ गुणस्य मायामूलत्वान्न मे मोक्षो न बंधनम् ॥ १ ॥ टीका ॥ तत्वज्ञाता परम शुद्ध । तयासि नाहीं मुक्त बद्ध । मुक्त बद्ध हा विनोद । मायागुणें ॥ ५६ ॥ जेथें नामरूप हें सरे । तेथें मुक्तपण कैचें उरे । मुक्तबद्ध हें विसरे । विसरपणेंसी

---

१. देहभानावर असणारे; व्यवहार करणारे. २. देहभानरहित, समाधिनिमग्न. ३. इंद्रियगति थांबणें. ४. गैरशिस्त. ५. अडथळा. ६. टिकत नाहीं. ७. भ्रामक. ८. त्रिगुणांचा विचार.

॥ ५७ ॥ बद्ध मुक्त झाला कोण । ऐसा श्रोता करी प्रश्न । बाधक जाणावें मीपण । धर्त्यास बाधी ॥५८॥ एवं हा अवघा भ्रम । अहंतेचा जाण भ्रम । मायातीत जो विश्राम । सेविला नाहीं ॥५९॥ असो बद्धता आणि मुक्तता । आली कल्पनेच्या माथां । ते कल्पना तरी तत्वतां । साच आहे[1] ॥ ६० ॥ म्हणोनि हें मृगजळ । माया नाथिलें आभाळ । स्वप्न मिथ्या तात्काळ । जागृतीस होय ॥ ६१ ॥ स्वप्नीं बद्ध मुक्त झाला । तो जागृतीस नाहीं आला । कैंचा कोण काय झाला । कांहीं कळेना ॥ ६२ ॥ म्हणोन मुक्त विश्वजन । जयांस झालें आत्मज्ञान । शुद्धज्ञानें मुक्तपण । समूळ वाव ॥६३॥ बद्ध मुक्त हा संदेह । धरी कल्पनेचा देह । साधु सदा निःसंदेह । देहातीत वस्तु ॥ ६४ ॥ आतां असो हें पुढती । पुढें कळावें कोणे रीतीं । तेंचि निरूपण श्रोतीं । सावध परिसावें ॥ ६५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके बद्धमुक्तनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. साधनप्रतिष्ठा.

श्रीगणेशाय नमः ॥ वस्तूसि जरी कल्पावें । तरी तें निर्विकल्प स्वभावें । तेथें कल्पनेच्या नांवें । शून्याकार ॥ १ ॥ तथापि कल्पूं जातां । न ये कल्पनेच्या हातां । वोळखी ठायीं[2] न पडे[2] चित्ता । भ्रंश पडे ॥ २ ॥ कांहीं दृष्टीसि न दिसे । मनास तेंहि न भासे । न भासे न दिसे कैसें । वोळखावें ॥ ३ ॥ पाहों जातां निराकार । मनासि पडे शून्याकार । कल्पूं जातां अंधकार । भरला वाटे ॥ ४ ॥ कल्पूं जातां वाटे काळें । परी तें काळें ना पिवळें । आरक्त निळें ना ढवळें[3] । वर्णरहित ॥ ५ ॥ जयास वर्ण व्यक्ती[4] नसे । भासाहूनि अनारिसें । रूपचि नाहीं कैसें । वोळखावें ॥ ६ ॥ न दिसतां वोळखण । किती धरावी आपण । हें तों भ्रमासीच कारण । होत असे ॥ ७ ॥ जो निर्गुण गुणातीत । जो अदृश्य अव्यक्त[5] । जो अचिंत्य चिंतनातीत । परमपुरुष ॥ ८ ॥ श्लोक ॥ अचिंत्याव्यक्तरूपाय निर्गुणाय गुणात्मने । समस्तजगदाधारमूर्तये ब्रह्मणे नमः ॥ १ ॥ अचिंत्य तें चिंतावें । अव्यक्तास आठवावें । निर्गुणास ओळखावें । कोणेपरी ॥ ९ ॥ जें दृष्टीसचि

---

१. खरी आहे? नाहीं. २. सांपडत नाहीं. ३. पांढरें. ४. आकार. ५. गुप्त.

न पडे । जें मनासहि नातुडे । तया कैसें पाहणें घडे । निर्गुणासी ॥ १० असंगाचा संग धरणें । निरालंबीं वास करणें । निःशब्दासि अनुवादणें । कोणे परी ॥ ११ ॥ अचिंत्यासि चिंतूं जातां । निर्विकल्पासि कल्पितां । अद्वैताचें ध्यान करितां । द्वैतचि उठे ॥ १२ ॥ आतां ध्यानचि सांडावें । अनुसंधान मोडावें । तरी मागुतें पडावें । महासंशयीं ॥ १३ ॥ द्वैताच्या भेणें अंतरीं । वस्तु न पाहिजे तरी । तेणें समाधाना दुरी । कदा असेचि ना ॥ १४ ॥ सवे लावितां सवे पडे । सवे पडतां वस्तु आतुडे । नित्यानित्य विचारें घडे । समाधान ॥ १५ ॥ वस्तु चिंतितां द्वैत उपजे । सोडी करितां कांहीं नुमजे । शून्यत्वें संदेहीं पडिजे । विवेकेंविण ॥ १६ ॥ ह्मणोनि विवेक धरावा । ज्ञानें प्रपंच सांडावा । अहंभाव वोसरावा । परी तो वोसरेना ॥ १७ ॥ परब्रह्म तें अद्वैत । कल्पितांच उठे द्वैत । तेथें हेतु आणि दृष्टांत । कांहींच न चले ॥ १८ ॥ तें आठवितां विसरिजे । कां तें विसरोन आठविजे । जाणोणियां नेणिजे । परब्रह्म तें ॥ १९ ॥ त्यास न भेटतां होय भेटी । भेटों जातां पडे तुटी । ऐशी हे नवल गोष्टी । मुकेपणाची ॥ २० ॥ तें साधूं जातां साधवेना । नातरी सोडितां सुटेना । लागला संबंध तुटेना । निरंतर ॥ २१ ॥ तें असतचि सदा असे । नातरी पाहतां दुरांसे । न पाहतां प्रकाशे । जेथें तेथें ॥ २२ ॥ जेथें अपाय तोचि उपाय । आणि उपाय तोचि अपाय । हें अनुभवेंविण काय । उमजों जाणे ॥ २३ ॥ तें नुमजतांचि उमजे । उमजोन कांहींच नुमजे । तें वृत्तीविण पाविजे । निवृत्तिपद ॥ २४ ॥ तें ध्यानीं धरितां न ये । चिंतनीं चिंतावें तें काय । मनामध्यें नें समाये । परब्रह्म तें ॥२५॥ त्यास उपमे द्यावें जळ । तरी तें निर्मळ निश्चळ । विश्व बुडालें सकळ । परी तें कोरडेंचि असे ॥ २६ ॥ नव्हे प्रकाशासारिखें । अथवा नव्हे काळोखें । आतां तें कासयासारिखें । सांगावें हो ॥ २७ ॥ ऐसें ब्रह्म निरंजन । कदा नव्हे दृश्यमान । लावावें तें अनुसंधान । कोणे परी ॥२८॥ अनुसंधान लावूं जातां । कांहीं नाहीं वाटे आतां । तेणें मनाचिये माथां । संदेह वाजे ॥ २९ ॥ लटिकेंचि काय पाहावें । कोठें

१. न कळे. २. अधांतरीं. ३. ठावठिकाण. ४. दुरावतें. ५. मावत नाहीं. ६. उपाधिरहित. ७. पाइण्याजोगें.

जाऊन राहावें । अभाव घेतला जीवें । सत्यस्वरूपाचा ॥ ३० ॥ अभावाचि म्हणों सत्य । तरी वेदशास्त्र कैसें मिथ्य । आणि व्यासादिकांचें कृत्य[1] । वाउगें नव्हे ॥ ३१ ॥ ह्मणोनि मिथ्या म्हणतां न ये । बहुत ज्ञानाचे उपाय । बहुतीं निर्मिलें तें काय । मिथ्या ह्मणावें ॥ ३२ ॥ अद्वैत ज्ञानाचा उपदेश । गुरुगीता तो महेश । सांगता होय पार्वतीस । महाज्ञान ॥ ३३ ॥ अवधूतें गीता केली । गोरक्षास निरूपिली । ते अवधूतगीता बोलिली । ज्ञानमार्गें ॥ ३४ ॥ विष्णु होऊन राजहंस । विधीसें[2] केला उपदेश । ते हंसगीता जगदीश । बोलिला स्वमुखें ॥ ३५ ॥ ब्रम्हा नारदातें उपदेशित । चतुःश्लोकी भागवत । पुढें व्यासमुखें बहुत । विस्तारलें ॥ ३६ ॥ वासिष्ठसार वसिष्ठ ऋषी । सांगता झाला रघुनाथासी । कृष्ण सांगे अर्जुनासी । सप्तश्लोकी[3] गीता ॥ ३७ ॥ ऐसें सांगावें तें किती । बहुत ऋषि बोलिले बहुतीं । अद्वैतज्ञान आदि अंतीं । सत्यचि असे ॥ ३८ ॥ म्हणोन मिथ्या आत्मज्ञान । म्हणतां पाविजे पतन । प्रज्ञेरहित जे जन । तयांस हें कळेना ॥ ३९ ॥ जेथें शेषाची प्रज्ञा[4] मंदली । श्रुतीस मौनमुद्रा पडिली । जाणपणें न वचे वदली । स्वरूपस्थिति ॥ ४० ॥ आपणास नुमजे बरवें । ह्मणोनि मिथ्या कैसें करावें । नातरी सुदृढ धरावें । सद्गुरुमुखें ॥ ४१ ॥ मिथ्या तेंचि सत्य झालें । सत्य असोनि मिथ्या केलें । संदेहसागरीं बुडालें । अकस्मात मन ॥ ४२ ॥ मनास कल्पायाची सवे । मनें कल्पिलें तें नव्हे । तेणें गुणें संदेह धांवे । मीपणाचेनि पंथें ॥४३॥ तरी तो पंथचि मोडावा । मग परमात्मा जोडावा । समूळ संदेह तोडावा । साधूचेनि संगतीं ॥४४॥ मीपण शस्त्रें तुटेना । मीपण फोडितां फुटेना । मीपण सोडितां सुटेना । कांहीं केल्या ॥ ४५ ॥ मीपणें वस्तु नाकळे । मीपणें भक्ति मावळे । मीपणें शक्ति गळे । वैराग्याची ॥ ४६ ॥ मीपणें प्रपंच न घडे । मीपणें परमार्थ बुडे । मीपणें सकळहि उडे । यश कीर्ती प्रताप ॥ ४७ ॥ मीपणें मैत्री तुटे । मीपणें प्रीति आटे । मीपणें लिगटे । अभिमान अंगीं ॥ ४८ ॥ मीपणें विकल्प उठे । मीपणें कलह सुटे । मीपणें संमोह फुटे । ऐक्यतेचा ॥४९॥ मीपण कोणासीच न साहे । तें भगवंतीं कैसेनि साहे । म्हणून

१. ग्रंथरूप कृति. २. ब्रम्हदेवास. ३. सप्तशतश्लोकी, सातशें श्लोकांची. ४. बुद्धि.

मीपण सांडून राहे । तोचि समाधानी ॥ ५० ॥ मीपण कैसें त्यागावें । ब्रम्ह कैसें अनुभवावें । समाधान कैसें पावावें । कोण्या प्रकारें ॥ ५१ ॥ मीपण जाणोन त्यागावें । ब्रम्ह होऊन अनुभवावें । समाधान तें पावावें । निःसंगपणें ॥ ५२ ॥ आणिक एक समाधान । मीपणेंविण साधन । करूं जाणे तोचि धन्य । समाधानी ॥ ५३ ॥ मी ब्रम्हचि झालों स्वतां । साधन कोण करील आतां । ऐसें मनीं कल्पूं जातां । कल्पनाचि उठे ॥ ५४ ॥ ब्रम्हीं कल्पना न साहे । तेचि तेथें उभी राहे । तयेसि शोधूनि पाहे । तोचि साधु ॥ ५५ ॥ निर्विकल्पासि कल्पावें । परी कल्पिलें तें आपण न व्हावें । मीपणास त्यागावें । येणें रीती ॥ ५६ ॥ ब्रम्हविद्येच्या लपर्नीं[1] । कांहींच न व्हावें असोनी । दक्ष आणि समाधानी । तोचि हें जाणे ॥ ५७ ॥ जयास आपण कल्पावें । तेंचि आपण स्वभावें । येथें कल्पनेच्या नांवें । शून्य आलें ॥ ५८ ॥ पदींहून[2] चळों नये । करावें साधन उपाय । तरीच सांपडे सोय । अलिप्तपणाची ॥ ५९ ॥ राजा राज्यपदीं असतां । उगीच चाले सर्वसत्ता । साध्यचि होऊन तत्वतां । साधन करावें ॥ ६० ॥ साधन आलें देहाच्या माथां । आपण देह नव्हे सर्वथा । ऐसा करून अकर्ता । सहजचि आहे ॥६१॥ देह आपण ऐसें कल्पावें । तरीच साधन त्यागावें । देहातीत असतां स्वभावें । देह कैंचा ॥ ६२ ॥ ना तें साधन ना तें देह । आपण आपला निःसंदेह । देहींच असोन विदेह[3]- । स्थिती ऐसी ॥ ६३ ॥ साधनेंविण ब्रम्ह होतां । लागों पाहे देहममता । आळस प्रबळे तत्वतां । ब्रम्हज्ञानमिसें ॥६४॥ परमार्थमिसें आळस जागे । ध्यानमिसें निद्रा लागे । मुक्तिमिसें दोष भोगे[4] । अनर्गळता[5] ॥६५॥ निरूपणमिसें निंदा घडे । संवादमिसें विवाद घडे । उपाधिमिसें येऊन जडे । अभिमान अंगीं ॥ ६६ ॥ तैसा ब्रम्हज्ञानमिसें । आळस अंतरीं प्रवेशे । म्हणे साधनाचें पिसें । काय करावें ॥६७॥ श्लोक ॥ किं करोमि क्व गच्छामि किं गृण्हामि त्यजामि किम् । आत्मना पूरितं सर्वं महाकल्पांबुना यथा ॥ १ ॥ वचन आधारीं लाविलें । जैसें शस्त्र फिरविलें । स्वतां हाणोनि घेतलें । जयापरी ॥ ६८ ॥ तैसा उपायाचा अपाय । विपरीतपणें स्वहित जाय । साधन सोडितां होय । मुक्तपणें बद्ध ॥ ६९ ॥

---

१. पोटीं. २. स्वरूपांतून. ३. देहसंबंधीं अलिप्तपणा. ४. लागतो. ५. स्वैरपणा.

साधन करितां सिद्धपण । हातींचें जाईल निघोन । तेणें गुणें साधन । करूंच नावडे ॥ ७० ॥ लोक म्हणती हा साधक । हेचि लज्जा वाटे एक । साधन करिती ब्रम्हादिक । हें ठाउकें नाहीं ॥ ७१ ॥ आतां असो हे अविद्या । अभ्यासंसारिणी[1] विद्या । अभ्यासें पाविजे आद्या । पूर्ण ब्रम्हा ॥ ७२ ॥ अभ्यास करावा कवण । ऐसा श्रोता करी प्रश्न । परमार्थाचें साधन । बोलिलें पाहिजे ॥७३॥ याचें उत्तर श्रोतयांसी । दीधलें पुढिलिये समासीं । निरूपिलें साधनासी । परमार्थाच्या ॥ ७४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके साधनप्रतिष्ठानिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. श्रवण.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐक परमार्थाचें साधन । जेणें होय समाधान । तें तूं जाण गा श्रवण । निश्चयेंसीं ॥ १ ॥ श्रवणें आतुडे भक्ती । श्रवणें उद्भवे विरक्ती । श्रवणें तुटे आसक्ती । विषयांची ॥ २ ॥ श्रवणें घडे चित्तशुद्धी । श्रवणें होय दृढबुद्धी[2] । श्रवणें तुटे उपाधी । अभिमानाची ॥ ३ ॥ श्रवणें निश्चय घडे । श्रवणें ममता मोडे । श्रवणें अंतरीं जडे । समाधान ॥४॥ श्रवणें आशंका फिटे । श्रवणें संशय तुटे । श्रवण होतां पालटे । पूर्वगुण आपुला ॥ ५ ॥ श्रवणें आवरे मन । श्रवणें घडे समाधान । श्रवणें तुटे बंधन । देहबुद्धीचें ॥ ६ ॥ श्रवणें मीपण जाय । श्रवणें धोका न ये । श्रवणें नाना अपाय । भस्म होती ॥ ७ ॥ श्रवणें होय कार्यसिद्धी । श्रवणें लागे समाधी । श्रवणें घडे सर्वसिद्धी । समाधानाची ॥ ८ ॥ सत्संगावरी श्रवण । तेणें कळे निरूपण । श्रवणें होइजे आपण । तदाकार ॥ ९ ॥ श्रवणें प्रबोध[3] वाढे । श्रवणें प्रज्ञा[4] चढे । श्रवणें विषयांचे वोढे । तुटोनि जाती ॥ १० ॥ श्रवणें विचार कळे । श्रवणें ज्ञान हें प्रबळे । श्रवणें वस्तु निवळे । साधकासी ॥ ११ ॥ श्रवणें सद्बुद्धि लागे । श्रवणें विवेक जागे । श्रवणें मन हें मांगे[5] । भगवंतासी ॥१२॥ श्रवणें कुसंग तुटे । श्रवणें काम वोहटे । श्रवणें धोका आटे । एकसरां ॥१३॥ श्रवणें मोह नासे । श्रवणें स्फूर्ति प्रकाशे । श्रवणें सद्वस्तु भासे । निश्चयात्मक ॥ १४ ॥ श्रवणें होय उत्तम गती । श्रवणें

---

१. अभ्यासानें लाभणारी. २. निश्चय. ३. विवेक. ४. बुद्धि. ५. इच्छितें.

आतुडे[1] शांति । श्रवणें पाविजे निवृत्ती[2] । अचल पद ॥ १५ ॥ श्रवणाऐसें सार नाहीं । श्रवणें घडे सर्व कांहीं । भवनदीच्या प्रवाहीं । तरणोपाय श्रवणें ॥ १६ ॥ श्रवण भजनाचा आरंभ । श्रवण सर्वां सर्वारंभ । श्रवणें होय स्वयंभ । सर्व कांहीं ॥ १७ ॥ प्रवृत्ती[3] अथवा निवृत्ती[4] । श्रवणेंविण न घडे प्राप्ती । हे तों सकळांस प्रचीती । प्रत्यक्ष आहे ॥ १८ ॥ ऐकिल्याविण कळेना । हें ठाउकें आहे जना । या कारणें मूळ प्रयत्ना । श्रवण आधीं ॥ १९ ॥ जें जन्मीं ऐकिलेंचि नाहीं । तेथें पडिजे संदेहीं । म्हणोनिया दुजें कांहीं । साम्यता न घडे ॥ २० ॥ बहुत साधनें पाहतां । श्रवणास न घडे साम्यता । श्रवणेंविण तत्वतां । कार्य न चले ॥ २१ ॥ न देखतां दिनकर । पडे अवघा अंधकार । श्रवणेंविण प्रकार । तैसा होय ॥ २२ ॥ कैसी नवविधा भक्ती । कैसी चतुर्विधा मुक्ती । कैसी आहे सहजस्थिती । हें श्रवणेंविण न कळे ॥ २३ ॥ न कळे षट्कर्माचरण[5] । न कळे कैसें पुरश्चरण[6] । न कळे कैसें उपासन । विधियुक्त ॥ २४ ॥ नाना व्रतें नाना दानें । नाना तपें नाना साधनें । नाना योग तीर्थाटणें । श्रवणेंविण न कळती ॥ २५ ॥ नाना विद्या पिंडज्ञान । नाना तत्वांचें शोधन । नाना कळा ब्रह्मज्ञान । श्रवणेंविण न कळे ॥ २६ ॥ अठराभार[7] वनस्पती । एक्या जळें प्रबळती । एक्या जळें उत्पत्ती । सकळ जीवांची ॥ २७ ॥ सकळ जीवां एक पृथ्वी । सकळ जीवां एक रवी । सकळ जीवां वर्तवी । एक वायु ॥ २८ ॥ सकळ जीवां एक पैस । जयास बोलिजे आकाश । सकळ जीवांचा वास । एक परब्रह्मीं ॥ २९ ॥ तैसें सकळ जीवांस मिळोन । सारें[8] एकचि साधन । तें हें जाण श्रवण । प्राणिमात्रांसी ॥ ३० ॥ नाना देश भाषा मतें । भूमंडळीं असंख्यातें । सर्वांस श्रवणापरतें । साधनचि नाहीं ॥ ३१ ॥ श्रवणें घडे उपरती[9] । बद्धाचे मुमुक्षु होती । मुमुक्षूचे साधक अंतीं । नेमेंसि चालती ॥ ३२ ॥ साधकांचे होती सिद्ध । अंगीं बाणतां प्रबोध[10] । हें तों आहे प्रसिद्ध । सकळांस ठाउकें ॥ ३३ ॥ ठायींचे खळ चांडाळ । तेचि होती पुण्यशीळ । ऐसा हा

---

१. प्राप्त होते. २. अंतर्मुख होणें. ३. संसार. ४. परमार्थ. ५. अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान, प्रतिग्रह, यांचें आचरण. ६. मंत्राचा विधिपूर्वक जप. ७. सर्व प्रकारच्या. ८. श्रेष्ठ. ९. वैराग्य. १०. विवेक.

गुण तात्काळ । श्रवणाचा ॥ ३४ ॥ जो दुर्बुद्धि दुरात्मा । तोचि होय पुण्यात्मा । अगाध श्रवणाचा महिमा । बोलिला न वचे ॥ ३५ ॥ तीर्थेंव्रतांची फळश्रुती । पुढें होणार सांगती । तैसें नव्हे हातींच्या हातीं । सप्रचीत श्रवणें ॥ ३६ ॥ नाना रोग नाना व्याधी । तत्काळ तोडिजे औषधीं । तैसी आहे श्रवणसिद्धि । अनुभवी जाणती ॥ ३७ ॥ श्रवणाचा विचार कळे । तरीच भाग्यश्री प्रबळे । मुख्य परमात्मा आकळे । स्वानुभवासी ॥ ३८ ॥ या नांव जाणावें मनन । अर्थालागीं सावधान । निदिध्यासें समाधान । होत असे ॥ ३९ ॥ बोलिल्याचा अर्थ कळे । तरीच समाधान निवळे । अकस्मात अंतरीं वोळे । निःसंदेह ॥ ४० ॥ संदेह जन्माचें मूळ । तें श्रवणें होय निर्मूळ । पुढें सहजचि प्रांजळ । समाधान ॥ ४१ ॥ जेथें नाहीं श्रवण मनन । तेथें कैंचें समाधान । मुक्तपणाचें बंधन । जडलें पायीं ॥ ४२ ॥ मुमुक्षु साधक अथवा सिद्ध । श्रवणेंविण तो बद्ध । श्रवणमननें शुद्ध । चित्तवृत्ति होय ॥ ४३ ॥ जेथें नाहीं नित्य श्रवण । तें जाणावें विलक्षण । तेथें साधकें एक क्षण । क्रमूं नये सर्वथा ॥ ४४ ॥ जेथें नाहीं श्रवणस्वार्थ । तेथें कैंचा हो परमार्थ । मागें केलें तितुकें व्यर्थ । श्रवणेंविण होय ॥ ४५ ॥ तस्मात् श्रवण करावें । साधन मनीं धरावें । नित्यनेमें तरावें । संसारसागरीं ॥ ४६ ॥ सेविलेंचि सेवावें अन्न । घेतलेंचि घ्यावें जीवन । तैसें श्रवणमनन । केलेंच करावें ॥ ४७ ॥ श्रवणाचा अनादर । आळसें करी जो नर । त्याचा होय अपहार । स्वहिताविषयीं ॥ ४८ ॥ आळसाचें संरक्षण । परमार्थाची बुडवण । या कारणें नित्य श्रवण । केलेंचि पाहिजे ॥ ४९ ॥ आतां श्रवण कैसें करावें । कोण्या पंथास पावावें । पुढिलिये समासीं आघवें । सांगिजेल ॥ ५० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके श्रवणनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. श्रवण.

श्रीगणेशाय नमः ॥ आतां श्रवण कैसें करावें । तेंहि सांगिजेल स्वभावें । श्रोतीं अवधान द्यावें । एकचित्तें ॥ १ ॥ एक वक्तृत्व श्रवणीं पडे । तेणें झालें समाधान मोडे । केला निश्चय विघडे । अकस्मात ॥ २ ॥ तें वक्तृ-

त्व त्यागावें । जें मायिक स्वभावें । जेथें निश्चयाच्या नांवें । शून्याकार ॥ ३ ॥ एक्या ग्रंथें निश्चय केला । तो दुजयानें उडाविला । तेणें संशयचि वाढला । जन्मवरी ॥ ४ ॥ जेथें संशय तुटती । होय आशंकानिवृत्ती । अद्वैतग्रंथ परमार्थी । श्रवण करावे ॥ ५ ॥ जो मोक्षाचा अधिकारी । तो परमार्थपंथ धरी । प्रीति लागली अंतरीं । अद्वैतग्रंथाची ॥ ६ ॥ जेणें सांडिला इहलोक । जो परलोकींचा साधक । तेणें पाहावा विवेक । अद्वैतशास्त्रीं ॥ ७ ॥ जयास पाहिजे अद्वैत । तयापुढें ठेवितां द्वैत । तेणें क्षोभलें उठे चित्त । श्रोतयांचें ॥ ८ ॥ आवडीसारिखें मिळे । तेणें सुखचि उचंबळे । नाहीं तरी कंटाळे । मानस ऐकतां ॥ ९ ॥ ज्याची उपासना जैशी । त्यासि प्रीति वाढे तैसी । तेथें वर्णितां दुजयासी । प्रशस्त न वाटे ॥ १० ॥ प्रीतीचें लक्षण ऐसें । अंतरीं उठे अनायासें । पाणी पाणवाटे जैसें । आपणाचि धांवे ॥ ११ ॥ तैसा जो आत्मज्ञानी नर । तयास नावडे इतर । तेथें पाहिजे सारासार । विचारणा ते ॥ १२ ॥ जेथें कुळदेवी भगवती । तेथें पाहिजे सप्तशती । इतर देवांची स्तुती । कामा न ये सर्वथा ॥ १३ ॥ घेतां अनंताच्या व्रता । तेथें नलगे भगवद्गीता । साधुजनांसि वार्ता । फळाशेची नाहीं ॥ १४ ॥ वीरकंकण घालितां नाकीं । परी तें शोभा पावेना कीं । जेथील तेथें आणिकीं । कामा न ये सर्वथा ॥ १५ ॥ नाना माहात्म्यें बोलिलीं । जेथील तेथें वंद्य झालीं । विपरीत करून वाचिलीं । तरी तें विलक्षण ॥ १६ ॥ मल्लारिमाहात्म्य द्वारकेसी । द्वारकामाहात्म्य नेलें काशीसी । काशीमाहात्म्य व्यंकटेशीं । शोभा न पावे ॥ १७ ॥ ऐसें सांगतां असे वाड । परी जेथील तेथेंचि गोड । तैशी ज्ञानियांस चाड । अद्वैतग्रंथाची ॥ १८ ॥ योगियापुढें राहाणें[१] । परीक्षावंतापुढें पाषाण । पंडितापुढें डफगाण । शोभा न पावे ॥ १९ ॥ वेदज्ञापुढें जती[२] । निस्पृहापुढें फळश्रुती । ज्ञानियापुढें पोथी । कोकशास्त्राची[३] ॥ २० ॥ ब्रह्मचाऱ्यापुढें नाचणी[४] । रासक्रीडा निरूपणीं । राजहंसापुढें पाणी । ठेविलें जैसें ॥ २१ ॥ तैसें अंतर्निष्ठापुढें[५] । ठेविलें शृंगारिक टिपडें । तेणें त्याचें कैसें घडे । समाधान ॥ २२ ॥ रायास रंकाची आशा । तक्र सांगणें पीयूषा[६] ।

१. जादूटोणा. २. जैनांचा स्वामी. ३. कामशास्त्राची. ४. नायकीण. ५. ब्रह्मनिष्ठापुढें. ६. अमृताला.

संन्याशास वोवसा[1] । उच्छिष्ट चांडोळीचा[2] ॥ २३ ॥ कर्मनिष्ठा वशीकरण । पंचाक्षरिया निरूपण । तेथें भंगे अंतःकरण । सहजचि त्याचें ॥ २४ ॥ तैसे पारमार्थिक जन । तयांस नसतां आत्मज्ञान । ग्रंथें[3] वाचितां समाधान । होणार नाहीं ॥ २५ ॥ आतां असो हें बोलणें । जयास स्वहित करणें । तेणें सदा विवरणें । अद्वैतग्रंथीं ॥ २६ ॥ आत्मज्ञानीं एकचित्त । तेणें पाहणें अद्वैत । एकांतस्थळीं निवांत । समाधान ॥ २७ ॥ बहुत प्रकारें पाहतां । ग्रंथ नाहीं अद्वैतापरता । परमार्थास तत्वतां । तारूंच कीं ॥ २८ ॥ इतर जे प्रापंचिक । हास्य विनोद नवरसिक । हित नव्हे तें पुस्तक । परमार्थासीं ॥ २९ ॥ जेणें परमार्थ वाढे । अंगीं अनुताप[4] चढे । भक्तिसाधन आवडे । त्या नांव ग्रंथ ॥ ३० ॥ जो ऐकतांच गर्व गळे । कां ते भ्रांतीच मावळे । नातरी एकसरें वोळे । मन भगवंतीं ॥ ३१ ॥ जेणें होय उपरती[5] । अवगुण अवघे पालटती । जेणें चुके अधोगती । त्या नांव ग्रंथ ॥ ३२ ॥ जेणें धारिष्ट चढे । जेणें परोपकार घडे । जेणें विषयवासना मोडे । त्या नांव ग्रंथ ॥ ३३ ॥ जेणें परत्रसाधन । जेणें ग्रंथें होय ज्ञान । जेणें होइजे पावन । त्या नांव ग्रंथ ॥ ३४ ॥ ग्रंथ बहुत असती । नानाविधानें फळश्रुती । जेथें नुपजे विरक्ती । तो ग्रंथचि नव्हे ॥ ३५ ॥ मोक्षेंविण फळश्रुती । ते दुराशेची पोथी । ऐकतां ऐकतां पुढती । दुराशा वाढे ॥ ३६ ॥ श्रवणीं लोभ उपजेल जेथें । विवेक कैंचा असेल तेथें । बैसलीं दुराशेचीं भुतें । तयां अधोगती ॥ ३७ ॥ ऐकोनीच फळश्रुती । पुढें तरी पावों म्हणती । तयां जन्म अधोगती । सहजचि जाहली ॥ ३८ ॥ नाना फळें पक्षी खाती । तेणेंचि तयां होय तृप्ती । परी त्या चकोराचे[6] चित्तीं । अमृत वसे ॥ ३९ ॥ तैसें संसारी मनुष्य । पाहे संसाराची वास । परी जे भगवंताचे अंश । ते भगवंत इच्छिती ॥ ४० ॥ ज्ञानियांस पाहिजे ज्ञान । भजकास पाहिजे भजन । साधकास पाहिजे साधन । इच्छेसारिखें ॥ ४१ ॥ परमार्थ्यास पाहिजे परमार्थ । स्वार्थ्यास पाहिजे स्वार्थ । कृपणास पाहिजे अर्थ[7] । मनापासूनी ॥ ४२ ॥ योगियास पाहिजे योग । भोगियास[8] पाहिजे भोग ।

---

१. व्रत. २. एक क्षुद्र देवता, तिचा. ३. ज्यांत आत्मज्ञान नाहीं तो ग्रंथ. ४. संसाराचा कंटाळा. ५. वैराग्य. ६. एक पक्षी, त्या े. ७. द्रव्य. ८. विषयी पुरुषास.

रोगियास पाहिजे रोग-। हरती मात्रा ॥ ४३ ॥ कवीस पाहिजे प्रबंध[१]। तार्किकास पाहिजे तर्कवाद । भाविकास संवाद[२] । गोड वाटे॥ ४४ ॥ पंडितास पाहिजे व्युत्पत्ती । विद्वानास अध्ययनप्रीती । कलावंता आवडती । नाना कळा ॥ ४५ ॥ हरिदासां आवडे कीर्तन । शुचिर्भूतास संध्यास्नान । कर्मनिष्ठा विधिविधान । पाहिजे तें ॥ ४६ ॥ प्रेमळास पाहिजे करुणा । दक्षता पाहिजे विचक्षणा । चातुर्य पाहे शाहाणा । आदरेंसी ॥ ४७ ॥ भक्त पाहे मूर्तिध्यान । संगीत[३] पाहे तालज्ञान । रागज्ञानी तानमान । मूर्च्छना पाहे ॥ ४८ ॥ योगाभ्यासी पिंडज्ञानें[४] । तत्वज्ञानी तत्वज्ञान । नाडीज्ञानी मात्राज्ञान । पाहतसे ॥ ४९ ॥ कामिक पाहे कोकशास्त्र[५] । चेटकी पाहे चेटकमंत्र । यंत्री पाहे नानायंत्र । आदरेंसी ॥ ५० ॥ टवाळासि आवडे विनोद । उन्मत्तास नानाछंद । तामसास प्रमाद[६] । गोड वाटे ॥ ५१ ॥ मूर्ख होय नादलुब्धी । निंदक पाहे उणी संधी । पापी पाहे पापबुद्धी । लावून अंगीं ॥ ५२ ॥ एका पाहिजे रसाळ । एका पाहिजे पाल्हाळ । एका पाहिजे केवळ । साबडी भक्ती ॥ ५३ ॥ आगमी[७] पाहे आगम । शूर पाहे संग्राम । एक पाहती नानाधर्म । इच्छेसारिखे ॥ ५४ ॥ मुक्त पाहे मुक्तलीला । सर्वज्ञ पाहे सर्वज्ञकळा । ज्योतिषी भविष्य पिंगळा । वर्णू[८] पाहे ॥ ५५ ॥ ऐसे सांगावे ते किती । आवडीसारिखें ऐकती। नाना पुस्तकें वाचिती। सर्वकाळ ॥ ५६ ॥ परी परत्र साधनेंविण । म्हणों नये तें श्रवण । जेथें नाहीं आत्मज्ञान । तया नांव कर्मणुक ॥ ५७ ॥ गोडीविण[९] गोडपण । नाकेंविण सुलक्षण । ज्ञानेंविण निरूपण । बोलोंचि नये ॥ ५८ ॥ आतां असो हें बहुत । ऐकावा परमार्थग्रंथ । परमार्थग्रंथेंविण व्यर्थ । गाथागोवी ॥ ५९ ॥ म्हणोनि नित्यानित्य विचार । जेथें बोलिला सारासार । तोचि ग्रंथ पैलपार । पाववी विवेकें ॥ ६० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके श्रवणनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ५ ॥

---

१. कविता. २. सरळ, उपदेशपर भाषण. ३. गाणारा. ४. शरीराचें ज्ञान. ५. कामशास्त्र. ६. आळस. ७. वेदाभ्यासी. ८. परलोकींचें. ९. प्रेमावांचून.

## १०. देहातीत.

श्रीगणेशाय नमः ॥ मिथ्या तेंचि झालें सत्य । सत्य तेंचि झालें असत्य । मायाविभ्रमाचें कृत्य । ऐसें असे पहातां ॥ १ ॥ सत्य कळावयाकारणें । बोलिलीं नाना निरूपणें । तरी उठेना धरणें । असत्याचें ॥ २ ॥ असत्य अंतरीं बिंबलें । न सांगतां तें दृढ झालें । सत्य असोन हरपलें । जेथील तेथें ॥ ३ ॥ वेद शास्त्रें पुराणें सांगती । सत्याचा निश्चय करिती । तरी न ये आत्मप्रचीती । सत्यस्वरूप ॥ ४ ॥ सत्य असोन आच्छादलें । मिथ्या असोन सत्य झालें । ऐसें विपरीत वर्तलें । देखत देखतां ॥ ५ ॥ ऐशी मायेची करणी । कळों आली तत्क्षणीं । संतसंगें निरूपणीं । विचार घेतां ॥ ६ ॥ मागां झालें निरूपण । देखिलें आपणासि आपण । तेणें बाणली खूण । परमार्थाची ॥ ७ ॥ तेणें समाधान झालें । चित्त चैतन्यीं मिळालें । निजरूपें ओळखिलें । निजवस्तूसी[1] ॥ ८ ॥ प्रारब्धीं टाकिला देहो । बोधें फिटला संदेहो । आतांचि पडो अथवा राहो । मिथ्या कलेवरें[2] ॥ ९ ॥ ज्ञानियांचें जें शरीर । तें मिथ्यात्वें निर्विकार । जेथें पडे तेचि सार । पुण्यभूमी ॥ १० ॥ साधुदर्शनें पावन तीर्थें । पुरती त्यांचे मनोरथ । साधु न येतां जिणें व्यर्थ । तया पुण्यक्षेत्राचें ॥ ११ ॥ पुण्य[3] नदीचें जें तीर । तेथें पडावें हें शरीर । हा इतर जनांचा विचार । साधु तो नित्यमुक्त ॥ १२ ॥ उत्तरायण हें उत्तम । दक्षिणायन तें अधम । हा संदेहीं वसे भ्रम । साधु तो निःसंदेही ॥ १३ ॥ शुक्लपक्ष उत्तरायण । गृहीं दीप दिवां[4] मरण । अंतीं राहावें स्मरण । गतीकारणें ॥ १४ ॥ इतुकें नलगे योगियासि । तो जितांचि मुक्त पुण्यराशी । तिळांजली पापपुण्यांसी । दीधली तेणें ॥ १५ ॥ देहाचा अंत बरा आला । देह सुखरूप गेला । त्यास म्हणती धन्य झाला । अज्ञान जन ॥ १६ ॥ जनाचें विपरीत मत । अंतीं भेटतो भगवंत । ऐसें कल्पून घात । करिती स्वयें ॥ १७ ॥ जितां सार्थक नाहीं केलें । व्यर्थ आयुष्य निघोन गेलें । मुळीं धान्यचि नाहीं पेरिलें । तें उगवेल कैंचें ॥ १८ ॥ जरी केलें ईश्वरभजन । तरी होइजे पावन । जैसें वेव्हारितां[5] धान्य । राशी माथां लाभे ॥ १९ ॥ दिधल्याविण पाविजेना । पेरिल्याविण उग-

१. आत्म्यास. २. शरीर. ३. पुण्यकर. ४. दिवसां. ५. व्यापार केला असतां.

वेना । ऐसें हें वाक्य जना । ठाउकेंचि आहे ॥ २० ॥ न कारितां सेवेच्या व्यापारा । स्वामीस म्हणे कोठें मुशारा । तैसें अंतीं अभक्त नरा । स्वहित न घडे ॥ २१ ॥ जितां नाहीं भगवद्भक्ती । मेल्या कैंची होईल मुक्ती । असो जे जे जैसें करिती । ते ते पावती तैसें ॥ २२ ॥ एवं न कारितां भगवद्भजन । अंतीं न होइजे पावन । जरी आलें बरवें मरण । तरी भक्तीविण अधोगती ॥ २३ ॥ म्हणोन साधूनें आपुलें । जीत असतां सार्थक केलें । शरीर कारणीं लाविलें । धन्य त्याचें ॥ २४ ॥ जे कां जीववन्मुक्त प्राणी । त्यांचें शरीर पडो रानीं । अथवा पडो स्मशानीं । तरी धन्य झालें ॥ २५ ॥ साधूचा देह खितपला । अथवा श्वानादिकीं भक्षिला । हें प्रशस्त न वाटे जनाला । मंदबुद्धीस्तव ॥ २६ ॥ अंत बरा नव्हे म्हणोन । कष्टी होती इतर जन । परी ते बापुडे अज्ञान । नेणती वर्म ॥ २७ ॥ जो जन्मलाचि नाहीं ठायींचा । त्यास मृत्यु येईल कैंचा । विवेकबळें जन्ममृत्यूचा । घोंट भरिला जेणें ॥ २८ ॥ स्वरूपानुसंधानबळें[1] । सगळी माया नाडळे । तयाचा पार न कळे । ब्रह्मादिकांसी ॥ २९ ॥ तो जितचि असतां मेला । मरणास मारून व्याला । जन्ममृत्यु न स्मरे त्याला । विवेकबळें ॥ ३० ॥ तो जनीं दिसतो परी वेगळा । वर्ततां[2] भासे निराळा । दृश्य पदार्थ त्या निर्मळा । स्पर्शलाचि नाहीं ॥ ३१ ॥ असो ऐसे साधुजन । त्यांचें घडलिया भजन । तेणें भजनें पावन । इतर जन होती ॥ ३२ ॥ सद्गुरूचा तो अंकित साधक । तेणें केलाच करावा विवेक । विवेक केलिया तर्क । पुढें निरूपणीं ॥ ३३ ॥ हेंचि साधकासि निरवणें[3] । अद्वैत प्रांजळ निरूपणें । तुमचेंहि समाधान बाणे । साधूच ऐसें ॥ ३४ ॥ जो संतांस शरण गेला । तो संतचि होऊन ठेला । इतर जनां उपयोगा आला । कृपाळूपणें ॥ ३५ ॥ ऐसें संतांचें महिमान । संतसंगें होतें ज्ञान । सत्संगापरतें साधन । आणिक नाहीं ॥ ३६ ॥ गुरुभजनाचेनि आधारें । निरूपणाचेनि विचारें । क्रियाशुद्ध निर्धारें । पाविजे पद ॥ ३७ ॥ परमार्थाचें जन्मस्थान । तेंचि सद्गुरूचें भजन । सद्गुरुभजनें समाधान । अकस्मात बाणे ॥ ३८ ॥ देह मिथ्या जाणोनि जीवें । याचें सार्थकचि करावें । भजनभावें तोषवावें । चित्त सद्गुरूचें ॥ ३९ ॥ शरणागतांची वाहे

---

१. स्वरूपचिंतनाच्या सामर्थ्यानें. २. व्यवहार करतांना. ३. सांगणें.

चिंता । तो एक सद्गुरु दाता । जैसें बाळक वाढवी माता । नानायत्नेंकरूनी ॥४०॥ श्लोक ॥ यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥ म्हणोन सद्गुरूचें भजन । जयास घडे तोचि धन्य । सद्गुरूविण समाधान । आणिक नाहीं ॥ ४१ ॥ सरली शब्दाची खटपट । आला ग्रंथाचा शेवट । तेथें सांगितलें स्पष्ट । सद्गुरुभजन ॥ ४२ ॥ सद्गुरुभजनापरतें कांहीं । मोक्षदायक दुसरें नाहीं । जयांस न[1] मानें[1] तिहीं । अवलोकावी गुरुगीता ॥ ४३ ॥ तेथें निरूपिलें बरवें । पार्वतीप्रति सदाशिवें । याकारितां सद्भावें । सद्गुरुचरण सेवावे ॥ ४४ ॥ जो ये ग्रंथींचा विवेक । विवंचून पाहे साधक । तयास सांपडे एक । निश्चय ज्ञानाचा ॥ ४५ ॥ ज्या ग्रंथीं बोलिलें अद्वैत । तो म्हणूं नये प्राकृत । सत्य जाणावा वेदांत । अर्थाविषयीं ॥ ४६ ॥ प्राकृतें वेदांत कळे । सकळ शास्त्रीं पाहतां मिळे । आणि समाधान निवळे । अंतर्यामीं ॥ ४७ ॥ तें प्राकृत म्हणों नये । तेथें ज्ञानाचा उपाय । मूर्खासि हें कळे काय । मर्कटा नारिकेळ जैसें ॥ ४८ ॥ आतां असो हें बोलणें । अधिकारपरत्वें घेणें । शिंपीमधील मुक्त[2] उणें । म्हणों नये ॥४९॥ जेथें नेतिनेति[3] श्रुती । तेथें न चले भाषाव्युत्पत्ती । परब्रह्म आदिअंतीं । अनिर्वाच्य ॥ ५० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके देहातीतनिरूपणं नाम दशमः समासः ॥१०॥

---

# दशक आठवा.

## १. देवदर्शन.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रोतीं व्हावें सावध । विमल ज्ञान बाळबोध । गुरुशिष्यांचा संवाद । अतिसुगम परियेसा ॥ १ ॥ नाना शास्त्रें धांडोळितां । आयुष्य पुरेना सर्वथा । अंतरीं संशयाची व्यथा । वाढोंचि लागे ॥ २ ॥ नाना तीर्थें थोरथोरें । सृष्टीमध्यें अपारें । सुगमें दुर्गमें दुष्करें । पुण्यदायकें ॥ ३ ॥ ऐशीं तीर्थें सर्वहि करी । ऐसा कोण रे संसारीं । फिरों जातां जन्म-

१. मान्य होत नाहीं. २. मोतीं. ३. 'अमुक ब्रह्म नव्हे' असें सांगतात; पण 'अमुक आहे' म्हणून दाखवूं शकत नाहींत.

वरी। आयुष्य पुरेना ॥४॥ नाना तपें नाना दानें। नाना योग नाना साधनें। हीं सर्वहि देवाकारणें। करिजेत आहे ॥ ५ ॥ पावावया देवाधिदेवा। बहुविध श्रम करावा। तेणें देव ठायीं पाडावा। हें सर्वमत ॥ ६ ॥ पावावया भगवंतातें। नाना पंथ नाना मतें। तया देवाचें स्वरूप तें। कैसें आहे ॥ ७ ॥ बहुत देव सृष्टीवरी। त्यांची गणना कोण करी। एक देव कोणेपरी। ठायीं पडेना ॥ ८ ॥ बहुविध उपासना। ज्याची जेथें पुरे कामना। तो तेथेंचि राहिला मना। सद्दढ करूनी ॥ ९ ॥ बहु देव बहु भक्त। इच्छा झाले आसक्त। बहु ऋषि बहु मत। वेगळाले ॥१०॥ बहु निवडितां निवडेना। एक निश्चय घडेना। शास्त्रें भांडती पडेना। निश्चय ठायीं ॥ ११ ॥ बहुत शास्त्रीं बहुत भेद। मतामतांसि विरोध। ऐसा करितां विवाद। बहुत गेले ॥१२॥ सहस्रामध्यें कोणी एक। पाहे देवाचा विवेक। परी त्या देवाचें कौतुक। ठायीं न पडे ॥ १३ ॥ ठायीं न पडे ऐसें म्हणतां। तेथेंचि लागली अहंता। देव राहिला परता। अहंतागुणें ॥ १४ ॥ आतां असो हें बोलणें। नाना योग ज्याकारणें। तो देव कोण्या गुणें। ठायीं पडे ॥१५॥ देव कोणास म्हणावें। कैसें तयास जाणावें। तेंचि बोलणें स्वभावें। बोलिजेल ॥ १६ ॥ जेणें केलें चराचर। केले सृष्ट्यादि व्यापार। सकळकर्ता निरंतर। नाम जयाचें ॥ १७ ॥ जेणें केल्या मेघमाळा। चंद्रबिंबीं अमृतकळा। तेज दिधलें रविमंडळा। जया देवें ॥ १८ ॥ ज्याची मर्यादा सागरा। जेणें स्थापिलें[1] फणिवरा। जयाचेनि गुणें तारा। अंतरिक्ष ॥ १९ ॥ चारी खाणी[2] चारी वाणी। चौऱ्यायशीं लक्ष जीवयोनी। जेणें निर्मिले लोक तिन्ही। तया नांव देव ॥२०॥ ब्रह्मा विष्णु आणि हर। हे जयाचे अवतार। तोचि देव हा निर्धार। निश्चयेंसी ॥ २१ ॥ देव्हारांचा उठोनि देव। करूं नेणे सर्व जीव। तयाचेनि ब्रह्मकटाव[3]। निर्मिला न वचे ॥२२॥ ठायीं ठायीं देव असती। तिहीं केली नाहीं क्षिती। चंद्र सूर्य तारा जीमूती[4]। तयांचेनि नव्हे ॥ २३ ॥ सर्वकर्ता तोचि देव। पाहूं जातां निरवयव। ज्याची कळा लीलालाघव। नेणती ब्रह्मादिक ॥२४॥ ऐथें आशंका उठिली। ती पुढिलीये

१. शेषाला पृथ्वी धरण्यास लाविलें. २. उद्भिज, जारज, अंडज आणि स्वेदज अशी चतुर्विध सृष्टि. ३. ब्रह्मांड. ४. मेघ.

समासीं फिटली । आतां वृत्ति सावध केली । पाहिजे श्रोतीं ॥ २५ ॥ पैस अवकाश आकाश । कांहींच नाहीं तें भकास । तया निर्मळीं वायूस । जन्म जाहला ॥ २६ ॥ वायूपासूनि झाला वन्ही[1] । वन्हीपासून झालें पाणी । ऐसी जयाची करणी । अघटित घडली ॥ २७ ॥ उदकापासून क्षिति[2] झाली । स्तंभेंविण उभारिली । ऐशी विचित्र कळा केली । त्या नांव देव ॥ २८ ॥ देवें निर्मिली हे क्षिती । तिचे पोटीं पाषाण होती । तयांसीच देव म्हणती । विवेकहीन ॥ २९ ॥ जो सृष्टिनिर्माणकर्ता । तो ये सृष्टीपूर्वीं होता । मग हे तयाची सत्ता । निर्माण जाहली ॥ ३० ॥ कुलाल[3] पात्रापूर्वीं आहे । पात्र कांहीं कुलाल नव्हे । तैसा देव पूर्वींच आहे । पाषाण नव्हे सर्वथा ॥ ३१ ॥ मृत्तिकेचें सैन्य केलें । कर्तें वेगळे राहिले । कार्य कारण एक केलें । तरी होणार नाहीं ॥ ३२ ॥ तथापि होईल पांचभौतिक । निर्गुण नव्हे कांहींएक । कार्यकारणांचा विवेक । भूतांपरता नाहीं ॥ ३३ ॥ अवघी सृष्टि जो कर्ता । तो ये सृष्टीहूनि परता । तेथें संशयाची वार्ता । काढूंच नये ॥ ३४ ॥ खांबसूत्रींची बाहुली । जेणें पुरुषें नाचविली । तोचि बाहुली हे बोली । घडे केवीं ॥ ३५ ॥ छायामंडपींची[4] सेना । सृष्टिसारिखी रचना । सूत्रें चाळी परी तो नाना । व्यक्ति नव्हे ॥ ३६ ॥ तैसा सृष्टिकर्ता देव । परी तो नव्हे सृष्टिभाव । जेणे केले नाना जीव । तो जीव कैसेनी ॥ ३७ ॥ जें जया करणें पडे । तो तें होणें कैसें घडे । म्हणोनि वायांचि बापुडे । संदेहीं पडती ॥ ३८ ॥ सृष्टीऐसेंचि स्वभावें । गोपुरें[5] निर्मिलें बरवें । परी तो गोपुरकर्ता नव्हे । निश्चयेसी ॥ ३९ ॥ तैसें जग निर्मिलें जेणें । तो वेगळा पूर्णपणें । एक म्हणती मूर्खपणें । जग तोचि जगदीश ॥ ४० ॥ एवं जगदीश तो वेगळा । जगनिर्माण ज्याची कळा । तो सर्वांमध्यें निराळा । असोन सर्वीं ॥ ४१ ॥ म्हणोनि भूतांचा कर्दम[6] । त्यासि अलिप्त आत्माराम । अविद्यागुणें मायाभ्रम । सत्यचि वाटे ॥ ४२ ॥ मायोपाधि जगडंबर । आहे सर्वेही साचार । ऐसा विपरीत विचार । कोठेंचि नाहीं ॥ ४३ ॥ म्हणोनि

१. अग्नि. २. पृथ्वी. ३. कुंभार. ४. पातळ पडदा लावून आंत दिवा ठेवतात व मधून कागदाचीं चित्रें, आकृति फिरवितात, त्या प्रकारांतील. ५. देवळांत देवाच्या समोर कांहीं मजले बांधतात ते. ६. परस्परांचें मिश्रण.

जग मिथ्या साच आत्मा । सर्वां पर जो परमात्मा । अंतर्बाह्य अंतरात्मा। व्यापूनि असे ॥ ४४ ॥ तयास म्हणावें देव । येर हें अवघेंचि वाव । ऐसा आहे अंतर्भावें । वेदांतींचा ॥ ४५ ॥ पदार्थ वस्तु नाशवंत । हें तों अनुभवास येत । या कारणें भगवंत । पदार्थां वेगळा ॥ ४६ ॥ देव निर्मळ आणि अचळ । शास्त्रें बोलती सकळ । तया निश्चळास चंचळ । म्हणों नये सर्वथा ॥ ४७ ॥ देव आला देव गेला । देव उपजला देव मेला । ऐसें बोलतां दुरिताला । काय उणें ॥ ४८ ॥ जन्ममरणाची वार्ता । देवास न लागे सर्वथा । देव अमर जयाची सत्ता । त्यास मृत्यु कैसेनी ॥ ४९ ॥ उपजणें आणि मरणें । येणें जाणें दुःख भोगणें । हें त्या देवाचें करणें । तो कारण वेगळा ॥५०॥ अंतःकरण पंच प्राण । बहुतत्वीं पिंडज्ञान । या सर्वांस आहे चळण । म्हणोनि देव नव्हती ॥ ५१ ॥ एवं कल्पनेरहित । तया नांव भगवंत । तेथें देवपणाची मात । भासत नाहीं ॥ ५२ ॥ तंव शिष्यें आक्षेपिलें । तरी हें कैसें ब्रह्मांड झालें । कर्तेपणें कारण पडिलें । कार्यामध्यें ॥ ५३ ॥ द्रष्टेपणें द्रष्टा दृश्यीं । जैसा पडे अनायासीं । कर्ते पणें निर्गुणासी । गुण तैसे ॥ ५४ ॥ ब्रह्मांडकर्ता कवण । कैसी त्याची वोळखण । देव सगुण कीं निर्गुण । मज निरूपावा ॥ ५५ ॥ एक म्हणती ब्रह्मातें । इच्छामात्रें सृष्टि करितें । सृष्टि करितें त्यापरतें । कोण आहे ॥ ५६ ॥ आतां असो हे बहु बोली । सकळ माया कोठूनि झाली । ते हे आतां निरूपिली । पाहिजे स्वामी ॥ ५७ ॥ ऐसें ऐकून वचन । वक्ता म्हणे सावधान । पुढिलिये समासीं निरूपण । सांगिजेल ॥ ५८ ॥ ब्रम्हां माया कैसी झाली । पुढें असे निरूपिली । श्रोतीं वृत्ति सावध केली । पाहिजे आतां ॥ ५९ ॥ पुढें हेंचि निरूपण । विशद केलें श्रवण । जेणें होय समाधान । साधकांचें ॥ ६० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टमदशके देवदर्शननिरूपणं नामः प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. आशंका.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां श्रोतीं आक्षेपिलें । तें पाहिजे निरूपिलें । निरवयवीं कैसें झालें । चराचर ॥ १ ॥ याचें ऐसें प्रतिवचन । ब्रम्ह जें कां

---

१. अभिप्राय. २. पापाला. ३. ज्यास अवयव नाहींत अशा ब्रम्हावर.

सनातन । तेथें माया मिथ्या भान । विवर्तरूप[1] भासे ॥ २ ॥ श्लोक ॥ आद्यमेकं परं ब्रम्ह नित्यमुक्तमविक्रियम् । तस्य मायासमावेशो जीवमव्याकृतात्मकम् ॥१॥ टीका ॥ आदि एक परब्रह्म । नित्य मुक्त अक्रिय[2] परम । तेथें अव्याकृत[3] सूक्ष्म । जाहली मूळमाया ॥ ३ ॥ एक ब्रम्ह निराकार । मुक्त अक्रिय निर्विकार । तेथें माया वोडंबर[4] । कोठूनि जाहली ॥ ४ ॥ ब्रम्ह अखंड निर्गुण । तेथें इच्छा धरी कोण । निर्गुणीं सगुणेंविण । इच्छा नाहीं ॥ ५ ॥ मुळीं असेचिना सगुण । म्हणोनि नामें निर्गुण । तेथें झालें सगुण । कोणे परी ॥ ६ ॥ निर्गुणचि गुणा आलें । ऐसें जरी अनुवादलें । लागों पाहे येणें बोलें । मूर्खपण ॥ ७ ॥ एक म्हणती निरवयव । करून अकर्ता तो देव । त्याची लीला बापुडे जीव । काय जाणती ॥ ८ ॥ एक म्हणती तो परमात्मा । कोण जाणे त्याचा महिमा । प्राणी बापुडा जीवात्मा । काय जाणे ॥ ९ ॥ उगाच महिमा सांगती । शास्त्रार्थ अवघाच लोपिती । बळेंच निर्गुणास म्हणती । करूनि अकर्ता ॥ १० ॥ मुळीं नाहीं कर्तव्यता । कोण करूनि अकर्ता । कर्ता अकर्ता हे वार्ता । समूळ मिथ्या ॥ ११ ॥ जें ठायींचें निर्गुण । तेथें कैंचें कर्तेपण । तरी हे इच्छा धरी कोण । सृष्टी रचावयाची ॥ १२ ॥ इच्छा परमेश्वराची । ऐसी युक्ति बहुतेकांची । परी त्या निर्गुणास इच्छा कैंची । हें कळेना ॥ १३ ॥ तरी हें इतुकें कोणें केलें । किंवा आपणचि झालें । देवेंविण उभारलें । कोणेपरी ॥ १४ ॥ देवेंविण झालें सर्व । मग देवास कैंचा ठाव । येथें देवाचा अभाव । दिसोन आला ॥ १५ ॥ देव म्हणों सृष्टिकर्ता । तरी येकं पाहे सगुणता । निर्गुणपणाची वार्ता । देवाची बुडाली ॥ १६ ॥ देव ठायींचा निर्गुण । तरी सृष्टिकर्ता कोण । कर्तेपणाचें सगुण । नाशवंत[6] ॥१७॥ येथें पडिला कीं विचार । कैसें झालें चराचर । माया म्हणों स्वतंत्र[7] । तरी हें विपरीत दिसे ॥ १८ ॥ माया कोणीं नाहीं केली । हे आपणचि विस्तारली । ऐसें बोलतां बुडाली । देवाची वार्ता ॥१९॥ देव निर्गुण स्वतःसिद्ध । त्यासि मायेसि काय संबंध ।

---

१. भलताच भास होणें म्हणजे विवर्त. २. कर्मरहित. ३. व्याकृत म्हणजे विकार पावलेली नव्हे अशी. ४. गारुड. ५. विचार ६. कर्ता म्हटला म्हणजे तो सगुण होतो अर्थात् नाशवंत होतो असा अर्थ. ७. स्वतःच सृष्टि उत्पन्न करणारी.

ऐसें बोलतां विरुद्ध । दिसोन आलें ॥ २० ॥ सकळ कांहीं कर्तव्यता । आली मायेच्या माथां । तरी भक्तांसि उद्धरिता । देव नाहीं कीं ॥ २१ ॥ देवेंविण नुसती माया । कोण नेईल विलया । आम्हां भक्तांस सांभाळाया । कोणीच नाहीं ॥ २२ ॥ म्हणोनि माया स्वतंत्र । ऐसा न घडे कीं विचार । मायेसि निर्मिता सर्वेश्वर । तो एकचि आहे ॥ २३ ॥ तरी कैसा आहे ईश्वर । मायेचा कैसा विचार । तरी हें आतां सविस्तर । बोलिलें पाहिजे ॥ २४ ॥ श्रोतीं व्हावें सावधान । एकाग्र करूनिया मन । आतां कथानुसंधान । सावध एका ॥ २५ ॥ ऐके आशंकेचा भाव । जनीं वेगळाले अनभव । तेहि बोलिजेती सर्व । यथानुक्रमें ॥ २६ ॥ एक म्हणती देवें केली । म्हणोनि हे विस्तारली । देवास इच्छा नसती झाली । तरी हे माया कैंचीं ॥ २७ ॥ एक म्हणती देव निर्गुण । तेथें इच्छा करी कोण । माया मिथ्या हे आपण । जाहलीच नाहीं ॥ २८ ॥ एक म्हणती प्रत्यक्ष दिसे । तयेसि नाहीं म्हणतां कैसें । माया हे अनादि असे । शक्ति ईश्वराची ॥ २९ ॥ एक म्हणती साच असे । तरी हे ज्ञानें कैसी निरसे । साचासारिखीच दिसे । परी हे मिथ्या ॥ ३० ॥ एक म्हणती मिथ्या स्वभावें । तरी साधन कासया करावें । भक्तिसाधन बोलिलें देवें । मायात्यागाकारणें ॥ ३१ ॥ एक म्हणती मिथ्या दिसतें । भय अज्ञान[१]सन्निपातें । साधनऔषध घेइजेतें । परी तें दृश्य मिथ्या ॥३२॥ अनंत साधनें बोललीं । नाना मतें भांबावलीं । तरी माय न वचे लागिली । मिथ्या कैसी म्हणावी ॥३३॥ मिथ्या बोले योगवाणी । मिथ्या वेदशास्त्रीं पुराणीं । मिथ्या नाना निरूपणीं । बोलिली माया ॥३४॥ माया मिथ्या म्हणतां गेली । हे वार्ता नाहीं ऐकिली । मिथ्या म्हणतांच लागली । समागमें ॥ ३५ ॥ जयाचे अंतरीं अज्ञान । नाहीं वोळखिले सज्जन । तयास माया मिथ्या भान । सत्यचि वाटे ॥ ३६ ॥ जेणें जैसा निश्चय केला । तयासि तैसाच फावला । पाहे तोचि दिसे बिंबला । तैसी माया ॥ ३७ ॥ एक म्हणती माया कैंची । आहे तें सर्व ब्रह्मची । थिजल्या विघुरल्या घृताची । ऐक्यता न मोडे ॥ ३८ ॥ थिजलें आणि विघुरलें । हें स्वरूपीं नाहीं बोलिलें । साहि[२]त्य भंगलें येणें बोलें । म्हणती एक ॥ ३९ ॥

१. अज्ञानरूप सन्निपात ज्वरानें. २. दृष्टांत.

एक म्हणती सर्व ब्रम्ह । हें न कळे ज्यास वर्म । तयाचे अंतरींचा भ्रम । गेलाचि नाहीं ॥ ४० ॥ एक म्हणती एकचि देव । तेथें कैंचें आणिलें सर्व । सर्व ब्रम्ह हें अपूर्व । आश्चर्य वाटे ॥ ४१ ॥ एक म्हणती एकचि खरें । तेथें नाहीं दुसरें । सर्व ब्रम्ह येणें प्रकारें । सहजचि जाहलें ॥४२॥ सर्व मिथ्या एकसरें । उरलें तेंचि ब्रम्ह खरें । ऐसीं वाक्यें शस्त्राधारें । बोलती एक ॥ ४३ ॥ अलंकार आणि सुवर्ण । तेथें नाहीं भिन्नपण । आटाआटी व्यर्थ शिण । म्हणती एक ॥४४॥ ही उपमा एकदेशी । कैसी साहेल वस्तूसी । वर्णव्यक्त अव्यक्तासी । साम्यता न घडे ॥ ४५ ॥ सुवर्णी दृष्टि घालितां । मुळींच आहे व्यक्तता । अलंकार सोनें पाहतां । सोनेंचि असे ॥ ४६ ॥ मुळीं सोनेंचि व्यक्त । जड एकदेशी पीत[१] । पूर्णास अपूर्णाचा दृष्टांत । केवीं घडे ॥ ४७ ॥ दृष्टांत तितुका एकदेशी । देणें लागे कळायासी । सिंधु आणि लहरीसी । भिन्नत्व कैंचें ॥ ४८ ॥ उत्तम मध्यम कनिष्ठ । एका दृष्टांतें कळे स्पष्ट । एका दृष्टांतें नष्ट । संदेह वाटे[२] ॥४९॥ कैंचा सिंधु कैंची लहरी । अचळास चंचळाची सरी । साचाऐसी वोडंबरी[३] । मानूंच नये ॥ ५० ॥ वोडंबरी हे कल्पना । नासा भास दाखवी जना । येरव्हीं हें जाणा । ब्रम्हचि असे ॥ ५१ ॥ ऐसा वाद एकमेकां । लागतां राहिली आशंका । तेचि आतां पुढें ऐका । सावध होऊनी ॥५२॥ माया मिथ्या कळों आली । परी ते ब्रम्हीं कैसी झाली । म्हणावी ते निर्गुणें केली । तरी ते मुळींच मिथ्या ॥ ५३ ॥ मिथ्या शब्दीं कांहींच नाहीं । तेथें केलें कोणें काई । करणें निर्गुणाचे ठायीं । हेंहि अघटित ॥ ५४ ॥ कर्ता ठायींचा अरूप । केलें तेंहि मिथ्यारूप । तथापि फेडूं आक्षेप[४] । श्रोतयांचा ॥ ५५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टमदशके आशंकानिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. सूक्ष्म शंका.

श्रीगणेशाय नमः ॥ अरे जें झालेंचि नाहीं । त्याची वार्ता पुससी काई । तथापि सांगों जेणें कांहीं । संशय तुरे ॥ १ ॥ दोरीकरितां भुजंग । जळाकरितां तरंग । मार्तंडाकरितां[५] चांग । मृगजळ वाहे ॥ २ ॥ कल्पने-

---

१. पिवळें. २. संशय गेला असें वाटतें. ३. गारुड. ४. शंका. ५. सूर्यामुळें.

करितां स्वप्न दिसे । शिंपीकरितां रुपें भासे । जळाकरितां गार वसे । निमिष एक ॥ ३ ॥ मातीकरितां भिंती झाली । सिंधूकरितां लहरी आली । तिळाकरितां पुतळी[1] । दिसों लागे ॥ ४ ॥ सोन्याकरितां अलंकार । तंतूकरितां झालें चीरें[3] । कांसवाकरितां विस्तार । हातापायांचा ॥ ५ ॥ तूप हात तरी थिजलें । तरीकरितां[4] मीठ झालें । बिंबाकरितां बिंबलें । प्रतिबिंब ॥ ६ ॥ पृथ्वीकरितां झालें झाड । झाडाकरितां छाया वाड[5] । धातूकरितां पवाडें[6] । उंच नीच वर्णांचा ॥ ७ ॥ आतां असो हे दृष्टांत । अद्वैतास कैंचें द्वैत । द्वैतेंविण अद्वैत । बोलतांच न ये ॥ ८ ॥ भासाकरितां भास भासे । दृश्याकरितां दृश्य दिसे । अदृश्यास उपमा नसे । ह्मणोनि निरुपम ॥ ९ ॥ कल्पनेविरहित हेत । दृश्यावेगळा दृष्टांत । द्वैतावेगळें अद्वैत । कैसें जाहलें ॥ १० ॥ विचित्र भगवंताची करणी । वर्णवेना सहस्त्रफणी[7] । तेणें केली उभवणी । अनंत ब्रह्मांडाची ॥ ११ ॥ परमात्मा परमेश्वर । सकळ कर्ता जो ईश्वर । तयापासूनि विस्तार । सकळ जाहला ॥ १२ ॥ ऐसीं अनंत नामें धरी । अनंत शक्ति निर्माण करी । तोचि जाणावा चतुरीं । मूळपुरुष ॥ १३ ॥ त्या मूळपुरुषाची वोळखण । ते मूळमायाच आपण । सकळ कांहीं कर्तेपण । तेथेंचि आलें ॥ १४ ॥ श्लोक ॥ कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते । हें उघड बोलतां न ये । मोडो पाहतो उपाय । येऱ्हवीं हें पाहतां काय । साच आहे ॥ १५ ॥ देवापासून सकळ झालें । हें सर्वांस मानलें । परी त्या देवास । वोळखिलें पाहिजे कीं ॥ १६ ॥ सिद्धाचें जें निरूपण । तें साधकां न माने जाण । पक्क नाहीं अंतःकरण । म्हणोनियां ॥ १७ ॥ अविद्यागुणें बोलिजे जीव । मायागुणें बोलिजे शिव । मूळमायागुणें देव । बोलिजे तो ॥ १८ ॥ म्हणोनि कारण मूळमाया । अनंत शक्ति धरावया । तेथींचा अर्थ जाणावया । अनुभवी पाहिजे ॥ १९ ॥ मूळमाया तोचि मूळपुरुष । तोचि सर्वांचा ईश । अनंतनामी जगदीश । तयासीच बोलिजे ॥ २० ॥ अवघी माया विस्तारली । परी हे निःशेष नाथिली । ऐशिया वचनाची खोली । विरळा जाणे ॥ २१ ॥ ऐसें अनिर्वाच्य[8] बोलिजे । परी हें स्वानुभवें जाणिजे । संतसंगें-

---

१. डोळ्यातील तीळ, त्यापासून. २. बाहुली. ३. वस्त्र. ४. खाडीपासून. ५. विस्तृत. ६. मोठेपणा. ७. शेषाला. ८. बोलून दाखविण्याजोगी नव्हे.

विण नुमजे। कांहीं केल्या ॥ २२ ॥ माया तोचि मूळपुरुष। साधकां न मानें हें निःशेष। परी अनंतनामी जगदीश। कोणास म्हणावें ॥ २३ ॥ नामरूप मायेस लागलें। तरी हें बोलणें नटिचि झालें। तेथें श्रोतीं अनुमानिलें। कासयासी ॥ २४ ॥ आतां असो हे सकळ बोली। मागिल आशंका राहिली। निराकारीं कैशी झाली। मूळमाया ॥२५॥ दृष्टिबंधन मिथ्या सकळ। परी तो कैसा झाला खेळ। हें अवघें निवळ। करूनि दाऊं ॥ २६ ॥ आकाश असतां निश्चळ। मध्यें झाला वायु चंचळ। तैसी जाणावी केवळ। मूळमाया ॥ २७ ॥ रूप वायूचें झालें। तेणें आकाश भंगलें। ऐसें हें सत्य मानिलें। न वचे कीं कदा ॥ २८ ॥ तैसी मूळमाया झाली। आणि निर्गुणता संचली। येणें दृष्टांतें तुटली। मागील आशंका ॥ २९ ॥ वायु नव्हे पुरातन। तैसी मूळमाया जाण। साच ह्मणतां पुनः लीन। होत असे ॥ ३० ॥ वायु रूपें कैसा आहे। तैसी मूळमाया पाहे। असे परी ते न लाहे। रूप तयाचें ॥ ३१ ॥ वायु सत्य म्हणों जातां। परी तो न ये दाखवितां। तयाकडे पाहों जातां। धुळीच दिसे ॥ ३२ ॥ तैसी मूळमाया भासे। भासे परी ते न दिसे। पुढें विस्तारली असे। माया अविद्या[1] ॥ ३३ ॥ जैसें वायूचेनि योगें। दृश्य उडे गगनमार्गें। मूळमायेच्या संयोगें। तैसें जग ॥ ३४ ॥ गगनीं आभाळ नाथिलें[2]। अकस्मात उद्भवलें। मायेचेनि गुणें झालें। तैसें जग ॥ ३५ ॥ नाथिलेंचि[2] गगन नव्हतें। अकस्मात् आलें तेथें। तैसें दृश्य झालें येथें। तैसियापरी ॥ ३६ ॥ परी तया आभाळाकरितां। गगनाची गेली निश्चळता। वाटे परी तें तत्वतां। तैसेंचि आहे ॥ ३७ ॥ तैसें मायेकरितां निर्गुण। वाटे झालें सगुण। परी तें पाहतां संपूर्ण। जैसें तैसें ॥ ३८ ॥ आभाळ आलें आणि गेलें। तरी गगन तें संचलें। तैसें गुणा नाहीं आलें। निर्गुण ब्रह्म ॥ ३९ ॥ नभ माथां लागलें दिसे। परी तें जैसें तैसें असे। तैसें जाणावें विश्वासें। निर्गुण ब्रह्म ॥ ४० ॥ ऊर्ध्व[3] पाहतां आकाश। नीलिमा[4] दिसे सावकाश। परी तो जाणिजे मिथ्या भास। भासला असे ॥ ४१ ॥ आकाश पालथें घातलें। चहूंकडे आटोपलें। वाटे विश्वास कोंडिलें। परी तें मोकळेंचि असे ॥ ४२ ॥ पर्वतीं निळा रंग दिसे। परी तो तया लागला

१. अज्ञान. २. नसलेलें. ३. वरती. ४. निळा रंग.

नसे । अलिप्त जाणावें तैसें । निर्गुण ब्रह्म ॥ ४३ ॥ रथ धांवतां पृथ्वी चंचळ । वाटे परी ते असे निश्चळ । तैसें परब्रह्म केवळ । निर्गुण जाणावें ॥४४॥ आभाळाकरितां तो मृगांक[1] । वाटे धांवतो निःशंक । परी तें अवघें मायिक । आभाळ चळे ॥ ४५ ॥ जळ अथवा अग्निज्वाळ । तेणें कंपित दिसे अंतराळ । वाटे परी तें निश्चळ । जैसें तैसें ॥४६॥ तैसें स्वरूप हें संचलें । असतां वाटे गुणा आलें[2] । ऐसें कल्पनेसि गमलें । परी तें मिथ्या ॥ ४७ ॥ दृष्टिबंधनाचा खेळ । तैसी हे माया चंचळ । वस्तु शाश्वत निश्चळ । तैसी तैसी ॥ ४८ ॥ ऐसी वस्तु निरवयव । माया दाखवी अवयव । इचा ऐसाचि स्वभाव । नाथिलीचि हे ॥ ४९ ॥ माया पाहतां मुळींच नसे । परी हे साचाऐसी भासे । उद्भवे आणि निरसे । आभाळ जैसें ॥ ५० ॥ ऐसी माया उद्भवली । वस्तु निर्गुण संचली । अहं[3] ऐसी स्फूर्ति[3] झाली । तेचि माया ॥ ५१ ॥ गुणमायेचे पवाडे[4] । निर्गुणीं हें कांहींच न घडे । परी हें घडे आणि मोडे । स्वस्वरूपीं[5] ॥ ५२ ॥ जैसी दृष्टि तरळली । तेणें सेनाच भासली । पाहतां आकाशींच झाली । तरी ते मिथ्या ॥ ५३ ॥ मिथ्या मायेचा खेळ । उद्भव बोलिला सकळ । नाना तत्वांचा पाल्हाळ । मांडूनियां ॥ ५४ ॥ तत्वें मुळींच आहेती । ओंकार वायूची गती । तेथींचा अर्थ जाणती । दक्षज्ञानी ॥ ५५ ॥ मूळमायेचें चळण । तेंचि वायूचें लक्षण । सूक्ष्म तत्वें तेंचि जाण । जडत्व पावली ॥ ५६ ॥ ऐसीं पंचमहाभूतें । पूर्वीं होतीं अव्यक्तें[6] । पुढें झालीं व्यक्तें । सृष्टिरचनेसी ॥ ५७ ॥ मूळमायेचें लक्षण । तेंचि पांचभौतिक जाण । तेंचि पाहतां लक्षून । सूक्ष्म दृष्टीं ॥ ५८ ॥ आकाशीं वायूविण । इच्छाशब्द करी कोण । इच्छाशक्ति तेचि जाण । तेजस्वरूप ॥५९॥ मृदुपण तेंचि जळ । जडत्व पृथ्वी केवळ । ऐसी मूळमाया सकळ । पांचभौतिक जाणावी ॥ ६० एकएका भूतापोटीं । पंचभूतांची राहाटी[7] । सर्व कळे सूक्ष्म दृष्टी । घालून पाहतां ॥ ६१ ॥ पुढें जडत्वास आली । तरी असे ती कालवली । ऐसी माया विस्तारली । पांचभौतिक ॥ ६२ ॥ मूळमाया पाहतां मुळीं । अथवा अविद्या भूमंडळीं । स्वर्ग मृत्यु पाताळीं । पांचाचि

१. चंद्र. २. सगुण झाले. ३. 'मी' असें स्फुरण. ४. पराक्रम. ५. आत्मस्वरूपावर. ६. अदृश्यरूप. ७. व्यवहार.

भूतें ॥ ६३ ॥ श्लोक ॥ स्वर्गे मृत्यौ च पाताले यत्किंचित्सचराचरम् ॥ सर्वं तत्पांचभौतिक्यं षष्ठं किंचिन्न दृश्यते ॥ टीका ॥ सत्यस्वरूप आदिअंतीं । मध्यें पंचभूतें वर्तती । पांचभौतिक जाणिजे श्रोतीं । मूळमाया ॥ ६४ ॥ येथें उठली आशंका । सावध होऊन ऐका । पंचभूतें झालीं एका । तमोगुणापासूनी ॥ ६५ ॥ मूळमाया गुणापरती । तेथें भूतें कैंचीं होतीं । ऐसी आशंका श्रोतीं । घेतली मागां ॥ ६६ ॥ ऐसें श्रोतीं आपेक्षिलें । संशयास उभें केलें । याचें उत्तर दीधलें । पुढिलिये समासीं ॥ ६७ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टमदशके सूक्ष्मशंकानिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. सूक्ष्म पंचभूतें.

श्रीगणेशाय नमः ॥ मागील आशंकेचें मूळ । आतां होईल प्रांजळ । वृत्ति करावी निवळ । निमिष एक ॥ १ ॥ ब्रह्मीं मूळमाया झाली । तिच्या पोटीं गुणमाया आली । मग ते गुणास प्रसवली । म्हणोनि गुणक्षोभिणी[1] ॥ २ ॥ पुढें तिजपासाव कोण । सत्व रज तमोगुण । तमोगुणापासून निर्माण । जाहलीं पंचभूतें ॥ ३ ॥ ऐसीं भूतें उद्भवलीं । पुढें तत्वें विस्तारलीं । एवं तमोगुणापासून झालीं । पंचमहाभूतें ॥ ४ ॥ मूळमाया गुणापरती । तेथें भूतें कैंचीं होती । ऐसी आशंका श्रोतीं । घेतली मागें ॥ ५ ॥ आणीक एकएके भूतीं । पंचभूतें असती । तेहि आतां कैशी स्थिती । प्रांजळ करूं ॥ ६ ॥ सूक्ष्मदृष्टीचें कौतुक । मूळमाया पांचभौतिक । श्रोतीं विमळ विवेक । केला पाहिजे ॥ ७ ॥ आधीं भूतें तों जाणावीं । रूपें कैसीं वोळखावीं । मग तीं शोधून पाहावीं । सूक्ष्म दृष्टी ॥ ८ ॥ वोळखी नाहीं अंतरीं । ते वोळखावी कोणे परी । म्हणोनि वोळखी चतुरीं । नावेकें[2] परिसावी ॥ ९ ॥ जें जें जड आणि कठिण । तें तें पृथ्वीचें लक्षण । मृदु आणि वोलेपण । तितुकें आप ॥ १० ॥ जें जें उष्ण आणि सतेज । तें तें जाणावें पैं[3] तेज । आतां वायुहि सहज । निरूपिजेल ॥ ११ ॥ चैतन्य आणि चंचळ । तो हा वायुचि केवळ । शून्य अवकाश निर्मळ । आकाश जाणावें ॥ १२ ॥

---

१. त्रिगुणास प्रगट करणारी. २. क्षणमात्र. ३. 'पहा' अशा अर्थी अव्यय.

ऐशीं पंच महाभूतें । ओळखी धरावी संकेतें । आतां एकीं पंचभूतें
वध ऐकां ॥ १३ ॥ जे त्रिगुणाहूनि पर । त्याचा सूक्ष्म विचार । य
अति तत्पर । होऊनि ऐका ॥ १४ ॥ सूक्ष्म आकाशीं कैसी पृथ्वी
आधीं निरूपावी । येथें धारणा धरावी । श्रोतेजनीं ॥ १५ ॥ आका
णजे अवकाश शून्य । शून्य म्हणिजे तें अज्ञान । अज्ञान म्हणिजे जडत्व
तेंचि पृथ्वी ॥ १६ ॥ आकाश आहे स्वयें मृद । तेंचि आप स्वतः
आतां तेजहि विशद । करून दाऊं ॥ १७ ॥ अज्ञानें भासला भास
तेजाचा प्रकाश । आतां वायु सावकाश । साकल्यें सांगों ॥ १८ ॥
आकाशा नाहीं भेद । आकाशाइतुका असे स्तब्ध । तथापि आकाशीं
रुद्ध । तोचि वायु ॥ १९ ॥ आकाशीं आकाश मिसळलें । हें तों न
बोलिलें । येणें प्रकारें निरूपिलें । आकाश पंचभूत ॥ २० ॥ वायूमध्यें
भूतें । तींही ऐका एकचित्तें । बोलिजेती समस्तें । यथान्वयें ॥ २१
फूल तरी जड । हलु वारा तरी निबिड । वायु लागतां कडाड । य
झाडें ॥ २२ ॥ तोलेंविण झाड मोडे । ऐसें हें कांहींच न घडे । तोलें
तया जडे । पृथ्वीचा अंश ॥ २३ ॥ येथें श्रोते आशंका घेती । तेथें
झाडें होती । झाडें नव्हती तरी शक्ति । कठिणरूप आहे ॥ २४ ॥ वा
लिंग लहान । कांहीं तरी असे उष्ण । तैसें सूक्ष्मीं जडपण । सू
॥ २५ ॥ मृदुपण तेंचि आप । भासे तेजाचें स्वरूप । वायु तेथें चंचळ
सहजचि आहे ॥ २६ ॥ सकळांस मिळोन आकाश । सहजचि आहे
काश । पंचभूतांचे अंश । वायूमध्यें निरूपिले ॥ २७ ॥ आतां
लक्षण । भासलें परी तेंचि कठिण । तेजीं ऐसी वोळखण । पृथ्व
॥ २८ ॥ भासला भास वाटे मृद । तेजीं आप तेंचि प्रसिद्ध । तेज
स्वतःसिद्ध । सांगणें नलगे ॥ २९ ॥ तेजीं वायु चंचळ । तेजीं अ
निश्चळ । तेजीं पंचभूतें सकळ । निरूपिलीं ॥ ३० ॥ आतां आपाचें
आप तेजीं मृदुपण । मृदुपण तें कठिण । तेंचि पृथ्वी ॥ ३१ ॥ आपें
सहजचि असे । तेज मृदुपणें भासे । वायु स्तब्धपणें दिसे । मृदुत्वा

१. एकेक भूतांत. २. चित्ताचें ऐक्य. ३. संपूर्णपणें. ४. मर्यादित. ५
६. वजन. ७. अग्नीची ठिणगी.

३२ ॥ आकाश नलगे सांगावें । तें व्यापकचि स्वभावें । आणि पंचभूतांचीं नांवें । सूक्ष्में निरूपिलीं ॥ ३३ ॥ आतां पृथ्वीचें लक्षण । कठिण पृथ्वी आप जाण । कठिणत्वीं मृदुपण । तेंचि आप[1] ॥ ३४ ॥ कठिणत्वाचा जो भास । तोचि तेजाचा प्रकाश । कठिणत्वीं निरोधांश । तोचि वायु ॥ ३५ ॥ आकाश सकळांस व्यापक । हा तों प्रगटचि विवेक । आकाशींच कांहीं-एक । भास भासे ॥ ३६ ॥ आकाश तोडितां तुटेना । आकाश फोडितां फुटेना । आकाश परतें होईना । तिळमात्र ॥ ३७ ॥ असो आतां पृथ्वी-आंत । दाविला भूतांचा संकेत । एके भूतीं पंचभूत । तें हें निरूपिलें ॥ ३८ ॥ परी हें आह्मा[2] पाहतां नातुडे । बळेंच पोटीं संदेह पडे । भ्रांतिरूपें अहंता जडे । अकस्मात ॥ ३९ ॥ सूक्ष्म दृष्टीनें पाहतां । वायुचि वाटे तत्वतां । सूक्ष्म वायु शोधूं जातां । पंचभूतें दिसती ॥ ४० ॥ एवं पांच-भौतिक पवन । तेचि मूळमाया जाण । माया आणि सूक्ष्म त्रिगुण । तेंचि पांचभौतिक ॥ ४१ ॥ भूतें गुण मेळविजे । त्यासि अष्टधा बोलिजे । पांच-भौतिक जाणिजे । अष्टधा[3] प्रकृती ॥ ४२ ॥ शोधून पाहिल्याविण । संदेह धरणें मूर्खपण । याची पाहावी वोळखण । सूक्ष्मदृष्टीं ॥ ४३ ॥ गुणापासून भूतें । पावलीं स्पष्ट दशेतें । जडत्वा येऊनि समस्तें । तत्वें जाहलीं ॥ ४४ ॥ पुढें तत्वविवंचना । पिंडब्रह्मांड तत्वरचना । बोलिलीसे ते जना । प्रगटचि आहे ॥ ४५ ॥ हा भूतकर्दम[4] बोलिला । सूक्ष्मसंकेतें दाविला । ब्रह्मगोळ उभा राहिला । तत्पूर्वीं ॥ ४६ ॥ या ब्रह्मांडापैलीकडील गोष्टी । जैं झाली नव्हती सृष्टी । मूळमाया सूक्ष्मदृष्टीं । वोळखावी ॥ ४७ ॥ सप्तकंचुकें[5] प्रचंड । झालें नव्हतें ब्रह्मांड । मायाअविद्येचें बंड । ऐलीकडे ॥ ४८ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर । हा ऐलीकडील विचार । पृथ्वी मेरु सप्त सागर । ऐलीकडे ॥ ४९ ॥ नाना लोक नाना स्थानें । चंद्र सूर्य तारांगणें । सप्त द्वीपें चौदा भुवनें । ऐलीकडे ॥ ५० ॥ शेष कूर्म सप्त पाताळ । एकवीस स्वर्ग अष्ट दिक्पाळ[6] । तेहतीस कोटी देव सकळ । ऐलीकडे ॥ ५१ ॥ बारा आदित्य

१. स्वतः २. बरवर. ३. भूतें पांच व गुण तीन मिळून. ४. भूतांचें मिश्रण. ५. सात आवरणें ( भूतें पांच व अहंकार आणि महत्तत्व हीं दोन ) यांनीं युक्त. ६. इंद्र, अग्नि, यम, निऋती, वरुण, वायु, कुबेर आणि शिव असे आठ दिशांचे अधिपति.

अकरा रुद्र । नव नाग सप्त ऋषीश्वर । नाना देवांचे अवतार । ऐलीकडे ॥ ५२ ॥ मेघ मनु चक्रवर्ती । नाना जीवांची उत्पत्ती । आतां असो सांगों किती । विस्तार हा ॥५३॥ सकळ विस्ताराचें मूळ । ते मूळमायाच केवळ । मागां निरूपिलें सकळ । पांचभौतिक ॥ ५४ ॥ सूक्ष्मभूतें जे बोलिलीं । तेंचि पुढें जडत्वा आलीं । ते हे सकळहि बोलिलीं । पुढिलिये समासीं ॥ ५५ ॥ पंचभूतें पृथगाकारें । पुढें निरूपिलीं विस्तारें । वोळखीकारणें अत्यादरें । श्रोतीं श्रवण करावीं ॥ ५६ ॥ पांचभौतिक ब्रह्मगोळ । जेणें कळे हा प्रांजळ । दृश्य सांडून केवळ । वस्तुचि पाविजे ॥ ५७ ॥ महाद्वार वोलांडावें । मग देवदर्शन घ्यावें । तैसें दृश्य हें सांडावें । जाणोनियां ॥ ५८ ॥ म्हणोनि दृश्याचे पोटीं । आहे पंचभूतांची दाटी । एकपणें पडिली मिठी । दृश्यपंचभूतां ॥ ५९ ॥ पंचभूतांचीच दृश्य । सृष्टि रचिली सावकाश । श्रोतीं करूनि अवकाश । श्रवण करावें ॥ ६० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टमदशके सूक्ष्मपंचभूतनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. पंचमहाभूतस्वरूप.

श्रीगणेशाय नमः ॥ केवळ मूर्ख तें नेणे । म्हणोनि घडलें सांगणें । पंचभूतांचीं लक्षणें । विशद करूनी ॥ १ ॥ पंचभूतांचा कर्दम जाहला । आतां न वचे वेगळा केला । परंतु कांहीं वेगळाला । करून दावूं ॥ २ ॥ पर्वत पाषाण शिळा शिखरें । नाना वर्णें लहान थोरें । खडे गुंडे बहुप्रकारें । जाणिजे पृथ्वी ॥ ३ ॥ नाना रंगांची मृत्तिका । नाना स्थळोस्थळीं जे कां । वाळुके वाळू अनेका । मिळोन पृथ्वी ॥ ४ ॥ पुरें पट्टणें मनोहरें । नाना मंदिरें दामोदरें[1] । नाना देवालयें शिखरें । मिळोन पृथ्वी ॥ ५ ॥ सप्तद्वीपवती पृथ्वी । काय म्हणोनि सांगावी । नवखंडें मिळोनि जाणावी । वसुंधरा[2] ॥ ६ ॥ नाना देश नाना नृपती । नाना भाषा नाना रीती । लक्ष चौऱ्यायशी उत्पत्ती । मिळोन पृथ्वी ॥ ७ ॥ नाना उद्वसें[3] वनें । नाना तरुवरांचीं बनें । गिरिकंदरें नाना स्थानें । मिळोन पृथ्वी ॥ ८ ॥ नाना रचना केली देवीं । जे जे निर्मिली मानवीं । सकळ मिळोन पृथ्वी । जाणिजे

---

१. रत्नखचित मंदिरें. २. पृथ्वी. ३. ओसाड.

श्रोतीं ॥ ९ ॥ नाना धातु सुवर्णादिक । नाना रत्नें जीं अनेक । नाना काष्ठ वृक्षादिक । मिळोन पृथ्वी ॥ १० ॥ आतां असो हें बहुवस । जडांश आणि कठिणांश । सकळ पृथ्वी हा विश्वास । मानिला पाहिजे ॥ ११ ॥ बोलिलें पृथ्वीचें रूप । आतां सांगिजेल आप । श्रोतीं ओळखावें रूप । सावध होऊनी ॥ १२ ॥ वापी कूप सरोवर । नाना सरितांचें जें नीर । मेघ आणि सप्त सागर । मिळोन आप ॥ १३ ॥ श्लोकार्ध ॥ क्षारक्षीरसुरासर्पि-र्दधि चेक्षुजलं तथा ॥ क्षारसमुद्र दिसताहे । सकळ जन दृष्टीस पाहे । जेथें लवण होत आहे । तोचि क्षारसिंधु ॥ १४ ॥ एक दुधाचा सागर । त्या नांव क्षीरसागर । देवें दीधला निरंतर । उपमन्यूसी[1] ॥ १५ ॥ एक समुद्र मद्याचा । एक जाणा घृताचा । एक निखळ दह्याचा । समुद्र असे ॥ १६ ॥ एक उं-साच्या रसाचा । एक तो शुद्ध जळाचा । ऐसा सातां समुद्रांचा । वेढा पृ-थ्वीसी ॥ १७ ॥ एवं भूमंडळींचें जळ । नाना स्थळींचें जें सकळ । मिळोन अवघें केवळ । आप जाणावें ॥ १८ ॥ पृथ्वीगर्भीं कितीक । पृथ्वीतळीं आ-वरणोदक । तिहीं लोकींचें उदक । मिळोन आप ॥ १९ ॥ नाना वल्ली बहु-वस । नाना तरुवरांचे रस । मध पारा अमृत विष । मिळोन आप ॥ २० ॥ नाना रस स्नेहादिकें[2] । यांहि वेगळे अनेक । जळाऐसे आवश्यक । आप बोलिजे ॥ २१ ॥ सार्द्र[3] आणि शीतळ । जळासारिखें पातळ । शुक्र[4] शो-णितें[5] मूत्र लाळ । आप बोलिजे ॥ २२ ॥ आप संकेतें जाणावें । पातळ ओलें ओळखावें । मृदु शीतळ स्वभावें । आप बोलिजे ॥ २३ ॥ झाला आपाचा संकेत । पातळ मृदु गुळगुळीत । स्वेद[6] श्लेष्मा[7] अश्रु समस्त । आ-प जाणावें ॥ २४ ॥ तेज ऐका सावधपणें । चंद्र सूर्य तारांगणें । दिव्य देह सतेजपणें । तेज बोलिजे ॥ २५ ॥ वन्हि मेघीं विद्युल्लता । वन्हि सृष्टि-संहारिता । वन्हि सागरा जाळिता । वडवानळ ॥ २६ ॥ वन्हि शंकराचें नेत्रींचा । वन्हि काळाचे क्षुधेचा । वन्हि परिघ[8] भूगोळाचा । तेज बोलिजे ॥ २७ ॥ जें जें सतेज प्रकाशरूप । तें तें तेजाचें स्वरूप । शोषक उष्णादि आरोप[9] । तेज जाणावें ॥ २८ ॥ वायु जाणावा चंचळ । चैतन्य चेतवी के-

१. एक ऋषिपुत्र, त्याला. २. तेल, तूप इत्यादि. ३. ओलसर. ४. रेत. ५. रक्त. ६. घाम. ७. कफ. ८. वेढा. ९. कल्पना.

वळ । बोलणें चालणें सकळ । वायूमुळें ॥ २९ ॥ डोले हाले तितुका पवन । कांहींच न चले पवनेंविण । सृष्टीच्या लया कारण । मूळ तो वायु ॥ ३० ॥ चळण वळण प्रसरण । निरोधन आणि आकुंचन । सकळ जाणावा पवन । चंचळरूपी ॥ ३१ ॥ प्राण अपान आणि व्यान । चौथा उदान पांचवा समान । नाग[१] कूर्म[१] कृकर[१] जाण । देवदत्त[१] धनंजय[१] ॥ ३२ ॥ जितुकें कांहीं होतें चळण । तितुकें वायूचें लक्षण । चंद्र सूर्य तारागण । वायुचि धर्ता ॥ ३३ ॥ आकाश जाणावें पोकळ । निर्मळ आणि निश्चळ । अवकाशरूप सकळ । आकाश जाणावें ॥ ३४ ॥ आकाश सकळांस व्यापक । आकाश अनेकीं एक । आकाशामध्यें कौतुक । चहूं भूतांचें ॥ ३५ ॥ आकाशाऐसें नाहीं सार । आकाश सकळांहूनि थोर । पाहतां आकाशाचा विचार । स्वरूपासारिखा ॥ ३६ ॥ तंव श्रोतीं केला आक्षेप । दोहींचें सारखेंचि रूप । तरी आकाशचि स्वरूप । कां म्हणों नये ॥ ३७ ॥ आकाश स्वरूपा कोण भेद । पाहतां दिसती अभेद । आकाश वस्तु स्वतःसिद्ध । कां न म्हणावी ॥ ३८ ॥ वस्तु अचळ अढळ । वस्तु निर्मळ निखळ । तैसेंच आकाश केवळ । वस्तूसारिखें ॥ ३९ ॥ ऐकोनि वक्ता बोले वचन । वस्तु निर्गुण पुरातन । आकाशा अंगीं सप्त गुण । शास्त्रीं निरूपिले ॥ ४० ॥ काम क्रोध शोक मोहो । भय अज्ञान शून्यत्व पाहो । ऐसा सप्तविध स्वभावो । आकाशाचा ॥ ४१ ॥ ऐसें शास्त्रकारें बोलिलें । म्हणोनि आकाश भूत झालें । स्वरूप निर्विकार संचलें । उपमेरहित ॥ ४२ ॥ कांचबंदी[२] आणि जळ । सारिखेंचि वाटे सकळ । परी एक कांच एक जळ । शाहणे जाणती ॥ ४३ ॥ रुवामध्यें स्फटिक पडिला । लोकीं तद्रूप देखिला । तेणें कपाळमोक्ष झाला । कापूस न करी ॥ ४४ ॥ तांदुळांमध्यें श्वेत[३] खडे । तांदुळासारिखे वांकडे । चावूं जातां दांत पडे । तेव्हां कळे ॥ ४५ ॥ त्रिभागामध्यें[४] खडा असे । त्रिभागासारिखाचि भासे । शोधूं जातां वेगळा दिसे । कठिणपणें ॥ ४६ ॥ गुळासारिखा गुळदगड । परी तो कठिण निचाड[५] । नागकोंडी[६] आणि वेखंड । एक म्हणों नये ॥ ४७ ॥ सोनें आणि सोनपितळ । एकचि वाटती

१. हीं पंच उपप्राणांची नांवें. २. कांचांनीं बनविलेली जागा. ३. पांढरे. ४. चुना, वाळू आणि ताग यांच्या मिश्रणामध्यें. ५. अतिशय. ६. बचनाग.

केवळ । परी पितळेस लागतां ज्वाळ । काळिमा चढे ॥ ४८ ॥ असो हे हीन दृष्टांत । आकाश ह्मणिजे केवळ भूत । तें भूत आणि अनंत । एक कैसें ॥ ४९ ॥ वस्तूसि वर्णचि नसे । आकाश श्यामवर्ण भासे । दोहींस साम्यता कैसे । करिती विचक्षण ॥ ५० ॥ श्रोते म्हणती कैचें रूप । आकाश ठायींचें अरूप । आकाश वस्तुच तद्रूप । भेद नाहीं ॥ ५१ ॥ चहूं भूतांस नाश आहे । आकाश कैसें नासताहे । आकाशीं न साहे । वर्ण[1] व्यक्ति[2] विकार ॥५२॥ आकाश अचळ दिसतें । त्याचें काय नासों पाहतें । पाहतां आमुचेनि मतें । आकाश शाश्वत ॥ ५३ ॥ ऐसें ऐकोन वचन । वक्ता बोले प्रतिवचन । ऐक आतां लक्षण । आकाशाचें ॥ ५४ ॥ आकाश तमापासून झालें । ह्मणोनि कामक्रोधें वेष्टिलें । अज्ञान शून्यत्व बोलिलें । नाम तयाचें ॥ ५५ ॥ अज्ञानें कामक्रोधादिक । मोह भय आणि शोक । हा अज्ञानाचा विवेक । आकाशगुणें ॥ ५६ ॥ नास्तिक नकारवचन । तेंचि शून्याचें लक्षण । तयास म्हणती हृदयशून्य । अज्ञान प्राणी ॥५७॥ आकाश स्तब्धपणें शून्य । शून्य म्हणिजे तें अज्ञान । अज्ञान म्हणिजे कठिण । रूप तयाचें ॥ ५८ ॥ कठिण शून्य विकारवंत । तयास कैसें म्हणावें सत । मनास वाटे हें तद्वत । औहाच[3] दृष्टी ॥ ५९ ॥ अज्ञान कालवलें आकाशीं । तया कर्दमा ज्ञान नाशी । म्हणोनिया आकाशासी । नाश आहे ॥ ६० ॥ तैसें आकाश आणि स्वरूप । पाहतां वाटती एकरूप । परी दोहींमध्यें विक्षेप[4] । शून्यत्वाचा ॥ ६१ ॥ औहाच[3] पाहतां कल्पनेसी । सारिखेंच वाटे निश्चयेंसी । परी आकाश स्वरूपासी । भेद आहे ॥ ६२ ॥ उन्मनी[5] आणि सुषुप्ति[6] अवस्था । सारिखीच वाटे तत्वतां । परी विवेचून पाहूं जातां । भेद आहे ॥ ६३ ॥ खोटें खऱ्यासारिखें भाविती । परी परीक्षावंत निवडिती । कां कुरंगें[7] देखोनि भुलती । मृगजळासी ॥ ६४ ॥ आतां असोत हे दृष्टांत । बोलिलों कळाया संकेत । म्हणोनि भूत आणि अनंत । एक नव्हेती ॥६५॥ आकाश वेगळेपणें पाहावें । स्वरूपीं स्वरूपचि व्हावें । वस्तूचें पाहणें स्वभावें । ऐसें असे ॥ ६६ ॥ येथें आशंका फिटली । संदेहवृत्ति मावळली । अभिन्नपणें न वचे अनुभविली । स्वरूपस्थिती ॥६७॥ आकाश अनुभवा येतें ।

१. रंग. २. आकार. ३. वरवर. ४. कल्पना. ५. मनोलय. ६. झोप. ७. हरिणें.

स्वरूप अनुभवा परतें । म्हणोनियां आकाशातें । साम्यत्ता न घडे ॥६८॥ दुग्धासारिखा जळांश । निवडूं जाणती राजहंस । तैसें स्वरूप आणि आकाश । संत जाणती ॥ ६९ ॥ सकळ माया गाथागोवी । संतसंगें हे उगवावी । पाविजे मोक्षपदवी । सत्समागमें ॥ ७० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टमदशके पंचमहाभूतस्वरूपाकाशभेदनिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. दुश्चितलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रोता विनवी वक्तयासी । सत्संगाची महिमा कैसी । मोक्ष लाभे किती दिवशीं । हें मज निरूपावें ॥ १ ॥ धरितां साधूची संगती । किती दिवशीं होते मुक्ती । हा निश्चय कृपामूर्ती । मज दीनास करावा ॥२॥ मुक्ति लाभे तत्क्षणीं । विश्वासतां निरूपणीं । दुश्चितपणें हानी । होत असे ॥ ३ ॥ सुचितपणें दुश्चित । मन होतें अकस्मात । त्यास करावें निवांत । कोणे परी ॥ ४ ॥ मनाच्या तोडून वोढी । श्रवणीं बैसावें आवडी । सावधपणें घडीनें घडी । काळ सार्थक करावा ॥ ५ ॥ अर्थप्रमेयें[1] ग्रंथांतरीं । शोधूनि घ्यावें अभ्यंतरीं । दुश्चितपण आलें तरी । पुन्हा श्रवण करावें ॥६॥ अर्थांतर[2] पाहिल्याविण । उगेंचि करी जो श्रवण । तो श्रोता नव्हे पाषाण । मनुष्यवेषें ॥ ७ ॥ येथें श्रोते मानितील शिण । आम्हांसि केलें पाषाण । तरी पाषाणाचें लक्षण । सावध ऐका ॥८॥ वांकुडा तिकुडा फोडिला । पाषाण घडून नीट केला । दुसरे वेळेस पाहिला । तरी तो तैसाचि असे ॥ ९ ॥ टांकीनें खपली फोडिली । ते मागुती नाहीं जडली । मनुष्याची कुबुद्धि झाडिली । तरी ते पुनः लागे ॥१०॥ सांगतां अवगुण गेला । पुनः मागुती जडला । या कारणें महा भला । पाषाण गोटा ॥ ११ ॥ ज्याचा अवगुण झडेना । तो पाषाणाहून उणा । पाषाण आगळा[3] जाणा । कोटिगुणें ॥ १२ ॥ कोटिगुणें कैसा पाषाण । त्याचेंहि ऐका लक्षण । श्रोतीं करावें श्रवण । सावध होऊनी ॥ १३ ॥ माणीक मोतीं प्रवाळ[4] । पाच वैडूर्य[5] वज्रनीळ[6] । गोमेद मणी परिस केवळ । पाषाण बोलिजे ॥ १४ ॥ यांहि वेगळे बहुत ।

---

१. सिद्धान्त. २. गूढार्थ. ३. श्रेष्ठ. ४. पोंवळें. ५. एक रत्न. ६. हिरा.

सूर्यकांत सोमकांत। नाना मोहरे[1] सप्रचीत। औषधाकारणें ॥ १५ ॥ यांहि वेगळे पाषाण भले। नाना तीर्थीं जे लागले। वापीकूप[2] सेखीं झाले। हरिहरमूर्ती ॥१६॥ याचा पाहतां विचार। पाषाणाऐसें नाहीं सार। मनुष्य तें काय पामर। पाषाणापुढें ॥ १७ ॥ तरी तो ऐसा नव्हे पाषाण। जो अपवित्र निष्कारण। तयासारिखा देह जाण। दुश्चित अभक्तांचा ॥ १८ ॥ आतां असो हें बोलणें। घात होतो दुश्चितपणें। दुश्चितपणाचेनि गुणें। प्रपंच ना परमार्थ ॥ १९ ॥ दुश्चितपणें कार्य नासे। दुश्चितपणें चिंता वसे। दुश्चितपणें स्मरण नसे। क्षणएक पाहतां ॥ २० ॥ दुश्चितपणें शत्रुजिणें[3]। दुश्चितपणें जन्ममरणें। दुश्चितपणाचेनि गुणें। हानि होय ॥ २१ ॥ दुश्चितपणें नव्हे साधन। दुश्चितपणें न घडे भजन। दुश्चितपणें नव्हे ज्ञान। साधकासी ॥ २२ ॥ दुश्चितपणें नव्हे निश्चय। दुश्चितपणें न घडे जय। दुश्चितपणें होय क्षय। आपुल्या स्वहिताचा ॥२३॥ दुश्चितपणें न घडे श्रवण। दुश्चितपणें न घडे विवरण। दुश्चितपणें निरूपण। हातींचें जाय ॥ २४ ॥ दुश्चितपणें बैसलाचि दिसे। परी तो असतचि नसे। चंचळचक्रीं पडिलें असे। मानस तयाचें ॥ २५ ॥ वेडें पिशाच निरंतर। अंध मुकें आणि बधिर। तैसा जाणावा संसार। दुश्चित प्राणियांचा ॥ २६ ॥ सावध असोनि उमजेना। श्रवण असोन ऐकेना। ज्ञान असोन कळेना। सारासार विचार ॥ २७ ॥ ऐसा जो दुश्चित आळशी। परलोक कैंचा त्यासी। जयाचे जीवीं अहर्निशीं। आळस वसे ॥२८॥ दुश्चितपणापासून सुटला। तरी तो सवेंचि आळस आला। आळसाहातीं प्राणियाला। उसंतचि नाहीं ॥ २९ ॥ आळसें राहिला विचार। आळसें बुडाला आचार। आळसें नव्हे पाठांतर। कांहीं केल्या ॥ ३० ॥ आळसें घडेना श्रवण। आळसें नव्हे निरूपण। आळसें परमार्थाची खूण। मलिन जाहली ॥ ३१ ॥ आळसें नित्यनेम राहिला। आळसें अभ्यास बुडाला। आळसें आळस वाढला। असंभाव्य ॥ ३२ ॥ आळसें गेली धारणा[4] धृति[5]। आळसें मलिन झाली वृत्ती। आळसें विवेकाची गती। मंद जाहली ॥ ३३ ॥ आळसें निद्रा वाढली। आळसें वासना विस्तारली। आळसें शून्याकार झाली। सद्बुद्धि निश्चयाची ॥ ३४ ॥ दुश्चित

१. औषधी मणी. २. आड, विहीर. ३. शत्रूनें जिंकणें. ४. चित्तैक्य. ५. धैर्य.

पणासवें आळस । आळसें निद्राविलास । निद्राविलासें केवळ नाश । आयुष्याचा ॥ ३५ ॥ निद्रा आळस दुश्चितपण । हेंचि मूर्खांचें लक्षण । येणें-करितां निरूपण । उमजेचि ना ॥ ३६ ॥ हीं तिन्ही लक्षणें जेथें । विवेक कैंचा असेल तेथें । अज्ञानास यापरतें । सुखचि नाहीं ॥ ३७ ॥ क्षुधा लागतांच जेविला । जेवून उठतां आळस आला । आळस येतांच निजला । सावकाश ॥ ३८ ॥ निजोन उठतांच दुश्चित । कदा नाहीं सावचित । तेथें कैचें आत्महित । निरूपणीं ॥ ३९ ॥ मर्कटापाशीं दिलें रत्न[1] । पिशाचा-हातीं निधान । दुश्चितापुढें निरूपण । तयापरी होय ॥ ४० ॥ आतां असो हे उपपत्ती । आशंकेची कोण गती । किती दिवसां होते मुक्ती । सज्जनाचे-नि संगें ॥ ४१ ॥ ऐका याचें प्रत्युत्तर । श्रोतीं व्हावें निरुत्तर । संतसंगाचा विचार । ऐसा असे ॥ ४२ ॥ लोह परिसासि लागला । थेंबुटा सागरीं मिळाला । गंगेसरिते[2] संगम झाला । तत्क्षणींचें[3] ॥ ४३ ॥ सावध सांक्षेपी[4] आणि दक्ष । तयास तत्काळचि मोक्ष । इतरांसि तें अलक्ष[5] । लक्षिलें न वचे ॥ ४४ ॥ येथें शिष्यप्रज्ञाचि[6] केवळ । प्रज्ञावंता नलगे वेळ । अनन्यास[7] तत्काळ । मोक्ष लाभे ॥ ४५ ॥ प्रज्ञावंत आणि अनन्य । तयास नलगे एक क्षण । अनन्य भावार्थेंविण । प्रज्ञा खोटी ॥ ४६ ॥ प्रज्ञेविण अर्थ न कळे । विश्वासेंविण वस्तु नाकळे । प्रज्ञाविश्वासें गळे । देहाभिमान ॥ ४७ ॥ देहाभिमानाचे अंतीं । सहजचि वस्तुप्राप्ती । सत्संगें होय सद्गती । विलंबचि नाहीं ॥ ४८ ॥ सावध सांक्षेपी आणि दक्ष । प्रज्ञावंत आणि विश्वास । तयास समाधानीं सायास । करणेंचि नलगे ॥ ४९ ॥ इतर भाविक साबडे । तयास साधनीं मोक्ष जोडे । साधुसंगें तत्काळ उघडे । विवेकदृष्टी ॥ ५० ॥ परी तें साधन मोडूं नये । निरूपणाच्या उपायें । निरूपणें न लागे सोय । सर्वत्रांसी ॥ ५१ ॥ आतां मोक्ष आहे कैसा । कैसी स्वरूपाची दशा । त्याचे प्राप्तीचा भरंवसा । सत्संगें केवीं ॥ ५२ ॥ ऐसें निरूपण प्रांजळ । पुढें बोलिलें असे सकळ । श्रोतीं होवोनियां निश्चळ । अवधान द्यावें ॥ ५३ ॥ अवगुण त्यागावयाकारणें । न्यायनिष्ठुर लागे बोलणें । श्रोतीं कोप न धरणें ।

---

१. रत्न. २. गंगा व एकादी नदी यांचा. ३. तत्काळ एकरूप होतात. ४. उद्योगी. ५. ब्रह्म. ६. शिष्याच्या बुद्धीची कुशाग्रता. ७. एकनिष्ठ असणारास.

ऐसिया वचनाचा ॥ ५४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टमदशके दुश्चितलक्षणनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. मोक्षलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां श्रोतयांचा पक्ष । किती दिवसां होतो मोक्ष । तेचि कथा श्रोते दक्ष । होऊन ऐका ॥१॥ मोक्षास कैसें जाणावें । मोक्ष कोणास म्हणावें । सत्संगें पावावें । मोक्षास कैसें ॥ २ ॥ तरी बद्ध म्हणिजे तो बांधला । आणि मोक्ष म्हणिजे मोकळा झाला । तो संतसंगें कैसा लाधला । तेंहि ऐका ॥ ३ ॥ प्राणी संकल्पें बांधला । जीवपणें बद्ध झाला । तो विवेकें मुक्त केला । साधुजनीं ॥ ४ ॥ मी जीव ऐसा संकल्प । दृढ धरितां गेले कल्प । तेणें प्राणी झाला अल्प । देहबुद्धीचा ॥ ५ ॥ मी जीव मज बंधन । मज आहे जन्ममरण । केल्या कर्माचें फळ आपण । भोगीन आतां ॥ ६ ॥ पापाचें फळ तें दुःख । आणि पुण्याचें फळ तें सुख । पापपुण्य आवश्यक । भोगणें लागे ॥ ७ ॥ पापपुण्यभोग सुटेना । आणि गर्भवासहि तुटेना । ऐसी जयाची कल्पना । दृढ जाहली ॥ ८ ॥ तया नांव बांधला । जीवपणें बद्ध झाला । जैसा स्वयें बांधोनि कोसला । मृत्यु पावे ॥ ९ ॥ तैसा प्राणी तो अज्ञान । नेणे भगवंताचें ज्ञान । म्हणे माझें जन्ममरण । सुटेचि ना ॥ १० ॥ आतां कांहीं दान करूं । पुढिलिया जन्मास आधारु । तेणें सुखरूप संसारु । होईल माझा ॥ ११ ॥ पूर्वीं दान नाहीं केलें । म्हणोनि दरिद्र प्राप्त झालें । आतां तरी कांहीं केलें । पाहिजे कीं ॥ १२ ॥ म्हणोनि दिलें वस्त्र जुनें । आणि एक ताम्र नाणें । म्हणे आतां कोटिगुणें । पावेन पुढें ॥ १३ ॥ कुशावर्तीं कुरुक्षेत्रीं । महिमा ऐकोन दान करी । आशा धरिली अभ्यंतरीं । कोटिगुणाची ॥ १४ ॥ रुका अडका दान केला । अतीतास तुकडा घातला । म्हणे माझा ढीग झाला । कोटि तुकड्यांचा ॥ १५ ॥ तो मी खाईन पुढिले जन्मीं । ऐसें कल्पी अंतर्यामीं । वासना गुंतली जन्मकर्मीं । प्राणियाची ॥ १६ ॥ आतां मी जें देईन । तें पुढिले जन्मीं पावेन । ऐसें कल्पी तो अज्ञान । बद्ध जाणावा ॥ १७ ॥ बहुतां जन्मांचे अंतीं । होय नरदेहाची प्राप्ती । येथें न होतां

ज्ञानसद्गती। गर्भवास चुकेना ॥ १८ ॥ गर्भवास नरदेहींच घडे । ऐसें हें सर्वथा न घडे। अकस्मात भोगणें पडे। पुन्हा नीच योनी ॥ १९ ॥ ऐसा निश्चय शास्त्रांतरीं । बहुतीं केला बहुतां परी । नरदेह संसारीं। परम दुर्लभ असे ॥ २० ॥ पाप पुण्य समता घडे । तरीच नरदेह जोडे। येरव्हीं जन्म न घडे । हें व्यासवचन भागवतीं ॥ २१ ॥ श्लोक ॥ नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं प्लवं सुकल्पं गुरुकर्णधारम् ॥ मयाऽनुकूलेन नभस्वतेरितं पुमान् भवाब्धिं न तरेत्स आत्महा ॥ १ ॥ टीका ॥ नरदेह परम दुर्लभ । अल्प संकल्पाचा लाभ । गुरु कर्णधार[1] स्वयंभ । सुख पाववी ॥ २२ ॥ देव अनुकूल नव्हे जया। स्वयें पापी तो प्राणिया । भवाब्धि न तरवे तया। आत्महत्यारा बोलिजे ॥ २३ ॥ ज्ञानेंविण प्राणियासी । जन्ममृत्यु लक्ष चौऱ्यायशी । तितुक्या आत्महत्या त्यासी । म्हणोनि आत्महत्यारा ॥ २४ ॥ नरदेहीं ज्ञानेंविण । कदा न चुके जन्ममरण। भोगणें लागती दारुण । नाना नीच योनी ॥ २५ ॥ रीस मर्कट श्वान सूकर । अश्व वृषभ म्हैसा खर । काक कुक्कुट जंबूक मार्जार । सरडे बेडुक मक्षिका ॥ २६ ॥ इत्यादिक नीच योनी। ज्ञान नसतां भोगणें जनीं । आशा धरी मूर्ख प्राणी । पुढिलिया जन्माची ॥ २७ ॥ हा नरदेह पडतां । तोचि पाविजे मागुता । ऐसा विश्वास धरितां । लाज नाहीं ॥ २८ ॥ कोण पुण्याचा संग्रहो । जे पाविजे नरदेहो । दुराशा धरिली पहा हो । पुढिलिया जन्माची ॥ २९ ॥ ऐसे मूर्ख अज्ञान जन । केलें संकल्पें बंधन । शत्रु आपणास आपण । होऊनि ठेले ॥ ३० ॥ श्लोक ॥ आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ऐसें संकल्पाचें बंधन । संतसंगें तुटे जाण । ऐक तयाचें लक्षण । सांगिजेल ॥ ३१ ॥ पांचां भूतांचें शरीर। निर्माण झालें चराचर । प्रकृतिस्वभावें जगदाकार । वर्तों लागे ॥ ३२ ॥ देहीं अवस्था[2] अभिमान[3] । स्थानें[4] भोग[5] मात्रा[6] गुण[7] । शक्ति[8] आदिकरूनि लक्षण । चौपुटी[9] तत्वांची ॥ ३३ ॥ ऐसी पिंडब्रह्मांडरचना । विस्तारें वाढली कल्पना । निर्धारितां तत्वज्ञाना । मतें भांबावलीं ॥ ३४ ॥

---

१. नावाडी. २. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ति. ३. विश्व, तैजस आणि प्राज्ञ; मी आहें असा समज. ४. नेत्र, कंठ आणि हृदय. ५. स्थूल, प्रविविक्त आणि आनंद. ६ पृथिव्यादि सूक्ष्म भूतें. ७. सत्व, रज आणि तम. ८. माया. ९. सांगड.

नाना मतें नाना भेद । भेदें वाढती विवाद । परी तो ऐक्यतेचा संवाद । साधु जाणती ॥ ३५ ॥ तया संवादाचें लक्षण । पांचभौतिक देह जाण । तया देहामध्यें कारण । आत्मा वोळखावा ॥ ३६ ॥ देह अंतीं नासोनि जाय । त्यास आत्मा म्हणों नये । नाना तत्वाचे समुदाय । देहामध्यें आले ॥३७॥ अंतःकरण प्राणादिक[1] । विषय[2] इंद्रियदशक[3] । हा सूक्ष्माचा[4] विवेक । बोलिला शास्त्रीं ॥ ३८ ॥ घेतां सूक्ष्माची शुद्धी[5] । भिन्न अंतःकरण मन बुद्धी । नाना तत्वांची उपाधी । वेगळा आत्मा ॥ ३९ ॥ स्थूल सूक्ष्म कारण । महाकारण विराट हिरण्य । अव्याकृत मूळप्रकृति जाण । ऐसे अष्ट देह ॥ ४० ॥ चारी पिंडीं चारी ब्रम्हांडीं । ऐसी अष्टदेहांची प्रौढी । प्रकृतिपुरुषांची वाढी । दश देह बोलिजे ॥ ४१ ॥ ऐसें तत्वांचें लक्षण । आत्मा साक्षी विलक्षण । कार्य कर्ता कारण । दृश्य तयाचें ॥ ४२ ॥ जीव शिव पिंड ब्रह्मांड । माया अविद्येचें बंड । हें सांगतां असे उदंड । परी तो आत्मा वेगळा ॥ ४३ ॥ पाहों जातां आत्मे चारी । त्यांचें लक्षण अवधारीं । हें जाणोनी अभ्यंतरीं । सुदृढ धरावें ॥ ४४ ॥ एक जीवात्मा दुसरा शिवात्मा । तिसरा परमात्मा जो विश्वात्मा । चौथा जाणिजे निर्मळात्मा । ऐसे चारी आत्मे ॥ ४५ ॥ भेदें उंच नीच भासती । परी चारी एकचि असती । येविषयीं दृष्टांत संमती । सावध ऐका ॥ ४६ ॥ घटाकाश मठाकाश । महदाकाश चिदाकाश । अवघें मिळोन आकाश । एकचि असे ॥ ४७ ॥ तैसा जीवात्मा आणि शिवात्मा । परमात्मा आणि निर्मळात्मा । अवघा मिळोन आत्मा । एकचि असे ॥ ४८ ॥ घटीं व्यापक जें आकाश । तया नांव घटाकाश । पिंडीं व्यापक जो ब्रह्मांश । त्यासि जीवात्मा बोलिजे ॥ ४९ ॥ मठीं व्यापक जें आकाश । तया नांव मठाकाश । तैसा ब्रह्मांडीं जो ब्रम्हांश । त्यास शिवात्मा बोलिजे ॥ ५० ॥ मठाबाहेरील आकाश । तया नांव महदाकाश । ब्रम्हांडाबाहेरील जो ब्रम्हांश । त्यासि परमात्मा बोलिजे ॥ ५१ ॥ उपाधीवेगळें आकाश । तया नांव चिदाकाश । तैसा निर्मळात्मा परेश । उपाधीवेगळा ॥ ५२ ॥ उपाधियोगें वाटे भिन्न । परी तें आ-

---

१ प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान. २. शब्द, स्पर्श, रूप, रस, आणि गंध. ३. पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें. ४. लिंगदेहाचा. ५. शोध.

काश अभिन्न । तैसा आत्मा स्वानंदघन । एकचि असे ॥ ५३ ॥ दृश्यासबाह्य अंतरीं । सूक्ष्मात्मा निरंतरी । त्याची वर्णावया थोरी । शेष समर्थ नव्हे ॥ ५४ ॥ ऐसें आत्म्याचें लक्षण । जाणतां नाहीं जीवपण । उपाधि शोधितां अभिन्न । मुळींच आहे ॥ ५५ ॥ जीवपण एकदेशीं । अहंकारें जन्म सोसी । विवेक पहतां प्राणियांसी । जन्म कैंचा ॥ ५६ ॥ जन्ममृत्यूपासून सुटला । या नांव जाणिजे मोक्ष झाला । तत्व शोधितां पावला । तत्ववस्तु ॥ ५७ ॥ तेचि वस्तु ते आपण । हें महावाक्याचें लक्षण । साधु करिती निरूपण । आपुलेनि सुखें ॥ ५८ ॥ जेचि क्षणीं अनुग्रह केला । तेचि क्षणीं मोक्ष झाला । बंधन कांहीं आत्मयाला । बोलोंचि नये ॥ ५९ ॥ आतां आशंका फिटली । संदेहवृत्ति मावळली । संतसंगें तात्काळ झाली । मोक्षपदवी ॥ ६० ॥ स्वप्नामध्यें जो बांधला । तो जागृतीनें मोकळा केला । ज्ञानविवेकें प्राणियाला । मोक्षप्राप्ती ॥ ६१ ॥ अज्ञान निशीच्या अंतीं । संकल्पःदुखें नासती । तेणें गुणें होय प्राप्ती । तत्काळ मोक्षाची ॥ ६२ ॥ तोडावया स्वप्नबंधन । नलगे आणिक साधन । तयास प्रयत्न जागृतीविण । बोलोंचि नये ॥ ६३ ॥ तैसा संकल्पें बांधला जीव । त्यास आणीक नाहीं उपाव । विवेक पाहतां वाव । बंधन होय ॥ ६४ ॥ विवेक पाहिल्याविण । जो जो उपाय तो तो शिण । विवेक पाहतां आपण । आत्माच असे ॥ ६५ ॥ आत्मयाच्या ठायीं कांहीं । बंध मोक्ष दोन्ही नाहीं । जन्ममृत्यु हें सर्वही । आत्मत्वीं न घडे ॥ ६६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टमदशके मोक्षलक्षणनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. आत्मानिर्दर्शन.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां झालें निरूपण । परमात्मा तोचि तूं जाण । तया परमात्मयाचें लक्षण । तें हें ऐसें असे ॥ १ ॥ जन्म नाहीं मृत्यु नाहीं । येणें नाहीं जाणें नाहीं । बंध मोक्ष दोन्ही नाहीं । परमात्मयासी ॥ २ ॥ परमात्मा निर्गुण निराकार । परमात्मा अनंत अपार । परमात्मा नित्य निरंतर । जैसा तैसा ॥ ३ ॥ परमात्मा सर्वांस व्यापक । परमात्मा अनेकीं

---

१. जगताचे आंत बाहेर. २. कृपा किंवा उपदेश. ३. रात्रीच्या.

एक । परमात्मयाचा विवेक । अतर्क्य आहे ॥ ४ ॥ ऐसी परमात्मयाची स्थिति । बोलताती वेदश्रुती । परमात्मा पाविजे भक्तीं । येथें संशय नाहीं ॥ ५ ॥ तये भक्तीचें लक्षण । भक्ति नवविधा भजन । नवविधा भजनें पावन । बहु भक्त जाहले ॥ ६ ॥ तये नवविधेमध्यें सार । आत्मनिवेदन थोर । तयेचा करावा विचार । स्वानुभवें स्वयें ॥ ७ ॥ आपुलिया स्वानुभवें । आपणास निवेदावें । आत्मनिवेदन जाणावें । ऐसें असे ॥ ८ ॥ महापूजेच्या अंतीं । देवास मस्तक वाहती । तैसी आहे निकटभक्ती । आत्मनिवेदनाची ॥ ९ ॥ आपणास निवेदिती । ऐसे भक्त थोडे असती । तयांस परमात्मा मुक्ती । तात्काळ देतो ॥ १० ॥ आपणास कैसें निवेदावें । कोठें जाऊन पडावें । किंवा मस्तक तोडावें । देवापुढें ॥ ११ ॥ ऐसें ऐकोन बोलणें । वक्ता वदे सर्वज्ञपणें । श्रोतीं सावधान होणें । एकाग्रचित्तें ॥ १२ ॥ आत्मनिवेदनाचें लक्षण । आधीं पाहावें मी कोण । मग परमात्मा निर्गुण । तो वोळखावा ॥ १३ ॥ देवा भक्तांचें शोधन । करितां होतें आत्मनिवेदन । देव आहे पुरातन । भक्त पाहे ॥ १४ ॥ देवास ओळखों जातां । तेथें झाली तद्रूपता । देवभक्तांची विभक्तता । मुळींच नाहीं ॥ १५ ॥ विभक्त नाहीं म्हणोन भक्त । बद्ध नाहीं म्हणोन मुक्त । अयुक्त[1] नाहीं बोलणें युक्त । शास्त्राधारें ॥ १६ ॥ देवा भक्तांचें पाहतां मूळ । होय भेदाचें निर्मूळ । एक परमात्मा सकळ । दृश्यावेगळा ॥ १७ ॥ तयासि होतां मिळणी । उरी नाहीं दुजेपणीं । देव भक्त हे कडसणी[2] । निरसोनि गेली ॥ १८ ॥ आत्मनिवेदनाच्या अंतीं । जे कां घडली अभेदभक्ती । तये नांव सायुज्यमुक्ती । सत्य जाणावी ॥ १९ ॥ जो संतासि शरण गेला । अद्वैतनिरूपणें बोधला । मग जरी वेगळा केला । तरी होणार नाहीं ॥ २० ॥ नदी मिळाली सागरीं । ते निवडावी कोणेपरी । लोह[3] सोनें होतां मावारी । काळिमा न ये ॥ २१ ॥ तैसा भगवंतीं मिळाला । तो न वचे वेगळा केला । देव आपण भक्त झाला । विभक्त नव्हे ॥ २२ ॥ देव भक्त दोनी एक । ऐसें ज्ञान जया निश्चयात्मक । साधुजनीं मोक्षदायक । तोचि जाणावा ॥ २३ ॥ आतां असो हें बोलणें । देव पाहावा भक्तपणें । तेणें त्याचें ऐश्वर्य

१. अयोग्य. २. गुंता. ३. लोखंड.

बाणे । तत्काळ अंगीं ॥ २४ ॥ देहचि होऊनि राहिजे । तेणें देहदुःख
साहिजे । देहातीतें होतां पाविजे । परब्रह्म तें ॥ २५ ॥ देहातीत कैसें होणें ।
कैसें परब्रह्म पावणें । ऐश्वर्याचीं लक्षणें । कवण सांगिजे ॥ २६ ॥ ऐसें श्रोतीं
आक्षेपिलें । याचें उत्तर काय बोलिलें । तेंचि आतां निरूपिलें । सावध
ऐका ॥ २७ ॥ देहातीत वस्तु आहे । ते तूं परब्रह्म पाहे । देह[1]संग हा न
साहे । तुज विदेहासी ॥ २८ ॥ ज्याची बुद्धि ऐसी । वेद वर्णिती तयासी ।
शोधितां नानाशास्त्रांसी । न पडे ठायीं ॥ २९ ॥ ऐश्वर्य ऐसें तत्वतां । बाणे
देहबुद्धि सोडितां । देह मी ऐसें भावितां । अधोगती ॥ ३० ॥ या कारणें
साधुवचन । मानूं नये अप्रमाण । मिथ्या मानितां दूषण । लागों पाहे ॥
३१ ॥ साधुवचन तें कैसें । काय धरावें विश्वासें । एक वेळ स्वामी ऐसें ।
मज निरूपावें ॥ ३२ ॥ सोहं[2] आत्मा स्वानंदघन । अजन्मा[3] तो तूंचि
जाण । हेंचि साधूचें वचन । सदृढ धरावें ॥ ३३ ॥ महावाक्याचें[4] अंतर[5] ।
तूंचि ब्रह्म निरंतर । ऐशिया वचनाचा विसर । पडोंचि नये ॥ ३४ ॥
देहास होईल अंत । मग मी पावेन अनंत । ऐसें बोलणें निभ्रांत । मानूंचि
नये ॥ ३५ ॥ एक मूर्ख ऐसें म्हणती । माया नासेल कल्पांतीं । मग
आम्हांस ब्रह्मप्राप्ती । येरवीं नाहीं ॥ ३६ ॥ मायेसि होईल कल्पांत ।
अथवा देहास होईल अंत । ते काळीं पावेन निवांत । परब्रह्म मी ॥
३७ ॥ हें बोलणें अप्रमाण । ऐसें नव्हे समाधान । समाधानाचें लक्षण ।
वेगळेंचि असे ॥ ३८ ॥ सैन्य अवघेंचि मरावें । मग राज्यपद प्राप्त
व्हावें । सैन्य असतांच राज्य करावें । हें कळेना ॥ ३९ ॥ माया असो-
नीच नाहीं । देह असतांच विदेही[6] । ऐसें समाधान कांहीं । वोळ-
खावें ॥ ४० ॥ राज्यपद हातासि आलें । मग परिवारें काय केलें ।
परिवार देखतां राज्य गेलें । हें तों घडेना ॥ ४१ ॥ प्राप्त झालिया आत्म-
ज्ञान । तैसें दृश्य देहभान । दृष्टी पडतां समाधान । जाणार नाहीं ॥४२॥
मार्गीं मुळी सर्पाकार । देखतां भय आलें थोर । कळतां तेथींचा विचार ।
मग मारणें काय ॥ ४३ ॥ तैसी माया भयानक । विचार पाहतां मायिक ।

१. देहाशीं संबंध. २. तो देव मी. ३. जन्मरहित ईश्वर. ४. तत्वमस्यादि महा-वाक्यांचा मथितार्थ. ५. ब्रह्म. ६. देहावेगळा.

मग तयेचा धाक । कासया धरावा ॥ ४४ ॥ देखतां मृगजळाचा पूर । म्हणे कैसा जाऊं पैलपार । कळतां तेथींचा विचार । मग सांकडें कैंचें ॥ ४५ ॥ देखतां स्वप्न भयानक । स्वप्नीं वाटे परम धाक । जागृति झालिया साशंक । कासया व्हावें ॥ ४६ ॥ तथापि माया कल्पनेसि दिसे । आपण कल्पनातीत असे । तेथें उद्वेग कायसे । निर्विकल्पासी ॥ ४७ ॥ अंतीं मति तेचि गती । ऐसें सर्वत्र बोलती । तुझ्या अंतीं तुझी प्राप्ती । सहजचि झाली ॥ ४८ ॥ चौदेहांचा[१] अंत । आणि जन्ममूळाचा प्रांत[२] । अंता प्रांतासि अलिप्त । तो तूं आत्मा ॥ ४९ ॥ जयास ऐशी आहे मती । तयास ज्ञानें आत्मगती । गती आणि अवगती[३]- । वेगळाचि तूं ॥ ५० ॥ मति खुंटली देवांची । तेथें गति आणि अवगति कैंची । आत्मशास्त्रगुरुप्रचीतीची । ऐक्यता आली ॥ ५१ ॥ जीवपणाची फिटली भ्रांती । वस्तु आली आत्मप्रचीतीं । प्राणी पावला उत्तम गती । सद्गुरुबोधें ॥ ५२ ॥ सद्गुरुबोध जेव्हां झाला । चौदेहांस अंत आला । तेणें निजध्यास लागला । स्वस्वरूपीं ॥ ५३ ॥ तेणें निजध्यासें प्राणी । ध्येयचि झाला निर्वाणीं[४] । सायुज्यमुक्तीचा धनी । होऊनि बैसला ॥ ५४ ॥ दृश्य पदार्थ वोसरतां । अवघा आत्माचि तत्त्वतां । नेहटून विचारें पाहतां । दृश्य मुळींच नाहीं ॥ ५५ ॥ मिथ्या मिथ्यात्वें पाहिलें । मिथ्यापणें[५] अनुभवा आलें । श्रोतीं पाहिजे ऐकिलें । या नांव मोक्ष ॥ ५६ ॥ सद्गुरुवचन हृदयीं धरी । तोचि मोक्षाचा अधिकारी । श्रवण मनन केलेंचि करी । अत्यादरें ॥ ५७ ॥ जेथें आटती दोनी पक्ष[६] । तेथें लक्ष ना अलक्ष । या नांव जाणिजे मोक्ष । नेमस्त आत्मा ॥ ५८ ॥ तेथें ध्यान धारणा सरे । कल्पना निर्विकल्पीं मुरे । केवळ ज्ञप्तिमात्र[७] उरे । सूक्ष्मब्रह्म ॥ ५९ ॥ भवमृगजळ आटलें । लटिकें बंधन तुटलें । अजन्म्यास मुक्त केलें । जन्मदुःखापासूनी ॥ ६० ॥ निःसंगाची संगव्याधी । विदेहाची देहबुद्धी । विवेकें तोडिली उपाधी । निष्प्रपंचाची ॥ ६१ ॥ अद्वैताचें तोडिलें द्वैत । एकांतासी दिधला एकांत । अनंतास दिधला अंत । अनंताचा ॥ ६२ ॥ जागृतीस चेवविलें । चेइल्यास सावध केलें । निजबोधा-

---

१. स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण यांचा. २. संबंध. ३. दुर्गति. ४. अखेरीस. ५. मिथ्या झाला असतां. ६. स्वपरभाव. ७. ज्ञानस्वरूप.

सि प्रबोधिलें । आत्मज्ञान ॥ ६३ ॥ अमृतास केलें अमर । मोक्षास मुक्तीचें घर । संयोगास निरंतर । योग केला ॥ ६४ ॥ निर्गुणास निर्गुण केलें । सार्थकाचें सार्थक झालें । बहुतां दिवसां भेटलें । आपणास आपण ॥६५॥ तुटला द्वैताचा पडदा । अभेदें तोडिलें भेदा । भूतपंचकाची बाधा । निरसोनि गेली ॥ ६६ ॥ झालें साधनांचें फळ । निश्चळास केलें निश्चळ । निर्मळाचा गेला मळ । विवेकबळें ॥ ६७ ॥ होतें सन्निध चुकलें । ज्याचें त्यास प्राप्त झालें । आपणा देखतां फिटलें । जन्मदुःख ॥ ६८ ॥ दुःस्वप्नें जाजावला । ब्राह्मण नीचयाती झाला । आपणासि आपण सांपडला । जागेपणें ॥ ६९ ॥ ऐसें जयास झालें ज्ञान । तया पुरुषाचें लक्षण । पुढिले समासीं निरूपण । बोलिलें असे ॥ ७० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टमदशके आत्मनिदर्शननिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. सिद्धलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ अंतरीं गेलिया अमृत । बाहेरी काया लखलखित । अंतरस्थिति बाणतां संत । लक्षणें कैसी ॥ १ ॥ झालें आत्मज्ञान बरवें । हें कैसेनि पां जाणावें । म्हणोनि बोलिलीं स्वभावें । साधुलक्षणें ॥ २ ॥ ऐका सिद्धाचें लक्षण । सिद्ध म्हणिजे स्वरूप जाण । तेथें पाहतां वेगळेपण । मुळींच नाहीं ॥ ३ ॥ स्वरूप होऊनि राहिजे । तया नांव सिद्ध बोलिजे । सिद्धस्वरूपींच[1] साजे । सिद्धपण ॥ ४ ॥ वेदशास्त्रीं जें प्रसिद्ध । स्वस्वरूप स्वतःसिद्ध । तयासीच बोलिजे सिद्ध । अन्यथा न घडे ॥ ५ ॥ तथापि बोलों कांहींएक । साधका कळावया विवेक । सिद्धलक्षणांचें कौतुक । तें हें ऐसें असे ॥ ६ ॥ अंतरें[2]स्थिति स्वरूप झाली । पुढें काया कैसी वर्तली । जैसी स्वप्नींची नाथिली । स्वप्नरचना ॥ ७ ॥ तथापि सिद्धाचें लक्षण । कांहीं करूं निरूपण । जेणें बाणे अंतरखुण । परमार्थाची ॥ ८ ॥ सदा स्वरूपा[3]नुसंधान । हें मुख्य साधूचें लक्षण । जनीं असोनि आपण । जनावेगळा ॥ ९ ॥ स्वरूपीं दृष्टि पडतां । तुटोन गेली संसारचिंता । पुढें लागली ममता । निरूपणाची ॥ १० ॥ हें साधकाचें लक्षण । परी सिद्धाअंगीं

---

१. स्वतःसिद्ध ब्रह्मस्वरूपीं. २. अंतःकरणाची वृत्ति. ३. आत्मस्वरूपाचें चिंतन.

असे जाण । सिद्धलक्षण साधकेंविण । बोलोंच नये ॥ ११ ॥ बाह्य साधकाचे परी । आणि स्वरूपाकार अंतरीं । सिद्धलक्षण तें चतुरीं । जाणिजे ऐसें ॥ १२ ॥ संदेहरहित साधन । तेंचि सिद्धाचें लक्षण । अंतर्बाह्य समाधान । चळेना ऐसें ॥ १३ ॥ अचळ झाली अंतरस्थिती । तेथें चळणास कैंची गती । स्वरूपीं लागतां वृत्ती । स्वरूपचि जाहली ॥ १४ ॥ मग तो चळतांच अचळ । चंपळपणें निश्चळ । निश्चळ असोनि चंचळ । देह त्याचा ॥ १५ स्वरूपीं स्वरूपचि झाला । मग तो पडोनीच राहिला । अथवा उठोन पळाला । तरी तो चळेना ॥ १६ ॥ येथें कारण अंतरस्थिती । अंतरींच पाहिजे निवृत्ती । अंतर लागलें भगवंतीं । तोचि साधु ॥ १७ ॥ बाह्य भलतैसें असावें । परी अंतर स्वरूपीं लागावें । मग लक्षणें दिसती स्वभावें । साधुअंगीं ॥ १८ ॥ राज्यीं बसतां अवलीळा[१] । अंगीं बाणे राजकळा । स्वरूपीं लागतां जिव्हाळा । लक्षणें बाणती ॥ १९ ॥ येरवीं अभ्यास करितां । हातां न चढती सर्वथा । स्वरूपीं राहावें तत्वतां । स्वरूप होऊनी ॥ २० ॥ अभ्यासाचा मुगुटमणी । वृत्ती राहावी निर्गुणीं । संतसंगें निरूपणीं । स्थिति बाणे ॥ २१ ॥ ऐसीं लक्षणें बरवीं । स्वरूपाकारें अभ्यासावीं । स्वरूप सोडितां गोसांवी । भांबावती ॥ २२ ॥ आतां असो हें बोलणें । ऐका साधूचीं लक्षणें । जेणें समाधान बाणे । साधुअंगीं ॥ २३ ॥ स्वरूपीं भरतां कल्पना । तेथें कैंची उरेल कामना । म्हणोनियां साधुजना । कामचि नाहीं ॥ २४ ॥ कल्पिला विषय हातींचा जावा । तेणें गुणें क्रोध यावा । साधुजनांचा अक्षय ठेवा । जाणार नाहीं ॥ २५ ॥ म्हणोनि ते क्रोधरहित । जाणती स्वस्वरूप संतें[२] । नाशवंत हे पदार्थ । सांडूनियां ॥ २६ ॥ जेथें नाहीं दुसरी परी । क्रोध यावा कोणावरी । क्रोधरहित चराचरीं[३] । साधुजन वर्तती ॥ २७ ॥ आपुला आपण स्वानंद । कोणावरी करावा मद । या कारणें वादविवाद । तुटोनि गेला ॥ २८ ॥ साधुस्वरूप निर्विकार । तेथें कैंचा तिरस्कार । आपला आपण मत्सर । कोणावरी करावा ॥ २९ ॥ साधु वस्तु अनायासें । या कारणें मत्सर नसे । मदमत्सरांचें पिसें । साधूसि नाहीं ॥ ३० ॥ साधु स्वरूप स्वयंभ । तेथें कैंचा असेल दंभ[४] । जेथें द्वैताचा

१. सहज. २. नित्य ३. जीवांच्या आणि जडांच्या ठिकाणीं ४. ढोंग.

आरंभ । जाहलाचि नाहीं ॥ ३१ ॥ जेणें दृश्य केलें विसंच[1] । तयास कैंचा होय प्रपंच । या कारणें निष्प्रपंच । साधु जाणावा ॥ ३२ ॥ अवघें ब्रह्मांड त्याचें घर । पांचभौतिक हा जोजार । मिथ्या जाणोनि सत्वर । त्याग केला ॥ ३३ ॥ या कारणें लोभ नसे । साधु सदा निर्लोभ असे । जयाची वासना समरसे[2] । शुद्ध स्वरूपीं ॥ ३४ ॥ आपला आपण आघवा । शोक कोणाचा करावा । म्हणोनि साधु तो जाणावा । शोकरहित ॥ ३५ ॥ दृश्य सांडूनि नाशवंत । स्वरूप सेविलें शाश्वत । या कारणें शोकरहित । साधु जाणावा ॥ ३६ ॥ शोकें दुखवावी वृत्ती । तरी ते झाली निवृत्ती । म्हणोनि साधु आदिअंतीं । शोकरहित ॥ ३७ ॥ मोहें झळंबावें मन । तरी तें मनचि झालें उन्मन[3] । या कारणें साधुजन । मोहातीत ॥ ३८ ॥ साधु वस्तु अद्वय । तेथें कैंचें वाटेल भय । परब्रह्म तें निर्भय । तोचि साधु ॥ ३९ ॥ या कारणें भयातीत । साधु निर्भय निवांत । सकळांस मांडेल अंत । साधु अनंतरूपी ॥ ४० ॥ सत्यस्वरूपीं अमर झाला । भय कैंचें वाटेल त्याला । या कारणें साधुजनाला । भयचि नाहीं ॥ ४१ ॥ जेथें नाहीं द्वैतभेद । आपला आपण अभेद । तेथें कैंचा उठेल खेद । देहबुद्धीचा ॥ ४२ बुद्धीनें निर्मिलें निर्गुणा । त्यास कोणीच नेईना । या कारणें साधूजना । खेदचि नाहीं ॥ ४३॥ साधु आपण एक । तेथें कैंचा दुःख शोक । दुजेंविण अविवेक । येणार नाहीं ४४ ॥ आशा धरितां परमार्थाची । दुराशा तुटली स्वार्थाची । म्हणोनि नैराश्यता साधूची । ओळखावी ॥ ४५ ॥ मृदुपणें जैसें गगन । तैसें साधूचें लक्षण । या कारणें साधुवचन । कठिण नाहीं ॥ ४६ ॥ स्वरूपाच्या संयोगीं । स्वरूपचि झाला योगी । या कारणें वीतरागी[4] । निरंतर ॥ ४७ ॥ स्थिति बाणतां स्वरूपाची । चिंता सोडिली देहाची । या कारणें होणाराची । चिंता नाहीं ॥ ४८ ॥ स्वरूपीं लागतां बुद्धी । तुटे अवघी उपाधी । या कारणें निरुपाधी । साधुजन ॥ ४९ ॥ साधु स्वरूपींच राहे । तेथें संगचि न साहे । म्हणोनि साधु तो न पाहे । मानापमान ॥ ५० ॥ अलक्षास लाविती लक्ष । म्हणोन साधु परम दक्ष । वोढूं जाणती कैपक्ष[5] । परमार्थाचा ॥ ५१ ॥ स्वरूपीं न साहे मळ । म्हणोनि साधु तो निर्मळ । साधु स्वरूप-

१. अदृश्य. २. एकरस होते. ३. कल्पनारहित. ४. आसक्तिशून्य. ५. कैवार.

चि केवळ । म्हणोनियां ॥ ५२ ॥ सकळ धर्मांमध्यें धर्म । स्वरूपीं राहणें हा स्वधर्म । हेंचि जाणिजे मुख्य वर्म । साधुलक्षणाचें ॥ ५३ ॥ धरितां साधूचीं संगती । आपैसीच लागे स्वरूपस्थिती । स्वरूपस्थितीनें बाणती । लक्षणें अंगीं ॥५४॥ ऐसीं साधूचीं लक्षणें । अंगीं बाणती निरूपणें । परंतु स्वरूपीं[1] राहणें । निरंतर ॥५५॥ निरंतर स्वरूपीं राहतां । स्वरूपचि होइजे तत्वतां । मग लक्षणें अंगीं बाणतां । वेळ नाहीं ॥ ५६ ॥ स्वरूपीं राहिल्या मती । अवगुण अववेच सांडती । परंतु यासि सत्संगती । निरूपण पाहिजे ॥ ५७ ॥ सकळ सृष्टीच्या ठाईं । अनुभव एकचि नाहीं । तो बोलिजेल सर्वेही । पुढिले समासीं ॥ ५८ ॥ कोणे स्थितीनें राहती । कैसा अनुभव पहाती । रामदास म्हणे श्रोतीं । अवधान द्यावें ॥ ५९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टमदशके सिद्धलक्षणनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. शून्यत्वनिरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ जगाचे अनुभव पुसतां । कलह उठला अवचिता । हा कथाकल्लोळ श्रोतां । कौतुकें ऐकावा ॥ १ ॥ एक म्हणती हा संसारु । करितां पाविजे पैलपारु । आपुला नव्हे कीं जोजारु । जीव देवाचे ॥ २ ॥ एक म्हणती हें न घडे । लोभ येऊनि अंगीं जडे । पोटास्तव करणें पडे । सेवा कुटुंबाची ॥ ३ ॥ एक म्हणती स्वभावें । संसार करावा सुखेंनावें[2] । कांहीं दान पुण्य करावें । सद्गतीकारणें ॥ ४ ॥ एक म्हणती संसार खोटा । वैराग्यें घ्यावा देशवटा । तेणें स्वर्गीच्या वाटा । मोकळ्या होती ॥ ५ ॥ एक म्हणती कोठें जावें । उगेंच कासया हिंडावें । आपुले आश्रमीं असावें । आश्रमधर्म करूनी ॥ ६ ॥ एक म्हणती कैंचा धर्म । अवघा होतसे अधर्म । ये संसारीं नाना कर्म । करणें लागे ॥ ७ ॥ एक म्हणती बहुतां परी । वासना असावी वरी । येणेंचि तरिजे संसारीं । अनायासें ॥ ८ ॥ एक म्हणती कारण भाव[3] । भावेंचि पाहिजे देव । येर हें अवघेंच वाव । गाथागोवी ॥ ९ ॥ एक म्हणती वाडिलें जीवीं[4] । अवघीं देवचि मानावीं । मायबापें पूजीत जावीं । एकभावें ॥ १० ॥ एक म्हणती देवब्राह्मण । त्यांचें

१. स्वरूपाचे चिंतनांत. २. सुखेनैव. ३. भक्ति. ४. अंतःकरणांतून.

करावें पूजन । मायबाप नारायण । विश्वजनाचा ॥ ११ ॥ एक म्हणती शास्त्र पाहावें । तेथें निरूपिलें देवें । तेणें प्रमाणेंचि जावें । परलोकासी ॥ १२ ॥ एक म्हणती अहो जना । शास्त्र पाहतां पुरवेना । या कारणें साधुजना । शरण जावें ॥ १३ ॥ एक म्हणती सांडा गोष्टी । वायांचि करितां चावटी[1] । सर्वांस कारण पोटीं । भूतदया असावी ॥ १४ ॥ एक म्हणती एकचि बरवें । आपुले आचारें असावें । अंतकाळीं नाम घ्यावें । देवाचें ॥ १५ ॥ एक म्हणती पुण्य असेल । तरीच वाचे नाम येईल । नाहीं तरी भुली पडेल । अंतकाळीं ॥ १६ ॥ एक म्हणती जीत असावें । तंवचि सार्थक करावें । एक म्हणती फिरावें । तीर्थाटण ॥ १७ ॥ एक म्हणती हे अटाटी । पाणीपाषाणाची भेटी । बुचकळ्या मारितां हिंपुटी । कासया व्हावें ॥ १८ ॥ एक म्हणती सांडा वाचाळी[1] । अगाध महिमा भूमंडळीं । दर्शनमात्रें होय होळी । महापातकांची ॥ १९ ॥ एक म्हणती तीर्थ[2] स्वभावें । कारण मनचि असावें । एक म्हणती कीर्तन करावें । सावकाश ॥ २० ॥ एक म्हणती योग बरवा । मुख्य तोचि आधीं साधावा । देह अमरचि करावा । अकस्मात ॥ २१ ॥ एक म्हणती ऐसें काय । काळवंचना[3] करूं नये । एक म्हणती धरावी सोय । भक्तिमार्गाची ॥ २२ ॥ एक म्हणती ज्ञान बरवें । एक म्हणती साधन करावें । एक म्हणती मुक्त असावें । निरंतर ॥ २३ ॥ एक म्हणती अनर्गळा[4] । धरीं पापाचा कंटाळा । एक म्हणती रे मोकळा । मार्ग आमुचा ॥ २४ ॥ एक म्हणती हें विशेष । करूं नये निंदा द्वेष । एक म्हणती सावकाश । दुष्टसंग त्यागावा ॥ २५ ॥ एक म्हणती ज्याचें खावें । त्या सन्मुखचि मरावें । तेणें तत्काळचि पावावें । मोक्षपद ॥ २६ ॥ एक म्हणती सांडा गोष्टी । आधीं पाहिजे ते रोटी । मग करावी चावटी[1] । सावकाश ॥ २७ ॥ एक म्हणती पाउस असावा । मग सकळ योग बरवा । कारण दुष्काळ न पडावा । म्हणिजे बरें ॥ २८ ॥ एक म्हणती तपोनिधी[5] । होतां वोळती सकळ सिद्धी । एक म्हणती रे आधीं । इंद्रपद साधावें ॥ २९ ॥ एक म्हणती आगम[6] पाहावा । वेताळ प्रसन्न करून घ्यावा । तेणें पाविजे देवा । स्वर्ग-

---

१. बडबड. २. तीर्थासारखें शुद्ध. ३. मृत्यूस फसविणें, देह अमर करणें. ४. अतिशय. ५. महा तपस्वी. ६. मंत्रशास्त्र.

लोकीं ॥ ३० ॥ एक म्हणती अघोरमंत्र । तेणें होइजे स्वतंत्र । श्रीहरी-जें कलत्र[1] । तेंचि बोले ॥ ३१ ॥ तिज लागले सर्व अधर्म । तेथें कैंचें क्रियाकर्म । एक म्हणती कुकर्म । तिच्या मर्दें ॥ ३२ ॥ एक म्हणती एक साक्षेप । करावा मृत्युंजयाचा जप । तेणें गुणें सर्व संकल्प[2] । सिद्धीतें पावती ॥३३॥ एक म्हणती बटु भैरव । तेणें पाविजे वैभव । एक म्हणती झोटिंग सर्व । पुरवितसे ॥ ३४ ॥ एक म्हणती काळी[3] । एक म्हणती भद्रकाळी । एक म्हणती उच्छिष्ट चांडाळी[4] । साध्य करावी ॥ ३५ ॥ एक म्हणती विघ्न-हर । एक म्हणती भोळा शंकर । एक म्हणती सत्वर । पावे भगवती ॥३६॥ एक म्हणती मल्लारी । सत्वराचि सभाग्य करी । एक म्हणती महा बरी । भक्ति व्यंकटेशाची ॥ ३७ ॥ एक म्हणती पूर्वठेवा[5] । एक म्हणती प्रयत्न करावा । एक म्हणती भार घालावा । देवावरी ॥३८॥ एक म्हणती देव कैंचा । अंतचि पाहतो भल्यांचा । एक म्हणती हा युगाचा । युगधर्म ॥३९॥ एक आश्चर्य मानिती । एक विस्मय करिती । एक कंटाळोन म्हणती । काय होईल तें पाहावें ॥ ४० ॥ ऐसे प्रापंचिक जन । लक्षणें सांगतां गहन । परंतु कांहींएक चिन्ह । अल्पमात्र बोलिलें ॥ ४१ ॥ आतां असो हा स्वभाव । ज्ञात्याचा कैसा अनुभव । तोहि सांगिजेल सर्व । सावध ऐका ॥ ४२ ॥ एक ह्मणती करावी भक्ती । श्रीहरि देईल सद्गती । एक ह्मणती ब्रह्मप्राप्ती । कर्मेंचि होय ॥ ४३ ॥ एक ह्मणती भोग सुटेना । जन्ममरण हें तुटेना । एक म्हणती ऊर्मी[6] नाना । अज्ञानाच्या ॥ ४४ ॥ एक म्हणती सर्व ब्रह्म । तेथें कैचें क्रियाकर्म । एक म्हणती हा अधर्म । बोलोंच नये ॥४५॥ एक म्हणती सर्व नासे । उरलें तेंचि ब्रह्म असे । एक म्हणती ऐसें नसे । समाधान ॥४६॥ सर्व ब्रह्म केवल ब्रह्म । दोन्ही पूर्वपक्षांचे[7] भ्रम । अनुभवाचें वेगळें वर्म । म्हणती एक ॥ ४७ ॥ एक ह्मणती हें न घडे । अनिवार्च्य[8] वस्तु न जोडे । जे बोलतां मौन पडे । वेदशास्त्रांसी ॥ ४८ ॥ तंव श्रोता अनुवादला । ह्मणे निश्चय कोण केला । सिद्धांतमतें अनुभवाला । उरी कैंची ॥ ४९ ॥ अनुभव देहीं वेगळाले । हें पूर्वींच बोलिलें । आतां कांहींएक केलें । न

---

१. स्त्री, लक्ष्मी. २. मनोरथ. ३. महाकाली. ४. एक देवी. ५. नशीब. ६. कल्पना. ७. खोट्या विचाराचे. ८. बोलून दाखवितां येत नाहीं अशी.

वचे कीं ॥ ५० ॥ एक साक्षित्वें वर्तती । साक्षी वेगळाचि ह्मणती । आपण द्रष्टा ऐसी स्थिती । स्वानुभवाची ॥ ५१ ॥ दृश्यापासून द्रष्टा वेगळा । ऐसी अलिप्तपणाची कळा । आपण साक्षित्वें निराळा । स्वानुभवें ॥ ५२ ॥ सकळ पदार्थ जाणता । तो पदार्थाहूनि परता । देहीं असोनि अलिप्तता । सहजाचि जाहली ॥ ५३ ॥ एक ऐसें स्वानुभवें । म्हणती साक्षित्वें वर्तावें । दृश्य असोनि वेगळें व्हावें । द्रष्टेपणें ॥ ५४ ॥ एक म्हणती नाहीं भेद । वस्तु ठायींचीच अभेद । तेथें कैंचा मतिमंद । द्रष्टा आणिला ॥ ५५ ॥ अवघी साकरचि स्वभावें । तेथें कडू काय निवडावें । द्रष्टा कैंचा स्वानुभवें । अवघेंचि ब्रह्म ॥ ५६ ॥ प्रपंच परब्रह्म अभेद । भेदवादी मानिती भेद । परी हा आत्मा स्वानंद । आकारला ॥ ५७ ॥ विघरलें तूप थिजलें । तैसें निर्गुणाचि गुणा आलें । तेथें काय वेगळें केलें । द्रष्टेपणें ॥ ५८ ॥ म्हणोनि द्रष्टा आणि दृश्य । अवघा एकचि जगदीश । द्रष्टेपणाचा सायास । कासयासी ॥ ५९ ॥ ब्रह्मचि आकारलें सर्व । ऐसा एकाचा अनुभव । ऐसे हे दोनी स्वभाव । निरूपिले ॥ ६० ॥ अवघा आत्मा आकारला । आपण भिन्न कैंचा उरला । दुसरा अनुभव बोलिला । ऐसियापरी ॥ ६१ ॥ ऐक तिसरा अनुभव । प्रपंच सारूनियां सर्व । कांहीं नाहीं तोचि देव । ऐसें ह्मणती ॥६२॥ दृश्य अवघें वेगळें केलें । केवळ अदृश्यचि उरलें । तेंचि ब्रह्म अनुभवलें । म्हणती एक ॥ ६३ ॥ परी तें ब्रह्म म्हणों नये । उपायासारिखा अपाय । शून्यत्वास ब्रह्म काय । म्हणों येईल ॥ ६४ ॥ दृश्य अवघें वोलांडिलें । अदृश्य शून्यत्वीं पडिलें । ब्रह्म म्हणोनि मुरडिलें । तेथूनचि मागें ॥६५॥ इकडे दृश्य तिकडे देव । मध्यें शून्यत्वाचा ठाव । तयास मंदबुद्धीस्तव । प्राणी ब्रह्म ह्मणे ॥ ६६ ॥ रायासि नाहीं वोळखिलें । सेवकास राव ऐसें कल्पिलें । परी तें अवघें व्यर्थ गेलें । राजा देखतां ॥६७॥ तैसें शून्यत्व कल्पिलें ब्रह्म । पुढें देखतां परब्रह्म । शून्यत्वाचा अवघा भ्रम । तुटोनि गेला ॥ ६८ ॥ परी हा सूक्ष्म अडथळा । वारी विवेकें वेगळा । जैसें दुग्ध घेऊनि जळा । राजहंस सांडिती ॥ ६९ ॥ आधीं दृश्य हें सोडिलें । मग शून्यत्व वोलांडिलें । मूळमायेपरतें देखिलें । परब्रह्म ॥ ७० ॥ वेगळेपणें पाहणें घडे । तेणें वृत्ति शून्यत्वीं पडे । पोटीं संदेह पवाडे । शून्यत्वाचे ॥ ७१ ॥ भिन्नपणें अनुभ-

विलें । तयास शून्यत्व ऐसें बोलिलें । वस्तुलेक्षीं[1] अभिन्न झालें । पाहिजे आधीं ॥ ७२ ॥ वस्तु आपणाचि होणें । ऐसें वस्तूचें पाहणें । निश्चयेंसि भिन्नपणें । शून्यत्व लाभे ॥ ७३ ॥ या कारणें शून्यत्व कांहीं । परब्रम्ह होणार नाहीं । वस्तुस्वरूप होऊनि पाहीं । स्वानुभवें ॥ ७४ ॥ आपण वस्तु सिद्धचि आहे । मन मी ऐसें कल्पूं नये । साधु सांगती उपाय । तूंचि आत्मा ॥ ७५ ॥ मन मी ऐसें नाथिलें[2] । संतीं नाहीं निरूपिलें । मानावें कोणाच्या बोलें । मन मी ऐसें ॥ ७६ ॥ संतवचनीं ठेवितां भाव । तोचि शुद्ध स्वानुभव । मनाचा तैसाच स्वभाव । आपण वस्तु ॥ ७७ ॥ जयाचा घ्यावा अनुभव । तोचि आपण निरवयव[3] । आपुला घेती अनुभव । विश्वजन ॥ ७८ ॥ लोभी धन साधूं गेले । तंव ते लोभी धनचि झाले । मग ते भाग्य पुरुषीं भोगिले । सावकाश ॥ ७९ ॥ तैसें देहबुद्धि सोडितां । साधकास झालें तत्वतां । अनुभवाची मुख्य वार्ता । ते हे ऐसी ॥ ८० ॥ आपण वस्तु मुळीं एक । ऐसा ज्ञानाचा विवेक । येथून हा ज्ञानदशक । संपूर्ण जाहला ॥८१॥ आत्मज्ञान निरूपिलें । यथामतीनें बोलिलें । न्यून पूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ॥ ८२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टमदशके शून्यत्वनिरसननिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी ६४३.

---

# दशक नववा.

## १. आशंका.

श्रीगणेशाय नमः ॥ निराकार म्हणिजे काय । निराधार म्हणिजे काय । निर्विकल्प ह्मणिजे काय । मज निरूपावें ॥ १ ॥ निराकार म्हणिजे आकार नाहीं । निराधार म्हणिजे आधार नाहीं । निर्विकल्प म्हणिजे कल्पना नाहीं । परब्रह्मीं ॥२॥ निरामय म्हणिजे काय । निराभास म्हणिजे काय । निरवयव म्हणिजे काय । मज निरूपावें ॥ ३ ॥ निरामय म्हणिजे आमय[4] नाहीं । निराभास म्हणिजे भासचि नाहीं । निरवयव म्हणजे अवयव नाहीं । पर-

१. ब्रह्मचिंतनानें. २. नसलेलें. ३. अवयवरहित. ४. दुःख.

ब्रह्मीं ॥ ४ ॥ निष्प्रपंच म्हणिजे काय । निष्कलंक म्हणिजे काय । निरुपाधी म्हणिजे काय । मज निरूपावें ॥ ५ ॥ निष्प्रपंच म्हणिजे प्रपंच नाहीं । निष्कलंक म्हणिजे कलंक नाहीं । निरुपाधि म्हणिजे उपाधि[1] नाहीं । परब्रह्मीं ॥ ६ ॥ निरुपम म्हणिजे काय । निरालंब म्हणिजे काय । निरपेक्ष म्हणिजे काय । मज निरूपावें ॥ ७ ॥ निरुपम म्हणिजे उपमा नाहीं । निरालंब म्हणिजे अवलंब[2] नाहीं । निरपेक्ष म्हणिजे अपेक्षा नाहीं । परब्रह्मासी ॥ ८ ॥ निरंजन म्हणिजे काय । निरंतर म्हणिजे काय । निर्गुण म्हणिजे काय । मज निरूपावें ॥ ९ ॥ निरंजन म्हणिजे अंजनचि[3] नाहीं । निरंतर म्हणिजे अंतर नाहीं । निर्गुण म्हणिजे गुणचि नाहीं । परब्रह्मासी ॥ १० ॥ निःसंग म्हणिजे काय । निर्मळ म्हणिजे काय । निश्चळ म्हणिजे काय । मज निरूपावें ॥ ११ ॥ निःसंग म्हणिजे संगचि नाहीं । निर्मळ म्हणिजे मळचि नाहीं । निश्चळ म्हणिजे चळ नाहीं । परब्रह्मासी ॥ १२ ॥ निःशब्द म्हणिजे काय । निर्दोष म्हणिजे काय । निवृत्ति म्हणिजे काय । मज निरूपावें ॥ १३ ॥ निःशब्द म्हणिजे शब्दचि नाहीं । निर्दोष म्हणिजे दोषचि नाहीं । निवृत्ति म्हणिजे वृत्तिच नाहीं । परब्रह्मासी ॥ १४ ॥ निष्काम म्हणिजे काय । निर्लेप म्हणिजे काय । निष्कर्म म्हणिजे काय । मज निरूपावें ॥ १५ ॥ निष्काम म्हणिजे कामचि नाहीं । निर्लेप म्हणिजे लेपचि नाहीं । निष्कर्म म्हणिजे कर्मचि नाहीं । परब्रह्मासी ॥ १६ ॥ अनाम म्हणिजे काय । अजन्मा म्हणिजे काय । अप्रत्यक्ष म्हणिजे काय । मज निरूपावें ॥ १७ ॥ अनाम म्हणिजे नामचि नाहीं । अजन्मा म्हणिजे जन्मचि नाहीं । अप्रत्यक्ष म्हणिजे प्रत्यक्ष नाहीं । परब्रह्म तें ॥ १८ ॥ अगणित म्हणजे काय । अकर्तव्य म्हणिजे काय । अक्षय म्हणिजे काय । मज निरूपावें ॥ १९ ॥ अगणित म्हणिजे गणित नाहीं । अकर्तव्य म्हणिजे कर्तव्य नाहीं । अक्षय म्हणिजे क्षय नाहीं । परब्रह्मासी ॥ २० ॥ अरूप म्हणिजे काय । अलक्ष्य म्हणिजे काय । अनंत म्हणिजे काय । मज निरूपावें ॥ २१ ॥ अरूप म्हणिजे रूपचि नाहीं । अलक्ष्य म्हणिजे लक्ष्यचि[4] नाहीं । अनंत म्हणिजे अंतचि नाहीं । परब्रह्मासी ॥ २२ ॥ अपार म्हणिजे काय । अढळ म्हणिजे

१. संबंध. २. आधार. ३. मळ. ४. लक्षांत आणण्याजोगें.

काय। अतर्क्य म्हणिजे काय। मज निरूपावें ॥ २३ ॥ अपार म्हणिजे पाराचि नाहीं। अढळ म्हणिजे ढळचि नाहीं। अतर्क्य म्हणिजे तर्क्यैचि नाहीं। परब्रह्म तें ॥ २४ ॥ अद्वैत म्हणिजे काय। अदृश्य म्हणिजे काय। अच्युत म्हणिजे काय। मज निरूपावें ॥ २५ ॥ अद्वैत म्हणिजे द्वैतचि नाहीं। अदृश्य म्हणिजे दृश्यचि नाहीं। अच्युत म्हणिजे च्युतै नाहीं। परब्रह्म तें ॥ २६ ॥ अच्छेद्य म्हणिजे काय। अदाह्य म्हणिजे काय। अक्लेद्य म्हणिजे काय। मज निरूपावें ॥ २७ ॥ अच्छेद्य म्हणिजे छेदेना। अदाह्य म्हणिजे जळेना। अक्लेद्य म्हणिजे कौलवेना। परब्रह्म तें ॥ २८ ॥ परब्रह्म म्हणिजे सकळां परतें। तयास पाहतां आपणचि तें। हें कळे अनुभवमतें। सद्गुरु केलिया ॥ २९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नवमदशके आशंका-निरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. ब्रह्म.

श्रीगणेशाय नमः ॥ जें जें कांहीं साकार दिसे। तें तें कल्पांतीं नासे। स्वरूप तें असतचि असे। सर्वकाळ ॥ १ ॥ जें सकळांमध्यें सार। मिथ्या नव्हे तें साचार। जें कां नित्य निरंतर। संचलेंचि असे ॥ २ ॥ तें भगवंताचें निजरूप। त्यासि बोलिजे स्वरूप। याहि वेगळीं अमूप। नामें तयाचीं ॥ ३ ॥ त्यास नामाचा संकेत। कळावया हा दृष्टांत। परी तें स्वरूप नामातीत। असतचि असे ॥ ४ ॥ दृश्यासबाह्य संचलें। परी तें विश्वास चोरलें। जवळींच नाहींसें झालें। असतचि कैसें ॥ ५ ॥ ऐसा ऐकोनियां देव। उठे दृष्टीचा भाव। पाहों जातां दिसे सर्व। दृश्यचि अवघें ॥ ६ ॥ दृष्टीचा विषय दृश्य। तोचि झालिया सादृश्य। तेणें दृष्टी पावे संतोष। परी तें देखणें नव्हे ॥ ७ ॥ दृष्टीस दिसे तें नासे। एतद्विषयीं श्रुति असे। म्हणोनि जें दृष्टीस दिसे। तें स्वरूप नव्हे ॥ ८ ॥ स्वरूप तें निराभास। आणि दृश्य भासलें साभास। भासास बोलिला नाश। वेदांतशास्त्रीं ॥ ९ ॥ आणि पाहतां दृश्यचि भासे। वस्तु दृश्यावेगळी असे। स्वानुभवें

---

१. तर्कानें जाणण्याजोगें. २ चळणारें. ३. भिजेना. ४. पुष्कळ. ५. जगताच्या आंतबाहेर. ६. पाहण्याची इच्छा. ७. प्रत्यक्ष. ८. आभासयुक्त.

पाहतां दिसे । दृश्यासबाह्य ॥ १० ॥ जें निराभास निर्गुण । त्याची काय सांगावी खुण । परी तें स्वरूप जाण । सन्निधचि असे ॥ ११ ॥ जैसा आकाशीं भासला भास । आणि सकळांमध्यें आकाश । तैसा जाणिजे जगदीश । सबाह्य अभ्यंतरीं ॥ १२ ॥ उदकामध्यें परी भिजेना । पृथ्वीमध्यें परी शिरेना । वन्हीमध्यें परी जळेना । स्वरूप देवाचें ॥ १३ ॥ तें ओघामध्यें परी बुडेना । तें वायूमध्यें परी उडेना । सुवर्णीं असे परी घडेना । सुवर्णासारिखें ॥ १४ ॥ ऐसें जें संचलें सर्वदा । परी तें आकळेना कदा । अभेदामाजी वाढवी भेदा । ते हे अहंता ॥ १५ ॥ तिच्या स्वरूपाची खूण । सांगों कांहीं वोळखण । अहंतेचें निरूपण । सावध ऐका ॥ १६ ॥ जे स्वरूपाकडे पावे । अनुभवासवें झेंपावे । अनुभवाचे शब्द आघवे । बोलोन दावी ॥ १७ ॥ म्हणे आतां मीच स्वरूप । तेंचि अहंतेचें रूप । निराकारीं आपेंआप । वेगळी पडे ॥१८॥ स्वयें मीच आहें ब्रह्म । ऐसा अहंतेचा भ्रम । ऐसिये सूक्ष्मीं सूक्ष्म । पाहतां दिसे ॥ १९ ॥ कल्पना आकळी हेत । वस्तु कल्पनातीत । म्हणोन नाकळे अंत । अनंताचा ॥ २० ॥ अन्वय आणि व्यतिरेक । हा शब्दभेद कोणीएक । निःशब्दाचा अंतर्विवेक । शोधिला पाहिजे ॥ २१ ॥ आधीं घेइजे वाच्यांश । मग वोळखिजे लक्ष्यांश । लक्ष्यांशीं पाहतां वाच्यांश । असेल कैंचा ॥ २२ ॥ सर्व ब्रह्म आणि विमळ ब्रह्म । हा वाच्यांशाचा अनुक्रम । शोधितां लक्ष्यांशाचें वर्म । वाच्यांश नासे ॥२३॥ सर्व विमळ दोन्ही पक्ष । वाच्यांशीं आटती[1] प्रत्यक्ष । लक्ष्यांशीं लावितां लक्ष । पक्षपात[2] घडे ॥ २४ ॥ हें लक्ष्यांशें अनुभवणें । तेथें नाहीं वाच्यांश बोलणें । मुख्य अनुभवाचे खुणे । वाचारंभ[3] कैंचा ॥ २५ ॥ परा पश्यंती मध्यमा वैखरी । जेथें वोसरती चान्ही । तेथें शब्द कळाकुसरी । कोण काज ॥ २६ ॥ शब्द बोलतां सर्वंचि नासे । तेथें शाश्वतता कोठें असे । प्रत्यक्षास प्रमाण नसे । बरें पाहा ॥ २७ ॥ शब्द प्रत्यक्ष नाशवंत । म्हणोन घडे पक्षपात । सर्व विमळ ऐसा हेत । अनुभवीं नाहीं ॥ २८ ॥ ऐक अनुभवाचें लक्षण । अनुभव म्हणिजे अनन्यपण । ऐक अनन्याचें लक्षण । ऐसें असे ॥ २९ ॥ अनन्य म्हणिजे अन्य नसे । आत्मनिवेदन जैसें । संगभंगें[4] असत-

१. लय पावतात. २. एकपक्षी बोलणें. ३. शब्दप्रवृत्ति. ४. आसक्ति तुटल्यानें.

चि असे । आत्मा आत्मपणें ॥ ३० ॥ आत्म्यास नाहीं आत्मपण । हेंचि निःसंगाचें लक्षण । हें वाच्यांशें बोलिलें जाण । कळावयाकारणें ॥ ३१ ॥ येऱ्हवीं लक्ष्यांश तो वाच्यांशें । सांगिजेल हें घडेल कैसें । वाक्यविवरणें आपैसें । कळों लागे ॥ ३२ ॥ करावें तत्वविवरण । शोधावें ब्रह्म निर्गुण । पाहावें आपणास आपण । म्हणजे कळे ॥३३॥ हें न बोलतांचि विवरिजे । विवरोन विवरोन राहिजे । मग अबोलणेंचि साजे । महापुरुषीं ॥ ३४ ॥ शब्दचि निःशब्द होती । श्रुति नेति नेति[1] म्हणती । हें तों आलें आत्मप्रचीती । प्रत्यक्ष आतां ॥ ३५ ॥ प्रचीत आणि अनुमान । हा तों प्रत्यक्ष दुरभिमान । तरी आतां मी अज्ञान । मज कांहींच न कळे ॥ ३६ ॥ मी लटिका माझें बोलणें लटिकें । मी लटिका माझें चालणें लटिकें । मी माझें अवघेंचि लटिकें । काल्पनिक ॥ ३७ ॥ मज मुळींच नाहीं ठाव । माझें बोलणें अवघेंचि वाव । हा प्रकृतीचा स्वभाव । प्रकृति लटिकी ॥३८॥ प्रकृति आणि पुरुष । या दोहींस जेथें निरास । तेथें मीपण विशेष । हें केवीं घडे ॥ ३९ ॥ जेथें सर्वहि अशेष[2] झालें । तेथें विशेष कैचें आलें । मी मौनी म्हणतां भंगलें । मौन जैसें ॥ ४० ॥ आतां मौन न भंगावें । करून कांहींच न करावें । असोन निःशेष नसावें । विवेकबळें ॥ ४१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नवमदशके ब्रह्मनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. निःसंदेह.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रोतीं केलें अनुमान । ऐसें कैसें ब्रम्हज्ञान । कांहींच नाहीं असोन । हें केवीं घडे ॥ १ ॥ सकळ करूनि अकर्ता । सकळ भोगून अभोक्ता । सकळांमध्यें अलिप्तता । येईल कैंची ॥ २ ॥ तथापि तुम्ही म्हणतां । योगी भोगून अभोक्ता । तरी स्वर्ग नरकही आतां । येणेंचि न्यायें ॥ ३ ॥ जन्ममृत्यु भोगिलेच भोगी । परी तो भोगून अभोक्ता योगी । पातक नाहीं तयालागीं । येणेंचि पाडें[3] ॥ ४ ॥ कुटून नाहीं कुटिला । रडोन नाहीं रडला । कुंथोन नाहीं कुंथिला । योगीश्वर ॥ ५ ॥ जन्म नसोन घातला । पतित नसोन झाला । यातना नसोन पावला । नानापरी ॥ ६ ॥

---

१. हें ब्रह्म नव्हे, तें ब्रह्म नव्हे, इत्यादि. २. शून्य. ३. तुलनेनें.

ऐसें श्रोतयांचें अनुमान । श्रोतीं घेतलें आडरान । आतां याचें समाधान । केलें पाहिजे ॥ ७ ॥ वक्ता म्हणे सावध व्हावें । तुम्ही बोलतां बरवें । परी हें तुमच्या अनुभवें । तुह्मांस घडे ॥ ८ ॥ ज्याचा अनुभव जैसा । तो तो बोलतो तैसा । संपदेविण[1] जो धिंवसा[2] । तो निरर्थक ॥ ९ ॥ नाहीं ज्ञानाची संपदा । अज्ञानदरिद्रें आपदा । भोगिल्याच भोगी सदा । शब्दज्ञानें ॥ १० ॥ ज्ञानी ओळखावा ज्ञानेश्वरें । योगी ओळखावा योगीश्वरें । महा चतुर तो चतुरें । वोळखावा ॥ ११ ॥ अनुभवी अनुभवियासि कळे । अलिप्त अलिप्तपणें निवळे । विदेहाचा देहभाव गळे । विदेही देखतां ॥ १२ ॥ बद्धासारिखा सिद्ध । आणि सिद्धासारिखा बद्ध । एक भावील तो अबद्ध । म्हणावा नलगे ॥ १३ ॥ झडपला तो देहधारी । आणि देहधारक पंचाक्षरी । परंतु दोघां एक सरी[3] । कैसी द्यावी ॥ १४ ॥ तैसा अज्ञान पतित । आणि ज्ञानी जीवन्मुक्त । दोघां समान मानी तो युक्त । कैसा म्हणावा ॥ १५ ॥ आतां असो हे दृष्टांत । प्रचीत बोलों कांहीं हेत । येथें श्रोतीं सावचित्त । क्षणएक व्हावें ॥ १६ ॥ जो ज्ञानें मुक्त झाला । जो विवेकें विराला । जो अनन्यपणें उरला । नाहींच कांहीं ॥ १७ ॥ तयास कैसें गवसावें । शोधूं जातां तोचि व्हावें । तोचि होतां म्हणावें । नलगे कांहीं ॥ १८ ॥ देहीं पाहतां दिसेना । तत्त्वें शोधितां भासेना । ब्रह्म आहे निवडेना । कांहीं केल्या ॥ १९ ॥ दिसतो तरी देहधारी । परी कांहींच नाहीं अंतरीं । तयास पाहतां वारिवरी । कळेल कैसा ॥ २० ॥ कळाया शोधावें अंतर । तंव तो नित्य निरंतर । जयास धुंडितां विकार । निर्विकार होती ॥ २१ ॥ तो परमात्मा केवळ । तयास नाहीं मायाजाळ । अखंड हेतूचा विटाळ । झालाच नाहीं ॥ २२ ॥ ऐसा जो कां योगिराज । तो आत्मा सहजीं सहज । पूर्णब्रह्म वेदबीज । देहाकारें कळेना ॥ २३ ॥ देहें भावितां[4] देहचि दिसे । अंतर अनारिसें[5] असे । तयास शोधितां नसे । जन्ममरण ॥ २४ ॥ जयास जन्ममरण व्हावें । तें तो नव्हेचि स्वभावें । नाहींच तें आणावें । कोठून कैंचें ॥ २५ ॥ निर्गुणास जन्म कल्पिला । अथवा निर्गुण उडाविला । तरी उडाला आणि जन्मला । आपला आपण ॥ २६ ॥ माध्यान्हीं थुंकितां सूर्यावरी । तो थुंका पडे आप-

---

१. सामर्थ्यावांचून. २. धैर्य. ३. योग्यता. ४. कल्पना केली असतां. ५. वेगळें.

णावरी । दुस-यास चिंतित ।  अंतरीं । आपणास घडे ॥ २७ ॥ समर्थ रायाचें महिमान । जाणतां होतें समाधान । परंतु भुंकों लागलें श्वान । तरी तें श्वानचि असे ॥ २८ ॥ ज्ञानी तो [1]सत्यस्वरूप । अज्ञान देखे मनुष्यरूप । भावासारिखा फळद्रूप । देव तैसा ॥ २९ ॥ देव निराकार निर्गुण । लोक [2]भाविती पाषाण । पाषाण फुटतो निर्गुण । फुटेल कैंचा ॥ ३० ॥ देव सदोदित संचला । लोकीं बहुविध केला । परंतु बहुविध झाला । हें तों घडेना ॥ ३१ ॥ तैसा साधु आत्मज्ञानी । बोधें पूर्ण समाधानीं । विवेकें आत्मनिवेदनीं । आत्मरूपी ॥ ३२ ॥ जळोन काष्ठाचा आकार । अग्नि दिसे काष्ठाकार । परी काष्ठ होईल हा विचार । बोलोंचि नये ॥ ३३ ॥ कर्पूर असे तो जळतां दिसे । तैसा ज्ञानी देहीं भासे । तयासि जन्मवितां कैसे । कर्दळीउदरीं ॥ ३४ ॥ बीज भाजलें उगवेना । वस्त्र जळालें उकलेना । बोध निवडितां निवडेना । गंगेमध्यें ॥ ३५ ॥ बोध गंगेमागें दिसे । गंगा एकदेशी असे । साधु कांहींच न भासे । आत्मा सर्वगत ॥ ३६ ॥ सुवर्ण नव्हे लोखंड । साधूस जन्म थोतांड । अज्ञान प्राणी जड मूढ । तयांसि हें उमजेना ॥ ३७ ॥ अंधास कांहींच न दिसे । तरी ते लोक आंधळे कैसे । सन्निपातें बरळतसे । सन्निपाती ॥ ३८ ॥ जो स्वप्नामध्यें भ्याला । तो स्वप्नभयें [3]वोसणला । तें भय जागत्याला । केवीं लागे ॥ ३९ ॥ मुळीं सर्पाकार देखिली । एक भ्याला एकें वोळखिली । दोघांची अवस्था लेखिली । सारिखीच कैसी ॥ ४० ॥ हातीं धरितां डसेना । हें एकास भासेना । तरी ते त्याची कल्पना । तयासीच बाधी ॥ ४१ ॥ विंचू सर्प डसला । तेणें तोचि जाकळला । तयाचेनि लोक झाला । कासावीस कैसा ॥ ४२ ॥ आतां तुटलें अनुमान । ज्ञानियास कळे ज्ञान । अज्ञान्यास जन्ममरण । चुकेना कीं ॥ ४३ ॥ एका जाणण्यासाठीं । लोक पडिले [4]आटाआटीं । नेणतपणें [5]हिंपुटी । होती जन्ममृत्यू ॥ ४४ ॥ तेंचि कथानुसंधान । पुढें केलें परीच्छिन्न । सावधान सावधान । म्हणे वक्ता ॥ ४५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नवमदशके निःसंदेहनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

१. ब्रह्मस्वरूप. २. मानतात. ३. घाबरला. ४. खटपटींत. ५. कष्टी.

## ४. जाणपण.

श्रीगणेशाय नमः ॥ पृथ्वीमध्यें लोक सकळ । एक संपन्न एक दुर्बळ । एक निर्मळ एक वोंगळ । काय निमित्तें ॥ १ ॥ कित्येक राजे नांदती । कित्येक दरिद्र भोगिती । कित्येकांची उत्तम स्थिती । कित्येक अधमाधम ॥ २ ॥ ऐसें काय निमित्त झालें । हें मज पाहिजे निरूपिलें । याचें उत्तर ऐकिलें । पाहिजे श्रोतीं ॥ ३ ॥ हे सकळ गुणापासी गती । स[1]गुण भाग्यश्री भोगिती । अवगुणास दरिद्रप्राप्ती । यदर्थीं संदेह नाहीं ॥ ४ ॥ जो जेथें उपजला । तो तेथें व्यवसायीं उमजला । तयास लोक म्हणती भला । कार्यकर्ता ॥ ५ ॥ जाणता तो कार्य करी । नेणता कांहींच न करी । जाणता तो पोट भरी । नेणता भीक मागे ॥ ६ ॥ हें तों प्रगटचि असे । जनीं पाहतां प्रत्यक्ष दिसे । विद्येविण करंटा वसे । विद्या तो भाग्यवंत ॥ ७ ॥ आपुली विद्या न शिकसी । तरी काय भीक मागसी । जेथें जेथें बुद्धि ऐसी । वडिलें सांगती ॥ ८ ॥ वडील आहे करंटा । आणि समर्थ होय धाकुटा । कां जो विद्येनें मोठा । म्हणोनियां ॥ ९ ॥ विद्या नाहीं बुद्धि नाहीं । विवेक नाहीं सांक्षेप नाहीं । कुशळता नाहीं व्याप[2] नाहीं । म्हणोन प्राणी करंटा ॥ १० ॥ इतुकेंहि जेथें वसे । तेथें वैभवास उणें नसे । वैभव सोडितां आपैसें । पाठी लागे ॥ ११ ॥ वडील समर्थ धाकुटा भिकारी । ऐकायाची कैसी परी । वडिलांऐसा व्याप न करी । म्हणोनियां ॥ १२ ॥ जैशी विद्या तैसी हांव । जैसा व्याप तैसें वैभव । तोलासारिखा हावभाव । लोक करिती ॥ १३ ॥ विद्या नसे वैभव नसे । तेथें निर्मळ कैंचा असे । करंटपणें वोखटा दिसे । वोंगळ आणि विकारी ॥ १४ ॥ पशु पक्षी गुणवंत । त्यांस ग्रहण करिती समर्थ । गुण नसतां जिणें व्यर्थ । प्राणिमात्रांचें ॥ १५ ॥ गुण नाहीं गौ[3]रव नाहीं । सामर्थ्य नाहीं महत्व नाहीं । कुशलता नाहीं तर्क नाहीं । प्राणिमात्रांसी ॥ १६ ॥ या कारणें उत्तम गुण । तेंचि भाग्याचें लक्षण । लक्षणेंविण अवलक्षण । सहजचि झालें ॥ १७ ॥ जनामध्यें जो जाणता । त्यास आहे मान्यता । कोणी एक विद्या असतां । महत्व पावे ॥ १८ ॥ प्रपंच अथवा परमार्थ । जाणता तोचि

१. गुणी पुरुष. २. उद्योग. ३. प्रतिष्ठा.

समर्थ । नेणता जाणिजे व्यर्थ । निष्कारण ॥१९॥ नेणतां विंचू सर्प डसे । नेणतां जीवघात असे । नेणतां कार्य नासे । कांहींएक ॥ २० ॥ नेणतां प्राणी सिंतरे[1] । नेणतपणें तऱ्हे भरे । नेणतपणें ठके विसरे । पदार्थ कांहीं ॥ २१ ॥ नेणतां वैरी जिंकिती । नेणतां अपायीं पडती । नेणतां संहारिती घडती । जीवनाश ॥ २२ ॥ आपुलें स्वहित न कळे जनां । तेणें भोगिती यातना । ज्ञान नेणतां अज्ञाना । अधोगती ॥२३॥ माया ब्रह्म जीव शिव । सारासार भावाभाव[2] । जाणिल्यासाठीं होतें वाव । जन्ममरण ॥ २४ ॥ कोण कर्ता निश्चयेंसी । बद्ध मोक्ष तो कोणासी । ऐसें जाणतां प्राणियासी । सुटका घडे ॥२५॥ जाणिजे देव निर्गुण । जाणिजे मी तो कोण । जाणिजे अनन्यलक्षण[3] । म्हणिजे मुक्त ॥२६॥ जितुकें जाणोन सांडिलें । तितुकें दृश्य वोलांडिलें । जाणत्यास जाणतां तुटलें । मूळ मीपणाचें ॥२७॥ न जाणतां कोटिवरी । साधनें केलीं परोपरी । तरी मोक्षास अधिकारी । होणार नाहीं ॥ २८ ॥ माया ब्रह्म वोळखावें । आपणास आपण जाणावें । इतुक्यासाठीं स्वभावें । चुके जन्म ॥ २९ ॥ जाणतां समर्थाचें अंतर । प्रसंगें वर्ते तदनुसार । भाग्यवैभव अपार । तेणेंचि पावे ॥ ३० ॥ म्हणोन जाणणें नव्हे सामान्य । जाणतां होइजे सर्वमान्य । कांहींच नेणे तो अमान्य । सर्वत्र करिती ॥ ३१ ॥ पदार्थ देखोन भूतें भावी । नेणतां झडपोन[4] प्राण ठेवी । मिथ्या आहे उठाठेवी । जाणते जाणती ॥ ३२ ॥ जाणत्यास कळे वर्म । नेणत्याचें खोटें कर्म । सकळ कांहीं धर्माधर्म । जाणतां कळे ॥३३॥ नेणे त्यास यमयातना । जाणत्यास कांहींच लागेना । सकळ जाणोन विवेचना । करी तो मुक्त ॥ ३४ ॥ नेणतां कांहीं राजकारण । अपमान करून घेती प्राण । नेणतां कठिण वर्तमान । समस्तांस होय ॥ ३५ ॥ म्हणोनियां नेणणें खोटें । नेणते प्राणी ते करंटे । जाणतां विवरतां तुटे । जन्ममरण ॥३६॥ म्हणोन अलक्ष करूं नये । जाणणें हाचि उपाय । जाणतां सांपडे सोय । परलोकाची ॥ ३७ ॥ जाणणें सकळांस प्रमाण । मूर्खास वाटे अप्रमाण । परंतु अलिप्तपणाची खूण । जाणतां कळे ॥ ३८ ॥ एक जाणणें करून परतें । कोण सोडवील प्राणियातें । कोणी एक कार्य जें तें । जाणिल्याविण न

१. फसतो. २. असणें-नसणें. ३. एकनिष्ठेचें स्वरूप. ४. पिशाच्च समजतो.

कळे ॥ ३९ ॥ जाणणें म्हणिजे स्मरण । नेणणें म्हणिजे विस्मरण । दोहीं-मध्यें कोण प्रमाण । शाहणे जाणती ॥ ४० ॥ जाणते लोक शाहाणे । नेणते वेडे दैन्यवाणे । विज्ञान तेंहि जाणतपणें । कळों आलें ॥ ४१ ॥ जेथें जाणतेपण खुंटलें । तेथें बोलणेंहि तुटलें । हेतुरहित जाहलें । समाधान ॥ ४२ ॥ श्रोते म्हणती हें प्रमाण । झालें परम समाधान । परी पिंडब्रह्मांड-ऐक्यलक्षण । आम्हां निरूपावें ॥ ४३ ॥ ब्रह्मांडीं तेंचि पिंडीं असे । बहुत बोलती ऐसें । परंतु याचा प्रत्यय विलसे । ऐसें केलें पाहिजे ॥ ४४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नवमदशके जाणपणनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. अनुमाननिरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ पिंडासारिखी ब्रह्मांडरचना । न ये आमुच्या अनुमाना । प्रचीत[१] पाहतां नाना । मतें भांबावती ॥ १ ॥ जें पिंडीं तेंचि ब्रह्मांडीं । ऐसी बोलावयाची प्रौढी । हें वचन घडीनें घडी । तत्वज्ञ बोलती ॥ २ ॥ पिंडब्रह्मांड एक राहाटी । ऐसी लोकांची धाटी । परी प्रत्ययाचे पारिपोटीं[२] । तगों न शके ॥ ३ ॥ स्थूल सूक्ष्म कारण महाकारण । हे पिंडींचे चार देह जाण । विराट हिरण्यगर्भ अव्याकृत मूळप्रकृति हे खूणें[३] । ब्रम्हांडाची ॥ ४ ॥ हे शास्त्रधाटी जाणावी । परी प्रचीती कैसी आणावी । प्रचीत पाहतां गाथागोवी । होत आहे ॥ ५ ॥ पिंडीं आहे अंतःकरण । तरी ब्रम्हांडीं विष्णु जाण । पिंडीं बोलिजेतें मन । ब्रम्हांडीं चंद्रमा ॥ ६ ॥ पिंडीं बुद्धि ऐसें बोलिजे । तरी ब्रम्हांडीं ब्रम्हा ऐसें जाणिजे । पिंडीं चित्त ब्रम्हांडीं वोळखिजे । नारायण ॥ ७ ॥ पिंडीं बोलिजे अहंकार । ब्रह्मांडीं रुद्र हा निर्धार । ऐसा बोलिला विचार । शास्त्रांतरीं ॥ ८ ॥ तरी कोण विष्णूचें अंतःकरण । चंद्राचें कैसें मन । ब्रह्माचें बुद्धिलक्षण । मज निरूपावें ॥ ९ ॥ नारायणाचें कैसें चित्त । रुद्र अहंकाराचा हेत । हा विचार पाहोन नेमस्त । मज निरूपावें ॥ १० ॥ प्रचीत निश्चयापुढें अनुमान । जैसें सिंहापुढें आलें श्वान । खऱ्यापुढें खोटें प्रमाण । होईल कैसें ॥ ११ ॥ परी यासि पारखी पाहिजे । पारखीनें निश्चय लाहिजे । परीक्षा नसतां

---

१. साक्षात्कार. २. मार्गामध्यें. ३. नांवें; चार देहांचीं चार.

राहिजे । अनुमानसंशयीं ॥ १२ ॥ विष्णु चंद्रमा आणि ब्रह्मा । नारायण आणि रुद्रनामा । या पांचांचीं अंतःकरणपंचकें आम्हां । स्वामी निरूपावीं ॥१३॥ येथें प्रचीत आहे प्रमाण । नलगे शास्त्राचें अनुमान । अथवा शास्त्रीं तरी पाहोन । प्रत्यय जाणावा ॥१४॥ प्रचीतीविण जें बोलणें । तें अवघेंच कंटाळवाणें । तोंड पसरोन जैसें सुणें[१] । रडोन गेलें ॥१५॥ तेथें काय हो ऐकावें । आणि काय शोधूनि पाहावें । जेथें प्रत्ययाच्या नांवें । शून्याकार ॥ १६ ॥ अवघे आंधळेचि मिळाले । तेथें डोळसांचें काय चाले । अनुभवाचे नेत्र गेले । तेथें अंधकार ॥१७॥ नाहीं दूध नाहीं पाणी । केली विष्ठेची सारणी[२] । तेथें निवडायाचे धनी । ते एक डोंबकावळे ॥ १८ ॥ आपुले इच्छेनें बोलिलें । पिंडाऐसें ब्रम्हांड कल्पिलें । तरी तें प्रचीतीस आलें । कोण्या प्रकारें ॥ १९ ॥ म्हणोन हें अवघेंच अनुमान । अवघें कल्पनेचें रान । भल्यानीं न घ्यावें आडरान । तस्करीं[३] घ्यावें ॥ २० ॥ कल्पून निर्मिले मंत्र । देव ते कल्पनामात्र । देव नाहीं स्वतंत्र । मंत्राधीन ॥ २१ ॥ येथें न बोलतांच जाणावें । बोलणें विवेका आणावें । आंधळें पाउलीं ओळखावें । विचक्षणें[४] ॥ २२ ॥ जयास जैसें भासलें । तेणें तैसें कवित्व केलें । परी हें पाहिजे निवडिलें । प्रचीतीनें ॥ २३ ॥ ब्रम्हयानें सकळ निर्मिलें । ब्रम्हयास कोणें निर्माण केलें । विष्णूनें विश्व पाळिलें । विष्णूस पाळिता कोण ॥ २४ ॥ रुद्र विश्वसंहारकर्ता । परी त्या रुद्रास कोण संहारिता । कोण काळाचा नियंता । कळला पाहिजे ॥ २५ ॥ याचा कळेना विचार । तो अवघा अंधकार । म्हणोनियां सारासार । विचार करणें ॥ २६ ॥ ब्रम्हांड स्वभावेंचि झालें । परंतु हें पिंडाकार कल्पिलें । कल्पिलें परी प्रत्यया आलें । नाहीं कदा ॥२७॥ पाहतां ब्रम्हांडाची प्रचीती । कित्येक संशय उठती । हें काल्पनिक श्रोतीं । नेमस्त जाणावें ॥ २८ ॥ पिंडासारिखी ब्रम्हांडरचना । कोण आणितो अनुमाना । ब्रह्मांडीं पदार्थ नाना । ते पिंडीं कैचे ॥ २९ ॥ औट[५] कोटी भूतावळी । औटकोटी तीर्थावळी । औटकोटी मंत्रावळी । पिंडीं कोठें ॥ ३० ॥ तेहतीस कोटी सुरवर । अठ्यायशीं सहस्र ऋषीश्वर । नवकोटी कात्यायनीचा विचार । पिंडीं कोठें ॥ ३१ ॥ चामुंडा छपन्नकोटी । कित्येक जीव कोट्यानकोटी ।

---

१. कुत्रें. २. चिखल. ३. चोरांनीं. ४. शहाण्यानें. ५. साडेतीन.

चौऱ्यायशीं लक्ष योनींची दाटी। पिंडीं कोठें ॥ ३२ ॥ ब्रह्मांडीं पदार्थ निर्माण झाले। पृथगाकारें वेगळाले। तेहि तितुके निरूपिले। पाहिजेत पिंडीं ॥ ३३ ॥ जितुक्या औषधी तितुकीं फळें। नानाप्रकारचीं रसाळें। नाना बीजें धान्यें सकळें। पिंडीं निरूपावीं ॥ ३४ ॥ हें सांगतां पुरवेना। तरी उगेंच बोलवेना। बोलिलें न येतां अनुमाना। लाजिरवाणें ॥ ३५ ॥ तरी हें निरूपिलें न वचे। फुकट बोलतां काय वेंचे। या कारणें अनुमानाचें। कार्य नाहीं ॥ ३६ ॥ पांच भूतें तीं ब्रह्मांडीं। आणि पांचचि वर्तती पिंडीं। यांची पाहावी रोकडी। प्रचीत आतां ॥ ३७ ॥ पांचां भूतांचें ब्रह्मांड। आणि पांचभौतिक हें पिंड। या वेगळें तें उदंड। अनुमानज्ञान ॥ ३८ ॥ जितुकें अनुमानाचें बोलणें। तितुकें वमनप्राय[1] त्यागणें। निश्चयात्मक तेंचि बोलणें। प्रत्ययाचें ॥ ३९ ॥ जें पिंडीं तेंचि ब्रह्मांडीं। प्रचीत नाहीं कीं रोकडी। पंचभूतांची तांतडी[2]। दोहींकडे ॥ ४० ॥ म्हणोनि दोहींचें स्थानमान। हें तों अवघेंचि अनुमान। आतां एक समाधान। मुख्य तें कैसें ॥ ४१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नवमदशके अनुमाननिरसननिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. गुणरूप.

श्रीगणेशाय नमः ॥ आकाश जैसें निराकार। तैसा ब्रह्माचा विचार। तेथें वायूचा विकार। तैसी मूळमाया ॥ १ ॥ हें दासबोधीं असे बोलिलें। ज्ञानदशकीं प्रांजळ केलें। मूळमायेतें[3] दाखविलें। पांचभौतिक ॥ २ ॥ तेथें जाणीव तो सत्वगुण। मध्य तो रजोगुण। नेणीव तो तमोगुण। जाणिजे श्रोतीं ॥ ३ ॥ म्हणाल तेथें कैंची जाणीव। तरी ऐका याचा अभिप्राय। पिंडीं महाकारण देहीं सर्व-। साक्षिणी अवस्था ॥ ४ ॥ तैसी मूळप्रकृति ब्रह्मांडींचें। देह महाकारण साचें। म्हणोनि तेथें जाणीवेचें। अधिष्ठान आलें ॥ ५ ॥ असो मूळमायेभीतरीं। गुप्त त्रिगुण वास करी। स्पष्ट होती[4] संधी चतुरीं। जाणावी गुणक्षोभिणी ॥ ६ ॥ जैसा तृणाचा पोटरा कळा।

---

१. वमनाप्रमाणें. २. विस्तार. ३. मूळमायाच पांचभौतिक आहे असें दाखविलें. ४. तीन गुण स्पष्ट होण्याची जी संधि तीच गुणक्षोभिणी माया.

पुढें उकलोन होय मोकळा । तैसी मूळमाया अवलीळा[1] । गुणा प्रसवली ॥ ७ ॥ मूळमाया वायुस्वरूप । ऐका गुणक्षोभिणीचें रूप । गुणविकार होतां अल्प । गुणक्षोभिणी बोलिजे ॥ ८ ॥ पुढें जाणीव मध्यस्थ नेणीव । मिश्रित चालिला स्वभाव । तेथें मातृकांस[2] ठाव । शब्द जाहला ॥ ९ ॥ तो शब्द-गुण आकाशींचा । ऐसा अभिप्राय येथींचा । शब्देंचि वेदशास्त्रांचा । आकार झाला ॥ १० ॥ पंचभूतें त्रिगुणाकार । अवघा वायूचा विकार । जाणीवनेणीवेचा विचार । वायूचकरितां ॥ ११ ॥ वायु नसतां कैंची जाणीव । जाणीव नसतां कैंची नेणीव । जाणीवनेणीवेसि ठाव । वायुगुणें ॥ १२ ॥ जेथें मुळींच नाहीं चळण । तेथें कैंचें जाणीवलक्षण । म्हणोन वायूचा गुण । नेमस्त जाणावा ॥ १३ ॥ एकापासून एक झालें । हें एक उगेंच दिसोन आलें । स्वरूप मुळींच भासलें । त्रिगुण भूतांचें ॥ १४ ॥ ऐसा हा मुळींचा कर्दम[3] । पुढें स्पष्टतेचा अनुक्रम । सांगतां एकापासून एक उगम । हेंहि खरें ॥ १५ ॥ वायूचा कर्दम बोलिला । तयापासून अग्नि झाला । तोहि पाहतां देखिला । कर्दमचि ॥ १६ ॥ अग्नीपासून झालें आप । तेंचि कर्दमस्वरूप । आपापासून पृथ्वीचें रूप । तेंहि कर्दमरूपी ॥ १७ ॥ येथें आशंका उठली । भूतांतें जाणीव कोठें देखिली । तरी भूतांत जाणीव ऐकिली । नाहीं वार्ता ॥ १८ ॥ जाणीव म्हणजे जाणतें चळण । तेचि वायूचें लक्षण । वायुअंगीं सकळ गुण । मागां निरूपिले ॥ १९ ॥ म्हणोन जाणीव नेणीव मिश्रित । अवघें चालिलें पंचभूत । म्हणोनिया भूतांत । जाणीव असे ॥ २० ॥ कोठें दिसे कोठें न दिसे । परी ते भूतीं व्यापून असे । तीक्ष्णबुद्धि करितां भासे । स्थूल सूक्ष्म ॥ २१ ॥ पंचभूतें आकारलीं । भूतीं भूतें कालवलीं । परी पाहतां भासलीं । एक स्थूळ एक सूक्ष्म ॥ २२ ॥ निरोधें वायु न भासे । तैसी जाणीव न दिसे । न दिसे परी ते असे । भूतरूपें ॥ २३ ॥ काष्ठीं अग्नि दिसेना । निरोधीं वायु भासेना । जाणीव तैसी लक्षेना । एकाएकीं ॥ २४ ॥ भूतें वेगळालीं दिसती । पाहतां एकचि भासती । बहुत धूर्तपणें प्रचीती । वोळखावी ॥ २५ ॥ ब्रह्मापासून मूळमाया । मूळमायेपासून गुणमाया । गुणमायेपासून तयां । गुणांस जन्म ॥ २६ ॥ गुणापासूनियां भूतें । पावलीं स्पष्टदेशेतें[5] । ऐसीं यांचीं रूपें

---

१. अकस्मात. २. अक्षरांस. ३. मिश्रण. ४. पंचभूतांत. ५. आकारास.

समस्तें । निरूपिलीं ॥ २७ ॥ आकाश गुणापासून जाहलें । हें कदापि नाहीं घडलें । शब्दगुणास कल्पिलें । आकाश वायां ॥ २८ ॥ एक सांगतां एकचि भावी । उगीच करी गाथागोवी । तया वेड्याची उगवी[1] । कोणें करावी ॥ २९ ॥ शिकविल्याहि कळेना । उमजविल्याहि उमजेना । दृष्टांतेंहि तर्केना । मंदरूप ॥ ३० ॥ भूतांहून भूत थोर । हाहि दाखविला विचार । परी भूतां वडील स्वतंत्र । कोण आहे ॥ ३१ ॥ जेथें मूळमाया पांचभौतिक । तेथें काय राहिला विवेक । मूळमायेपरतें एक । निर्गुण ब्रह्म ॥ ३२ ॥ ब्रह्मीं मूळमाया झाली । तिची लीला परीक्षिली । तंव ते निखळ वोतिली । भूतें त्रिगुणांचीं ॥ ३३ ॥ भूतें विकारवंत चार । आकाश पाहतां निर्विकार । आकाश भूत हा विचार । उपाधीकरितां ॥ ३४ ॥ पिंडीं व्यापक म्हणोन जीव । ब्रह्मांडीं व्यापक म्हणोन शिव । तैसाचि हाहि अभिप्राव । आकाशाचा ॥ ३५ ॥ उपाधीमध्यें सांपडलें । सूक्ष्म पाहतां भासलें । इतुक्यासाठीं आकाश झालें । भूतरूप ॥ ३६ ॥ आकाश अवकाश तो भकास । परंतु ब्रह्म तें निराभास । उपाधि नसतां जें आकाश । तेंचि ब्रह्म ॥ ३७ ॥ जाणीव नेणीव मध्यमान । हेंचि गुणांचें प्रमाण । येथें निरूपिले त्रिगुण । रूपेंसहित ॥ ३८ ॥ प्रकृति पावली विस्तारातें । पुढें एकाचें एकचि होतें । विकारवंताचि तयातें । नेम कैंचा ॥ ३९ ॥ काळें पांढरें मेळवितां । पारवें होतें तत्वतां । काळें पिवळें मेळवितां । हिरवें होय ॥ ४० ॥ ऐसे रंग नानापरी । मेळवितां पालट धरी । तैसें दृश्य हें विकारी । विकारवंत ॥ ४१ ॥ एका जीवनें[2] नाना रंग । उमटों लागती तरंग । पालटाचा लागवेग[3] । किती म्हणोन पाहावा ॥ ४२ ॥ एका उदकाचे विकार । पाहतां दिसती अपार । पंचभूतांचा विस्तार । चौऱ्यायशीं लक्ष योनी ॥ ४३ ॥ नाना देहांचें बीज उदक । उदकापासून सकळ लोक । किडा मुंगी श्वापदादिक । उदकेंचि होय ॥ ४४ ॥ शुक्र[4] शोणित[5] म्हणिजे नीर[6] । त्या नीराचें हें शरीर । नखें दंत अस्थिमात्रं[7] । उदकाच्या होती ॥ ४५ ॥ मुळाचे बारीक पागोरे । तेणें पंथें उदक भरे । त्या उदकेंचि विस्तारे । वृक्षमात्र ॥ ४६ ॥ आम्रवृक्ष मोहरा आले । अवघे उदकाकरितां झाले । फळीं फुलीं लगडले । सावकाश

१. उलगडा. २. उदकानें. ३. प्रकार. ४. रेत. ५. रक्त. ६. पाणी. ७. हाडें.

॥ ४७ ॥ खोड फोडून आंबे पाहतां । तेथें दिसेना सर्वथा । खांद्यांचे ढपळे काढितां । चोली साल ॥४८॥ मुळापासून शेवटवरी । फळ नाहीं तदंतरीं । जळरूप फळ चतुरीं । विवेकें जाणावें ॥ ४९ ॥ तेंचि जळ सेंड्यासि चढे । तेव्हां वृक्षमात्र लिगडे । एकाचें एकाचि घडे । येणें प्रकारें ॥ ५० ॥ पत्रें पुष्पें फळें भेद । किती करावा अनुवाद । सूक्ष्म दृष्टीनें विशद । होत आहे ॥ ५१ ॥ भूतांचे विकार सांगूं किती । क्षणक्षणा पालटती । एकाचे एकचि होती । नाना वर्ण ॥ ५२ ॥ त्रिगुणभूतांची लटपट । पाहों जातां हे खटपट । बहु रूप बहु पालट । किती म्हणोन सांगावा ॥ ५३ ॥ ये प्रकृतीचा निरा-सें[1] । विवेकें करावा सावकाश । मग परमात्मा परेश । अनन्यभावें भजावा ॥ ५४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नवमदशके गुणरूपनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. विकल्पनिरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ आधीं स्थूळ आहे एक । तरी मग अंतःकरणपंचक । जाणतेपणाचा विवेक । स्थूळाकारितां ॥ १ ॥ तैसी ब्रम्हांडेंविण कांहीं । मूळमायेसि जाणीव नाहीं । तया स्थूळाच्या आधारें सर्वही । कार्य चाले ॥ २ ॥ तें स्थूळचि नसतां निर्माण । कोठें राहील अंतःकरण । ऐसा श्रोतीं केला प्रश्न । याचें प्रत्युत्तर आइका ॥ ३ ॥ कोसलें[2] अथवा कांटेघरें । नाना पृष्ठभागीं चालतीं घरें । जीव करिती लहान थोरें । शक्त्यनुसार ॥ ४ ॥ शंख शिंपी घुला कवडे । आधीं त्यांचें घर घडे । किंवा आधीं निर्माण किडे । हें विचारावें ॥ ५ ॥ आधीं प्राणी ते होती । मग घरें निर्माण करि-तीं । हे तों प्रत्यक्ष प्रचीती । सांगणें नलगे ॥६॥ तैसें आधीं सूक्ष्म जाण । मग स्थूळ होतें निर्माण । येणें दृष्टांतें प्रश्न । फिटला श्रोतयांचा ॥ ७ ॥ तंव श्रोता पुसे आणिक । जी आठवलें कांहींएक । जन्ममृत्यूचा विवेक । मज निरूपावा ॥ ८ ॥ कोण जन्मास घालितें । आणि मागुतें कोण जन्म घेतें । हें प्रत्यया कैसें येतें । कोण्या प्रकारें ॥ ९ ॥ ब्रम्हा जन्मास घालितो । विष्णु प्रतिपाळ करितो । रुद्र अवघें संहारितो । एसें बोलती ॥ १० ॥ तरी

---

१. निवारण. २. एक किडा आपल्या सभोंवतीं पिशवीसारखें घर करतो तें.

हें प्रवृत्तीचें बोलणें । प्रत्ययास आणी उणें । प्रत्यय पाहतां श्लाघ्यवाणें । होणार नाहीं ॥ ११ ॥ ब्रम्ह्यास कोणें जन्मास घातलें । विष्णूस कोणें प्रतिपाळिलें । रुद्रास कोणें संहारिलें । महाप्रळयीं ॥१२॥ ह्मणोनि हा सृष्टिभाव । अवघा मायेचा स्वभाव । कर्ता म्हणों निर्गुण देव । तरी तो निर्विकारी ॥ १३ ॥ म्हणावें माया जन्मास घाली । तरी हे आपणचि विस्तारली । आणि विचारितां थारेली । हेंहि घडेना ॥ १४ ॥ आतां जन्मतो कोण । कैसी त्याची वोळखण । आणि संचिताचें लक्षण । तेंहि निरूपावें ॥ १५ ॥ पुण्याचें कैसें रूप । आणि पापाचें कैसें स्वरूप । याहि शब्दाचा आक्षेप । कोण कर्ता ॥ १६ ॥ हें कांहींच न ये अनुमाना । म्हणती जन्म घेते वासना । तरी ते पाहतां दिसेना । ना धरितां न ये ॥१७॥ वासना कामना आणि कल्पना । हेतु भावना मति नाना । ऐशा अनंत वृत्ति जाणा । अंतःकरणपंचकाच्या ॥ १८ ॥ असो हें अवघें जाणीवयंत्र । जाणीव म्हणजे स्मरणमात्र । त्या स्मरणास जन्मसूत्र । कैसें लागे ॥ १९ ॥ देह निर्माण पांचभूतांचा । वायु चाळक तयाचा। जाणणें हा मनाचा । मनोभाव ॥२०॥ ऐसें हें सहजचि घडलें । तत्वाचें गुंथाडें झालें । कोणास कोणें जन्मविलें । कोण्या प्रकारें ॥ २१ ॥ तरी हें पाहतां दिसेना । म्हणोनि जन्मचि असेना । उपजला प्राणी येईना । मागुती जन्मा ॥ २२ ॥ कोणासीच जन्म नाहीं । तरी संतसंगें केलें कायी । ऐसा अभिप्राय सर्वही । श्रोतयांचा ॥ २३ ॥ पूर्वी स्मरण ना विस्मरण । मध्येंचि हें झालें स्मरण । अंतर्यामी अंतःकरण । जाणती कळा ॥ २४ ॥ सावधान आहे तों स्मरण । विकळ होतां विस्मरण । विस्मरण पडतां मरण । पावती प्राणी ॥ २५ ॥ स्मरण विस्मरण राहिलें । मग देहास मरण आलें । पुढें जन्मास घातलें । कोणास कोणें ॥ २६ ॥ म्हणोनि जन्मचि असेना । आणि यातनाहि दिसेना । अवघी व्यर्थचि कल्पना । बळावली ॥ २७ ॥ म्हणोनि जन्मचि नाहीं कोणासी । श्रोतयांची आशंका ऐसी । मरोन गेलें तें जन्मासी । मागुतीं न ये ॥ २८ ॥ वाळलें काष्ठ हिरवळेना । पडिलें फळ पुन्हा लागेना । तैसें पडिलें शरीर येइना । जन्मास मागुतें ॥ २९ ॥ मडकें अवचितें फु-

---

१. लोकरीतीचें. २. बरें. ३. टिकली. ४. पूर्वकर्माचें. ५. विचार. ६. सावध.

टलें । फुटलें तें फुटोनीच गेलें । तैसेंचि पुन्हा जन्मलें । नाहीं मनुष्य ॥३०॥ येथें अज्ञान आणि सज्ञान । सारिखेंचि झालें समान । ऐसें बळावलें अनुमान । श्रोतयांसी ॥ ३१ ॥ वक्ता म्हणे हो ऐका । अवघें थोतांड करूं नका । सावध होऊन विवेका । अवलोकावें ॥३२॥ प्रयत्नेंविण कार्य झालें। जेविल्याविण पोट भरलें । ज्ञानेंविण मुक्त झालें । हें तों घडेना ॥ ३३ ॥ स्वयें आपण जेविला । त्यास वाटे लोक धाला । परंतु हें समस्तांला । घडलें पाहिजे ॥ ३४ ॥ पोहणें शिकला तो तरेल । पोहणें नेणे तो बुडेल । येथेंहि अनुमान करील । ऐसा कवण ॥ ३५ ॥ तैसें जयांस ज्ञान झालें । ते ते तितुकेच तरले । ज्याचें बंधन तुटलें । तोचि मुक्त ॥ ३६ ॥ मोकळा ह्मणे नाहीं बंधन । आणि प्रत्यक्ष बंदीं पडिले जन । त्यांचें कैचें समाधान । तें तुम्ही पाहा ॥ ३७ ॥ नेणे दुसऱ्याची तळमळ । तें मनुष्य परदुःखशीतळ । तैसाचि हाहि केवळ । अनुभव जाणावा ॥ ३८ ॥ जयास आत्मज्ञान झालें । तत्वें तत्व विवंचिलें । खुणेसि पावतां बाणलें । समाधान ॥ ३९ ॥ ज्ञानें चुके जन्ममरण । सगट बोलणें अप्रमाण । वेद शास्त्र आणि पुराण । मग कासयासी ॥ ४० ॥ वेदशास्त्र विचारखोली । महानुभावांची मंडळी । भूमंडळीं लोक सकळी । हें तों मानीतना ॥ ४१ ॥ अवघें होतां अप्रमाण । मग आपुलेंच काय प्रमाण । ह्मणोनि जेथें आत्मज्ञान । तोचि मुक्त ॥४२॥ अवघेच मुक्त पाहतां नर । हाहि ज्ञानाचा उद्गार । ज्ञानेंविण तो उद्धार । होणार नाहीं ॥ ४३ ॥ आत्मज्ञान कळों आलें । ह्मणोनि दृश्य मिथ्या झालें । परंतु वेढा लाविलें । सकळांस येणें ॥ ४४ ॥ आतां प्रश्न फिटला । ज्ञानी ज्ञानें मुक्त झाला । अज्ञान तो बांधला । आपुले कल्पनेनें ॥ ४५ ॥ विज्ञानासारिखें अज्ञान । आणि मुक्तासारिखें बंधन । निश्चयासारिखें अनुमान । मानूंचि नये ॥ ४६ ॥ बंधन ह्मणिजे कांहींच नाहीं । परी वेढा लाविलें सर्वही । यासि उपायचि नाहीं । कळल्यावांचूनी ॥ ४७ ॥ कांहींच नाहीं आणि बांधी । हेंचि नवल पाहतां आधीं । मिथ्या जाणिजेना बंधीं । ह्मणोनि बद्ध ॥ ४८ ॥ भोळा भाव सिद्धीस जाव । हा उधाराचा उपाव । रोकडा मोक्षाचा अभिप्राव । विवेकें जाणावा ॥ ४९ ॥ प्राणी व्हावया मोकळा । आधीं पाहिजे जाणीवकळा । सकळ जाणतां निराळा । सहजचि

होय ॥ ५० ॥ कांहींच नेणिजे तें अज्ञान । सकळ जाणिजे तें ज्ञान । जाणीव राहतां विज्ञान[1] । स्वयेंचि आत्मा ॥ ५१ ॥ अमृत सेवून अमर झाला । तो म्हणे मृत्यु कैसा येतो जनाला । ऐसा विवेकी म्हणे बद्धाला । जन्म तो कैसा ॥ ५२ ॥ जाणता म्हणे जनांतें । तुम्हांस भूत कैसें झडपितें । तुम्हांस विष कैसें चढतें । निर्विष म्हणे ॥ ५३ ॥ आधीं बद्धासारिखें व्हावें । मग हें नलगेचि पुसावें । विवेक दूरी ठेवून पाहावें । लक्षण बद्धाचें ॥ ५४ ॥ निजल्यास चेइला तो । म्हणे हा कां रे वोसणतो[2] । अनुभव पाहणेंचि आहे तो । तरी मग निजोन पाहावा ॥ ५५ ॥ ज्ञात्याची उठावली वृत्ती । बद्धाऐसी न पडे गुंती । भुकेल्याची अनुभवप्राप्ती । धाल्यास न ये ॥ ५६ ॥ इतुकेन आशंका तुटली । ज्ञानें मोक्षप्राप्ति झाली । विवेक पाहतां बाणली । अंतरस्थिती ॥ ५७ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नवमदशके विकल्पनिरसननिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. देहातीत.

श्रीगणेशाय नमः ॥ ज्ञानी सुटला ज्ञानमतें । परंतु जन्म कैसा बद्धातें । बद्धाचें काय जन्मतें । अंतकाळीं ॥ १ ॥ बद्ध प्राणी मरोन गेले । तेथें कांहींच नाहीं उरलें । जाणिवेचें विस्मरण झालें । मरणापूर्वीं ॥ २ ॥ ऐसी घेतली आशंका । याचें उत्तर ऐका । आतां दुश्चित होऊं नका । म्हणे वक्ता ॥ ३ ॥ पंचप्राण स्थळें सोडिती । प्राणरूप वासनावृत्ती । वासनामिश्रित प्राण जाती । देह सोडूनियां ॥ ४ ॥ वायूसरिसी वासना गेली । ते वायुरूपेंचि राहिली । पुन्हा जन्म घेऊनि आली । हेतुपरत्वें ॥ ५ ॥ कित्येक प्राणी निःशेष मरती । पुन्हा मागुते जीव येती । टाकून दिल्हे तेणें दुखवती । हस्तपादादिक ॥ ६ ॥ सर्पदंश झालियावरी । तीन दिवसां उठवी धन्वंतरी । तेव्हां ते माघारीं । वासना येते कीं ॥ ७ ॥ कित्येक शवें होऊन पडती । कित्येक तयांस उठविती । यमलोकींहून आणिती । माघारे प्राणी ॥ ८ ॥ कित्येक पूर्वीं शापिले । ते शापदेह पावले । उःशापकाळीं पुन्हा आले । पूर्वदेहीं ॥ ९ ॥ कित्येकीं बहु जन्म घेतले । कित्येक

---

१. ब्रम्हानुभवाचें ज्ञान. २. भितो.

परकाया प्रवेशले । ऐसे आले आणि गेले । बहुत लोक ॥ १० ॥ फुंकिल्या-सरिसा वायु गेला । तेथें वायुसुत[1] निर्माण झाला । म्हणोन वायुरूप वासनेला । जन्म आहे ॥११॥ मनाच्या वृत्ति नाना । त्यांत जन्म घेते वासना। वासना पाहतां दिसेना । परंतु आहे ॥१२॥ वासना जाणिजे जाणीवहेतु । जाणीव मूळींचा मूळतंतु । मूळमायेंत असे मिश्रित । कारणरूपें ॥ १३ ॥ कारणरूपें आहे ब्रह्मांडीं । कार्यरूपें वर्ते पिंडीं । अनुमानितां तांतडी । अनुमानेना ॥ १४ ॥ परंतु आहे सूक्ष्मरूप । जैसें वायूचें स्वरूप । सकळ देव वायुरूप । आणि भूतसृष्टी ॥१५॥ वायूमध्यें विकार नाना । वायु तरी पाहतां दिसेना । तैसी जाणीव वासना । अति सूक्ष्म ॥१६॥ त्रिगुण आणि पंचभूतें । हीं वायूमध्यें मिश्रितें । अनुमानेना म्हणोनि त्यांतें । मिथ्या म्हणों नये ॥१७॥ सहज वायु चाले । तरी सुगंध दुर्गंध कळों आले । उष्ण शीतळ तप्त निवाले । प्रत्यक्ष प्राणी ॥ १८ ॥ वायूचेनि मेघ वोळती । वायूचेनि नक्षत्रें चालती । सकळ सृष्टीची वर्तती गती । सकळ तो वायु ॥ १९ ॥ वायुरूपें दैवतें भूतें । अंगीं भरती अकस्मातें । वध केलिया प्रेतें । सावध होती ॥२०॥ राहणें[2] ब्राह्मणसमंध जाती । राहणें ठेवणीं सांपडती । नाना गुंतले उसवती । प्रत्यक्ष राहणें ॥ २१ ॥ वारें निराळें न बोले । देहामध्यें भरोन डोले । आळी[3] घेऊन जन्मा आले । कित्येक प्राणी ॥२२॥ ऐसा वायूचा विकार । एवंच कळेना विस्तार । सकळ कांहीं चराचर । वायूमुळें ॥ २३ ॥ वायु स्तब्धरूपें सृष्टिधर्ता । वायु चंचलरूपें सृष्टिकर्ता । न कळे तरी विचारीं प्रवर्ता । म्हणिजे कळे ॥ २४ ॥ मुळापासून शेवटवरी । वायुचि सकळ कांहीं करी । वायूवेगळें कर्तृत्व चतुरीं । मज निरूपावें ॥ २५ ॥ जाणीवरूप मूळमाया । जाणीव जाते आपुल्या ठाया । गुप्त प्रगट होऊनियां । विश्वीं वर्ते ॥ २६ ॥ कोठें गुप्त कोठें प्रगटे । जैसें जीवन उफाळे[4] आटे । पुढें मागुतां ओघ लोटे । भूमंडळीं ॥ २७ ॥ तैसाच वायूमध्यें जाणीवप्रकार । उमटे आटे निरंतर । कोठें विकारे[5] कोठें समीरें[6] । उगाच वाजे ॥ २८ ॥ वारीं अंगावरून जाती । तेणें हात पाय वाळती । वारा

---

१. वायूपासून झालेला, अग्नि. २. अंगांत दैवत आणवून बोलविणें, त्यायोगें. ३. वासना. ४. चढतें-उतरतें. ५. विकार पावतो. ६. वायु.

वाजतां करपती । आलीं पिकें ॥ २९ ॥ नाना रोगांचीं नाना वारीं । पिडा करिती पृथ्वीवरी । वीज कडाडी अंबरीं[1] । वायूमुळें ॥ ३० ॥ वायूकारितां रागोद्धार[2] । कळे वोळखीचा निर्धार । दीप लागे मेघ पडे हा चमत्कार । रागोद्धारीं ॥ ३१ ॥ वायु फुंकितां भुली पडती । वायु फुंकितां खोडकें करपती । वायूकारितां चालती । नाना मंत्र ॥ ३२ ॥ मंत्रीं देव प्रगटती । मंत्रीं भूतें आवरती । बाजीगिरी[3] वोडंबरी करिती । मंत्रसामर्थ्यें ॥ ३३ ॥ राक्षसांची मावरचना । ते हे देवादिकां कळेना । विचित्र सामर्थ्यें नाना । स्तंभनमोहनादिकें ॥३४॥ धडचि पिसें करावें । पिसेंच उमजवावें । नाना विकार सांगावे । किती म्हणोनी ॥ ३५ ॥ मंत्रीं संग्राम देवाचा । मंत्रीं साभिमान ऋषींचा । महिमा मंत्रसामर्थ्याचा । कोण जाणे ॥ ३६ ॥ मंत्रीं पक्षी आटोपिती । मूषकें श्वापदें बांधिती । मंत्रीं महासर्प खिळिती । आणि धनलाभ ॥३७॥ आतां असो हा प्रश्न झाला । बद्धाचा जन्म प्रत्यया आला । मागील प्रश्न फिटला । श्रोतयांचा ॥ ३८ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नवमदशके देहातीतनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. संदेहवारण.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्रह्म वारितां वारेना । ब्रह्म सारितां सरेना । ब्रह्म कांहीं वोसरेना । एकीकडे ॥१॥ ब्रह्म भेदितां भेदेना । ब्रह्म छेदितां छेदेना । ब्रह्म परतें होईना । केलें तरी ॥ २ ॥ ब्रह्म खंडेना अखंड । ब्रह्मीं नाहीं दुसरें बंड । तरी कैसें हें ब्रह्मांड । शिरकलें मध्यें ॥ ३ ॥ पर्वत पाषाण शिळा शिखरें । नाना स्थळें स्थळांतरें । भूगोलरचना कोण्या प्रकारें । झाली परब्रह्मीं ॥ ४ ॥ भूगोल आहे ब्रह्मामध्यें । ब्रह्म आहे भूगोलामध्यें । पाहतां एकमेकांमध्यें । प्रत्यक्ष दिसे ॥ ५ ॥ ब्रह्मीं भूगोल पैस केला । आणि भूगोलहि ब्रह्में भेदिला । विचार पाहतां प्रत्यय आला । प्रत्यक्ष आतां ॥६॥ ब्रह्में ब्रह्मांड भेदिलें । हें तों पाहतां नीटचि झालें । परी ब्रह्मास ब्रह्मांडें भेदिलें । हें विपरीत दिसे ॥ ७ ॥ भेदिलें नाहीं म्हणावें । तरी ब्रह्मीं ब्रह्मांड स्वभावें । हें सकळांस अनुभवें । दिसतचि आहे ॥ ८ ॥ तरी हें आतां

---

१. आकाशांत. २. गायनशास्त्रांतील राग, आलाप काढणें. ३. इंद्रजाल विद्या.

कैसें झालें । विचारून पाहिजे बोलिलें । ऐसें श्रोतीं आक्षेपिलें । आक्षेपवचनें[1] ॥ ९ ॥ आतां याचें प्रत्युत्तर । सावध ऐका निरुत्तर । येथें पडिलें कीं विचार । संदेहाचे ॥ १० ॥ ब्रह्मांड नाहीं म्हणों तरी दिसे । आणि दिसे म्हणों तरी नासे । आतां हें समजती कैसे । श्रोतेजन ॥ ११ ॥ तंव श्रोते झाले उदित[2] । आह्मों म्हणती सावचित्त । प्रसंगें बोलों उचित । प्रत्युत्तर ॥ १२ ॥ आकाशीं दीपासि लाविलें । दीपें आकाश परतें केलें । हें तों घडेना पाहिलें । पाहिजे श्रोतीं ॥ १३ ॥ आप तेज अथवा पवन । सारूं न शकती गगन । गगन पाहतां सघन । चळेल कैसें ॥ १४ ॥ अथवा कठिण झाली मेदिनी[3] । तरी गगनें केली चाळणी । पृथ्वीचें सर्वांग भेदूनी । राहिलें गगन ॥ १५ ॥ याची प्रचीत ऐसी असे । जें जडत्वा आलें तितुकें नासे । आकाश जैसें तैसें असे । चळणार नाहीं ॥ १६ ॥ वेगळेपणें पाहावें । तयास आकाश म्हणावें । अभिन्न होतां स्वभावें । आकाश ब्रह्म[4] ॥ १७ ॥ तस्मात् आकाश कळेना । भेद गगनाचा कळेना । भासलें ब्रह्म यास जाणा । आकाश म्हणावें ॥ १८ ॥ निर्गुण ब्रह्मसें भासलें । कल्पूं जातां अनुमानलें । म्हणोन आकाश बोलिलें । कल्पनेसाठीं ॥१९॥ कल्पनेसी भासे भास । तितुकें जाणावें आकाश । परब्रह्म निराभास । निर्विकल्प ॥ २० ॥ पंचभूतांमध्यें वास । म्हणोनि बोलिजे आकाश । भूतांतरीं[5] जो ब्रह्मांश । तेंचि गगन ॥ २१ ॥ प्रत्यक्ष होतें आणि जातें । अचळ कैसें म्हणावें त्यातें । म्हणोनियां गगनातें । भेदिलेंचि नाहीं ॥ २२ ॥ पृथ्वी विरोन उरे जीवन । जीवन नसतां उरे अग्न । अग्नि विझतां उरे पवन । तोहि नासे ॥ २३ ॥ मिथ्या आलें आणि गेलें । तेणें खरें तें भंगलें । ऐसें हें प्रचीतीस आलें । कोणे परी ॥ २४ ॥ भ्रमें प्रत्यक्ष दिसतें । विचार पाहतां काय तेथें । भ्रममूळ या जगातें । खरें कैसें म्हणावें ॥ २५ ॥ भ्रम शोधितां कांहींच नाहीं । तेथें भेदिलें कोणे ठाईं । भ्रमें भेदिलें म्हणतां ठायीं । भ्रमचि मिथ्या ॥ २६ ॥ भ्रमाचें रूप मिथ्या झालें । मग सुखें म्हणावें भेदिलें । मुळीं लटिकें त्याणें केलें । तेंहि तैसें ॥ २७ ॥ लटिक्यानें[6] उदंड केलें । तरी आमुचें काय गेलें ।

---

१. शंकावचनानें. २. तयार. ३. पृथ्वी. ४. वेगळें होऊन पाहिल्यास आकाश, व एकरूपतेनें अनुभव घेतल्यास तेंच ब्रह्म होय. ५. पंचभूतांमध्यें. ६. जो नाहीं त्यानें.

केलें म्हणतांच नाथिलें । शाहणे जाणती ॥ २८ ॥ सागरामध्यें खसखस । तैसें परब्रह्म दृश्य । मतीसारिखा मतिप्रकाश । अंतरीं वाटे ॥ २९ ॥ मति करितां विशाळ । कवळों लागे अंतराळ । पाहतां भासे ब्रह्मगोळ । कविंठ जैसें ॥ ३० ॥ वृत्ति त्याहूनि विशाळ । करितां ब्रह्मांड बदरिफळ । ब्रह्माकार होतां केवळ । कांहींच नाहीं ॥ ३१ ॥ आपण विवेकें विशाळला । मर्यादे वेगळा झाला । मग ब्रह्मगोल देखिला । वटबीजन्यायें ॥३२॥ होतां त्याहून विस्तीर्ण । वटबीज कोटिप्रमाण । आपण होतां परिपूर्ण । कांहींच नाहीं ॥ ३३ ॥ आपण भ्रमें लाहानला । केवळ देहधारी झाला । तरी मग ब्रह्मांड त्याला । कवळेल कैसें ॥ ३४ ॥ वृत्ति ऐसी वाढवावी । पसरून नाहींच करावी । पूर्णब्रह्मास पुरवावी । चहूंकडे ॥ ३५ ॥ जवें एक सुवर्ण आणितां । तेणें ब्रह्मांड मढवितां । कैसें होईल तत्वतां । बरें पाहा ॥ ३६ ॥ वस्तु वृत्तीस कवळे । तेणें वृत्ति फाटोन वितुळे । निर्गुण आत्मा निवळे । जैसा तैसा ॥ ३७ ॥ येथें फिटली आशंका । श्रोते हो संदेह धरूं नका । अनुमान असेल तरी विवेका । अवलोकावें ॥ ३८ ॥ विवेकें तुटे अनुमान । विवेकें होतें समाधान । विवेकें आत्मनिवेदन । मोक्ष लाभे ॥ ३९ ॥ केली मोक्षाची अपेक्षा । विवेकें सारिलें पूर्वपक्षा । सिद्धांत आत्मा प्रत्यक्षा । प्रमाण नलगे ॥ ४० ॥ हीं प्रचितीचीं उत्तरें । कळती सारासार विचारें । मननध्यासें साक्षात्कारें । पावन होइजे ॥४१॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नवमदशके संदेहवारणनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. अलिप्त स्थिति.

श्रीगणेशाय नमः ॥ देउळामध्यें जगन्नायक । आणि देउळावरी बैसला काकें । तरी तो देवाहून अधिक । म्हणों नये ॥ १ ॥ सभा बैसली राजद्वारीं । आणि मर्कट बैसलें स्तंभावरी । परी तें सभेहून श्रेष्ठ चतुरीं । कैसें मानावें ॥ २ ॥ ब्राह्मण स्नान संध्या करून गेले । आणि बर्क तैसेंचि

---

१. नाहीं. २. बोराएवढें. ३. वटवृक्षाचे तुलनेनें त्यांचें बीज फारच लहान असते, या विचारसरणीनें. ४. जवभार. ५. वृत्तीला ब्रह्माचें आकलन झाल्यावर वृत्ति लय पावते. ६. भ्रामक विचारास. ७. कावळा. ८. बगळा.

बैसले । परी ते ब्राह्मणापरीस भले । कैसे मानावे ॥३॥ ब्राह्मणांमध्यें कोणी नेमस्त । कोणी जाहले अस्ताव्यस्त । आणि श्वान सदा ध्यानस्त । परी तें उत्तम नव्हे ॥ ४ ॥ ब्राह्मण लक्ष्यमुद्रा[1] नेणे । मार्जार लक्ष्याविशीं शहाणें । परी ब्राह्मणापरिस विशेष कोणें । म्हणावें तयासी ॥५॥ ब्राह्मण पाहे भेदाभेद । मक्षिका सर्वांसी अभेद । परी तसि जाहला ज्ञानबोध । हें तों न घडे ॥ ६ ॥ उंच वस्त्रें नीच त्याला । आणि समर्थ उघडाच बैसला । परी तो आहे परीक्षिला । परीक्षवंतीं ॥ ७ ॥ बाह्यात्कार केला अधिक । परी तो अवघा लौकिक । येथें पाहिजे मुख्य एक । अंतर्निष्ठ ॥ ८ ॥ लौकिक बरा संपादिला । परी अंतरीं सावध नाहीं जाहला । मुख्य देवास चुकला । तो आत्मघातकी ॥ ९ ॥ देवास भजतां देवलोक । पित्रांस भजतां पितृलोक । भूतांस भजतां भूतलोक । पाविजेती ॥ १० ॥ जेणें जयास भजावें । तेणें त्या लोकास जावें । निर्गुणीं भजतां व्हावें । निर्गुणचि स्वयें ॥ ११ ॥ निर्गुणाचें कैसें भजन । निर्गुणीं असावें अनन्य[2] । अनन्य होतां होइजे धन्य । निश्चयेंसी ॥ १२ ॥ सकळ केलियाचें सार्थक । देव ओळखावा एक । आपण कोण हा विवेक । पाहिला पाहिजे ॥ १३ ॥ देव पाहतां निराकार । आपला तो मायिक विचार । सोहं आत्मा हा निर्धार । बाणोन गेला ॥१४॥ आतां अनुमान तो काई । वस्तु आहे वस्तूच्या ठायीं । देहभाव कांहींच नाहीं । धांडोळितां ॥ १५ ॥ सिद्धास आणि साधन । हें तों अवघेंचि अनुमान । मुक्तास आणि बंधन । आढळेना ॥ १६ ॥ साधनें जें कांहीं साधावें । तें तो आपणाचि स्वभावें । आतां साधनाच्या नांवें । शून्याकार ॥ १७ ॥ कुलाल[3] पावला राज्यपदवी । आतां रासभें[4] कासया राखावीं । कुलालपणाची उठाठेवी । कासया पाहिजे ॥ १८ ॥ तैसा अवघा वृत्तिभाव । नाना साधनांचा उपाव । साध्य झालिया कैंचा ठाव । साधनासी ॥ १९ ॥ साधनें काय साधावें । नेमें काय फळ द्यावें । आपण वस्तु[5] भरंगळावें । कासयासी ॥ २० ॥ देह तरी पांचा भूतांचा । जीव तरी अंश ब्रह्माचा । परमात्मा तरी अनन्याचा । ठाव पाहा ॥२१॥ उगेंच पाहतां मीपण दिसे । शोध घेतां कांहींच नसे । तत्वें तत्व निरसे । पुढें निखिल आत्मा ॥ २२ ॥

---

१. चित्तैक्याची एक रीत. २. एकनिष्ठ. ३. कुंभार. ४. गाढवें. ५. ब्रम्ह.

आत्मा आहे आत्मपणें । जीव आहे जीवपणें । माया आहे मायापणें । विस्तारली ॥ २३ ॥ ऐसें हें अवघेंचि आहे । आणि आपणहि कोणी एक आहे । हें सकळ शोधून पाहे । तोचि ज्ञानी ॥ २४ ॥ शोधूं जाणे सकळांसी । परी पाहों नेणें आपणासी । ऐसा ज्ञानी एकदेशी । वृत्तिरूपें ॥ २५ ॥ व वृत्तिरूप जरी पाहिलें । तरी मग कांहींच नाहीं राहिलें । प्रकृतिनिरासें अवघेंचि गेलें । विकारवंत ॥ २६ ॥ उरलें तें निखिल निर्गुण । विवंचितां तेंचि आपण । ऐसी हे परमार्थाची खूण । अगाध आहे ॥ २७ ॥ फळ एक आपण एक । ऐसा नाहीं हा विवेक । फळाचें फळ कोणी एक । स्वयेंचि होइजे ॥ २८ ॥ रंक होता तो राजा जाहला । बरें पाहतां प्रत्यय आला । रंकपणाचा गलबला । रंकीं करावा ॥ २९ ॥ वेद शास्त्रें पुराणें । नाना साधनें निरूपणें । सिद्ध साधु त्या कारणें । नाना सायास करिती ॥ ३० ॥ तें ब्रह्मरूप आपणचि अंगें । सारासार विचार प्रसंगें । करणें न करणें वाउगें । कांहींच नाहीं ॥३१॥ रंक राजाज्ञेसि भ्यालें । तेचि पुढें राजा जाहलें । मग तें भयाचि उडालें । रंकपणासरिसें ॥ ३२ ॥ वेदें वेदाज्ञेनें चालावें । सच्छास्त्रें शास्त्र अभ्यासावें । तीर्थें तीर्थास जावें । कोण्या प्रकारें[3] ॥ ३३ ॥ अमृतें सेवावें अमृत । अनंतें पाहावा अनंत । भगवंतें लक्षावा भगवंत । कोण्या प्रकारें ॥ ३४ ॥ संतें[1] असंतें[2] त्यागावें । निर्गुणें निर्गुणास भावावें[4] । स्वरूपें स्वरूपीं रंगावें । कोण्या प्रकारें ॥ ३५ ॥ अंजनें ल्यावें अंजन । धनें साधावें धन । निरंजनें निरंजन । कैसें अनुभवावें ॥ ३६ ॥ साध्येंचि करावें साधनासी । ध्येयेंचि धरावें ध्यानासी । उन्मनें आवरावें मनासी । कोण्या प्र[3]कारें ॥ ३७ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नवमदशके अलिप्तस्थितिनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी ४२७.

---

१. नित्य वस्तूनें. २. अनित्य. ३. वेद, शास्त्र, तीर्थ, अमृत इत्यादि हीं सर्व (ओंवी ३३ ते ३६) आत्मरूपच असल्यामुळें आपण आपलेंच सेवन कसें करावें? सारांश, स्वरूपतः सर्व एकरस आहे. ४. कल्पावें.

# दशक दहावा.



## १. अंतःकरण.

श्रीगणेशाय नमः ॥ सकळांचें अंतःकरण एक। किंवा एक नव्हे अनेक। ऐसें हें निश्चयात्मक। मज निरूपावें ॥ १ ॥ ऐसें श्रोतयानें पुसिलें। अंतःकरण एक कीं वेगळें। याचें उत्तर ऐकिलें। पाहिजे श्रोतीं ॥ २ ॥ समस्तांचें अंतःकरण एक। निश्चय जाणावा नेमक। हा प्रत्ययाचा विवेक। तुज निरूपिला ॥ ३ ॥ श्रोता म्हणे वक्तयासी। अंतःकरण एक समस्तांसी। तरी मिळेना एकएकासी। काय निमित्त ॥ ४ ॥ एक जेवितां अवघे धाले। एक निवतां अवघे निवाले। एक मरतां अवघे मेले। पाहिजेत कीं ॥ ५ ॥ एक सुखी एक दुःखी। ऐसें वर्ततें लौकिकीं। एक अंतःकरणाची वोळखी। कैसी जाणावी ॥ ६ ॥ जनीं वेगळाली भावना। कोणास कोणीच मिळेना। म्हणोन हें अनुमाना। येत नाहीं ॥ ७ ॥ अंतःकरण एक असतें। तरी एकाचें एकास कळों येतें। कांहीं चोरितांच न येतें। गौप्य गुह्य ॥ ८ ॥ याकारणें अनुमानेना। अंतःकरण एक हें घडेना। विरोध लागला जना। काय निमित्त ॥९॥ सर्प डसाया येतो। प्राणी भिऊन पळतो। एक अंतःकरण तरी तो। विरोध नसावा ॥ १० ॥ ऐसी श्रोतयांची आशंका। वक्ता म्हणे चळों नका। सावध होऊन ऐका। निरूपण ॥ ११ ॥ अंतःकरण म्हणिजे जाणीव। जाणीव जाणता स्वभाव। देहरक्षणाचा उपाव। जाणती कळा ॥ १२ ॥ सर्प जाणोनि डंखूं आला। प्राणी जाणोनि पळाला। दोहींकडे जाणिवेला। बरें पाहा ॥ १३ ॥ दोहींकडे जाणिवेसि पाहिलें। तरी अंतःकरण एकचि जाहलें। विचारितां प्रत्यया आलें। जाणीवरूपें ॥ १४ ॥ जाणीवरूपें अंतःकरण। सकळांचें एक हें प्रमाण। जीवमात्रास जाणपण। एकचि असे ॥ १५ ॥ एक दृष्टीचें देखणें। एक जिव्हेचें चाखणें। ऐकणें स्पर्शणें वास घेणें। सर्वत्रांस एक ॥ १६ ॥ पशु पक्षी किडा मुंगी। जीवमात्र निर्माण जगीं। जाणीवकळा सर्वांलागीं। एकचि आहे ॥ १७ ॥ सर्वांस जळ तें शीतळ। सर्वांस अग्नि तेजाळ। सर्वांस अंतःकरण केवळ। जाण-

ती कळा ॥ १८ ॥ आवडे नावडे ऐसें जाहलें । तरी देहस्वभावावरी गेलें। परी हें कळों आलें । अंतःकरणयोगें ॥ १९ ॥ सर्वांचें अंतःकरण एक । ऐसा निश्चय निश्चयात्मक । जाणती याचें कौतुक । चहूंकडे ॥ २० ॥ इतुकेन फिटली आशंका । आतां अनुमान करूं नका । जाणणें तितुकें एका । अंतःकरणाचें ॥ २१ ॥ जाणोन जीव चारा घेती । जाणोन भिती लपती । जाणोनियां पळोन जाती । प्राणिमात्र ॥ २२ ॥ किडामुंगीपासून ब्रह्मादिक। समस्तांस अंतःकरण एक । ये गोष्टीचें कौतुक । प्रत्ययें जाणावें ॥ २३ ॥ थोर लहान तरी अग्नी । थोडें बहुत तरी पाणी । न्यून पूर्ण तरी प्राणी । अंतःकरण जाणती ॥ २४ ॥ कोठें उणें कोठें अधिक । परंतु जिन्नस मासला एक । जंगम[1] प्राणी कोणी एक । जाणिल्याविण नाहीं ॥ २५ ॥ जाणीव म्हणिजे अंतःकरण । अंतःकरण विष्णूचा अंश जाण । विष्णु करितो प्रतिपाळण । येणें प्रकारें ॥ २६ ॥ नेणतां प्राणी संहारितो । नेणीव तमोगुण बोलिजे तो । तमोगुणें रुद्र संहारितो । येणें प्रकारें ॥ २७ ॥ कांहीं जाणीव कांहीं नेणीव । हा रजोगुणाचा स्वभाव । जाणतां नेणतां जीव । जन्मास येती ॥ २८ ॥ जाणिवेनें होतें सुख । नेणिवेनें होतें दुःख। सुखदुःख आवश्यक । उत्पत्तिगुणें ॥ २९ ॥ जाणण्या नेणण्याची बुद्धी । तोचि देहीं जाणावा विधी[2] । स्थूळदेहीं ब्रह्मा त्रिशुद्धी[3] । उत्पत्तिकर्ता ॥ ३० ॥ ऐसा उत्पत्ति स्थिति संहार । प्रसंगें बोलिला विचार । परंतु याचा निर्धार । प्रत्ययें पाहावा ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दशमदशके अंतःकरणनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. देहाशंका.

श्रीगणेशाय नमः ॥ स्वामीनें विचार दाखविला । तेथें विष्णूचा अभाव दिसोन आला । ब्रह्मा विष्णु महेश्वराला । ठरी नाहीं ॥ १ ॥ उत्पत्ति स्थिति संहार । ब्रह्मा विष्णु महेश्वर । यांचा पाहतां विचार । प्रत्यय नाहीं ॥ २ ॥ ब्रह्मा उत्पत्तिकर्ता चौमुखाचा । येथें प्रत्यय नाहीं त्याचा । पालनकर्ता[4] विष्णु चौभुजांचा । तोहि ऐकोनि जाणों ॥ ३ ॥ महेश[5] संहार कारि-

१. सचेतन. २. ब्रम्हदेव. ३. निश्चयपूर्वक. ४. पालन. ५. शंकर.

तो। हाहि प्रत्यय कैसा येतो। लिंगपुराणीं महिमा तों। विपरीत बोलिला ॥ ४ ॥ मूळमायेस कोणें केलें। हें तों पाहिजे कळलें। तिहीं देवांचें रूप झालें। ऐलीकडे ॥ ५ ॥ मूळमाया लोकजननी। तयेपासून गुणक्षोभिणी[1]। गुणक्षोभिणीपासून त्रिगुणीं। जन्म देवां ॥ ६ ॥ ऐसें बोलती शास्त्रकारक। आणि प्रवृत्तीचेहि[2] लोक। प्रत्यय पुसतां कित्येक। आकांत करिती ॥ ७ ॥ म्हणोनि त्यांस पुसवेना। त्यांचेन प्रत्यय आणवेना। प्रत्ययेंविण प्रयत्न नाना। ठकाठकी ॥ ८ ॥ प्रचीतीविण वैण म्हणवी। उगीच करी उठाठेवी। तया मूर्खाला गोंवी[3]। प्राणिमात्र ॥ ९ ॥ तैसाच हाहि विचार। प्रत्ययें करावा निर्धार। प्रत्यय नसतां अंधकार। गुरुशिष्यांशीं ॥ १० ॥ बरें लोकांसि काय म्हणावें। लोक म्हणती तेंचि बरवें। परंतु स्वामीनें सांगावें। विशद[4] करूनी ॥ ११ ॥ म्हणों देवीं माया केली। तरी देवांचीं रूपें मायेंत आलीं। जरी म्हणों मायेनें माया केली। तरी दुसरी नाहीं ॥ १२ ॥ जरी म्हणों भूतीं केली। तरी ते भूतांचीच वळली। म्हणावी जरी परब्रह्में केली। तरी ब्रह्मीं कर्तृत्व नाहीं ॥ १३ ॥ आणि माया खरी असावी। तरी ब्रह्मीं कर्तृत्वाची गोंवी[5]। माया मिथ्या ऐसी जाणावी। तरी कर्तृत्व कैंचें ॥ १४ ॥ आतां हें अवघेंच उगवे[6]। आणि मनासि प्रत्यय फावे[7]। ऐसें केलें पाहिजे देवें। कृपाळूपणें ॥ १५ ॥ वेद मातृकेविर्ण[8] नाहीं। मातृका देहाविण नाहीं। देह निर्माण होत नाहीं। देहावेगळा ॥ १६ ॥ तया देहामध्यें नरदेहो। त्या नरदेहांत ब्राह्मणदेहो। तया ब्राह्मणदेहांत पाहो। अधिकार वेदीं ॥ १७ ॥ असे वेद कोठून झाले। देह कासयांचे केले। देव कैसे प्रगटले। कोण्या प्रकारें ॥ १८ ॥ ऐसें बळावलें अनुमान। केलें पाहिजे समाधान। वक्ता म्हणे सावधान। होईं आतां ॥ १९ ॥ प्रत्यय पाहतां सांकडी। अवघीं होते विघडाविघडी। अनुमानितां घडीनें घडी। काळ जातो ॥ २० ॥ लोकधाटी शास्त्रनिर्णय। येथें बहुविध निश्चय। म्हणोनियां एक प्रत्यय। येणार नाहीं ॥ २१ ॥ आतां शास्त्रांची भीड धरावी। तरी सुटेना ही गाथागोवी। गाथागोवी हे उगवी। तरी शास्त्रभेद दिसे ॥ २२ ॥ शास्त्र रक्षून

१. त्रिगुणांचा आविर्भाव करणारी. २. व्यावहारिक. ३. फजीत करी. ४. उघड. ५. गुंतागुंत. ६. उलगडावें. ७. येई. ८. अक्षरांवाचून.

प्रत्यय आणिला । पूर्वपक्ष त्यागून सिद्धांत पाहिला । शहाणा मूर्ख समजाविला । एका वचनें ॥ २३ ॥ शास्त्रींच पूर्वपक्ष बोलिला । पूर्वपक्ष म्हणावें लटिक्याला । विचार पाहतां आम्हांला । शब्द नाहीं ॥ २४ ॥ तथापि बोलों कांहीं एक । शास्त्र रक्षून कौतुक । श्रोतीं सादरें विवेक । केला पाहिजे ॥ २५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दशमदशके देहाशंका- निरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. देहाशंका.

श्रीगणेशाय नमः ॥ उपाधीविणें जें कां आकाश । तेंचि ब्रह्म निराभास । ते निराभासीं मूळमायेस । जन्म जाहलें ॥ १ ॥ ते मूळमायेचें लक्षण । वायुस्वरूपचि जाण । पंचभूतें आणि त्रिगुण । वायुअंगीं ॥ २ ॥ आकाशापासून वायु झाला । तो वायुदेव बोलिला । वायूपासून अग्नि झाला । तो अग्निदेव ॥३॥ अग्नीपासून झालें आप । तें नारायणाचें स्वरूप । आपापासून पृथ्वीचें रूप । तें बीजाकारें ॥ ४ ॥ ते पृथ्वीचे पोटीं पाषाण । बहुदेवांचें लक्षण । नाना प्रचीत प्रमाण । पाषाणदेवीं ॥ ५ ॥ नाना काष्ठ वृक्ष मृत्तिका । प्रचीत रोकडी विश्वलोकां । समस्त देवांचा थारा एका । वायूमध्यें ॥ ६ ॥ देव यक्षिणी कात्यायनी । चामुंडा जाखिणी मानविणी । नाना शक्ति नाना स्थानीं । देहपरत्वें ॥ ७ ॥ पुरुषनामें कितीएक । देव असती अनेक । भूतें दैवतें नपुंसक । नामें बोलिजेती ॥८॥ देव देवता देवतें भुतें । पृथ्वीमध्यें असंख्यातें । परंतु या समस्तांतें । वायुस्वरूप बोलिलें ॥ ९ ॥ वायुस्वरूप सदा असणें । प्रसंगें नाना देह धरणें । गुप्त प्रगट होणें जाणें । समस्तांसी ॥ १० ॥ वायुस्वरूपें विचरती । वायूमध्यें जगज्योती । जाणती कळा वासना वृत्ती । नाना भेदें ॥ ११ ॥ आकाशापासून वायु झाला । तो दों प्रकारें विभागला । सावधपणें विचार केला । पाहिजे श्रोतीं ॥ १२ ॥ एक वारा सकळ जाणती । एक वायूमधील जगज्ज्योती । जगज्ज्योतीच्या अनंत मूर्ती । देवदेवतांच्या ॥ १३ ॥ वायु बहुत विकारला । परंतु दों प्रकारें विभागला । आतां विचार ऐकिला । पाहिजे तेजाचा ॥१४॥ वायूपासून तेज झालें । उष्ण शीतळ प्रकाशलें । द्विधारूप ऐकिलें । पाहिजे

तेजाचें ॥ १५ ॥ उष्णापासून झाला भानु । प्रकाशरूपें दैदीप्यमान । सर्वभक्षक हुताशन । आणि विद्युल्लता ॥१६॥ शीतळापासून आप अमृत । चंद्र तारा आणि शीत । आतां परिसा सावचित्त । होऊन श्रोते ॥ १७ ॥ तेज बहुत विकारिलें । परंतु द्विधाच बोलिलें । आपहि द्विधाच निरूपिलें । आप आणि अमृत ॥ १८ ॥ ऐका पृथ्वीचा विचार । पाषाण मृत्तिका निरंतर । आणिक दुसरा प्रकार । सुवर्ण परिस नाना रत्नें ॥ १९ ॥ बहुरत्ना वसुंधरा । कोण खोटा कोण खरा । अवघें कळे विचारा- । रूढ होतां ॥ २० ॥ मनुष्यें कोठून झालीं । हे मुख्य आशंका राहिली । पुढें वृत्ति सावध केली । पाहिजे श्रोतीं ॥ २१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दशमदशके देहाशंकानिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. बीजलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ आतां पाहों जातां उत्पत्ती । मनुष्यापासून मनुष्यें होती । पशूपासून पशु निपजती । प्रत्यक्ष आतां ॥ १ ॥ खेचरें आणि भूचरें । वनचरें आणि जळचरें । नानाप्रकारचीं शरीरें । शरीरापासून होती ॥ २ ॥ प्रत्यक्षास आणि प्रमाण । निश्चयास आणि अनुमान । मार्ग सांडून आडरान । घेऊंच नये ॥३॥ विपरीतापासून विपरीत होती । परी शरीरें बोलिजेती । शरीरावांचून उत्पत्ती । होणार नाहीं ॥ ४ ॥ तरी हे उत्पत्ति कैसी झाली । कासयाची कोणें केली । जेणें केली त्याची निर्मिली । काया कोणें ॥ ५ ॥ ऐसें पाहतां उदंड लांबलें । परी मुळीं शरीर कैसें झालें । कासयाचें उभारिलें । कोणें कैसें ॥ ६ ॥ ऐसी हे मागील आशंका । राहत गेली ते ऐका । कदापि जाजु घेऊं नका । प्रत्यय आलियानें ॥ ७ ॥ प्रत्ययचि आहे प्रमाण । मूर्खास वाटे अप्रमाण । पिंडें प्रचीत शब्दें जाण । विश्वासासी ॥ ८ ॥ ब्रह्मीं मूळमाया झाली । तेचि अष्टधा प्रकृति बोलिली । भूतीं त्रिगुणीं कालवली । मूळमाया ॥९॥ ते मूळमाया वायुस्वरूप । वायूमध्यें जाणीवेचें रूप । तेचि इच्छा परी आरोप । ब्रह्मीं न घडे ॥ १० ॥

---

१. अग्नि. २. पृथ्वी. ३. पक्षी. ४. जनावरें. ५. मासे वगैरे. ६. संशय. ७. पंचमहाभूतें व मन, बुद्धि, आणि अहंकार मिळून आठ प्रकारची.

तथापि ब्रह्मीं कल्पिला । तरी तो शब्दचि वायां गेला । आत्मा निर्गुण संचला । शब्दातीत ॥११॥ आत्मा निर्गुण वस्तु ब्रह्म । नाममात्र तितुका भ्रम । कल्पून लाविला संभ्रम[1] । तरी लागणार नाहीं ॥१२॥ तथापि आग्रहें लाविला । तरी धोंडा अंतरीं मारिला । आकाशावरी कुंथिला । तरी तें तुटेना ॥ १३ ॥ तैसें ब्रह्म निर्विकार । निर्विकारीं लाविती विकार । विकार नासे निर्विकार । जैसें तैसें ॥१४॥ आतां ऐकावा प्रत्यय । जाणोनि धरावा निश्चय । तरीच पाविजे जय । अनुभवाचा ॥१५॥ मायाब्रह्मीं जो समीर[2] । त्यातें जाणता तो ईश्वर । ईश्वर आणि सर्वेश्वर । तयासचि बोलिजे ॥ १६ ॥ तोचि ईश्वर गुणास आला । त्याचा त्रिगुणभेद झाला । ब्रह्मा विष्णु महेश उपजला । तये ठायीं ॥१७॥ सत्व रज आणि तम । हे त्रिगुण उत्तमोत्तम । त्यांच्या स्वरूपाचा अनुक्रम । मागां निरूपिला ॥ १८ ॥ जाणता विष्णु भगवान । जाणता नेणता चतुरानन[3] । नेणता महेश पंचानन[4] । अत्यंत भोळा ॥ १९ ॥ त्रिगुणीं त्रिगुण कालवले । कैसे होती वेगळाले । परी विशेष न्यून भासले । ते बोलावे लागती ॥ २० ॥ वायूमध्यें विष्णु होता । तो वायुस्वरूपचि तत्वतां । पुढें झाला देहधर्ता । चतुर्भुज ॥२१॥ तैसाच ब्रम्हा आणि महेश । देह धरिती सावकाश । गुप्त प्रगट होतां तयांस । वेळ नाहा ॥ २२ ॥ आतां रोकडी प्रचीती । मनुष्यें गुप्त प्रगटती । मों[5] त्या देवांच्या मूर्तीं । सामर्थ्यवंत ॥ २३ ॥ देव देवता भूतें दैवतें । चढतें सामर्थ्य आहे येथें । येणेंचि न्यायें राक्षसांतें । सामर्थ्यकळा ॥ २४ ॥ झोटिंग वायुस्वरूप असती । सर्वेचि खुळखुळां चालती । खोबरीं खारिका टाकूनि देती । अकस्मात ॥ २५ ॥ अवघेंच न्याल अभावें[6] । तरी हें बहुतेकांस ठावें । आपुलाल्या अनुभवें । विश्वलोक जाणती ॥ २६ ॥ मनुष्यें धरिती शरीरवेष । नाना परकाया प्रवेश । मग तो परमात्मा जगदीश । कैसा न धरी ॥ २७ ॥ म्हणोन वायुस्वरूप देह धरिले । ब्रम्हा विष्णु महेश झाले । पुढें तेचि विस्तारले । पुत्रपौत्रीं ॥ २८ ॥ अंतरींच स्त्रिया कल्पिल्या । तों त्या कल्पितांच निर्माण झाल्या । परी तयांपासून प्रजा निर्मिल्या । नाहींत कदा ॥ २९ ॥

---

१. प्रपंचाचा व्याप. २. वायु. ३. ब्रह्मदेव. ४. शंकर. ५. मग. ६. अश्रद्धेनें.

इच्छून पुत्र कल्पिले । ते ते प्रसंगीं निर्माण झाले । येणें प्रकारें वर्तले । हरिहरादिक ॥ ३० ॥ पुढें ब्रम्हयानें सृष्टि केली । इच्छेसरिसी सृष्टि झाली । जीवसृष्टि निर्माण केली । ब्रम्हदेवें ॥ ३१ ॥ नानाप्रकारचे प्राणी कल्पिले । इच्छेसरिसे निर्माण झाले । अवघे जोडेंचि उदेलें । अंडज[1] जारजादिक[2] ॥ ३२ ॥ एक जलस्वेदापासून[3] झाले । ते प्राणी स्वेदज बोलिले । एक वायूकरितां झाले । अकस्मात उद्भिज्ज[4] ॥ ३३ ॥ मनुष्याची गौंड[5] विद्या । राक्षसांची वोडंबरी[6] विद्या । ब्रह्मयाची सृष्टिविद्या । येणें प्रकारें ॥ ३४ ॥ कांहींएक मनुष्यांची । त्याहून विशेष राक्षसांची । त्याहून विशेष ब्रह्मयाची । सृष्टिविद्या ॥ ३५ ॥ जाणते नेणते प्राणी निर्मिले । वेद वदोन मार्गीं लाविले । ब्रह्मयानें निर्माण केले । येणें प्रकारें ॥ ३६ ॥ मग शरीरापासून शरीरें । सृष्टि वाढिली विकारें । सकळ शरीरें येणें प्रकारें । निर्माण जाहलीं ॥ ३७ ॥ येथें आशंका फिटली । सकळ सृष्टि विस्तारली । विचार पाहतां प्रत्यया आली । यथान्वयें ॥ ३८ ॥ ऐसी सृष्टि निर्माण केली । पुढें विष्णूनें कैसी प्रतिपाळिली । हेहि विवंचना पाहिली । पाहिजे श्रोतीं ॥ ३९ सकळ प्राणी निर्माण झाले । ते मूळरूपें जाणोन पाळिले । शरीरें दैत्य निर्दाळिले । नानाप्रकारींचे ॥ ४० ॥ नाना आवतार धरणें । दुष्टांचा संहार करणें । धर्म स्थापावयाकारणें । विष्णूस जन्म ॥ ४१ ॥ म्हणोन धर्मस्थापनेचे नर । तेहि विष्णूचे अवतार । अभक्त दुर्जन रजनीचरँ[7] । सहजचि झाले ॥ ४२ ॥ आतां प्राणी जे जन्मले । ते नेणोन संहारले । मूळरूपें संहारिले । येणें प्रकारें ॥ ४३ ॥ शरीरें रुद्र खवळेल । तैं जीवसृष्टि संहारेल । अवघें ब्रह्मांडचि जळेल । संहारकाळीं ॥ ४४ ॥ एवं उत्पत्ति स्थिति संहार । यांचा ऐसा आहे विचार । श्रोतीं होऊन तत्पर । अवधान द्यावें ॥ ४५ ॥ कल्पांतीं संहार घडेल । तोचि पुढें सांगिजेल । पंच प्रळय ओळखेल । तोचि ज्ञानी ॥ ४६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दशमदशके बीजलक्षणनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

१. पक्षी. २. मनुष्य वगैरे. ३. घामापासून. ४. वनस्पती. ५. गौडबंगाल. ६. मायावी. ७. राक्षस.

## ५. पंचप्रलय.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐक प्रळयाचें लक्षण । पिंडीं दोन प्रळय जाण । एक निद्रा एक मरण । देहांतकाळीं ॥ १ ॥ देहधारक तीन मूर्ती । निद्रा जेव्हां संपादिती । तो निद्राप्रळय श्रोतीं । ब्रम्हांडींचा जाणावा ॥ २ ॥ तिही मूर्तींस होईल अंत । ब्रम्हांडास माडेल कल्पांत । तेव्हां जाणावा नेमस्त । ब्रम्हप्रळय जाहला ॥ ३ ॥ दोनी पिंडीं दोनी ब्रम्हांडीं । चारी प्रळय नवखंडीं । पांचवा प्रळय उदंडीं । जाणिजे विवेकाचा ॥ ४ ॥ ऐसे हे पांच प्रळय । सांगीतले यथान्वयें । आतां हें अनुभवास ये । ऐसें करूं ॥ ५ ॥ निद्रा जेव्हां संचरे । तेव्हां जागृतिव्यापार सरे । सुषुप्ति[१] अथवा स्वप्न भरे । अकस्मात अंगीं ॥ ६ ॥ या नांव निद्राप्रळय । जागृतीचा होय क्षय । आतां ऐका देहांतसमय । म्हणिजे मृत्युप्रळय ॥ ७ ॥ देहीं रोग बळावती । अथवा कठिण प्रसंग पडती । तेणें पंचप्राण जाती । व्यापार सांडूनी ॥ ८ ॥ तिकडे गेला मनपवन । इकडे राहिली नुसती तनू । दुसरा प्रळय अनुमानें[२] । असेचिना ॥ ९ ॥ तिसरा ब्रम्हा निजेला । तों हा मृत्युलोक गोळा झाला । अवघा व्यापार खुंटला । प्राणिमात्रांचा ॥ १० ॥ तेव्हां प्राणियांचे सूक्ष्मांश । वायुचक्रीं करिती वास । कित्येक काळ जातां ब्रम्हयास । जागृती घडे ॥ ११ ॥ पुनः मागुती सृष्टि रची । विसंचले[३] जीव मागुते संची[३] । सीमा होतां आयुष्याची । ब्रम्हप्रळय मांडे ॥ १२ ॥ शतवरुषें मेघ जाती । तेणें प्राणी मृत्यु पावती । असंभाव्य तडके क्षिती । मर्यादे वेगळी ॥ १३ ॥ सूर्य तपे बारा कळीं । तेणें पृथ्वीची होय होळी । अग्नि पावतां पाताळीं । शेष विष वमी[४] ॥ १४ ॥ आकाशीं सूर्यांच्या ज्वाळा । पाताळीं शेष वमी गरळा । दोहींकडून जळतां भूगोळा । उरी कैंची ॥ १५ ॥ सूर्यास खडतरता चढे । हलकल्लोळ चहूंकडे । कोसळती मेरूचे कडे । घडघडायमान ॥ १६ ॥ अमरावती सत्यलोक । वैकुंठ कैलासादिक । यांहि वेगळे नानालोक । भस्मोन जाती ॥ १७ ॥ मेरु अवघाच सरे । तेथील महिमाच वोसरे । देवसमुदाय वावरे । वायुचक्रीं ॥ १८ ॥ भस्म झालिया धारित्री । पर्जन्य पडे शुंडाधारीं । मही विरे जळांतरीं । निमिषमात्रें ॥ १९ ॥ पुढें नुसतें उरेल जळ । तयास शोषील

---

१. झोंप. २. संशय. ३. विस्कळित झालेले जमवितो. ४. ओकतो.

अनळ । पुढें एकवटतील ज्वाळ । मर्यादेवेगळे ॥ २० ॥ समुद्रींचा वडवानळ । शिवनेत्रींचा नेत्रानळ । सप्तकंचुकींचा आवरणानळ । सूर्य आणि विद्युल्लता ॥ २१ ॥ ऐसे ज्वाळ एकवटती । तेणें देव देह सोडिती । पूर्वरूपीं मिळोन जाती । प्रभंजनीं ॥ २२ ॥ तो वारा झडपी वैश्वानरा । वन्हि विजेल एकसरां । वायु धांवे सैरावैरा । परब्रह्मीं ॥ २३ ॥ धूम्र वितळे आकाशीं । तैसें होईल समीरासी । बहुतांमध्यें थोडियासी । नाश बोलिला ॥ २४ ॥ वायु वितळतां जाण । सूक्ष्म भूतें आणि त्रिगुण । ईश्वर सांडी अधिष्ठान । निर्विकल्पीं ॥ २५ ॥ तेथें जाणीव राहिली । आणि जगज्ज्योत निमाली । शुद्ध सारांश उरली । स्वरूपस्थिती ॥ २६ ॥ जितुकीं कांहीं नामाभिधानें । तये प्रकृतीचेनि गुणें । प्रकृति नसतां बोलणें । कैसें बोलावें ॥ २७ ॥ प्रकृति असतां विवेक कीजे । त्यास विवेकप्रळय बोलिजे । पांचहि प्रळय वोजें । तुज निरूपिले ॥ २८ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दशमदशके पंचप्रलयनिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. भ्रम.

श्रीगणेशाय नमः ॥ उत्पत्ति स्थिति संहार । यांचा निरूपिला व्यवहार । परमात्मा निर्गुण निराकार । जैसा तैसा ॥ १ ॥ होतें वर्ततें आणि जातें । यांचा संबंध नाहीं तेथें । आदि मध्य अवसानीं तें । संचलेंचि आहे ॥ २ ॥ परब्रह्म असतांचि असे । मध्येंचि हा भ्रम भासे । भासे परंतु अवघा नासे । काळांतरीं ॥ ३ ॥ उत्पत्ति स्थिति संहारत । मध्यें हें अखंड होत जात । पुढें शेवटीं कल्पांत । सकळांस आहे ॥ ४ ॥ यांमध्यें ज्यास विवेक आहे । तो आधींच जाणताहे । सारासार विचारें पाहे । म्हणोनियां ॥ ५ ॥ बहुत भ्रमिष्ट मिळाले । त्यांत उमजल्याचें काय चाले । सृष्टीमध्यें उमजले । ऐसे थोडे ॥ ६ ॥ त्या उमजल्याचें लक्षण । कांहीं करूं निरूपण । भ्रमाहून विलक्षण । महापुरुष ॥ ७ ॥ भ्रम हा नसेल जयासी । मनीं वोळखावें तयासी । ऐका आतां भ्रमासी । निरूपिजेल ॥ ८ ॥ एक परब्रह्म संचलें । कदापि नाहीं विकारलें । त्या वेगळें जें भासलें । तें भ्रमरूप ॥ ९ ॥ जयास

---

१. अग्नि. २. ब्रह्मांडाचा. ३. वायूचे ठिकाणीं. ४. मायेचे. ५. स्पष्टपणें.

बोलिला कल्पांत । त्रिगुण आणि पंचभूत । हें अवघेंच समस्त । भ्रमरूप ॥ १० ॥ मी तूं हा भ्रम । उपासनाहि भ्रम । ईश्वर हाहि भ्रम । निश्चयेंसी ॥ ११ ॥ श्लोक ॥ भ्रमेणाहं भ्रमेण त्वं भ्रमेणोपासका जनाः । भ्रमेणेश्वरभावत्वं भ्रममूलमिदं जगत् ॥ १ ॥ टीका ॥ या कारणें सृष्टि भासत । परंतु भ्रमाचि हा समस्त । यामध्यें जे विचारवंत । तेचि धन्य ॥ १२ ॥ आतां भ्रमाचा विचारू । अत्यंतचि प्रांजळ[1] करूं । दृष्टांतद्वारें विवरूं । श्रोतयांसी ॥ १३ ॥ भ्रमण करितां दूरदेशीं । दिशाभुली आपणाशी । कां ओळखी मोडे जिवलगांसीं । या नांव भ्रम ॥ १४ ॥ कां उन्मत्तद्रव्य[2] सेविलें । तेणें अनेक भासों लागलें । नाना व्यथा कां झडपिलें । भूतें तो भ्रम ॥ १५ ॥ दशावतारीं वाटती नारी । कां ते मांडिली बाजीगिरी[3] । उगाच संदेह अंतरीं । या नांव भ्रम ॥ १६ ॥ ठेवला ठाव तो विसरला । कां मार्गीं जातां चुकला । पट्टणामध्यें[4] भांबावला । या नांव भ्रम ॥ १७ ॥ वस्तु आपणापासीं असतां । गेली म्हणोन होय दुश्चिता । आपुलें आपण विसरतां । या नांव भ्रम ॥ १८ ॥ कांहीं पदार्थ विसरोन गेला । कां जें शिकला तें विसरला । स्वप्नदुःखें वाविरा[5] झाला । या नांव भ्रम ॥ १९ ॥ दुश्चिन्ह अथवा अपशकुन । मिथ्या वार्तेनें भंगे मन । दचके पदार्थ देखोन । या नांव भ्रम ॥ २० ॥ वृक्ष काष्ठ पशु देखिले । मनांत वाटे भूत आलें । कांहींच नसतां हडबडिलें । या नांव भ्रम ॥ २१ ॥ आतां कांच म्हणोन उदकांत पडे । कां सभा देखोन दर्पणीं वावडे[6] । द्वार चुकोन भलतीकडे । या नांव भ्रम ॥ २२ ॥ एक असतां एक वाटे । एक सांगतां एक निवटे । एक दिसतां एक उठे । या नांव भ्रम ॥ २३ ॥ आतां जें जें देइजेतें । तें तें पुढें पाविजेतें । मेलें माणूस भोजना येतें । या नांव भ्रम ॥ २४ ॥ ये जन्मींचें पुढिले जन्मीं । कांहीं एक पावेन मी । प्रीति गुंतली मनुष्याचे नामीं । या नांव भ्रम ॥ २५ ॥ मेलें मनुष्य स्वप्नीं आलें । तेणें कांहीं मागीतलें । मनीं अखंड बैसलें । या नांव भ्रम ॥ २६ ॥ अवघें मिथ्या म्हणोन बोले । आणि सामर्थ्यावरी मन चाले । ज्ञाते वैभवें दडपिले । या नांव भ्रम ॥ २७ ॥ कर्मठपणें ज्ञान विटे । कां ज्ञातेपणें बळेंचि

१. उघड. २. मादक पदार्थ. ३. जादुगिरी. ४. मोठ्या शहरामध्यें. ५. आरसेमहाल. ६. शिरतो. ७. घडतें.

भ्रष्टे। कोणी एक सीमा फिटे। या नांव भ्रम ॥२८॥ देहाभिमान कर्माभिमान। जात्याभिमान कुळाभिमान। ज्ञानाभिमान मोक्षाभिमान। या नांव भ्रम ॥ २९ ॥ कैसा न्याय तो न कळे। केला अन्याय तो नाढळे। उगाच अभिमानें खवळे। या नांव भ्रम ॥ ३० ॥ मागील कांहीं आठवेना। पुढील हीं सुचेना। अखंड आरूढ अभिमाना। या नांव भ्रम ॥ ३१ ॥ प्रचीतीवीण औषध घेणें। प्रचीत नसतां पथ्य करणें। प्रचीतिविण ज्ञान सांगणें। या नांव भ्रम ॥ ३२ ॥ फळश्रुतीविण प्रयोग। ज्ञानेंविण नुसता योग। उगाच शरीरें भोगी भोग। या नांव भ्रम ॥ ३३ ॥ ब्रह्मा लिहितो अदृष्टीं[1]। आणि वाचून जाते सटी[2]। ऐशा प्रकारींच्या गोष्टी। या नांव भ्रम ॥ ३४ ॥ उदंड भ्रम विस्तारला। अज्ञानजनीं पैसावला। अल्पसंकेतें बोलिला। कळावयाकारणें ॥३५॥ भ्रमरूप विश्वस्वभावें। तेथें काय म्हणोन सांगावें। निर्गुण ब्रह्मावेगळें आघवें। भ्रमरूप ॥ ३६ ॥ ज्ञात्यास नाहीं संसार। ऐसे बोलती अपार। गत ज्ञात्यांचे चमत्कार[3]। या नांव भ्रम ॥ ३७ ॥ येथें आशंका उठिली। ज्ञात्यांची समाधि पूजिली। तेथें कांहीं प्रचीत आली। किंवा नाहीं ॥ ३८ ॥ तैसेचि अवतार संपले। त्यांचेंहि सामर्थ्य उदंड चाले। तरी ते काय गुंतले। वासना धरूनी ॥ ३९ ॥ ऐसी आशंका उद्भवली। समर्थें पाहिजे निरूपिली। इतुकेन हे संपली। कथा भ्रमाची ॥ ४० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दशमदशके भ्रमनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. सगुणभजन.

श्रीगणेशाय नमः ॥ अवतारादिक ज्ञानी संत। सारासार विचारें मुक्त। त्यांचें सामर्थ्य चालत। कोण्या प्रकारें ॥ १ ॥ हे श्रोतयांची आशंका। पाहतां प्रश्न केला निका। सावध होऊन ऐका। म्हणे वक्ता ॥ २ ॥ ज्ञानी मुक्त होऊन गेले। मागें त्यांचें सामर्थ्य चाले। परंतु ते नाहीं आले। वासना धरूनी ॥ ३ ॥ लोकांस होतो चमत्कार। लोक मानिती साचार। परंतु याचा विचार। पाहिला पाहिजे ॥ ४ ॥ जित असतां नेणों किती। जना-

---

१. कपाळावर. २. सटवी. ३. अलौकिक कृत्यें.

मध्यें चमत्कार होती । ऐसी यांची सद्यःप्रचीती । रोकडी पाहावी ॥ ५ ॥ तो तरी आपण नाहीं गेला । लोकीं प्रत्यक्ष देखिला । ऐसा हा चमत्कार झाला । यास काय म्हणावें ॥ ६ ॥ तरी हा लोकांचा भावार्थ । भाविकां देव यथार्थ । अन्यत्र कल्पना व्यर्थ । कुतर्कांच्या ॥ ७ ॥ आवडे तें स्वप्नीं देखिलें । तरी काय तेथूनि आलें । म्हणाल तेणें आठविलें । तरी द्रव्य कां दिसे ॥ ८ ॥ एवं आपली कल्पना । स्वप्नीं येती पदार्थ नाना । तरी ते पदार्थ चालतीना । अथवा आठवू नाहीं ॥ ९ ॥ येथें तुटली आशंका । ज्ञात्यास जन्म कल्पूं नका । उमजेना तरी विवेका । बरें पाहा ॥ १० ॥ ज्ञाते मुक्त होऊन गेले । त्यांचें सामर्थ्य उगेंचि चाले । कां जे पुण्यमार्गें चालिले । म्हणोनियां ॥ ११ ॥ या कारणें पुण्यमार्गें चालावें । भजन देवाचें वाढवावें । न्याय सोडून न जावें । अन्यायमार्गें ॥ १२ ॥ नाना पुरश्चरणें करावीं । नाना तीर्थाटणें फिरावीं । नाना सामर्थ्यें वाढवावीं । वैराग्यबळें ॥ १३ ॥ निश्चय बैसे वस्तूकडे । तरी ज्ञानमार्गींहि सामर्थ्य चढे । कोणी एक ऐकांत मोडे । ऐसें न करावें ॥ १४ ॥ एक गुरु एक देव । कोठें तरी असावा भाव । भावार्थ नसतां वाव । सर्व कांहीं ॥ १५ ॥ निर्गुण ज्ञान झालें । म्हणोन सगुण अलक्ष्य केलें । तरी तें ज्ञानें नागविलें । दोहींकडे ॥ १६ ॥ नाहीं भक्ति नाहीं ज्ञान । मध्येंचि पैसावलें अनुमान । म्हणोनियां जप ध्यान । सांडूंचि नये ॥ १७ ॥ सांडील सगुण भजनासी । तरी तो ज्ञाता परी अपेशी । म्हणोनियां सगुण भजनासी । सांडूंच नये ॥ १८ ॥ निष्कामबुद्धीचिया भजना । त्रैलोक्यीं नाहीं तुळणा । सामर्थ्येंविण घडेना । निष्काम भजन ॥ १९ ॥ कामनेनें फळ घडे । निष्कामभजनें भगवंत जोडे । फळभगवंतासी कोणीकडे । महदंतर ॥ २० ॥ नाना फळें देवापाशीं । आणि फळ अंतरी भगवंतासी । या कारणें परमेश्वरासी । निष्काम भजावें ॥ २१ ॥ निष्काम भजनाचें फळ आगळें । सामर्थ्य चढे मर्यादेवेगळें । तेथें बापुडीं फळें । कोणीकडे ॥ २२ ॥ भक्तें जें मनीं धरावें । तें देवें आपणचि करावें । तेथें वेगळें भावावें । नलगे कदा ॥ २३ ॥ दोनी सामर्थ्यें एक होतां । काळासि नाटोपे सर्वथा । तेथें इतरांची काय कथा । कीटकन्यायें ॥ २४ ॥

१. अन्य पदार्थ. २. निष्ठा. ३. मनांतून दूर. ४. संशय.

म्हणोनि निष्काम भजन । वरी विशेष ब्रह्मज्ञान । तयास तुळितां त्रिभुवन । उणे वाटे ॥ २५ ॥ येथें बुद्धीचा प्रकाश । आणिक न चढे विशेष । प्रताप कीर्ति आणि यश । निरंतर ॥ २६ ॥ निरूपणाचा विचार । आणि हरिकथेचा गजर । तेथें होती तत्पर । प्राणिमात्र ॥ २७ ॥ जेथें भ्रष्टाकार घडेना। तो परमार्थहि दडेना । समाधान बिघडेना । निश्चयाचें ॥ २८ ॥ सारासार विचार करणें । न्याय अन्याय अखंड पाहणें । बुद्धि भगवंताचें देणें । पालटेना ॥ २९ ॥ भक्त भगवंतीं अनन्य । त्यासि बुद्धि देतो आपण । यदर्थी भगवद्वचन । सावध ऐका ॥ ३० ॥ श्लोकार्ध ॥ ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ म्हणोन सगुण भजन । वरी विशेष ब्रह्मज्ञान । प्रत्ययाचें समाधान । दुर्लभ जगीं ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दशमदशके सगुणभजननिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. प्रचीत.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका प्रचीतीचीं लक्षणें । प्रचीत पाहतील ते शाहणे । येर[1] वेडे दैन्यवाणे । प्रचीतीविण ॥ १ ॥ नाना रत्नें नाना नाणीं । परीक्षून न घेतां होय हानी । प्रचीत न येतां निरूपणीं । बैसोंच नये ॥ २ ॥ तुरंग शस्त्र दमून पाहिलें[2] । बरें पाहतां प्रचीतीस आलें । तरी मग पाहिजे घेतलें । जाणते पुरुषीं ॥ ३ ॥ बीज उगवेल ऐसें पाहावें । तरी मग द्रव्य घालून घ्यावें । प्रचीत आलिया ऐकावें । निरूपण ॥ ४ ॥ देहीं आरोग्यता झाली । ऐसी जनास प्रचीत आली । तरी मग अगत्य घेतली । पाहिजे मात्रा ॥ ५ ॥ प्रचीतीविण औषध घेणें । तरी मग घडचि विघडणें । अनुमानानें जें कार्य करणें । तेंचि मूर्खपण ॥ ६ ॥ प्रचीतीस नाहीं आलें । आणि सुवर्ण करविलें । तरी मग जाणावें ठकिलें । देखत देखतां ॥ ७ ॥ शोधून पाहिल्याविण । कांहीं तरी एक कारण । होणार नाहीं निर्वाणीं[3] । प्राणास घडे ॥ ८ ॥ म्हणोन अनुमानाचें कार्य । भल्यानें कदापि करूं नये । उपाय पाहतां अपाय । नेमस्त घडे ॥ ९ ॥ पाण्यांतील म्हैसीची सौटी । करणें हे बुद्धिच खोटी । शोधिल्याविण हिंपुटी । होणें घडे ॥ १० ॥

---

१. इतर. २. घोडा अथवा शस्त्र फिरवून पाहिल्यावर. ३. नाश. ४. सवदा.

विश्वासें घर घेतलें । ऐसें कधीं नाहीं ऐकिलें । मैंद[1] मैंदावें केलें । परी तें शोधिलें पाहिजे ॥ ११ ॥ शोधिल्याविण अन्नवस्त्र घेणें । तेणें प्राणास मुकणें । लटिक्याचा विश्वास धरणें । हेंचि मूर्खपण ॥ १२ ॥ संगती चोरांची धरितां । घात होईल तत्वतां । ठक सितरू[2] शोधितां । ठायीं पडे ॥ १३ ॥ गैरसाळै[3] तालमागिरी । कोणी नवी मुद्रा करी । नाना कपट परोपरी । शोधून पहावें ॥ १४ ॥ दिवाळखोराचा मांड । पाहतां वैभवहि दिसे उदंड । परी तें अवघें थोतांड । भंड पुढें ॥ १५ ॥ तैसें प्रचीतीविण ज्ञान । तेथें नाहीं समाधान । करून बहुतांचें अनुमान । अनहित केलें ॥ १६ ॥ मंत्र यंत्र उपदेशिले । नेणते प्राणी गोविले । जैसें झांकून मारिलें । दुखणाइत ॥ १७ ॥ वैद्य पाहिला परी काचा । तरी प्राण गेला पोराचा । येथें उपाय दुसऱ्याचा । काय चाले ॥ १८ ॥ स्वदुःखें अंतरीं झिजे । आणि वैद्य पुसतां लाजे । तरी मग तयासि साजे । आत्महत्यारेपण ॥ १९ ॥ जाणत्यावरी गर्व गेला । परी तो नेणत्याकारितां बुडाला । येथें कोणाचा घात झाला । बरें पाहा ॥ २० ॥ पापाची खंडणा झाली । जन्मयातना चुकली । ऐसी स्वयें प्रचीत आली । म्हणिजे बरें ॥ २१ ॥ परमेश्वरासि ओळखिलें । आपण कोण ऐसें कळलें । आत्मनिवेदन झालें । म्हणिजे बरें ॥ २२ ॥ ब्रह्मांड कोणें केलें । कासयाचें उभारलें । मुख्य कर्त्यास ओळखिलें । म्हणिजे बरें ॥ २३ ॥ जेथें अनुमान राहिलें । तरी परमार्थ केले ते वायां गेले । प्राणी संशयीं बुडालें । प्रचीतीविण ॥ २४ ॥ हेंचि परमार्थाचें वर्म । लटिकें बोलेल तो अधम । लटिकें मानील तो अधमाधम । यथार्थ जाणावा ॥ २५ ॥ येथें बोलण्याची झाली सीमा । नेणतां न कळे परमात्मा । असत्य नाहीं सर्वोत्तमा । तूंचि जाणसी ॥ २६ ॥ माझे उपासनेचा बडिवार । ज्ञान सांगावें साचार । मिथ्या बोलतां उत्तर । प्रभूसि लागे ॥ २७ ॥ म्हणोनि सत्याचि बोलिलें । कर्त्यास पाहिजे ओळखिलें । मायोद्भवाचें शोधिलें । पाहिजे मूळ ॥ २८ ॥ तेंचि पुढें निरूपण । बोलिलें बोलिजे प्रमाण । श्रोतीं सावध अंतःकरण । घातलेंचि घालावें ॥ २९ ॥ सूक्ष्म निरूपण लागलें । तेथें बोलिलेंचि मागुती बोलिलें । श्रोतयांस पाहिजे उमजलें । म्हणोनिया

---

१. फांसेगारानें. २. फसव्या. ३. दुर्वर्तनी. ४. पसारा.

॥ ३० ॥ प्रचीत पाहतां निकट । उठोन जाती परिपाठ[1] । म्हणोन हे खटपट । करणें लागे ॥ ३१ ॥ परिपाठेंचि जरी बोलिलें । तरी प्रचीत समाधान बुडालें । प्रचीतसमाधान राखिलें । तरी परिपाठ उडे ॥३२॥ ऐसीं साकडीं दोहींकडे । म्हणोनि बोलिलेंचि बोलणें घडे । दोन्ही राखोनियां कोडें । उकलून दाऊं ॥३३॥ परिपाठ आणि प्रचीतप्रमाण । दोन्ही राखोन निरूपण । श्रोते परम विचक्षण । विवरोत पुढें ॥ ३४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दशमदशके प्रचीतनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. प्रकृतिपुरुषनिदर्शन.

श्रीगणेशाय नमः ॥ आकाशीं वायु झाला निर्माण । तैसी ब्रह्मीं मूळमाया जाण । त्या वायूमध्यें त्रिगुण । आणि पंचभूतें ॥ १ ॥ वटबीजीं असे वड । फोडून पाहतां न दिसे झाड । नाना वृक्षांचे जुंबाड । बीजापासून होती ॥ २ ॥ तैसी बीजरूप मूळमाया । विस्तार झाला तेथूनिया । तिचें स्वरूप शोधूनिया । बरें पाहा ॥ ३ ॥ तेथें दोनी भेद दिसती । विवेकें पाहावी प्रचीती । निश्चळीं जे चंचळ स्थिति । तोचि वायु ॥ ४ ॥ तयामध्यें जाणीवकळा । जगज्ज्योतीचा जिव्हाळा । वायु जाणीव मिळोन मेळा । मूळमाया बोलिजे ॥ ५ ॥ सरिता[2] म्हणतां बायको भासे । तेथें पाहतां पाणीच असे । विवेकी हो समजा तैसें । मूळमायेसी ॥ ६ ॥ वायु जाणीव जगज्योती । तयास मूळमाया म्हणती । पुरुष आणि प्रकृती । याचेंच नांव ॥ ७ ॥ वायूस म्हणती प्रकृती । आणि पुरुष म्हणती जगज्ज्योती । पुरुष प्रकृति शिव शक्ती । याचेंच नांव ॥ ८ ॥ वायूमध्यें जाणीव विशेष । तोचि प्रकृतीमध्यें पुरुष । ये गोष्टीचा विश्वास । धरिला पाहिजे ॥ ९ ॥ वायु शक्ति जाणीव ईश्वर । अर्धनारी नटेश्वर । लोक म्हणती निरंतर । येणें प्रकारें ॥ १० ॥ वायूमध्यें जाणीव गुण । तेंचि ईश्वराचें लक्षण । तयापासून त्रिगुण । पुढें झाले ॥ ११ ॥ तया गुणांमध्यें सत्वगुण । निखिल जाणीव लक्षण । त्याचा देहधारी आपण । विष्णु जाहला ॥ १२ ॥ त्याच्या अंगें जग चाले । ऐसें भगवद्गीता बोले । गुंतलें तेंचि उगवलें[3] । विचार पाहतां ॥ १३ ॥ एक

---

१. संप्रदाय. २. नदी. ३. उलगडलें.

जाणीव वांटली । प्राणिमात्रास विभागली । जाणजाणों वांचविली । सर्व काया ॥ १४ ॥ तयेचें नांव जगज्योती । प्राणिमात्र तिचेनि जगती । याची रोकडी प्रचीती । प्रत्यक्ष पाहावी ॥ १५ ॥ पक्षी श्वापद किडा मुंगी । कोणी एक प्राणी जगीं । जाणीव खेळे त्याचे अंगीं । निरंतर ॥ १६ ॥ जाणोन काया पळविती । तेणें गुणें प्राणी वांचती । दडती आणि लपती । जाणजाणों ॥ १७ ॥ अवघ्या जगास वांचविती । म्हणोन नामें जगज्योती । ते गेलिया प्राणी मरती । जेथील तेथें ॥ १८ ॥ मुळींच जाणीवेचा विकार । पुढें झाला विस्तार । जैसे उदकाचे तुषार । अनंत रेणू ॥ १९ ॥ तैसें देव देवता भूतें । मिथ्या म्हणों नये त्यांतें । आपुलाल्या सामर्थ्यें ते । सृष्टिमध्यें फिरती ॥ २० ॥ सदा विचरती वायुस्वरूपें । स्वइच्छा पालटती रूपें । अज्ञान प्राणी भ्रमे संकल्पें । त्यासि बाधिती ॥ २१ ॥ ज्ञात्यासि संकल्पचि असेना । म्हणोन त्यांचेनि बाधवेना । या कारणें आत्मज्ञाना । अभ्यासावें ॥ २२ ॥ अभ्यासिल्या आत्मज्ञान । सर्व कर्मं होये खंडण । हे रोकडी प्रचीत प्रमाण । संदेह नाहीं ॥ २३ ॥ ज्ञानेंविण कर्म विवंडे । हें तों कल्पांतीं न घडे । सद्गुरुविण ज्ञान जोडे । हेंहि अघटित ॥ २४ ॥ म्हणोन सद्गुरु करावा । सत्संग शोधून धरावा । तत्वविचार विवरावा । अंतर्यामीं ॥ २५ ॥ तत्वें तत्व निरसोन जातां । आपला आपणचि तत्वतां । अनन्यभावें सार्थकता । सहजचि जाहली ॥ २६ ॥ विचार न करितां जें जें केलें । तें तें वाउगेंच व्यर्थ गेलें[1] । म्हणोनि विचारीं प्रवर्तलें । पाहिजे आधीं ॥ २७ ॥ विचार पाहील तो पुरुष । विचार न पाहे तो पशु । ऐसीं वचनें सर्वेश । ठायीं ठायीं बोलिला ॥ २८ ॥ सिद्धांत साधावयाकारणें । पूर्वपक्ष लागे उठवणें । परंतु साधकांसी निरूपणें । साक्षात्कार ॥ २९ ॥ श्रवण मनन निदिध्यास । प्रचीतीनें बाणतां विश्वास । रोकडा साक्षात्कार सायास । करणेंचि नलगे ॥३०॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दशमदशके प्रकृतिपुरुषनिदर्शननिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

१. फलशून्य होतें.

## १०. चलाचल.

श्रीगणेशाय नमः ॥ गगनासारिखें ब्रह्म पोकळ । उदंड उंच अंतराळ । निर्गुण निर्मळ निश्चळ । सदोदित ॥ १ ॥ त्यास परमात्मा म्हणती । आणिक नामें सांगों किती । परी तें जाणिजे आदि अंतीं । जैसें तैसें ॥२॥ विस्तीर्ण पसरला पैस । भोंवता दाटला अवकाश । भासचि नाहीं निराभास । जैसें तैसें ॥ ३ ॥ चहूंकडे पाताळातळीं । अंतचि नाहीं अंतराळीं । कल्पांत-काळीं सर्वकाळीं । संचलेंचि असे ॥ ४ ॥ ऐसें कांहींएक चंचळ । तें अचंचळीं भासे चंचळ । त्यास नामेंही सकळ । विविध प्रकारें ॥ ५ ॥ न दिसतां नाम ठेवणें । न देखतां खूण सांगणें । असीं हीं जाणावयाकारणें । नामाभिधानें ॥ ६ ॥ मूळमाया मूळप्रकृती । मूळपुरुष ऐसें म्हणती । शिव-शक्ति नामें किती । नाना प्रकारें ॥ ७ ॥ परी जें नाम ठेविलें जया । आधीं ओळखावें तया । प्रचीतीविण कासया । वल्गना करावी ॥ ८ ॥ रूपाची न धरितां सोय । नामासरिसें भरंगळों नये । प्रत्ययेंविण गळंगा[1] होय । अनुमानज्ञानें ॥ ९ ॥ निश्चळ गगनीं चंचळ वारा । वाजों लागला भरारा । परी त्या गगना आणि समीरा । भेद आहे ॥ १० ॥ तैसें निश्चळ परब्रम्ह । चंचळ माया भासला भ्रम । त्या भ्रमाचा संभ्रम[2] । करून दावूं ॥ ११ ॥ जैसा गगनीं चालिला पवन । तैसें निश्चळीं झालें चळण । इच्छा स्फूर्ति लक्षण । स्फुरणरूप ॥ १२ ॥ अहंपणें जाणाव झाली । तेचि मूळ-प्रकृति बोलिली । महाकारण काया रचिली । ब्रह्मांडाची ॥१३॥ महामाया मूळप्रकृती । कारण ते अव्याकृती । सूक्ष्म हिरण्यगर्भ म्हणती । विराट ते स्थूळ ॥ १४ ॥ ऐसें पंचीकरणें[3] शास्त्रप्रमेय[4] । ईश्वरतनुचतुष्टयें[5] । म्हणोन हें बोलणें होय । जाणीव मूळमाया ॥१५॥ परमात्मा परमेश्वर । परेश ज्ञानघन ईश्वर । जगदीश जगदात्मा जगदीश्वर । पुरुष नामें ॥१६॥ आत्मा अंतरात्मा विश्वात्मा । द्रष्टा साक्षी सर्वात्मा । क्षेत्रज्ञ शिवात्मा जीवात्मा । देहीं कूटस्थ बोलिजे ॥ १७ ॥ इंद्रात्मा ब्रम्हात्मा हरिहरात्मा । यमात्मा धर्मात्मा नैर्ऋ-तात्मा । वरुण वायु कुबेरात्मा । ऋषिदेवमुनिधर्ता ॥ १८ ॥ गण गंधर्व

---

१. घोंटाळा. २. खुलासा. ३. पचतत्वांचें मिश्रण. ४. शास्त्राचे सिद्धांत. ५. विराट्, हिरण्यगर्भ, अव्याकृत व मूळ प्रकृति हे ब्रह्मांडाचे चार देह.

विद्याधर । यक्ष किन्नर नारद तुंबर । सर्व लोकांचें अंतर । तो सर्वात्मा बोलिजे ॥१९॥ चंद्र सूर्य तारामंडळें । भूमंडळें मेघमंडळें । एकवीस स्वर्गें सप्त पाताळें । अंतरात्माच वर्तवी ॥ २० ॥ गुप्तवल्ली पाल्हाळली । तिचीं पुरुषनामें घेतलीं । आतां स्त्रीनामें ऐकिलीं । पाहिजे श्रोतीं ॥ २१ ॥ मूळमाया जगदीश्वरी । परम विद्या परमेश्वरी । विश्वविद्या विश्वेश्वरी । त्रैलोक्यजननीं ॥ २२ ॥ अंतर्हेतु अंतर्कळा । मौन्यगर्भ जाणीवकळा । चपळा जगज्योति जीवनकळा । परा पश्यंती मध्यमा ॥ २३ ॥ युक्ति बुद्धि मति धारणा । सावधानता नाना चाळणा । भूत भविष्य वर्तमाना । उकलून दावी ॥ २४ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति जाणे । तुर्या तटस्थावस्था जाणे । सुख दुःख सकळ जाणे । मानापमान ॥ २५ ॥ ते परम कठिण कृपाळू । ते परम कोमळ स्नेहाळू । ते परम क्रोधी लोभाळू । मर्यादेवेगळी ॥ २६ ॥ शांति क्षमा विरक्ति भक्ती । अध्यात्मविद्या सायुज्य-मुक्ती । विचारणा सहजस्थिती । जयेचेनी ॥ २७ ॥ पूर्वीं पुरुषनामें बोलिलीं । उपरि स्त्रीनामें निरूपिलीं । आतां नपुंसकनामें ऐकिलीं । पाहिजे चंचळाचीं ॥ २८ ॥ सत्तारूप ज्ञानस्वरूप । प्रकाशरूप ज्योतिरूप । कारणरूप चिद्रूप[1] । शुद्ध सूक्ष्म अलिप्त ॥ २९ ॥ जाणणें अंतःकरण चित्त । श्रवण मनन चैतन्य जीवित । येतें जातें सुचित्त । होऊन ऐका ॥ ३० ॥ मीपण तूंपण जाणपण । ज्ञातेपण सर्वज्ञपण । जीवपण शिवपण ईश्वरपण । अलिप्तपण बोलिजे ॥ ३१ ॥ ऐसी नामें उदंड असती । परी ते एकचि जगज्योती । विचारवंत ते जाणती । सर्व अंतरात्मा ॥ ३२ ॥ आत्मा जगज्योति सर्वज्ञपण । तिन्ही मिळोनि एकचि जाण । अंतर्कळाचि प्रमाण । ज्ञप्तिमात्र[2] ॥ ३३ ॥ ढीग झाले पदार्थांचे । पुरुष स्त्री नपुंसक नामांचे । परंतु सृष्टिरचनेचे । किती म्हणोन सांगावे ॥ ३४ ॥ सकळां चाळिता एक । अंतरात्मा वर्तवी अनेक । मुंगीपासून ब्रह्मादिक । तेणेंचि चालती ॥ ३५ ॥ तो अंतरात्मा आहे कैसा । प्रस्तुत ओळखाना आभासा । नाना प्रकारींचा तमासा । येथेंचि आहे ॥ ३६ ॥ तो कळतो परी दिसेना । प्रचित येते परी भासेना । शरीरीं असे परी वसेना । एके ठायीं ॥ ३७ ॥ तीक्ष्णपणें

---

१. ज्ञानस्वरूप २. सूक्ष्मपणें.

गगनीं भरे । सरोवर देखतांच पसरे । पदार्थ रक्षून उरे । चहूंकडे ॥ ३८ ॥ जैसा पदार्थ दृष्टीस दिसतो । तो त्या पदार्थासारिखाच होतो । वायूहून विशेष तो । चंचळविषयीं ॥ ३९ ॥ कित्येक दृष्टीनें देखे । कित्येक रसनेनें चाखे । कित्येक ते वोळखे । मनेंकरूनी ॥ ४० ॥ श्रोत्रीं[1] बैसोन शब्द ऐकतो । घ्राणेंद्रियें[2] वास घेतो । त्वचेंद्रियें[3] जाणतो । शीतोष्णादिक ॥ ४१ ॥ ऐशा जाणे अंतरकळा । सकळांमध्यें परी निराळा । पाहतां त्याची अगाध लीला । तोचि जाणे ॥ ४२ ॥ तो पुरुष ना सुंदरी । बाळ तरुण ना कुमारी । नपुंसकाचा देहधारी । परी नपुंसक नव्हे ॥ ४३ ॥ तो चालवी सकळ देहांसी । करून अकर्ता म्हणती त्यासी । तो क्षेत्रज्ञ क्षेत्रवासी । देहीं कूटस्थ बोलिजे ॥ ४४ ॥ श्लोक ॥ द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ॥ क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १ ॥ टीका ॥ दोनी पुरुष लोकीं असती । क्षराक्षर बोलिजेती । सर्व भूतें क्षर म्हणती । अक्षर कूटस्थ बोलिजे ॥ ४५ ॥ उत्तम पुरुष तो आणिक । निष्प्रपंच आणि निष्कलंक । निरंजन परमात्मा एक । निर्विकारी ॥ ४६ ॥ चारी देह निरसावे । साधकें देहातीत व्हावें । देहातीत होतां जाणावें । अनन्य भक्त ॥ ४७ ॥ देहमात्र निरसोन गेला । तेथें अंतरात्मा कैंचा उरला । निर्विकारीं विकारला । विकारचि नाहीं ॥ ४८ ॥ निश्चळ परब्रह्म एक । चंचळ जाणावें मायिकें[4] । ऐसा प्रत्यय निश्चयात्मक । विवेकें पाहावा ॥ ४९ ॥ येथें बहुत नलगे खळखळ । एक चंचळ एक निश्चळ । शाश्वत कोण हें केवळ । ज्ञानें ओळखावें ॥ ५० ॥ असार त्यागून घेइजे सार । म्हणोन सारासार विचार । नित्यानित्य निरंतर । पाहती ज्ञानी ॥ ५१ ॥ जेथें ज्ञानाचें होतें विज्ञान । जेथें मनचि होतें उन्मन । तेथें कैंचें चंचळपण । आत्मयासी ॥ ५२ ॥ सांगणी वांगणीचें काम नव्हे । आपुल्या अनुभवें जाणावें । प्रत्ययेंविण सिणावें । तेंचि पाप ॥ ५३ ॥ सत्याएवढें सुकृत[5] नाहीं । असत्याएवढें पाप नाहीं । प्रचीतीविण कोठेंचि नाहीं । समाधान ॥ ५४ ॥ सत्य म्हणिजे स्वरूप जाण । असत्य माया हें प्रमाण । येथें निरूपिलें पाप पुण्य । रूपेंसहित ॥ ५५ ॥ दृश्य पाप वोसरलें । पुण्य परब्रह्म उरलें । अनन्य होतांच झालें । नामा-

१. कानामध्यें. २. नाकामध्यें. ३. त्वचेमध्यें. ४. खोटें. ५. पुण्य.

तीत[१] ॥ ५६ ॥ आपण वस्तुच स्वतःसिद्ध । तेथें नाहीं देहसंबंध । पापराशी होती दग्ध । येणें प्रकारें ॥ ५७ ॥ येऱ्हवीं ब्रह्मज्ञानेंविण । जें जें साधन तो तो सिण । नाना दोषांचें क्षाळण । होईल कैसें ॥ ५८ ॥ पापाचें वळलें शरीर । पापचि वडे तदनंतर । अंतरीं रोग वरी उपचार । काय करी ॥ ५९ ॥ नाना क्षेत्रीं हें मुंडलें । नाना तीर्थीं हें दंडिलें । नाना निग्रहीं खंडिलें । ठायीं ठायीं ॥ ६० ॥ नाना मृत्तिकेनें घांसिलें । अथवा तप्तमुद्रेनें क्षोंशिलें[२] । जरी हें वरीवरी तासिलें । तरी शुद्ध नव्हे ॥ ६१ ॥ शेणाचे गोळे गिळिले । गोमूत्राचे मोंघे[३] घेतले । माळा रुद्राक्ष घातले । काष्ठमणी ॥ ६२ ॥ वेष वारिवरी केला । अंतरीं दोष भरला । त्या दोषाच्या दहनाला । आत्मज्ञान पाहिजे ॥ ६३ ॥ नाना व्रतें नाना दानें । नाना योग तीर्थाटणें । सर्वांहून[४] कोटिगुणें । महिमा आत्मज्ञानाचा ॥ ६४ ॥ आत्मज्ञान पाहे सदा । त्याच्या पुण्यास नाहीं मर्यादा । दुष्ट पातकांची बाधा । निरसोन गेली ॥ ६५ वेदशास्त्रीं सत्यस्वरूप । तेंचि ज्ञानियाचें रूप । पुण्य झालें अमूर्प[४] । सुकृतें सीमा सांडिली ॥ ६६ ॥ ह्या प्रचीतीच्या गोष्टी । प्रचीत पाहावी आत्मदृष्टी । प्रचीतीवेगळें कष्टी । होऊं नये ॥ ६७ ॥ अगा हे प्रचीतीचे लोक हो । प्रचीत नसतां अवघा शोक हो । रघुनाथकृपेनें राहो । प्रत्यय निश्चयाचा ॥ ६८ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दशमदशके चळाचळनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी ३५४.

---

# दशक अकरावा.

## १. सिद्धान्त.

श्रीगणेशाय नमः ॥ आकाशापासून वायु होतो । हा तों प्रत्यय येतो । वायूपासून अग्नि होतो । सावध ऐका ॥ १ ॥ वायूची कठिण घंसणी[५] । येथें निर्माण झाला वन्ही[६] । मंद वायु शीतळ पाणी । तेथून जाहलें ॥ २ ॥ आंपापासून[७] झाली पृथ्वी । ते नाना बीजरूप जाणावी । बीजापासून उत्पत्ति

१. नामरहित. २. डागलें. ३. एक मातीचें भांडें. ४. पुष्कळ. ५. घर्षण. ६. अग्नि. ७. जलापासून.

व्हावी । हा स्वभावचि आहे ॥ ३ ॥ मुळीं सृष्टि कल्पनेची । कल्पना आहे मुळींची । तयेपासून देवत्रयांची[1] । काया जाहली ॥ ४ ॥ निश्चळामध्यें चंचळ । तेचि कल्पना केवळ । अष्टधा प्रकृतीचें मूळ । कल्पनारूप ॥ ५ ॥ कल्पनेचि अष्टधा प्रकृति । अष्टधा तेचि कल्पनामूर्ति । मूळाग्रापासून उत्पत्ती । अष्टधा जाणा ॥ ६ ॥ पंच भूतें तीन गुण । आठ झालीं दोनी मिळोन । म्हणोनि अष्टधा प्रकृति जाण । बोलिजेते ॥ ७ ॥ मुळीं कल्पनारूप झाली । पुढें तेचि फांपावली । केवळ जडत्वा आली । सृष्टिरूपें ॥ ८ ॥ मुळीं झाली ते मूळमाया । त्रिगुण झाले ते गुणमाया । जडत्व पावली ते अविद्यामाया । सृष्टिरूपें ॥ ९ ॥ पुढें चारी खाणी[2] झाल्या । चारी वाणी विस्तारल्या । नाना योनि प्रगटल्या । नाना व्यक्ति ॥ १० ॥ ऐसी झाली उभारणी । आतां ऐका संहारणी । मागिले दशकीं विशद करूनी । बोलिलें असे ॥ ११ ॥ परंतु आतां संकलित । बोलिजेल संहारसंकेत । श्रोते वक्ते एकचित्त । होऊन ऐका ॥ १२ ॥ शत वरुषें अनावृष्टि । तेणें आटेल जीवसृष्टी । ऐशा कल्पाताच्या गोष्टी । शास्त्रीं निरूपिल्या ॥ १३ ॥ बारा कळीं तपे सूर्य । तेणें पृथ्वीची रक्षा होय । मग रक्षा विरोन जाय । जळांतरीं ॥ १४ ॥ तें जळ शोषी वैश्वानर । वन्हि झडपी समीर । समीर वितुळे निराकार । जैसें तैसें ॥ १५ ॥ ऐसी सृष्टिसंहारिणी झाली । मागें विस्तारें बोलिली । माया- निरासें उरली । स्वरूपस्थिती ॥ १६ ॥ तेथें जीव शिव पिंड ब्रह्मांड । आटोनि गेलें थोतांड । माया अविद्येचें बंड । वितळोन गेलें ॥ १७ ॥ विवेकेंचि बोलिला क्षय । ह्मणोन विवेकप्रळय । विवेकी जाणती सोय । मूर्खांस कळेना ॥ १८ ॥ सृष्टि शोधितां सकळ । एक चंचल एक निश्चळ । चंचळास कर्ता चंचळ । चंचळरूपी ॥ १९ ॥ जो सकळ शरीरीं वर्ते । सकळ कर्तृत्वास प्रवर्ते । करून अकर्ता हा वर्ते । शब्द जया ॥ २० ॥ राव रंक ब्रह्मादिक । सकळांमध्यें वर्ते एक । नाना शरीरीं चाळक । इंद्रियद्वारें ॥ २१ ॥ त्यास परमात्मा बोलती । सकळकर्ता ऐसें म्हणती । परी तो नासेल प्रचीती । विवेकें पाहावी ॥ २२ ॥ जो श्वानामध्यें गुरगुर करितो । जो सूकरामध्यें कुर्कुरतो । गाढवीं भरोन भुंकितो । अट्टहास्यें ॥ २३ ॥ लोक नाना

१. ब्रह्माविष्णुमहेशांची. २. जारज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज हे चारप्रकार.

देह देखती । विवेकी देहांतर पाहती । पंडित समदर्शनें घेती । येणें प्रकारें ॥ २४ ॥ श्लोक ॥ विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ॥ शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १ ॥ देह पाहतां वेगळाले । परंतु अंतर एकचि झालें । प्राणिमात्र देखिलें । एका अंतरें ॥२५॥ अनेक प्राणी निर्माण होती। परी एकचि कळा वर्तती । तया नांव जगज्योती । जाणती कळा ॥ २६ ॥ श्रोत्रीं नाना शब्द जाणे । त्वचेमध्यें शीतोष्ण जाणे । चक्षूमध्यें पाहों जाणे। नाना पदार्थ ॥ २७ ॥ रसनेमध्यें रस जाणे । घ्राणामध्यें वास तो जाणे । कर्मेंद्रियामध्यें जाणे । नाना विषयस्वाद ॥ २८ ॥ सूक्ष्मरूपें स्थूळ रक्षी । नाना सुखदुःखें परीक्षी । त्यास म्हणती अंतरसाक्षी । अंतरात्मा ॥ २९ ॥ आत्मा अंतरात्मा विश्वात्मा । चैतन्य सर्वात्मा सूक्ष्मात्मा । जीवात्मा शिवात्मा परमात्मा । द्रष्टा साक्षी सत्तारूप ॥ ३० ॥ विकारांमधील विकारी। अखंड नाना विकार करी । तयास वस्तु म्हणती भिकारी । परम हीन ॥ ३१ ॥ सर्व एकचि देखती । अवघा एकाकार करिती । अवघी मायिक स्थिती । चंचळामध्यें ॥ ३२ ॥ चंचळ माया ते मायिक । निश्चळ परब्रह्म एक । नित्यानित्य विवेक । या कारणें ॥ ३३ ॥ जाणता जीव तो ज्ञान । नेणता जीव तो अज्ञान । जन्मतो जीव तो जाण । वासनात्मक ॥ ३४ ॥ ऐक्यजीव तो ब्रह्मांश । जेथें पिंडब्रह्मांडानिरास । येथें सांगितले विशेष । चार जीव ॥ ३५ ॥ असो हें अवघें चंचळ । चंचळ जाईल सकळ । निश्चळ तें निश्चळ । आदिअंतीं ॥३६॥ आद्य मध्य अवसान । जे वस्तु समसमान । निर्गुण निर्विकारी निरंजन । निःसंग निष्प्रपंच ॥ ३७ ॥ उपाधिनिरासें तत्वतां । जीवशिवांस ऐक्यता । विवंचून पाहूं जातां । उपाधि कैंची ।।३८॥ असो जाणणें तितुकें ज्ञान[1] । परंतु होतसे विज्ञान[2] । मनें ओळखावें उन्मन । कोण्या प्रकारें ॥ ३९ ॥ वृत्तीस न कळे निवृत्ती । गुणास कैंची निर्गुणप्राप्ती । गुणातीत साधक संतीं । विवेकें कळे ॥ ४० ॥ श्रवणापरीस मनन थोर । मननें कळे सारासार । निदिध्यासें साक्षात्कार । निःसंग वस्तु ॥ ४१ ॥ निर्गुणीं जे अनन्यता । तेचि मुक्ती सायुज्यता । लक्ष्यांश वाच्यांश आतां । पुरे झाला ॥ ४२ ॥ अलक्ष्यीं राहिलें लक्ष । सिद्धांतीं कैंचा पूर्व-

---

१. बुद्धीस आकलन झालेलें. २. प्रत्यक्ष अनुभवास आलेलें.

पक्ष । अप्रत्यक्षास कैंचें प्रत्यक्ष । असोन नाहीं ॥ ४३ ॥ असोन मायिक उपाधी । तोंच सहजसमाधी । श्रवणें बळावली बुद्धी । निश्चयाची ॥ ४४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके सिद्धांतनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. चत्वार देव.

श्रीगणेशाय नमः ॥ एक निश्चळ एक चंचळ । चंचळीं गुंतलें सकळ । निश्चळ तें निश्चळ । जैसें तैसें ॥ १ ॥ पाहे निश्चळाचा विवेक । ऐसा लक्षांमध्यें एक । निश्चळाऐसा निश्चयात्मक । निश्चळचि तो ॥ २ ॥ या निश्चळाच्या गोष्टी सांगती । पुनः चंचळाकडे धांवती । चंचळचक्रीं[1] निघोन जाती । ऐसे थोडे ॥ ३ ॥ चंचळीं चंचळ जन्मलें । चंचळामध्यें वाढलें । अवघें चंचळचि बिंबलें । जन्मवरी ॥ ४ ॥ पृथ्वी अवघी चंचळाकडे । करणें तितुकें चंचळीं घडे । चंचळ सांडून निश्चळीं पैंवाडे[2] । ऐसा कैंचा ॥ ५ ॥ चंचळ कांहीं निश्चळेना । निश्चळ कदापि चळेना । नित्यानित्य विवेकें जना । उमजे कांहीं ॥ ६ ॥ कांहीं उमजलें तरी नुमजे । कांहीं समजलें तरी न समजे । कांहीं बुझे तरी निर्बुजे । किंचिन्मात्र ॥ ७ ॥ संदेह अनुमान आणि भ्रम । अवघा चंचळामध्यें भ्रम । निश्चळीं कदा नाहीं वर्म । समजलें पाहिजे ॥ ८ ॥ चंचळाकार तितुकी माया । मायिक जाय विलया । लहान थोर म्हणावया । कार्य नाहीं ॥ ९ ॥ सगटें[3] माया विस्तारली । अष्टधा प्रकृति फांपावली । चित्रविचित्र विकारली । नाना रूपें ॥ १० ॥ नाना उत्पत्ति नाना विकार । नाना प्राणी लहान थोर । नाना पदार्थचमत्कार । नाना रूपें ॥ ११ ॥ विकारवंत विकारलें । सूक्ष्म जडत्वास आलें । अमर्याद दिसों लागलें । कांहींच्या बाही ॥ १२ ॥ मग नाना शरीरें निर्माण झालीं । नाना नामाभिधानें ठेविलीं । भाषापरत्वें कळों आलीं । कांहीं कांहीं ॥१३॥ मग नाना रीती नाना दंडकें[4] । आचार एकाहूनि एक । वर्तों लागले सकळ लोक । लोकाचारें ॥ १४ ॥ अष्टधा प्रकृतीचीं शरीरें । निर्माण झालीं लहान थोरें । पुढें आपल्या प्रकारें । वर्तों

१. मायेच्या चक्रांतून. २. प्रवेश करील. ३. सर्व प्रकारें. ४. परंपरा.

लागलीं ॥१५॥ नाना मतें निर्माण झालीं । नाना पाषांडें वाढलीं । नाना प्रकारचीं उठिलीं । नाना बंडें ॥ १६ ॥ जैसा प्रवाह पडिला । तैसाच लोक चालिला । कोण वारील कोणाला । एक नाहीं ॥ १७ ॥ पृथ्वीचा झाला गळांठा । एक लहान एक मोठा । कोण खरा कोण खोटा । कोण जाणे ॥ १८ ॥ आचार बहुचकींत[1] पडिला । कित्येक पोटासाठीं बुडाला । अवघा वरपंगाचि[2] झाला । साभिमानें ॥ १९ ॥ देव झाले उदंड । देवांचें मांडिलें भंड । भूतां देवतांचें थोतांड । एकचि जाहलें ॥ २० ॥ मुख्य देव तो कळेना । कशास कांहींच मिळेना । एकास एक वळेना । अनावर ॥ २१ ॥ ऐसा नासला विचार । कोण पाहतो सारासार । कैंचा लहान कैंचा थोर । कळेचि ना ॥ २२ ॥ शास्त्रांचा बाजार भरला । देवांचा गलबला झाला । लोक कामनेच्या व्रताला । झोंबोन पडती ॥ २३ ॥ ऐसें अवघें नासलें । सत्यासत्य हारपलें । अवघें अनायक[3] झालें । चहूंकडे ॥ २४ ॥ मतामतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला । जो जे मतीं सांपडला । तयासी तेंचि थोर ॥ २५ ॥ असत्याचा साभिमान । तेणें पाविजे पतन । म्हणोनियां ज्ञाते जन । सत्य शोधिती ॥ २६ ॥ लोक वर्तती सकळ । तें ज्ञात्यांस करतळामळ[4] । आतां ऐका केवळ । विवेकी हो ॥ २७ ॥ लोक कोण्या पंथें जाती । आणि कोण्या देवास भजती । ऐसी हे रोकडी प्रचीती । सावध ऐका ॥ २८ ॥ मृत्तिका धातु पाषाणादिक । ऐसिया प्रतिमा अनेक । बहुतेक लोकांचा दंडक[5] । प्रतिमा देवीं ॥ २९ ॥ नाना देवांचे अवतार । चरित्रें ऐकती एक नर । जप ध्यान निरंतर । करिती पूजा ॥ ३० ॥ एक सकळांचा अंतरात्मा । विश्वीं वर्ते जो विश्वात्मा । द्रष्टा साक्षी ज्ञानात्मा । मानिती एक ॥ ३१ ॥ एक ते निर्मळ निश्चळ । कदापि नव्हेति चंचल । अनन्यभावें केवळ । वस्तुच ते ॥ ३२ ॥ एक नाना प्रतिमा । दुसरा अवतारमहिमा । तिसरा तो अंतरात्मा । चौथा तो निर्विकारी ॥ ३३ ॥ ऐसे हे चार देव । सृष्टीमधील स्वभाव । या वेगळा अंतर्भाव[6] । कोठेंचि नाहीं ॥ ३४ ॥ अवघें एकचि मानती । ते साक्षें[7] देव जाणती । परंतु अष्टधा प्रकृती । वोळखिली

१. टवाळी करण्यांत. २. बाह्यात्कारी. ३. बेबंदशाही. ४. हातचे आंवळ्यासारखें स्पष्ट. ५. पूजनाचा परिपाठ. ६. पोटभाग. ७. प्रत्यक्ष.

पाहिजे ॥ ३५ ॥ प्रकृतीमधील देव । तो प्रकृतीचा स्वभाव । भावातीत महानुभाव । विवेकें जाणावा ॥ ३६ ॥ जो निर्मळास ध्याईल । तो निर्मळचि होईल । जो जयास भजेल । तो तद्रूप जाणावा ॥ ३७ ॥ क्षीर नीर निवडिती । ते राजहंस बोलिजेती । सारासार जाणती । महानुभाव ॥३८॥ अरे जो चंचळास भजेल । तो सहजचि चळेल । जो निश्चळास भजेल । तो निश्चळचि ॥ ३९ ॥ प्रकृतीसारिखें चालावें । परी अंतरीं शाश्वत ओळखावें । सत्य[1] होऊन वर्तावें । लोकांऐसें ॥ ४० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके चत्वारदेवनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥२॥

## ३. शिक्षा.

श्रीगणेशाय नमः ॥ बहुतां जन्मांचा शेवट । नरदेह सांपडे अवचट । येथें वर्तावें चोखट । नीतिन्यायें ॥ १ ॥ प्रपंच करावा नेमक । पाहावा परमार्थ विवेक । जेणें कारितां उभयलोक[2] । संतुष्ट होती ॥ २ ॥ शत वरुषें वय नेमिलें । त्यांत बाळत्व नेणतां गेलें । तारुण्य अवघें वेंचलें । विषयांकडे ॥ ३ ॥ वृद्धपणीं नाना रोग । भोगणें लागे कर्मभोग । आतां भगवंताचा योग । कोणे वेळे ॥ ४ ॥ राजिकें[3] दैविक उद्वेग चिंता । अन्न वस्त्र देह ममता । नाना प्रसंगें अवचिता । जन्म गेला ॥ ५ ॥ लोक मरमरों जाती । वडिलें गेलीं हे प्रचीती । जाणत जाणत निश्चितीं । काय मानिलें ॥ ६ ॥ अग्नि गृहासि लागला । आणि सावकास निजला । तो कैसा म्हणावा भला । आत्महत्यारा ॥ ७ ॥ पुण्यमार्ग अवघा बुडाला । पापसंग्रह उदंड झाला । यमयातनेचा झोला । कठीण आहे ॥ ८ ॥ तरी आतां ऐसें न करावें । बहुत विवेकें वर्तावें । इहकोक परत्र साधावें । दोहींकडे ॥ ९ ॥ आळसाचें फळ रोकडें । जांभया देऊन निद्रा पडे । सुख म्हणोन आवडे । आळसी लोकां ॥ १० ॥ साक्षेप कारितां कष्टती । परंतु पुढें सुरवाडती[4] । खाती जेविती सुखी होती । यत्नेंकरूनि ॥ ११ ॥ आळस उदास नागवणा । आळस प्रयत्नबुडवणा । आळसें करंटपणाच्या खुणा । प्रकट होती ॥ १२ ॥ म्हणोन आळस नसावा । तरीच पाविजे वैभवा । अरेत्रीं[5]

---

१. ब्रम्हरूप. २. इहपरलोक. ३. राजकारण. ४. सुख पावतात. ५. इहलोकीं.

परत्रीं[1] जीवा । समाधान ॥ १३ ॥ प्रयत्न करावा तो कोण । हेंचि ऐका निरूपण । सावध करूनि अंतःकरण । निमिष एक ॥ १४ ॥ प्रातःकाळीं उठावें । कांहीं पाठांतर करावें । यथानुशक्ति आठवावें । सर्वोत्तमासी ॥१५॥ मग दिशेकडे[2] जावें । जें कोणासीच नव्हे ठावें । शौच आचमन करावें । निर्मळ जळें ॥ १६ ॥ मुखमार्जन प्रातःस्नान । संध्या तर्पण देवतार्चन । पुढें वैश्वदेव उपासन । यथासांग ॥ १७ ॥ कांहीं फळाहार घ्यावा । मग संसार धंदा करावा । सुशब्दें राजी राखावा । सकळ लोक ॥ १८ ॥ ज्याचा जो व्यापार । तेथें असावें खबरदार । दुश्चितपणें तरी पोर । वेढा लावी ॥ १९ ॥ चुके ठके विसरे सांडी । आठवण झालिया चरफडी । दुश्चित आळसाची रोकडी । प्रचीत पहा ॥२०॥ या कारणें सावधान । एकाग्र असावें मन । तरी मग जेवितां भोजन । गोड वाटे ॥ २१ ॥ पुढें भोजन झालियावरी । कांहीं देवाची चर्चा करी । एकांतीं जाऊन विवरी । नाना ग्रंथ ॥ २२ ॥ तरीच प्राणी शाहणा होतो । नाहीं तरी मूर्खचि राहतो । लोक खाती आपण पाहतो । दैन्यवाणा ॥ २३ ॥ ऐसें सदैवें[3]पणाचें लक्षण । रिकामा जाऊं नेदी क्षण । प्रपंच व्यवसायाचें ज्ञान । बरें पाहे ॥ २४ ॥ कांहीं मेळवी मग जेवी । गुंतल्या लोकांस उगवी[4] । शरीर कारणीं लावी । कांहीं तरी ॥ २५ ॥ कांहीं धर्मचर्चा पुराण । हरिकथा निरूपण । वाया जाऊं नेदी क्षण । दोहींकडे ॥ २६ ॥ ऐसा जो सर्वसावध । त्यास कैंचा असेल खेद । विवेकें तुटला संबंध । देहबुद्धीचा ॥ २७ ॥ आहे तितुकें देवाचें । ऐसें वर्तणें निश्चयाचें । मूळ तुटलें उद्वेगाचें । येणें रीतीं ॥ २८ ॥ प्रपंचीं पाहिजे सुवर्ण । परमार्थीं पंचीकरण[5] । महावाक्याचें विवरण । करितां सुटे ॥ २९ ॥ कर्म उपासना आणि ज्ञान । येणें राहे समाधान । परमार्थाचें साधन । तेंचि ऐकत जावें ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके शिक्षानिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. विवेक.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्रह्म म्हणिजे निराकार । गगनासारिखा विचार ।

---

१. परलोकीं. २. शौचास. ३. भाग्याचें ४. सोडवी. ५. पंचभूतांचा विचार.

विकार नाहीं निर्विकार । तेंचि परब्रह्म ॥ १ ॥ ब्रह्म म्हणिजे निश्चळ । अंतरात्मा तो चंचळ । द्रष्टा साक्षी केवळ । बोलिजे तया ॥ २ ॥ तो अंतरात्मा म्हणिजे देव । त्याचा चंचळ स्वभाव । पाळिताहे सकळ जीव । अंतरीं वसोनी ॥ ३ ॥ त्या वेगळे जड पदार्थ । तेणेंविण देह व्यर्थ । तेणेंचि कळे परमार्थ । सकळ कांहीं ॥ ४ ॥ कर्ममार्ग उपासनामार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग । प्रवृत्तिमार्ग[1] निवृत्तिमार्ग[2] । देवचि चालवी ॥ ५ ॥ चंचळेंविण निश्चळ कळेना । चंचळ तरी स्थिरावेना । ऐसे विचार नाना । बरे पाहा ॥ ६ ॥ चंचळनिश्चळांची संधी । तेथें भांबावते बुद्धी । कर्ममार्गाचा जो विधी । तो मग ऐलीकडे ॥ ७ ॥ देव या सकळांचें मूळ । देवास मूळ ना डाळ । परब्रह्म तें निश्चळ । निर्विकारी ॥ ८ ॥ निर्विकार आणि विकारी । एक म्हणेल तो भिकारी । विचाराची होते वारी[3] । देखत देखतां ॥ ९ ॥ सकळ परमार्थाचें मूळ । पंचीकरण महावाक्य केवळ । तें विवरावें प्रांजळ । पुनः-पुन्हा ॥ १० ॥ पहिला देह स्थूलकाया । आठवा देह मूळमाया । अष्ट देह निरसलिया । विकार कैंचा ॥ ११ ॥ या कारणें विकारी । साचाऐशी बाँ[4]-जिगिरी । एक समजे एक खरी । मानिताहे ॥ १२ ॥ उत्पत्ति स्थिति संहार । यां वेगळा निर्विकार । काळायासी सारासार । विचार केला ॥ १३ ॥ सार असार दोन्ही एक । तेथें कैंचा उरला विवेक । परीक्षा नेणती रंक । पापी करंटे ॥ १४ ॥ जो एकचि विस्तारला । तो अंतरात्मा बोलला । नाना विकारीं विकारला । निर्विकारी ॥ १५ ॥ ऐसें प्रगटचि आहे । आपुल्या प्रत्ययें पाहे । काय राहे काय न राहे । हेंहि कळेना ॥ १६ ॥ तें अखंड होत जातें । जें सर्वदा संहारतें । रोकडें प्रचीतीस येतें । जनांमध्यें ॥ १७ ॥ एक रडे एक चरफडी । एकाची एक धरी नरडी । एकमेकां झोंबती बॅराडी[5] । दुकळले जैसे ॥ १८ ॥ नाहीं न्याय नाहीं नीती । ऐसे हे लोक वर्तती । आणि अवघेंच सार म्हणती । विवेकहीन ॥ १९ ॥ धोंडे सांडून सोनें घ्यावें । माती सांडून अन्न खावें । आणि अवघेंच सार म्हणावें । बाष्कळपणें ॥ २० ॥ म्हणोन हा विचार करावा । सत्य मार्ग तोचि धरावा । लाभ जाणोन घ्यावा । विवेकाचा ॥ २१ ॥ सानें[6] गानें[6] एकचि सरी । तेथें

---

१. प्रंपच. २. परमार्थ. ३. समाप्ति. ४. गारुड. ५. अधाशी. ६. थोर लहान.

परीक्षेस कैंची उरी । या कारणें चतुरीं । परीक्षा करावी ॥ २२ ॥ जेथें परी-क्षेचा अभाव । तेथें दे घाव घे घाव । सगट सारिखा स्वभाव । लौंद[1]पणाचा ॥ २३ ॥ घेऊं ये तेंचि घ्यावें । घेऊं नये तें सांडावें । उंच नीच ओळखावें । या नांव ज्ञान ॥ २४ ॥ संसार सं[2]तेसि आलें । एक लाभें अभरें[3] झाले । एक ते करंटे ठकले । मुद्दल गेलें ॥ २५ ॥ जाणत्यानें ऐसें न करावें । सार तेंचि शोधून घ्यावें । असार तें जाणोन त्यागावें । वमन जैसें ॥ २६ ॥ तें वमन करी प्राशन । तरी तें श्वानाचें लक्षण । तेथें शुचिष्मंत ब्राह्मण । काय करी ॥ २७ ॥ जिहीं जैसें संचित केलें । तयांस तैसेंच घडलें । जें अभ्यासीं पडोन जडलें । तें तों सुटेना ॥ २८ ॥ एक दिव्यान्नें भक्षिती । एक विष्ठा सावडिती । आपल्या वडिलांचा घेती । साभिमान ॥ २९ ॥ असो विवेकें-विण । बोलणें तितुका शीण । कोणी एकें श्रवण मनन । केलेंचि करावें ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके विवेकनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. राजकारण.

श्रीगणेशाय नमः ॥ कर्म केलेंचि करावें । ध्यान धरलेंचि धरावें । विवरलेंचि विवरावें । पुनः निरूपण ॥ १ ॥ तैसें आम्हांस घडलें । बोलिलेंचि बोलणें पडिलें । कां जें विघडलेंचि घडलें । पाहिजे समाधान ॥ २ ॥ अनन्य[4] राहे समुदाव । इतर जनांस उपजे भाव[5] । ऐसा आहे अभिप्राव । उपायाचा ॥ ३ ॥ एक हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण । तिसरें तें सावधपण । सर्व विषयीं ॥ ४ ॥ चौथा अत्यंत साक्षेप । फेडावे नाना आक्षेप । अन्याय थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥ ५ ॥ जाणावें पराचें अंतर । उदासीनता निरंतर । नीति न्यायास अंतर । पडोंच न द्यावें ॥ ६ ॥ संकेतें[6] लोक वेधावा । एकें अनेक बोधावा । प्रपंचहि सांवरावा । यथानुशक्त्या ॥ ७ ॥ प्रसंग समय ओळखावा । धीर बहुत असावा । संबंध पडों न द्यावा । अतिपरिचयाचा ॥ ८ ॥ उपाधीस विस्तारावें । उपाधींत न सांपडावें । नीचत्व पहिलें घ्यावें । आणि मूर्खपण ॥ ९ ॥ दोष देखोन झांकावे ।

---

१.आळसाचा. २.बाजारास. ३.श्रीमान्. ४.एकनिष्ठ. ५.विश्वास. ६.चातुर्यानें.

अवगुण अखंड न बोलावे। दुर्जन सांपडोन सोडावे। परोपकार करूनी ॥ १० ॥ तऱ्हे भरोंच नये। सुचावे नाना उपाय। नव्हे तेंचि करावें कार्य। दीर्घ प्रयत्नें ॥ ११ ॥ फड नासोंच न द्यावा। पडिला प्रसंग सांवरावा। अति वाद न करावा। कोणी एकासी ॥ १२ ॥ दुसऱ्याचें अभीष्ट जाणावें। बहुतांचें बहुत सोसावें। न सोसे तरी जावें। दिगंतरासी ॥ १३ ॥ दुःख दुसऱ्याचें जाणावें। ऐकोन तरी वांटून घ्यावें। बरें वाईट सोसावें। समुदायाचें ॥ १४ ॥ अपार असावें पाठांतर। सन्निध असावा विचार। सर्वदा असावें तत्पर। परोपकारासी ॥१५॥ शांति करून करवावी। तऱ्हे सांडून सांडवावी। क्रिया करून करवावी। बहुतांकरवीं ॥ १६ ॥ करणें असला अपाय। तरी बोलोन दाखवूं नये। परस्परेंचि प्रत्यय। प्रचीतीस आणावा ॥ १७ ॥ जो बहुतांचें सोसीना। त्यास बहुत लोक मिळेना। बहुत सोसितां उरेना। महत्व आपुलें ॥ १८ ॥ राजकारण बहुत करावें। परंतु कळोंच न द्यावें। परपीडेवरी नसावें। अंतःकरण ॥ १९ ॥ लोक पारखून सोडावे। राजकारणें अभिमान झाडावे। पुन्हा मेळवूनि घ्यावे। दुरिल्या दोरें ॥ २० ॥ हिरवटासि दुरी धरावें। कचरटासि न बोलावें। संबंध पडतां सांडूनि जावें। एकीकडे ॥ २१ ॥ ऐसें असे राजकारण। सांगतां तें असाधारण। सुचित्त असतां अंतःकरण। राजकारण जाणिजे ॥२२॥ वृक्षारूढास उचलावें। युद्धकर्त्यास ढकलून द्यावें। कारभाराचें सांगावें। अंग कैसें म्हणोनी ॥ २३ ॥ पाहतां तरी सांपडेना। कीर्ति करूं तरी राहेना। आलें वैभव अभिलाषीना। कांहीं केल्या ॥ २४ ॥ एकाची पाठी राखणें। एकास देखों न शकणें। ऐसीं नव्हेत कीं लक्षणें। चातुर्याचीं ॥ २५ ॥ न्यायें बोलतांहि मानेना। हित तेंचि न ये मना। येथें कांहींच चालेना। त्यागाविण ॥ २६ ॥ श्रोतीं कळोन आक्षेपिलें। म्हणोनि बोलिलेंचि बोलिलें। न्यून पूर्ण क्षमा केलें। पाहिजे श्रोतीं ॥ २७ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके राजकारणनिरूपणं नाम पंचमः समासः ॥५॥

---

## ६. महंतलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ शुद्ध नेटकें ल्याहावें। लिहोन शुद्ध शोधावें। शोधून

शुद्ध वाचावें । चुकों नये ॥ १ ॥ विस्कळित मातृका[1] नेमस्त कराव्या । धाव्या जाणोनि सदृढ धराव्या । रंग राखोन भराव्या । नाना कथा ॥ २ ॥ जाणायाचें सांगतां न ये । सांगायाचें नेमस्त न ये । समजल्याविण कांहींच न ये । कोणी एक ॥ ३ ॥ हरिकथा निरूपण । नेमस्तपणें राजकारण । वर्तायाचें लक्षण । तेंहि असावें ॥ ४ ॥ पुसों जाणे सांगों जाणे । अर्थांतर करूं जाणे । सकळिकांचें राखों जाणे । समाधान ॥ ५ ॥ दीर्घसूचना[2] आधींच कळे । सावधपणें तर्क प्रबळे । जाणजाणोनि वळे । यथायोग्य ॥ ६ ॥ ऐसा जाणे जो समस्त । तोचि महंत बुद्धिवंत । या वेगळें अंतवंत । सकळ कांहीं ॥ ७ ॥ ताल वेळ तान मानें । प्रबंध कविता जाड वचनें । मजालसी[3] नाना चिन्हें । सुचत जावीं ॥ ८ ॥ जो एकांतास तत्पर । आधीं करी पाठांतर । अथवा शोधी अर्थांतर । ग्रंथगर्भींचें ॥ ९ ॥ आधींच शिकोन जो शिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी । गुंतल्या लोकांस उगवी । विवेकबळें ॥ १० ॥ अक्षर सुंदर वाचणें सुंदर । बोलणें सुंदर चालणें सुंदर । भक्ति ज्ञान वैराग्य सुंदर । करूनि दावी ॥ ११ ॥ जयास प्रयत्नाचि आवडे । नाना प्रसंगीं पवाडे[4] । धीटपणें प्रगटे दडे । ऐसा नव्हे ॥ १२ ॥ सांकडींमध्यें वर्तों जाणे । उपाधीमध्यें मिळों जाणे । अलिप्तपणें राखों जाणे । आपणासी ॥ १३ ॥ आहे तरी सर्वां[5] ठायीं । पाहों जातां कोठेंचि नाहीं । जैसा अंतरात्मा ठायींचा ठायीं । गुप्त जाहला ॥ १४ ॥ त्या वेगळें कांहींच नसे । पाहों जातां तो न दिसे । न दिसोन वर्तवीतसे । प्राणिमात्रांसी ॥ १५ ॥ तैसाचि हाहि नानापरी । बहुत जनांसि शाहणे करी । नाना विद्या त्या विवरी । स्थूळ सूक्ष्म ॥ १६ ॥ आपणाकरितां शाहाणे होती । ते सहजचि सोयें धरिती । जाणतेपणाची महंती । ऐसी असे ॥ १७ ॥ राखों जाणे नीति न्याय । न करी न करवी अन्याय । कठिण प्रसंगीं उपाय । करूं जाणे ॥ १८ ॥ ऐसा पुरुष धारणेचा[6] । तोचि आधार बहुतांचा । दास म्हणे रघुनाथाचा । गुण घ्यावा ॥ १९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके महंतलक्षणनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

१. अक्षरें. २. दूरवर विचार. ३. सभा. ४. शिरतो. ५. अगत्य. ६. निश्चयी.

## ७. चंचळ नदी.

श्रीगणेशाय नमः ॥ चंचळ नदी गुप्त गंगा । स्मरणें पावन करी जगा । प्रचीत रोकडी पहा गा । अन्यथा नव्हे ॥ १ ॥ केवळ अचंचळीं निर्माण झाली । अधोमुखें बळें चालिली । अखंड वाहे परी देखिली । नाहींच कोणीं ॥ २ ॥ लवणें वाकाणें भोंवरें । उखळया तरंग झरे । लादा लाटा कातरे । ठायीं ठायीं ॥ ३ ॥ शुष्क जळाचे चळाळ । धारा धबावे खळाळ । चिपळया चळक्या भळाळ । चपळ पाणी ॥ ४ ॥ फेन[1] फुगे हेलावे । सैरावैरा उदक धांवे । थेंब भुई मोजावे । अणुरेणु किती ॥ ५ ॥ वोसंणे[2] वाहती उदंड । झोलावे दर्कुटे दगड । खडकें बेटें आड । वळसा[3] उठे ॥ ६ ॥ मृदु भूमि तुटोन गेल्या । कठिण तैशाच राहिल्या । ठायीं ठायीं उदंड पाहिल्या । सृष्टीमध्यें ॥ ७ ॥ एक ते वाहताचि गेले । एक ते वळशामध्यें पडिले । एक सांकडींत अडकले । अधोमुखें ॥ ८ ॥ एक आपट आपटोनच गेलीं । एक चिरड चिरडोनीच मेलीं । कितीएक तीं फुगलीं । पाणी भरलें ॥ ९ ॥ एक बळाचे निवडिले । ते पोहताचि उगमासि गेले । उगमदर्शनें पवित्र झाले । तीर्थरूप ॥ १० ॥ तेथें ब्रह्मादिकांचीं भुवनें । ब्रह्मांडदेवतांचीं स्थानें । उफराटी गंगा पाहतां मिळणें । सकळांस तेथें ॥ ११ ॥ त्या जळाऐसें नाहीं निर्मळ । त्या जळाऐसें नाहीं चंचळ । आपोनारायण[4] केवळ । बोलिजे त्यासी ॥ १२ ॥ महानदी परी अंतराळीं । प्रत्यक्ष वाहे सर्वकाळीं । स्वर्गमृत्युपाताळीं । पसरली पाहा ॥ १३ ॥ अधोर्ध्व अष्टहि दिशा । तिचें उदक करी वळसा[5] । जाणते जाणती जगदीशा- । सारिखीचि ते ॥ १४ ॥ अनंत पात्रीं उदक भरिलें । कोठें पाझरपाझरोनि गेलें । कितीएक तें वेंचलें । संसारासी ॥ १५ ॥ एकासंगें तें कडवट । एकासंगें तें गुळवट । एकासंगें तिखट । तुरट खार ॥ १६ ॥ ज्या ज्या पदार्थास मिळे । तेथें तद्रूपचि मिसळे । सखोल भूमीस तुंबले[6] । सखोलपणें ॥ १७ ॥ विषामध्यें विषचि होतें । अमृतामध्यें मिळोन जातें । सुगंधीं सुगंध तें । दुर्गंधीं दुर्गंध ॥ १८ ॥ गुणीं अवगुणीं मिळे । ज्याचें त्यापरी निवळे । त्या उदकाचा महिमा न कळे । उदकेंविण ॥ १९ ॥ उदक वाहे अपरंपार । न कळे नदी कीं सरोवर । जळ-

---

१. फेंस. २. पाचोळा. ३. भोंवरा. ४. जलरूप ईश्वर. ५. वेष्टण. ६. सांचतें.

वास करून नर । राहिले कितीएक ॥ २० ॥ उगमापैलीकडे गेलें । तेथें परतोन पाहिलें । तंव तें पाणीच आटलें । कांहींच नाहीं ॥ २१ ॥ वृत्तिशून्य योगिश्वर । याचा पाहावा विचार । दास म्हणे वारंवार । किती सांगों ॥२२॥

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके चंचळनदीनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. अंतरात्मविवरण.

श्रीगणेशाय नमः ॥ आधीं वंदूं सकळ कर्ता । समस्त देवांचा जो भर्ता । त्याचे भजनीं प्रवर्ता । कोणी तरी ॥ १ ॥ तेणेंविण कार्य न चले । पडिलें पर्ण तेंहि न हाले । अवघें त्रैलोक्यचि चाले । जयाचेनी ॥ २ ॥ तो अंतरात्मा सकळांचा । देव दानव मानवांचा । चार खाणी चार वाणींचा । प्रवर्तक ॥ ३ ॥ तो एकलाचि सकळां घटीं । करी भिन्नभिन्न राहटी । सकळ सृष्टीची गोष्टी । किती म्हणोन सांगावी ॥ ४ ॥ ऐसा जो गुप्तेश्वर । त्यास म्हणावें ईश्वर । सकळ ऐश्वर्य थोर थोर । जयाचेनि भोगिती ॥ ५ ॥ ऐसा जेणें वोळखिला । तो विश्वंभरचि झाला । समाधि आणि सहजस्थितीला । कोण पुसे ॥ ६ ॥ अवघें त्रैलोक्य विवरावें । तेव्हां वर्म पडे ठावें । अवचटें घबाडें सिणावें । नलगेचि कांहीं ॥ ७ ॥ पाहतां ऐसा कोण आहे । जो अंतरात्मा विवरोन पाहे । अल्प स्वल्प कळोन राहे । समाधानें ॥८॥ अरे हें पाहिलेंचि पाहावें । विवरलेंचि मागुती विवरावें । वाचिलेंचि वाचावें । पुनःपुन्हा ॥९॥ अंतरात्मा केवढा कैसा । पाहाणाराची कोण दशा । देखिल्या ऐकिल्या ऐसा । विवेक सांगे ॥१०॥ उदंड देखिलें ऐकिलें । अंतरात्म्यास न वचे पुरवलें । प्राणी देहधारी बाहुलें । काय जाणे ॥ ११ ॥ पूर्णास अपूर्ण पुरवेना । कां जें अखंड विवरेना । विवरतां विवरतां उरेना । देवावेगळा ॥ १२ ॥ विभक्तपणें नसावें । तरीच भक्त म्हणवावें । नाहीं तरी व्यर्थचि शिणावें । खटाटोपें ॥ १३ ॥ उगाच घर पाहोन गेला । घरधनी नाहीं ओळखिला । राज्यामधूनचि आला । परी राजा नेणे ॥१४॥ देहसंगें विषय भोगिले । देहसंगें प्राणी मिरवलें । देहधर्त्यास चुकलें । नवल

---

१. संकल्पविकल्परहित. २. आधार. ३. पदार्थांत. ४. अदृश्य ईश्वर. ५. पुष्कळ.

मोठें ॥ १५ ॥ ऐसे लोक अविवेकी । आणि म्हणती आम्ही विवेकी । बरें ज्याची जैसी टांकी । तैसें करावें ॥१६॥ मूर्ख अंतर राखों नेणे । म्हणोन असावे शाहणे । ते शाहणेहि दैन्यवाणे । होऊन गेले ॥१७॥ अंतरीं ठेवणें चुकलें । दारोदारीं धुंडूं लागले । तैसें अज्ञानासि झालें । देव न कळे ॥१८॥ या देवाचें ध्यान करी । ऐसा कोण रे संसारीं । वृत्ति एकदेशी तरी । पवों-डेल कोठें ॥ १९ ॥ ब्रह्मांडीं दाटले प्राणी । बहुरूपें बहुवाणी । भूगर्भीं आणि पाषाणीं । कितीएक ॥ २० ॥ इतुक्या ठायीं पुरवला । अनेकीं एकच वर्तला । गुप्त आणि प्रगटला । किती एक ॥ २१ ॥ चंचळ न होइजे नि-श्चळ । प्रचीत जाणावी केवळ । चंचळ नव्हे निश्चळ । परब्रह्म तें ॥ २२ ॥ तत्वें तत्व जेव्हां उडे । तेव्हां देहबुद्धि झडे । निर्मळ निश्चळ चहूंकडे । निरंजन ॥ २३ ॥ आपण कोण कोठें कैंचा । ऐसा मार्ग विवेकाचा । प्राणी जो स्वयें काचा । त्यास हें कळेना ॥ २४ ॥ भल्यानें विवेक धरावा । दुस्तर संसार तरावा । अवघा वंश उद्धरावा । हरिभक्ति करूनी ॥ २५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके अंतरात्मविवरणनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. उपदेश.

श्रीगणेशाय नमः ॥ आधीं कर्माचा प्रसंग । कर्म केलें पाहिजे सांग[१] । कदाचित् पडिलें व्यंग । तरी प्रत्यवाय घडे ॥ १ ॥ म्हणोन कर्म आरंभिलें । कांहीं एक सांग घडलें । जेथें जेथें अंतर पडिलें । तेथें हरिस्मरण करावें ॥ २ ॥ तरी तो हरि आहे कैसा । विचार पाहावा ऐसा । संध्येपूर्वीं जगदीशा । चौवीस नामें स्मरावें ॥३॥ चौवीस नामीं सहस्र नामीं । अनंत-नामीं तो अनामी । तो कैसा आहे अंतर्यामीं । विवेकें ओळखावा ॥४॥ ब्राह्मण स्नान करून आला । मग तो देवार्चनास बैसला । यथासांग तो पूजिला । प्रतिमादेव ॥ ५ ॥ नाना देवांच्या नाना प्रतिमा । लोक पूजिती धरूनि प्रेमा । ज्याच्या प्रतिमा तो परमात्मा । कैसा आहे ॥ ६ ॥ ऐसें ओळखिलें पाहिजे । ओळखोन भजन कीजे । जैसा साहेब[६] नमस्कारिजे ।

---

१. भावना. २. शिरल ३. भूमीचे पोटांत. ४. पूर्ण. ५. दोष. ६. अधिकारी.

ओळखिल्या उपरी ॥७॥ तैसा परमात्मा परमेश्वर । बरा ओळखावा पाहोन विचार। तरीच पाविजे पार । भवसागराचा ॥ ८ ॥ पूजा घेताती प्रतिमा । अंगा येतो अंतरात्मा । अवतारी तरी निजधामा । येऊनि गेले ॥ ९ ॥ परी ते निजरूपें असती । तें निजरूप जगज्योती । सत्वगुण तयेस म्हणती । जाणती कळा ॥ १० ॥ तये कळेचे पोटीं । देव असती कोट्यानकोटी । या अनुभवाच्या गोष्टी । प्रत्ययें पाहाव्या ॥ ११ ॥ देहपुरामध्यें ईश । म्हणोन तया नांव पुरुष । जगामध्यें जगदीश । तैसा ओळखावा ॥ १२॥ जाणीवरूपें जगदाकारें । प्रस्तुत वर्तवी शरीरें । अंतःकरणीं विष्णु येणें-प्रकारें । ओळखावा ॥ १३ ॥ तो विष्णु आहे जगदंतरीं । तोचि आपुले अंतरीं । कर्ता भोक्ता चतुरीं । अंतरात्मा ओळखावा ॥१४॥ ऐके देखे हुंगे चाखे । जाणोन विचारें ओळखे । कितीक आपुलें पारखें । जाणताहे ॥१५॥ एकचि जगाचा जिव्हाळा । परी देहलोभाचा अडथळा । देहसंबंधें वेगळा । अभिमान धरी ॥१६॥ उपजे वाढे मरे मारी । जैशा उसळती लहरीवरी लहरी । चंचळसागरीं[१] भरोवरी । त्रैलोक्य होत जातें ॥ १७ ॥ त्रैलोक्य वर्तवितो एक । म्हणोनि त्रैलोक्यनायक । ऐसा प्रत्ययाचा विवेक । पाहाना कैसा ॥ १८ ॥ ऐसा अंतरात्मा बोलिला । परी तोहि तत्वांमध्यें आला । पुढें विचार पाहिजे केला । महावाक्याचा ॥१९॥ आधीं देखिला देहधारी । मग पाहिला जगदंतरीं । तयाचेनि याउपरी । परब्रह्म पावावें ॥ २० ॥ परब्रह्माचा विचार । होतां निवडे सारासार । चंचळ जाईल हा निर्धार । चुकेना कीं ॥२१॥ उत्पत्ति स्थिति संहार जाण । त्याहून वेगळा निरंजन । येथें ज्ञानाचें विज्ञान । होत आहे ॥ २२ ॥ अष्ट देह स्थान मान । जाणोन झालिया निरसन । पुढें उरे निरंजन । विमळ ब्रह्म ॥ २३ ॥ विचारेंचि अनन्य झाला । पाहणाराविण प्रत्यय आला । तेहि वृत्ति निवृत्तीला[२] । बरें पाहा ॥२४॥ येथें राहिला वाच्यांश । पाहोन सांडिला लक्ष्यांश । लक्ष्यांशासारिखा वृत्तिलेश । तोहि गेला ॥२५॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके उपदेशनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

१. मायारूप समुद्रांत. २. वृत्तींचा अभाव झाला पाहिजे हा भाव.

## १० निस्पृहवर्तन.

श्रीगणेशाय नमः ॥ मूर्ख एकदेशी होतो । चतुर सर्वत्र पाहतो । जैसा बहुधा होऊनि भोगितो । नाना सुखें ॥ १ ॥ तोचि अंतरात्मा महंत । तो कां होईल संकोचित । प्रशस्त जाणता समस्त । विख्यात योगी ॥ २ ॥ कर्ता भोक्ता तत्वतां । भूमंडळीं सर्व सत्ता । त्या वेगळा त्यास ज्ञाता । पाहेसा कवण ॥ ३ ॥ ऐसें महंतें असावें । सर्व सार शोधूनि घ्यावें । पाहों जातां न सांपडावें । एकाएकीं ॥ ४ ॥ कीर्तिरूपें उदंड ख्यात । जाणती लहान थोर समस्त । वेष पाहतां शाश्वत । एकहि नाहीं ॥ ५ ॥ प्रगट कीर्ति ते ढळेना । बहुत जनांस कळेना । पाहों जातां आढळेना । काय कैसें ॥ ६ ॥ वेषभूषण[1] तें दूषण । कीर्तिभूषण तें भूषण । चालनेविण एक क्षण । जाऊंच नेदी ॥ ७ ॥ त्यागी ओळखीचे जन । सर्वकाळ नित्य नूतन । लोक शोधून पाहती मन । परी इच्छा दिसेना ॥ ८ ॥ पुरतें कोणाकडे पाहेना । पुरतें कोणासी बोलेना । पुरतें एके स्थळीं राहेना । उठोन जातो ॥ ९ ॥ जातो स्थळ तें सांगेना । सांगीतलें तरी तेथें जायेना । आपली स्थिति अनुमाना । येऊंच नेदी ॥ १० ॥ लोकीं केलें तें चुकवी । लोकीं भाविलें तें उलथवी । लोकीं तर्किलें तें दावी । निष्फळ करुनी ॥ ११ ॥ लोकांस पाह्याचा आदर । तेथें याचा आनादर । लोक सर्वकाळ तत्पर । तेथें याची अनिच्छा ॥ १२ ॥ एवं कल्पितां कल्पेना[2] । तर्कितांहि तर्केना । कदापि भावितां भावेना[3] । योगीश्वर ॥ १३ ॥ ऐसें अंतर सांपडेना । शरीर ठायीं पडेना । क्षण एक विसंबेना । कथाकीर्तन ॥ १४ ॥ लोक संकल्प विकल्प करिती । ते अवघेच निष्फळ होती । जनांची जनां लाजवी वृत्ती । तेव्हां योगेश्वर ॥ १५ ॥ बहुतीं शोधून पाहिलें । बहुतांच्या मनास आलें । तरी मग जाणावें साधिलें । महत्कृत्य ॥ १६ ॥ अखंड एकांत सेवावा । अभ्यासचि करित जावा । काळ सार्थकचि करावा । जनांसहित ॥ १७ ॥ उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनांस शिकवावे । उदंड समुदाय करावे । पुरी गुप्तरूपें ॥ १८ ॥ अखंड कामाची लगबग । उपासनेस लावावें जग । लोक समजोन मग । आज्ञा इच्छिती ॥ १९ ॥ आधीं कष्ट मग फळ । कष्टचि नाहीं तें निष्फळ । सांक्षेपें-

१. वस्त्रालंकारांची शोभा. २. कल्पिलें. ३. जाणवना. ४. उद्योगावांचून.

विण केवळ । वृथा पुष्ट ॥ २० ॥ लोक बहुत शोधावे । त्यांचे अधिकार जाणावे । जाणजाणोनि धरावे । जवळीं दुरीं ॥ २१ ॥ अधिकारपरत्वें कार्य होतें । अधिकार नसतां व्यर्थ जातें । जाणोन शोधावीं चित्तें । नानाप्रकारें ॥ २२ ॥ अधिकार पाहोन कार्य सांगणें । साक्षेप पाहोन विश्वास धरणें । आपला मगज राखणें । कांहीं तरी ॥ २३ ॥ हें प्रचीतीचें बोलिलें । आधीं केलें मग सांगीतलें । मानेल तरी पाहिजे घेतलें । कोणीएकें ॥ २४ ॥ महंतें महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे । जाणते करोन विखरावे । नाना देशीं ॥ २५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके निस्पृहवर्तननिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी २८७.

---

# दशक बारावा.

## १. विमललक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थविवेका । येथें आळस करूं नका । विवेकी हो ॥ १ ॥ प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल । प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ॥ २ ॥ प्रपंच सोडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला । मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा ॥ ३ ॥ परमार्थ सांडूनि प्रपंच करिसी । तरी तूं यमयातना भोगिसी । अंतीं परम कष्टी होसी । यमयातना भोगितां ॥ ४ ॥ साहेब कामास नाहीं गेला । गृहींच सुरवाडोनें बैसला । तरी साहेबी कुटिली तयाला । पाहती लोक ॥ ५ ॥ तेव्हां महत्त्वचि गेलें । दुर्जनाचें हांसें झालें । दुःख उदंड भोगिलें । आपुल्या जीवें ॥ ६ ॥ तैसेंचि होणार अंतीं । म्हणोनि भजावें भगवंतीं । परमार्थाची प्रचीती । रोकडी घ्यावी ॥७॥ संसारीं असतां मुक्त । तोचि जाणावा सुयुक्त । अखंड पाहे युक्तायुक्त । विचारणा हे ॥ ८ ॥ प्रपंचीं जो सावधान । तो परमार्थ करील जाण । प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थीं खोटा ॥ ९ ॥ म्हणोन सावधानपणें । प्रपंच-

---

१. बीज. २. पाठवावे. ३. हुद्दार. ४. सुस्त होऊन. ५ अव्यवस्थित.

परमार्थ चालवणें । ऐसें न कारितां भोगणें । नाना दुःखें ॥ १० ॥ पर्णाळी पाहोन उचले । जीवसृष्टि विवेकें चाले । आणि पुरुष होऊन भ्रमले । यासि काय म्हणावें ॥ ११ ॥ म्हणोन असावी दीर्घसूचना । अखंड करावी चाळणा । पुढील होणार अनुमाना । आणून सोडावें ॥ १२ ॥ सुखी असतो खबरदार । दुःखी होतो बेखबर । ऐसा हा लौकिक विचार । दिसतचि आहे ॥ १३ ॥ म्हणोन सर्व सावधान । धन्य तयाचें महिमान । जनीं राखे समाधान । तोचि एक ॥ १४ ॥ चालनेचा आळस केला । तरी अवचितां पडेल घाला । ते वेळे सांवरायाला । अवकाश कैंचा ॥ १५ ॥ म्हणोन दीर्घसूचनेचे लोक । त्यांचा पाहावा विवेक । लोकांकारितां लोक । शाहणे होती ॥ १६ ॥ परी ते शाहणे वोळखावे । गुणवंताचे गुण घ्यावे । अवगुण देखोन सांडावे । जनांमध्यें ॥ १७ ॥ मनुष्य पारखूं राहेना । आणि कोणाचें मन तोडीना । मनुष्यमात्र अनुमाना । आणून पाहे ॥ १८ ॥ दिसे सकळांसि सारिखा । पाहतां विवेकीं नेटका । कामी निकामी लोकां । बरें पाहे ॥ १९ ॥ जाणोन पाहिजेत सर्व । हेंचि तयाचें अपूर्व । ज्याचें त्यापरी गौरव । राखों जाणे ॥ २० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वादशदशके विमललक्षणनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. प्रत्यय.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका संसारासि आले हो । स्त्री पुरुष निस्पृह हो । सुचित्तपणें पाहो । अर्थांतर ॥ १ ॥ काय म्हणते वासना । काय कल्पिते कल्पना । अंतरींचे तरंग नाना । प्रकारें उठती ॥ २ ॥ बरें खावें बरें जेवावें । बरें ल्यावें बरें नेसावें । मनासारिखेंच असावें । सकळ कांहीं ॥ ३ ॥ ऐसें आहे मनोगत । परी तें कांहींच न होत । बरें करितां अकस्मात । वाईट होतें ॥ ४ ॥ एक सुखी एक दुःखी । प्रत्यक्ष वर्ततें लोकीं । कष्टी होऊनियां सेखीं । प्रारब्धावारि घालिती ॥ ५ ॥ अचूक यत्न करवेना । म्हणोन केलें तें सजेना । आपुला अवगुण जाणवेना । कांहीं केल्या ॥ ६ ॥ जो आपुला आपण नेणे । तो दुसऱ्याचें काय जाणे । न्याय सोडितां दैन्यवाणे ।

---

१. झाडावरील कीड. २. पाऊल उचलते. ३. मनुष्येतर जीव. ४. विचार.

होती लोक ॥ ७ ॥ लोकांचें मनोगत कळेना । लोकांसारिखें वर्तवेना । मूर्खपणें लोकीं नाना । कलह उठती ॥ ८ ॥ मग ते कलह वाढती । परस्परें कष्टी होती । प्रयत्न राहतां अंतीं । श्रमचि होय ॥ ९ ॥ ऐसी नव्हे वर्तणुक । परीक्षावे नाना लोक । समजलें पाहिजे नेमक । ज्याचें त्यापरी ॥ १० ॥ शब्दपरीक्षा अंतरपरीक्षा । कांहीं एक कळे दक्षा । मनोगत नेत[1]-द्रक्षा । काय कळे ॥ ११ ॥ दुसऱ्यास शब्द ठेवणें । आपला कैंपेक्ष[2] घेणें । पाहों जातां लौकिक लक्षणें । बहुतेक ऐसीं ॥ १२ ॥ लोकीं बरें म्हणायाकारणें । भल्यास लागतें सोसणें । न सोसितां भंडवाणें । सहजचि होय ॥ १३ ॥ आपणास जें मानेना । तेथें कदापि राहवेना । डैरी[3] तोडून जावेना । कोणी एकें ॥ १४ ॥ बोलतो खरें चालतो खरें । त्यास मिळती लहान थोरें । न्याय अन्याय परस्परें । सहजचि कळे ॥ १५ ॥ लोकांस कळेना तंववरी । विवेकें क्षमा जो न करी । तेणें कारितां बराबरी । होत जाते ॥ १६ ॥ जंववरी चंदन झिजेना । तंववरी तो सुगंध कळेना । चंदन आणि वृक्ष नाना । सैंगट[4] होती ॥ १७ ॥ जंव उत्तम गुण न कळे । तों या जनास काय कळे । उत्तम गुण देखतां निवळे । जगदंतर ॥ १८ ॥ जगदंतर निवळत गेलें । जगदंतरीं सख्य झालें । तरी मग जाणावे वोळले । विश्वजन ॥ १९ ॥ जरी जनार्दन वोळला । तरी काय उणें तयाला । राजी राखावें सकळांला । कठिण आहे ॥ २० ॥ पेरिलें तें उगवतें । उसणें द्यावें घ्यावें लागतें । वर्म काढितां भंगतें । परांतर ॥ २१ ॥ लौकिकीं बरेपण केलें । तेणें सौख्य वाढलें । उत्तरासारिखें आलें । प्रत्युत्तर ॥ २२ ॥ हें अवघें आपणापासी । येथें बोल नाहीं जनांसी । शिकवावें आपुल्या मनासी । क्षणक्षणां ॥ २३ ॥ खळ दुर्जन भेटला । क्षमेचा धीर बुडाला । तरी मौनेंचि स्थळत्याग केला । पाहिजे साधकें ॥ २४ ॥ लोक नाना परीक्षा जाणती । परी अंतरपरीक्षा नेणती । तेणें प्राणी करंटे होती । संदेह नाहीं ॥ २५ ॥ आपणास आहे मरण । म्हणोन राखावें बरेपण । कठिण आहे लक्षण । विवेकाचें ॥ २६ ॥ थोर लहान समान । आपुले पारिखे सकळ जन । चढतें वाढतें समाधान । कारितां बरें ॥ २७ ॥ बरें कारितां बरें होतें । हें तों प्रत्ययास

१. मूर्खास. २. बाजू. ३. भीड. ४. समान.

येतें । आतां पुढें सांगावें तें । कोणास काय ॥ २८ ॥ हरिकथा निरूपण । बरेपणें राजकारण । प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥ २९ ॥ विद्या उदंडचि शिकला । प्रसंगमान चुकतचि गेला । मग तये विद्येला । कोण पुसे ॥ ३० इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वादशदशके प्रत्ययनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. देवभक्त.

श्रीगणेशाय नमः ॥ पृथ्वीमध्यें बहुत लोक । तिहीं पाहावा विवेक । इहलोक आणि परलोक । बरा पाहावा ॥ १ ॥ इहलोक साधावयाकारणें । जाणत्याची संगति धरणें । परलोक साधावयाकारणें । सद्गुरु पाहिजे ॥ २ ॥ सद्गुरूसि काय पुसावें । हेंहि कळेना स्वभावें । अनन्यभावें एकभावें । दोनी गोष्टी पुसाव्या ॥ ३ ॥ दोनी गोष्टी त्या कोण । देव कोण आपण कोण । त्या दों गोष्टींचें विवरण । केलेंचि करावें ॥४॥ आधीं मुख्य देव तो कोण । मग आपण भक्त तो कोण । पंचीकरण[१] महावाक्य विवरण । केलेंचि करावें ॥ ५ ॥ सकळ केलियाचें फळ । शाश्वत ओळखावें निश्चळ । आपण कोण हा केवळ । शोध घ्यावा ॥ ६ ॥ सारासार विचार घेतां । पदार्थास नाहीं शाश्वतता । आदिकारण भगवंता । वोळखिलें पाहिजे ॥ ७ ॥ निश्चळ चंचळ आणि जड । अवघा मायेचा पैवाड[२] । यामध्यें वस्तु जाड[३] । जाणार नाहीं ॥ ८ ॥ तें परब्रह्म धुंडावें । विवेकें त्रैलोक्य हिंडावें । मायिक विचारें खंडावें । परीक्षवंतीं ॥ ९ ॥ खोटें सांडून खरें घ्यावें । परीक्षवंतीं परीक्षावें । मायेचें अवघेंचि जाणावें । रूप मायिक ॥ १० ॥ पंचभौतिक हे माया । मायिक जाय विलया । पिंड ब्रह्मांड अष्टकायां[४] । नाशवंत ॥ ११ ॥ दिसेल तितुकें नासेल । उपजेल तितुकें मरेल । रचेल तितुकें खचेल । रूप मायेचें ॥ १२ ॥ वाढेल तितुकें मोडेल । येईल तितुकें जाईल । भूतांस भूत खाईल । कल्पांतकाळीं ॥ १३ ॥ देहधारक तितुके नासती । हे तों रोकडी प्रचीती । मनुष्येंविण उत्पत्ती । रेत कैचें ॥ १४ ॥ अन्न नसतां रेत कैचें । औषधी असतां अन्न कैचें । औषधीस जिणें कैचें । पृथ्वी नसतां ॥ १५ ॥

---

१. पंचभूतांचा विचार. २. विस्तार. ३. श्रेष्ठ. ४. आठ शरीरें.

आप[1] नसतां पृथ्वी नाहीं । तेज नसतां आप नाहीं । वायु नसतां तेज नाहीं । ऐसें जाणावें ॥ १६ ॥ अंतरात्मा नसतां वायु कैंचा । विकार नसतां अंतरात्मा कैंचा । निर्विकारीं विकार कैंचा । बरें पाहा ॥ १७ ॥ पृथ्वी नाहीं आप नाहीं । तेज नाहीं वायु नाहीं । अंतरात्मा विकार नाहीं । निर्विकारीं ॥ १८ ॥ निर्विकार जें निर्गुण । तेचि शाश्वताची खूण । अष्टधा प्रकृति संपूर्ण । नाशवंत ॥ १९ ॥ नाशवंत समजोन पाहिलें । तों तें असतांच नसतें झालें । सारासारें कळों आलें । समाधान ॥ २० ॥ विवेकें पाहिला विचार । मनास आलें सारासार । येणें करितां विचार । सदृढ जाहला ॥ २१ ॥ शाश्वत देव तो निर्गुण । ऐशी अंतरीं बाणली खूण । देव कळला मी कोण । कळलें पाहिजे ॥ २२ मी कोण पाहिजे कळलें । देहतत्व तितुकें शोधिलें । मनोवृत्तीच्या ठायीं आलें । मीतूंपण ॥ २३ ॥ सकळदेहाचा शोध घेतां । मीपण दिसेना पाहतां । मीतूंपण हें तत्वतां । तत्वीं मावळलें ॥ २४ ॥ दृश्य पदार्थचि वोसरे । तत्वें तत्व तेव्हां सरे । मीतूंपण कैंचें उरे । तत्वता वस्तु ॥ २५ ॥ पंचीकरण तत्वविवरण । महावाक्यें वस्तु आपण । निःसंगपणें निवेदन । केलें पाहिजे ॥ २६ ॥ देवभक्तांचें मूळ । शोधून पाहतां सकळ । उपाधीवेगळा केवळ । निरुपाधि आत्मा ॥ २७ ॥ मीपण तत्वीं बुडालें । विवेकें वेगळेपण गेलें । निवृत्तिपद[2]दास प्राप्त झालें । उन्मनी[3]पद ॥ २८ ॥ विज्ञानीं राहिलें ज्ञान । ध्येयीं राहिलें ध्यान । सकळ कांहीं कार्यकारण । पाहोन सांडिलें ॥ २९ ॥ जन्ममरणाचें चुकलें । पाप अवघेंचि बुडालें । यमयातनेचें झालें । निसंतान ॥ ३० ॥ निर्बंध अवघाच तुटला । विचारें मोक्ष प्राप्त झाला । जन्म सार्थकचि वाटला । सकळही ॥ ३१ ॥ नाना किंतु निवारिले । धोके अवघेच तुटले । ज्ञानविवेकें पावन झाले । बहुत लोक ॥ ३२ ॥ पतितपाव[4]नाचे दास । तेहि पावन करिती जगास । ऐशी हे प्रचीत मनास । बहुतांच्या आली ॥ ३३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वादशदशके देवभक्तनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

१. पाणी. २. मोक्षास. ३. निर्विकल्प समाधि. ४. पतितोद्धारी श्रीहरीचे.

R. ... Alupanikar ...



## ४. विवेकवैराग्य.

श्रीगणेशाय नमः ॥ महद्भाग्य हातासि आलें । परी भोगूं नाहीं जाणितलें । तैसें वैराग्य उत्पन्न झालें । परी विवेक नाहीं ॥ १ ॥ आदळतें आफळतें । कष्टी होतें दुःखी होतें । ऐकतें देखतें येतें । वैराग्य तेणें ॥ २ ॥ नाना प्रपंचाच्या वोढी । नाना संकटें सांकडीं । संसार सांडून देशधडी । होय तेणें ॥ ३ ॥ तो चिंतेपासून सुटला । पराधीनतेपासून पळाला । दुःखत्यागें मोकळा झाला । रोगी जैसा ॥ ४ ॥ परी तो होऊं नये मोकाट । नष्ट भ्रष्ट आणि चाट । सीमाचि नाहीं सैराट । गुरूं जैसें ॥ ५ ॥ विवेकेंविण वैराग्य केलें । तरी अविवेकें अनर्थीं घातलें । अवघें व्यर्थचि गेलें । दोहींकडे ॥ ६ ॥ ना प्रपंच ना परमार्थ । अवघें जिणेंचि झालें व्यर्थ । अविवेकें अनर्थ । ऐसा केला ॥ ७ ॥ कां व्यर्थचि ज्ञान बडबाडिला । परी वैराग्ययोग नाहीं घडला । जैसा कारागृहीं अडकला । पुरुषार्थ सांगे ॥ ८ ॥ वैराग्येंविण ज्ञान । तो व्यर्थचि साभिमान । लोभदंभें घोळसून । कासावीस केला ॥ ९ ॥ (श्वान बांधिलें तरी भुंके । तैसा स्वार्थमुळें थिंके[१] । परोधिक[२] देखों न शके । साभिमानें) ॥ १० ॥ हें एकेंविण एक । तेणें उगाच वाढे शोक । आतां वैराग्य आणि विवेक-। योग ऐका ॥ ११ ॥ विवेकें अंतरीं सुटला । वैराग्यें प्रपंच तुटला । अंतर्बाह्य मोकळा झाला । निःसंग योगी ॥ १२ ॥ जैसें मुखें ज्ञान बोले । तैशीच सर्व क्रिया चाले । दीक्षा देखोन चकित झाले । शुचिष्मंत ॥ १३ ॥ आस्था नाहीं त्रैलोक्याची । स्थिति बाणली वैराग्याची । यत्न विवेक धारणेची[३] । सीमा नाहीं ॥ १४ ॥ संगीत रसाळ हरिकीर्तन । तालबद्ध तानमान । प्रेमळ आवडीचें भजन । अंतरापासूनी ॥ १५ ॥ तात्काळचि सन्मार्ग लागे । ऐसा अंतरीं विवेक जागे । वक्तृत्व करितां न भंगे । साहित्य प्रत्ययाचें ॥ १६ ॥ सन्मार्गें जगास मिळाला । म्हणजे जगदीश वोळला । प्रसंग पाहिजे कळला । कोणीएक ॥ १७ ॥ प्रखर वैराग्य उदासीन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान । स्नान संध्या भगवद्भजन । पुण्यमार्ग ॥ १८ ॥ विवेकवैराग्य तें ऐसें । नुसतें वैराग्य हेंकाडपिसें । शब्दज्ञान वेळीलैसें । आपणचि वाटे ॥ १९ ॥ म्हणोन विवेक

१. उसळतो. २. दुसऱ्याचें बरें. ३. चित्ताच्या एकाग्रतेची. ४. मिळमिळीत.

आणि वैराग्य । तेंचि जाणिजे महद्भाग्य । रामदास म्हणे योग्य । साधु जाणती ॥ २० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वादशदशके विवेक-वैराग्यनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. आत्मनिवेदन.

श्रीगणेशाय नमः ॥ [१]रेखेचें गुंडाळें केलें । मातृकाक्षरीं शब्द झाले । शब्द मेळऊन चाले । श्लोक गद्य प्रबंध ॥ १ ॥ वेद शास्त्रें पुराणें । नाना काव्यें निरूपणें । ग्रंथभेद [२]अनुवादणें । किती म्हणोनी ॥ २ ॥ नाना ऋषि नाना मतें । पाहों जातां असंख्यातें । भाषा लिपी जेथें तेथें । काय उणें ॥ ३ ॥ [३]वर्ग [३]ऋचा श्रुति स्मृती । अध्याय सर्ग स्तबक जाती । प्रसंगमानें समास पोथी । बहुधा नामें ॥ ४ ॥ नाना पदें नाना श्लोक । नाना वीर नाना कडक । नाना साख्या दोहरे अनेक । नामाभिधानें ॥ ५ ॥ डफगाणें माचीगाणें । दिंडीगाणें कथागाणें । नाना मानें नाना [४]जसणें । नाना खेळ ॥ ६ ॥ ध्वनि घोष नाद रेखा । चहूं वाचामध्यें देखा । वाचारूपेंहि ऐका । नाना-भेद ॥ ७ ॥ [५]उन्मेष [६]परा ध्वनि [६]पश्यंती । नाद मध्यमा शब्द चौथी । [६]वैख-रीपासून उमटती । नाना शब्दरत्नें ॥ ८ ॥ अकार उकार मकार । अर्धमा-त्रांचें अतर । [७]औटमात्रा तदनंतर । [८]बावन [८]मातृका ॥ ९ ॥ नाना भेद राग-ज्ञान । नृत्यभेद तान मान । अर्थभेद तत्वज्ञान । विवंचना ॥ १० ॥ तत्वां-मध्यें मुख्य तत्व । तें जाणावें शुद्ध सत्व । अर्धमात्रा महत्तत्व । मूळमाया ॥ ११ ॥ नाना तत्वें लहान थोरें । मिळोन अष्टहि शरीरें । अष्टधा प्रकृतीचें वारें । निघोन जातें ॥ १२ ॥ वारें नसतां गगन । तैसें परब्रह्म सघन । अष्टदेहांचें निरसन । करून पाहावें ॥ १३ ॥ ब्रह्मांडपिंडउभार । पिंड-ब्रह्मांडसंहार । दोहीं वेगळें सारासार । विमळ ब्रह्म ॥ १४ ॥ पदार्थ जड आत्मा चंचळ । विमळ ब्रह्म तें निश्चळ । विवरोनि विवरे तात्काळ । तद्रूप

---

१. रेघांचें गुंडाळें करून अक्षरें बनविलीं, अक्षरांपासून शब्द झाले. २. सांगणें. ३. वेदांतील वाक्यें म्हणजे ऋचा, व कांहींएक ऋचा मिळून वर्ग. ४. मनोरंजक गोष्टी. ५. अंतःस्फुरण. ६. उन्मेष ही परा, ध्वनि ही पश्यंती, नाद ही मध्यमा व शब्द ही वैखरी या चार वाणी. ७. साडेतीन अक्षरें, ॐकार. ८. अ ते ज्ञपर्यंत.

होय ॥ १५ ॥ पदार्थे मनें काया वाचा । मी हा अवघा देवाचा । जड आत्मनिवेदनाचा । विचार ऐसा ॥ १६ ॥ चंचळकर्ता तो जगदीश । प्राणिमात्र त्याचा अंश । त्याचा तोचि आपणास । ठाव नाहीं ॥ १७ ॥ चंचळ आत्मनिवेदन । याचें सांगीतलें लक्षण । कर्ता देव तो आपण । कोठेंचि नाहीं ॥ १८ ॥ चंचळ चळे स्वप्नाकार । निश्चळ देव तो निराकार । आत्मनिवेदनाचा प्रकार । जाणिजे ऐसा ॥ १९ ॥ ठावचि नाहीं चंचळाचा । तेथें आधीं आपण कैंचा । निश्चळ आत्मनिवेदनाचा । विवेक ऐसा ॥ २० ॥ तिहीं प्रकारें आपण । नाहीं नाहीं दुजेपण । आपण नसतां मीपण । नाहींच कोठें ॥ २१ ॥ पाहतां पाहतां अनुमानलें । कळतां कळतां कळों आलें । पाहतां अवघें निवांत झालें । बोलणें आतां ॥ २२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वादशदशके आत्मनिवेदननिरूपणं नाम पंचमः समासः ॥५॥

---

## ६. सृष्टिक्रम.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्रह्म निर्मळ निश्चळ । शाश्वत अमल विमळ । अवकाश घन पोकळ । गगनाऐसें ॥ १ ॥ तयास करणें ना धरणें । तयास जन्म ना मरणें । तेथें येणें ना जाणें । शून्यातीत ॥ २ ॥ तें रचेना ना खचेना । तें होयना ना जायना । मायातीत निरंजना । पारचि नाहीं ॥ ३ ॥ पुढें संकल्प उठिला । षड्गुणेश्वर[1] बोलिजे त्याला । अर्धनारीनटेश्वराला । बोलिजेते ॥ ४ ॥ सर्वेश्वर सर्वज्ञ । साक्षी द्रष्टा ज्ञानघन । परेश परमात्मा जगज्जीवन । मूळपुरुष ॥ ५ ॥ ते मूळमाया बहुगुणी । अधोमुखें[2] गुणक्षोभिणी । गुणत्रय तिजपासूनी । निर्माण झालें ॥ ६ ॥ पुढें विष्णु झाला निर्माण । जाणती कळा सत्वगुण । जो करिताहे पाळण । त्रैलोक्याचें ॥७॥ पुढें जाणीव नेणीव मिश्रित । ब्रह्मा जाणावा नेमस्त । त्याच्या गुणें उत्पत्ति होत । भुवनत्रयीं ॥ ८ ॥ पुढें रुद्र तमोगुण । सकळसंहाराचें कारण । सकळ कांहीं कर्तेपण । तेथेंचि आलें ॥ ९ ॥ तेथूनि पुढें पंचभूतें । पावलीं स्पष्टदशेतें[3] । अष्टधा प्रकृतीचें स्वरूप तें । मुळींच आहे ॥ १० ॥ निश्चळीं

---

१. सत्ता, धर्म, यश, संपत्ति, ज्ञान, आणि वैराग्य या सहा गुणांनीं युक्त. २. खालीं; संसारोत्पत्तीकडे. ३. दृश्य रूपास.

झालें चळण । तेंचि वायूचें लक्षण । पंचभूतें आणि त्रिगुण । सूक्ष्म अष्टधा ॥ ११ ॥ आकाश म्हणिजे अंतरात्मा । प्रत्ययें पाहावा महिमा । त्या आकाशापासून जन्मा । वायु आला ॥ १२ ॥ तया वायूच्या दोन्ही झुळुका । उष्ण शीतळ ऐका । शीतळापासूनि तारा मृगांका[1] । जन्म जाहला ॥ १३ ॥ उष्णापासून रवि वन्ही । विद्युल्लता आदिकरूनी । शीतळ उष्ण मिळोनी । तेज जाणावें ॥ १४ ॥ तया तेजापासून झालें आप । आप आळोनि पृथ्वीचें रूप । पुढें औषधी अमूप । निर्माण जाहल्या ॥ १५ ॥ औषधींपासून नाना रस । नाना बीजें अन्नरस । चौऱ्यांयशी लक्ष योनींचा वास । भूमंडळीं ॥ १६ ॥ ऐशी झाली सृष्टिरचना । विचार आणिला पाहिजे मना । प्रत्ययेंविण अनुमाना[2] । पात्र होइजे ॥ १७ ॥ ऐसा झाला आकार । येणेंचि न्यायें संहार । सारासार विचार । यासि बोलिजे ॥ १८ ॥ जें जें जेथूनि निर्माण झालें । तें तें तेथेंचि निमालें । येणेंचि न्यायें संहारलें । महाप्रलयीं ॥ १९ ॥ आद्य मध्य अवसान । जें शाश्वत निरंजन[3] । तेथें लावावें अनुसंधान । जाणते पुरुषीं ॥ २० ॥ होते जाते नाना रचना । परी कांहींच तगेना । सारासार विचारणा । या कारणें ॥२१॥ द्रष्टा साक्षी अंतरात्मा । सर्वत्र बोलती महिमा । परी हे सर्वसाक्षी अवस्था मा[4] । प्रत्ययें पाहावी ॥२२॥ मुळापासूनि शेवटवरी । अवघी मायेची भरोवरी । नाना विद्या कळा कुसरी । तयेमध्यें ॥ २३ ॥ जो उपाधीचा शेवट पावेल । त्यास भ्रम ऐसें वाटेल । जो उपाधीमध्यें आडकेल । त्यास काढिता कवण ॥ २४ ॥ विवेकप्रत्ययाचीं कामें । कैसीं वडतील अनुमानभ्रमें । सारासार विचाराचेनि संभ्रमें[6] । पाविजे ब्रह्म ॥२५॥ ब्रह्मांडींचें महाकारण । ते मूळमाया जाण । अपूर्णास म्हणती ब्रह्म पूर्ण । विवेकहीन ॥२६॥ सृष्टीमध्यें बहुत जन । एक भोगिती नृपासन । एक विष्टा टाकिती जाण । प्रत्यक्ष आतां ॥ २७ ॥ ऐसे उदंड लोक असती । आपणास थोर म्हणविती । परी ते विवेकी जाणती । सकळ कांहीं ॥ २८ ॥ ऐसा आहे समाचार । कारण पाहिजे विचार । बहुतांच्या बोलें हा संसार । नासूं नये ॥ २९ ॥ पुस्तकज्ञानें निश्चय धरणें । तरी गुरु कायसा करणें । या कारणें विवरणें । आपुल्या प्रत्ययें ॥३०॥ जो बहुतांचे

१. चंद्राचा. २. संशयास. ३. उपाधिरहित. ४. मग. ५. विस्तार. ६. मार्गानें.

बोलों लागला । तो नेमस्त जाणावा बुडाला । एक साहेब नसतां कोणाला । मुशारा मागावा ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वादशदशके सृष्टिक्रमनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. विषयत्याग.

श्रीगणेशाय नमः ॥ न्यायनिष्ठुर बोलणें । बहुतांस वाटे कंटाळवाणें । मळमळ करितां जेवणें । विहित नव्हे ॥१॥ बहुतीं विषय निंदिले । आणि तेचि सेवीत गेले । विषयत्यागें देह चाले । हें तों घडेना ॥ २ ॥ बोलणें एक चालणें एक । त्याचें नांव हीनविवेक। येणें करितां सकळ लोक । हांसों लागती ॥ ३ ॥ विषयत्यागेंविण तों कांहीं । परलोक तो प्राप्त नाहीं । ऐसें बोलणें ठायीं ठायीं । बरें पाहा ॥४॥ प्रपंची खाती जेविती । परमार्थी काय उपास करिती । उभयतां सारखे दिसती । विषयाविषयीं ॥ ५ ॥ देह चालतां विषयत्यागी । ऐसा आहे कोण जगीं । त्याचा निर्वाह मजलागीं । देवें निरूपावा ॥ ६ ॥ विषय अवघा त्यागावा । तरीच परमार्थ करावा । ऐसें पाहतां गोंवा । दिसतो कीं ॥ ७ ॥ ऐसा श्रोता अनुवादला । वक्ता उत्तर देता झाला । सावध होऊन मन घाला । एतद्विषयीं ॥ ८ ॥ वैराग्यें करावा त्याग । तरीच परमार्थयोग । प्रपंचत्यागें सर्व सांग । परमार्थ घडे ॥९॥ मागें ज्ञानी होऊन गेले । तिहीं बहुत कष्ट केले । तरी मग विख्यात झाले । भूमंडळीं ॥१०॥ येरें मत्सर करितांच गेलीं । अन्न अन्न करितांचि मेलीं । कित्येक तीं भ्रष्टलीं । पोटासाठीं ॥११॥ वैराग्य मुळींहून नाहीं । ज्ञान प्रत्ययाचें नाहीं । शुचि आचार तोहि नाहीं । भजन कैंचें ॥१२॥ ऐसे प्रकारिचे जन । आपणांस म्हणती सज्जन । पाहों जातां अनुमान । अवघेंच दिसे ॥ १३ ॥ जयास नाहीं अनुताप । हेंचि एक पूर्व पाप । क्षणक्षणा विक्षेप । पराधिकपणें ॥ १४ ॥ मज नाहीं तुज साजेना । हें तों अवघें ठाउकें आहे जनां । खात्यास न खातें देखों शकेना । ऐसें आहे ॥ १५ ॥ भाग्य पुरुष थोरथोर । त्यांस निंदिती दिवाळखोर । सांवास देखतां चोर । चरफडी जैसा ॥१६॥ वैराग्या परतें नाहीं भाग्य । वैराग्य नाहीं तें अभाग्य ।

---

१. धनी. २. विचारशून्य. ३. संशय. ४. वैराग्य. ५. मनाचें चांचल्य.

वैराग्य नसतां योग्य । परमार्थ नव्हे ॥ १७ ॥ प्रत्ययज्ञानी वीतरागी । विवेकबळें सकळ त्यागी । तो जाणिजे महायोगी । ईश्वरी पुरुष ॥ १८ ॥ अष्टसिद्धींची उपेक्षा । करून घेतली योगदीक्षा । घरोघरीं मागें भिक्षा । महादेव ॥ १९ ॥ ईश्वराची बराबरी । कैसा करील वेषधारी । म्हणोनियां सगटसरी । होत नाहीं ॥२०॥ उदासवृत्ति आणि विवेक । त्यासि शोधिती सकळ लोक । जे लालची मूर्ख रंक । ते दैन्यवाणे ॥२१॥ जे विचारापासून चेवले । जे आचारापासून भ्रष्ट झाले । विचार करूं विसरले । विषयलोभी ॥ २२ ॥ भजन तरी आवडेना । पुरश्चरण सहसा घडेना । भल्यास त्यास पटेना । एक निमिष ॥२३॥ वैराग्यें करून भ्रष्टेना । ज्ञान भजन सोडीना । व्युत्पन्न आणि वाद घेना । ऐसा थोडा ॥ २४ ॥ कष्ट करितां शेत पिके । उंच वस्तु तत्काळ विके । जाणत्या लोकांच्या कौतुकें । उड्या पडती ॥२५॥ येर तें अवघेंच मंदलें । दुराशेनें खोटें झालें । कानकोंडें ज्ञान केलें । भ्रष्टाकारें ॥ २६ ॥ सबळ विषय त्यागणें । शुद्ध कार्याकारण घेणें । विषयत्यागाचीं लक्षणें । वोळखावीं ऐशीं ॥२७॥ सकळ कांहीं कर्ता देव । नाहीं प्रकृतीचा ठाव । विवेकाचा अभिप्राव । विवेकी जाणती ॥२८॥ शूरत्वविषयीं खडतर । त्यास मानिती लहान थोर । कामगार आणि अंगचोर । एक कैसा ॥ २९ ॥ त्यागात्याग तार्किक जाणे । बोलाऐसें चालों जाणे । पिंड ब्रह्मांड सकळ जाणे । यथायोग्य ॥ ३० ॥ ऐसा जो सर्व जाणता । उत्तम लक्षणीं तो पुरता । तथाचेनि सार्थकता । सहजचि होय ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्य-संवादे द्वादशदशके विषयत्यागनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

## ८. काल.

श्रीगणेशाय नमः ॥ मूळ माया जगदीश्वर । पुढें अष्टधेचा विचार । सृष्टिक्रमें आकार । आकारला ॥ १ ॥ हें अवघेंचि नसतां निर्मळ । जैसें गगन अंतराळ । निराकारीं काळ वेळ । कांहींच नाहीं ॥ २ ॥ उपाधीचा विस्तार झाला । तेणें काळ दिसोन आला । येऱ्हवीं पहातां काळाला । ठावचि नाहीं ॥ ३ ॥ एक चंचळ एक निश्चळ । या वेगळा कोठें सकळ । चं-

१. अनुभवी. २. वैराग्यशील. ३. शास्त्रज्ञानी. ४. विलासाचे; आकर्षक.

चळ आहे तावत्काळ । काळ म्हणावें ॥ ४ ॥ आकाश म्हणिजे अवकाश । अवकाश बोलिजे विलंबास । त्या विलंबरूप काळास । जाणोन घ्यावें ॥५॥ सूर्याकरितां विलंब कळे । गणना सकळांची आकळे । पळापासून निवळे । युगपर्यंत ॥ ६ ॥ पळ घटिका प्रहर दिवस । अहोरात्र पक्ष मास । षण्मास वर्षं युगास । ठाव जाहला ॥ ७ ॥ कृत त्रेत द्वापार केली । संख्या चालली भूमंडळीं । देवांचीं आयुष्यें आगळीं । शास्त्रीं निरूपिलीं ॥ ८ ॥ ते देवत्रयाची खटपट । सूक्ष्मरूपें विलगट । दंडक सांडितां चटपट । लोकांस होते ॥ ९ ॥ मिश्रित त्रिगुण निवडेना । तेणें आद्यंत सृष्टिरचना । कोण थोर कोण शहाणा । कैसा म्हणावा ॥ १० ॥ असो हें जाणत्याचीं कामें । नेणता उगाचि गुंते भ्रमें । प्रत्यय जाणोनि वर्में । ठायीं पाडावीं ॥ ११ ॥ उत्पत्तिकाळ सृष्टिकाळ । स्थितिकाळ संहारकाळ । आद्यंत अवघा काळ । विलंबरूप ॥ १२ ॥ जें जें जये प्रसंगीं झालें । तेथें काळाचें नांव पडिलें । बरें नसेल अनुमानलें । तरी पुढें ऐका ॥ १३ ॥ पर्जन्यकाळ शीतकाळ । उष्णकाळ संतोषकाळ । सुखदुःख आनंदकाळ । प्रत्यय येतो ॥ १४ ॥ प्रातःकाळ मध्यान्हकाळ । सायंकाळ वसंतकाळ । पर्वकाळ कठिणकाळ । जाणिजे लोकीं ॥ १५ ॥ जन्मकाळ बाळत्वकाळ । तारुण्यकाळ वृद्धापकाळ । अंतकाळ विषमकाळ । वेळरूपें ॥ १६ ॥ सुकाळ आणि दुष्काळ । प्रदोषकाळ पुण्यकाळ । सकळ वेळा मिळोन काळ । तयास म्हणावें ॥ १७ ॥ असतें एक वाटतें एक । त्याचें नांव हीनविवेक । नाना प्रवृत्तीचे लोक । प्रवृत्ति जाणती ॥ १८ ॥ प्रवृत्ति चाले अधोमुखें । निवृत्ति धावें ऊर्ध्वमुखें । ऊर्ध्वमुखें नानामुखें । विवेकी जाणती ॥ १९ ॥ ब्रह्मांडरचना जेथूनि झाली । तेथें विवेकी दृष्टि घाली । विवरतां विवरतां लाधली । पूर्वापार स्थिति ॥ २० ॥ प्रपंचीं असोन परमार्थ पाहे । तो हे स्थितीतें लाहे । प्रारब्धयोगेंकरून राहे । लोकांमध्यें ॥ २१ ॥ सकळांचें एकचि मूळ । एक जाणते एक बाष्कळ । विवेकेंकरून तात्काळ । परलोक साधावा ॥ २२ ॥ तरीच जन्माचें सार्थक । भले पाहती उभयलोक । कारण मूळींचा विवेक । केला पाहिजे ॥ २३ ॥ विवेकहीन जे जन । ते जाणावे पशुसमान । त्यांचें ऐकतां

१. ओळखते २. पंधरवडा. ३. अधिक. ४. निरनिराळी. ५. व्यवहाराचे.

भाषण । परलोक कैंचा ॥ २४ ॥ बरें आमचें काय गेलें । जें केलें तें फळास आलें । पेरिलें तें उगवलें । भोगती आतां ॥२५॥ पुढेंहि करी तो पावे । भक्तियोगें भगवंत फावे । देवभक्त मिळतां दुणावें । समाधान ॥२६॥ कीर्ति करून मेले । उगेचि आले आणि गेले । शाहाणे होऊन भ्रमले । काय सांगावें ॥२७॥ येथील येथें अवघेंचि राहतें । ऐसें प्रत्ययास येतें । कोण काय घेऊनि जातें । सांगाना कां ॥२८॥ पदार्थीं[1] असावें उदास । विवेक पाहावा सावकाश । येणें करितां जगदीश । अलभ्य लाभे ॥२९॥ जगदीशापरता लाभ नाहीं । कार्याकारण सर्व कांहीं । संसार करित असतांही । समाधान ॥ ३० ॥ मागां होते जनकादिक । राज्य करितही अनेक । तैसेचि आतां पुण्यश्लोक[2] । कित्येक असती ॥ ३१ ॥ राजा असतां मृत्यु आला । लक्ष कोटी कबूल झाला । तरी सोडीना तयाला । मृत्यु कांहीं ॥ ३२ ॥ ऐसें पराधीन जिणें । यामध्यें दुखणें बाहणें । नाना उद्वेग चिंता करणें । किती म्हणोनी ॥ ३३ ॥ हाटें[3] भरला संसाराचा । नफा पहावा देवाचा । तरीच या कष्टाचा । परिहार होतो ॥ ३४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वादशदशके कालनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. यत्नशिक्षा.

श्रीगणेशाय नमः ॥ दुर्बळ नाचारी[4] वोडगस्त । आळसी खादाड ऋणग्रस्त । मूर्खपणें अवघें अव्यवस्थ । कांहींच नाहीं ॥ १॥ खाया नाहीं जेवाया नाहीं । लेया नाहीं नेसाया नाहीं । आंथराया नाहीं पांघराया नाहीं । खोंपट नाहीं अभागी ॥ २ ॥ सोयरें नाहीं धायरें नाहीं । इष्ट नाहीं मित्र नाहीं । पाहतां कोठें ओळख नाहीं । आश्रयेंविण परदेशी ॥ ३ ॥ तेणें कैसें करावें । काय जीवेंसि धरावें । वांचावें कीं मरावें । कोण्या प्रकारें ॥ ४ ॥ ऐसें कोणी एकें पुसिलें । कोणी एकें उत्तर दीधलें । श्रोतीं सावध ऐकिलें । पाहिजे आतां ॥ ५ ॥ लहान थोर काम नाहीं । केल्याविणें होत नाहीं । करंट्या सावध पाहीं । सदैव[5] होसी ॥ ६ ॥ अंतरीं नाहीं सावधानता । यत्न ठाकेना पुरता । सुख संतोषाची वार्ता । येथें कैंची ॥ ७ ॥ म्हणोनि

---

१. सर्व वस्तूंवर. २. पुण्यवान् महात्मे. ३. बाजार. ४. दुर्वर्तनी. ५. भाग्यवान्.

आळस सोडावा । यत्न साक्षेपें जोडावा । दुश्चितपणाचा मोडावा । थारा बळें ॥ ८ ॥ प्रातःकाळीं उठत जावें । प्रातःस्मरामि[1] करावें । नित्य नेमें करावें । पाठांतर ॥ ९ ॥ मागील उजळणी पुढें पाठ । नेम धरावा निकट । बाष्कळपणाची वटवट । करूंचि नये ॥ १० ॥ दिशेकडे दुरी जावें । शुचिष्मंत होऊन यावें । येतां कांहीं तरी आणावें । रितें खोटें ॥ ११ ॥ धूतवस्त्रें घालावीं पिळून । करावें चरणक्षालनें[2] । देवदर्शन देवतार्चन । यथासांग ॥ १२ ॥ कांहीं फळाहार घ्यावा । पुढें व्यवसाय करावा । लोक आपला परावा । म्हणत जावा ॥ १३ ॥ सुंदर अक्षर ल्याहावें । स्पष्ट नेमस्त वाचावें । विवरविवरोनी[3] जाणावें । अर्थांतरें[4] ॥ १४ ॥ नेमस्त नेटकें पुसावें । विशद करून सांगावें । प्रत्ययेंविण बोलावें । तेंचि पाप ॥ १५ ॥ सावधानता असावी । नीति मर्यादा राखावी । जनास माने ऐसी करावी । क्रिया शुद्ध ॥ १६ ॥ आलियाचें समाधान । हरिकथा निरूपण । सर्वदा प्रसंग पाहोन । वर्तत जावें ॥ १७ ॥ ताळ धाटी मुद्रा शुद्ध । अर्थप्रमेय अन्वय शुद्ध । गद्य पद्य दृष्टांत शुद्ध । अन्वयाचे ॥ १८ ॥ गाणें वाजवणें नाचणें । हस्तन्यासें[5] दाखवणें । सभारंजकें वचनें । आडकथा छंदबंध ॥ १९ ॥ बहुतांचें समाधान राखावें । बहुतांस मानेल तें करावें । विलगें[6] पडोंचि न द्यावें । कथेमध्यें ॥ २० ॥ लोकांसि उद्दंड वाँजी[7] आणूं नये । लोकांचें उकलावें हृदय । तरी मग स्वभावेंचि होय । नामघोष ॥ २१ ॥ भक्ति ज्ञान वैराग्य योग । नाना साधनांचे प्रयोग । जेणें तुटे भवरोग । मननमात्रें ॥ २२ ॥ तैसें बोलणें बोलावें । तैसेंचि चालणें चालावें । मग महंतलीला स्वभावें । अंगीं बाणे ॥ २३ ॥ युक्तीविण साजिरा योग । तो दुराशेचा रोग । संगतीच्या लोकांचा भोग । उभा ठेला ॥ २४ ॥ ऐसें न करावें सर्वथा । जनास पाववूं नये व्यथा । हृदयीं चिंतावें समर्था । रघुनाथजीसी ॥ २५ ॥ उदासवृत्तीस[8] मानवे जन । विशेष कथानिरूपण । रामकथा ब्रह्मांड भेदून । पैलाडें[9] न्यावी ॥ २६ ॥ सांगें[10] महंती संगीत गाणें । तेथें वैभवास काय उणें । नभामाजी तारांगणें । तैसे लोक ॥ २७ ॥ अक्कलबंद नाहीं जेथें । अवघेंचि

१. प्रातःस्मरण. २. पाय धुणें. ३. विचार करकरून. ४. अर्थाचें मर्म. ५. ज्ञाताचे हावभाव. ६. उणें. ७. कंटाळा. ८. निस्पृहपणास. ९. पलीकडे. १०. पूर्ण.

विस्कळित तेथें । एके अकलेविण तें । काय आहे ॥ २८ ॥ घालून अकलेचा पंवाड[1] । व्हावें ब्रह्मांडाहून वाडें[2] । तेथें कैचें आणिलें द्वाड । करंटपण ॥२९॥ येथें आशंका फिटली । बुद्धि यत्नीं प्रवेशली । कांहीं एक आशा वाढली । अंतर्यामीं ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वादशदशके यत्नशिक्षानिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. उत्तमपुरुषनिदर्शन.

श्रीगणेशाय नमः ॥ आपण यथेष्ट जेवणें । उरलें अन्न तें वांटणें । परंतु वायां दवडणें । हा धर्म नव्हे ॥ १ ॥ तैसें ज्ञानें तृप्त व्हावें । तेंचि ज्ञान जनांस सांगावें । तरतेन बुडों न द्यावें । बुडतयासी ॥२॥ उत्तम गुण स्वयें घ्यावे । ते बहुतांस सांगावे । वर्तल्याविण बोलावे । ते शब्द मिथ्या ॥३॥ स्नान संध्या देवतार्चन । एकाग्र करावें जपध्यान । हरिकथा निरूपण । केलें पाहिजे ॥ ४ ॥ शरीर परोपकारीं लावावें । बहुतांच्या कार्यास यावें । उणें पडों न द्यावें । कोणी एकाचें ॥ ५ ॥ अडलें गांजलें जाणावें । यथाशक्ति कामास यावें । मृदुवचन बोलत जावें । कोणी एकासी ॥ ६ ॥ दुसऱ्याचे दुःखें दुःखी व्हावें । परसंतोषें सुखी व्हावें । प्राणिमात्रास मेळवून घ्यावें । बऱ्या शब्दें ॥ ७ ॥ बहुतांचे अन्याय क्षमावे । बहुतांचे कार्यभाग करावे । आपल्यापरी व्हावे । पारिखे[3] जन ॥ ८ ॥ दुसऱ्याचें अंतर जाणावें । तदनुसाराचि वर्तावें । लोकांस परीक्षीत जावें । नानाप्रकारें ॥ ९ ॥ नेमकेंचि बोलावें । तात्काळचि प्रतिवचन द्यावें । कदापि रागासि न यावें । क्षमारूपें ॥ १० ॥ आळस अवघाच दवडावा । यत्न उदंडचि करावा । शब्दमत्सर[4] न करावा । कोणी एकाचा ॥ ११ ॥ उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा । शब्द निवडून बोलावा । सावधपणें करीत जावा । संसार आपुला ॥ १२ ॥ मरणाचें स्मरण असावें । हरिभक्तीसी सादर व्हावें । मरोन कीर्तीस उरवावें । येणें प्रकारें ॥ १३ ॥ नेमकपणें वर्तो लागला । तो बहुतांस कळों आला । सर्व आर्जवी तयाला । काय उणें ॥ १४ ॥ ऐसा उत्तमगुणी विशेष । तयास म्हणावें पुरुष । जयाच्या भजनें जगदीश । तृप्त होय ॥१५॥ उदंड

---

१. विस्तार. २. मोठें. ३. परकी, दुसरे. ४. अर्थ न पाहतां शब्दवाद करणें.

धिक्कारून बोलती । तरी चळों न द्यावी शांती । दुर्जनासि मिळोन जाती । धन्य ते साधु ॥ १६ ॥ उत्तम गुणीं शृंगारिला । ज्ञानवैराग्यें शोभला । तोचि एक जाणावा भला । भूमंडळीं ॥१७॥ स्वयें आपण कष्टावें । बहुतांचें सोशीत जावें । झिजोन कीर्तीसी उरवावें । नानाप्रकारें ॥ १८ ॥ कीर्ति पाहूं जातां सुख नाहीं । सुख पाहतां कीर्ति नाहीं । विचारेंविण कोठेंचि नाहीं । समाधान ॥ १९ ॥ परांतरास[1] न लावावा ढका । कदापि पडों न द्यावा चुका । क्षमाशीळ तयाच्या तुकां[2] । कोण नाहीं ॥ २० ॥ आपलें अथवा परावें । कार्य अवघेंचि करावें । प्रसंगीं कामास चुकवावें । हें विहित नव्हे ॥ २१ ॥ बरें बोलतां सुख वाटतें । हें तों प्रत्यक्ष कळतें । आत्मवत्[3] परावें तें । मानीत जावें ॥ २२ ॥ कठिण शब्दें वाईट वाटतें । हें तों प्रत्ययास येतें । तरी मग वाईट बोलावें तें । काय निमित्त ॥ २३ ॥ आपणास चिमोटा घेतला । तेणें कासावीस झाला । आपणावरून दुसऱ्याला । राखीत जावें ॥ २४ ॥ जे दुसऱ्यास दुःख करी । ते अपवित्र वैखरी[4] । आपणास वात करी । कोणी एके प्रसंगीं ॥ २५ ॥ पेरिलें तें उगवतें । बोलण्यासारिखें उत्तर येतें । तरी मग कर्कश बोलावें तें । काय निमित्त ॥ २६ ॥ आपुल्या पुरुषार्थवैभवें[5] । बहुतांस सुखी करावें । परंतु कष्टी करावें । हे राक्षसी क्रिया ॥ २७ ॥ दंभ दर्प अभिमान । क्रोध आणि कठिण वचन । हें अज्ञानाचें लक्षण । भगवद्गीतेंत बोलिलें ॥ २८ ॥ जो उत्तमगुणें शोभला । तोचि पुरुष महा भला । कित्येक लोक तयाला । शोधीत फिरती ॥ २९ ॥ क्रियेविण शब्दज्ञान । तेंचि श्वानाचें वमन । भले तेथें अवलोकन । कदापि न करिती ॥ ३० ॥ मनापासून भक्ति करणें । उत्तम गुण अगत्य धरणें । तया महापुरुषाकारणें । धुंडीत येती ॥ ३१ ॥ ऐसा जो महानुभाव[6] । तेणें करावा समुदाव । भक्तियोगें देवाधिदेव । आपुला करावा ॥ ३२ ॥ आपण अवचितें मरोन जावें । मग भजन कोणें करावें । या कारणें भजनास लावावे । बहुत लोक ॥ ३३ ॥ आमची प्रतिज्ञा ऐसी । कांहीं न मागावें शिष्यासी । आपणा मागें जगदीशासी । भजत जावें ॥ ३४ ॥ या कारणें समुदा-

१. दुसऱ्याच्या अंतःकरणास. २. तुलनेस. ३. आपल्याप्रमाणें. ४. वाणी. ५. सामर्थ्यानें. ६. थोर प्रतापाचा पुरुष.

व । झाला पाहिजे महोत्सव । हातोंपातीं[1] देवाधिदेव । वोळेसा करावा ॥ ३५ ॥ आतां समुदायाकारणें । पाहिजेत दोनी लक्षणें । श्रोतीं येथें सावधपणें । मन घालावें ॥ ३६ ॥ जेणें बहुतांस घडे भक्ती । ते हे रोकडी प्रबोधशक्ती[2] । बहुतांचें मनोगत हातीं । घेतलें पाहिजे ॥ ३७ ॥ मागां बोलिले उत्तम गुण । तयांस मानिती प्रमाण । प्रबोधशक्तीचें लक्षण । पुढें चाले ॥ ३८ ॥ बोलण्यासारखें चालणें । स्वयें करून बोलणें । तयांचीं वचनें प्रमाणें । मानिती जनीं ॥ ३९ ॥ जें जनासी मानेना । तें आपुले न ये मना । आपण एकला जन नाना । सृष्टीमध्यें ॥ ४० ॥ म्हणोन सांगाती असावे । मानत मानत शिष्य करावे । हळू हळू शेवटा न्यावे । विवेकानें ॥ ४१ ॥ परंतु हीं विवेकाचीं कामें । विवेकी करतील नेमें । इतर ते बापुडे श्रमें । भांडोंच लागले ॥ ४२ ॥ बहुतांसि भांडतां एकला । सैन्यावांचून पुरवला । या कारणें बहुतांला । राजी राखावें ॥ ४३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे द्वादशदशके उत्तमपुरुषनिदर्शननिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी २९४.

# दशक तेरावा.



## १. आत्मानात्मविवेक.

श्रीगणेशाय नमः ॥ आत्मानात्मविवेक[3] करावा । करून बरा विवरावा । विवरोन सदृढ धरावा । जीवामध्यें ॥ १ ॥ आत्मा कोण अनात्मा कोण । त्यांचें करावें विवरण । तेंचि आतां निरूपण । सावध ऐका ॥ २ ॥ चारी खाणी चारी वाणी । चौऱ्यांयशी लक्ष जीवयोनी । संख्या बोलिली पुराणीं । वर्तती आतां ॥ ३ ॥ नाना प्रकारचीं शरीरें । वर्तती दिसती अपारें । तयांमध्यें निर्धारें । आत्मा कवण ॥ ४ ॥ दृष्टीमध्यें पाहतो । श्रवणामध्यें ऐकतो । रसनेमध्यें स्वाद घेतो । प्रत्यक्ष आतां ॥ ५ ॥ घ्राणामध्यें वास घेतो । सर्वांगीं तो स्पर्शतो । वाचेमध्यें बोलवितो । जाणोनि शब्द ॥ ६ ॥ सावधा-

१. तावडतोब. २. उपदेशशक्ति. ३. आत्मा कोण व अनात्मा कोण हा विचार.

न आणि चंचळ । चहूंकडे चळवळ । एकलाचि चालवी सकळ । इंद्रियद्वारें ॥ ७ ॥ पाय चालवी हात हालवी । भ्रुकुटी पालवी[1] डोळा घालवी । संकेत खुणा बोलवी । तोचि आत्मा ॥ ८ ॥ धिटावी[2] लाजवी खाजवी । खोकवी ओकवी थुंकवी । अन्न जेवून उदक सेवी । तोचि आत्मा ॥ ९ ॥ मळमूत्र-त्याग करी । शरीर मात्र सांवरी । प्रवृत्ति[3] निवृत्ति[3] विवरी[3] । तोचि आत्मा ॥ १० ॥ ऐके देखे हुंगे चाखे । नाना प्रकारें वोळखे । संतोष पावे आणि धाके[4] । तोचि आत्मा ॥ ११ ॥ आनंद विनोद उद्वेग चिंता । काया छाया माया ममता । आत्मत्वें पावे समता । तोचि आत्मा ॥ १२ ॥ पदार्थाची आस्था धरी । जनीं वाईट बरें करी । आपल्यां राखे पराव्यां मारी । तोचि आत्मा ॥ १३ ॥ युद्ध होतां दोन्हींकडे । नाना शरीरीं वावडे[5] । परस्परें पाडी पडे । तोचि आत्मा ॥ १४ ॥ तो येतो जातो देहीं वर्ततो । हांसतो रडतो पस्तावतो । समर्थ करंटा होतो । व्यापासारिखा ॥ १५ ॥ होतो लंडी होतो बळकट । होतो विद्यावंत होतो धट । न्यायवंत होतो उद्धट । तोचि आत्मा ॥ १६ ॥ धीर उदार कृपण । वेडा आणि विचक्षण[6] । उत्संगळ[7] आणि सहिष्णु[8] । तोचि आत्मा ॥ १७ ॥ विद्या कुविद्या दोहींकडे । आनंदरूप वावडे । जेथें तेथें सर्वांकडे । तोचि आत्मा ॥ १८ ॥ निजे उठे बैसे चाले । धांवे भंवडी डोले तोले । सोइरे धाइरे केले । तोचि आत्मा ॥ १९ ॥ पोथी वाची अर्थ सांगे । ताल धरी गाऊं लागे । वाद विवाद वाउगे । तोचि आत्मा ॥ २० ॥ आत्मा नसतां देहांतरीं । मग तें प्रेत चराचरीं । देहसंगें आत्मा करी । सकळ कांहीं ॥ २१ ॥ एकेविण एक काय । कामा न ये वाया जाय । म्हणोनि हा उपाय । देहात्मयोगें ॥ २२ ॥ देह अनित्य आत्मा नित्य । हा विवेक नित्यानित्य । अवघें सूक्ष्माचें[9] कृत्य । जाणती ज्ञानी ॥ २३ ॥ पिंडीं देहधर्ता जीव । ब्रह्मांडीं देहधर्ता शिव । ईश्वरतनुचतुष्टय । सर्व ईश्वर धर्ता ॥ २४ ॥ त्रिगुणा परता जो ईश्वर । अर्धनारीनटेश्वर । सकळ सृष्टीचा विस्तार । तेथून जाहला ॥ २५ ॥ बरवें विचारून पाहीं । स्त्री पुरुष तेथें नाहीं । चंचळ रूप येतें कांहीं । प्रत्ययासी ॥ २६ ॥ मुळींहूनि शेवट-

---

१. खुणावतो. २. धीट करवितो. ३. करण्या न करण्याचा विचार करी. ४. भितो. ५. फिरतो. ६. चतुर. ७. स्वच्छंदी. ८. सहनशील. ९. लिंगदेहाचें.

वरी। ब्रह्मादि पिपीलिका देह धरी[1]। नित्यानित्यविवेक चतुरीं। जाणिजे ऐसा ॥ २७ ॥ जड तितुकें अनित्य। आणि सूक्ष्म तितुकें नित्य। यांहि मध्यें नित्यानित्य। पुढें निरूपिलें ॥ २८ ॥ स्थूल सूक्ष्म वोलांडिलें। कारण महाकारण सांडिलें। विराट हिरण्यगर्भ खांडिलें। विवेकानें ॥ २९ ॥ अव्याकृत मूळप्रकृती[2]। तेथें जाऊन बैसली वृत्ती। ते वृत्ती व्हावया निवृत्ती। निरूपण ऐका ॥ ३० ॥ आत्मानात्मविवेक बोलिला। चंचळ आत्मा प्रत्यया आला। पुढिलिये समासीं निरूपिला। सारासारविचार ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे त्रयोदशदशके आत्मानात्मविवेकनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. सारासारविचार.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका सारासारविचार। उभारलें जगडंबर[3]। त्यांत कोण सार कोण असार। विवेकें ओळखावें ॥ १ ॥ दिसेल तें नासेल। आणि येईल तें जाईल। जें असतांचि असेल। तेंचि सार ॥ २ ॥ मागां आत्मानात्मविवेक बोलिला। आत्मा वोळखून सांडिला। आत्मा जाणतां लागला। मुळींचा तंतू ॥ ३ ॥ मुळीं जे राहिली वृत्ती। ते झाली पाहिजे निवृत्ती। सारासारविचार श्रोतीं। बरा पहावा ॥ ४ ॥ नित्यानित्यविवेक केला। आत्मा नित्यसा निवडिला। निवृत्तिरूपें हेत उरला। निर्विकारीं ॥ ५ ॥ हेत म्हणिजे तो चंचळ। निर्गुण म्हणिजे तें निश्चळ। सारासारविचारें चंचळ। होऊन जातें ॥ ६ ॥ चळे म्हणोनि तें चंचळ। न चळे म्हणोनि निश्चळ। निश्चळीं उडे चंचळ। निश्चयेंसी ॥७॥ ज्ञान आणि उपासना[4]। दोन्ही एकचि पहाना। उपासनेकरितां जना। जगदुद्धार ॥ ८ ॥ द्रष्टा साक्षी जाणता। ज्ञानघन चैतन्य सत्ता। ज्ञान देवचि तत्वता। बरें पाहा ॥९॥ त्या ज्ञानाचें विज्ञान[5] होतें। शोधून पाहावें बहुमतें। चंचळ अवघें नासतें। येणेंप्रकारें ॥ १० ॥ नाशवंत नासेल कीं नासेना। ऐसें अनुमानचि आहे। मना। तरी तो पुरुष सहसा ज्ञाना। अधिकारी नव्हे ॥ ११ ॥ नित्य नि-

---

१. ब्रम्हदेवापासून मुंगीपर्यंत सर्व देह धारण करितो. २. माया, आदिशक्ति. ३. जगाचा पसारा. ४. भक्ति. ५. साक्षात्कार.

श्चय केला । संदेह उरतचि गेला । तरी तो जाणावा वाहवला । मायामृगजळीं ॥ १२ ॥ क्षयचि नाहीं जो अक्षयी । व्यापकपणें सर्वां ठायीं । तेथें हेतु संदेह नाहीं । निर्विकारीं ॥ १३ ॥ जें उदंड घनदाट । आद्य मध्य शेवट । अचळ अढळ अतुट[१] । जैसें तैसें ॥ १४ ॥ पाहतां जैसें गगन । गगनाहून तें सघन । जनचि नाहीं निरंजन[२] । सदोदित ॥ १५ ॥ चर्मचक्षु ज्ञानचक्षु । हा तो अवघा पूर्वपक्ष[३] । निर्गुण ठायींचें अलक्ष[४] । लक्षवेना ॥ १६ ॥ संगत्यागेंविण कांहीं । परब्रह्म होणार नाहीं । संगत्याग करूनि पाहीं । मौनेंगर्भे ॥ १७ ॥ निरसितां अवघेंचि निरसिलें । चंचळ तितुकें निघोन गेलें । निश्चळ परब्रह्म उरलें । तेंचि सार ॥ १८ ॥ आठवा देह मूळमाया । निरसोनि गेल्या अष्टकाया । साधु सांगती उपाया । कृपाळूपणें ॥ १९ ॥ सोहंहंस तत्वमसी । तें तूं ब्रह्म आहेसी । विचार पाहतां स्थिति ऐसी । सहजचि होते ॥ २० ॥ साधक असोन ब्रह्म उरलें । तेथें वृत्तिशून्य झालें । सारासार विचारिलें । येणें प्रकारें ॥ २१ ॥ तें तापेना ना निवेना । तें उजळेना ना काळवंडेना । डहुळेना ना वितळेना । परब्रह्म तें ॥ २२ ॥ तें भिजेना ना वाळेना । तें विझेना ना जळेना । जयास कोणीच नेईना । परब्रह्म तें ॥ २३ ॥ दिसेना ना भासेना । उपजेना ना नासेना । तें येईना ना जाईना । परब्रह्म तें ॥ २४ ॥ जें सन्मुखचि चहूंकडे । जेथें दृश्यभास उडे । धन्य साधु तो पहुडे[५] । निर्विकारीं ॥२५॥ निर्विकल्प कल्पनातीत । तोचि ओळखावा संत । येर अवघेंचि असंत[६] । भ्रमरूप ॥ २६ ॥ खोटें सांडून खरें घ्यावें । तरीच परीक्षवंत म्हणावें । असार सांडून सार घ्यावें । परब्रह्म तें ॥ २७ ॥ जाणतां जाणतां जाणीव जाते । आपली वृत्ती तद्रूप होते । आत्मनिवेदनी भक्ती ते । ऐसी आहे ॥ २८ ॥ वाच्यांशें भुक्ति मुक्ति बोलावी । लक्ष्यांशें तद्रूपता विवरावी । विवरितां हेतु नुरवी । ते तद्रूपता ॥ २९ ॥ सद्रूप[७] चिद्रूप[८] आणि तद्रूप[९] । स्वरूप म्हणिजे आपुलें रूप । आपलें रूप म्हणिजे अरूप । तत्त्वनिरसना उपरी ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे त्रयोदशदशके सारासारविचारनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

१. अखंड. २. निर्जन. ३. निरास होणारा विचार. ४. शब्दरहित ब्रह्म. ५. विश्रांति घेतो. ६. क्षणभंगुर. ७. नित्य. ८. ज्ञानरूप. ९. एकरूप.

## ३. उभारणी.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्रह्म घन आणि पोकळ । आकाशाहूनि विशाळ । निर्मळ आणि निश्चळ । निर्विकारी ॥ १ ॥ ऐसें असतां कित्येक काळ । तेथें आरंभिला भूगोळ । तया भूगोळाचें मूळ । सावध ऐका ॥ २ ॥ परब्रम्ह असतां निश्चळ । तेथें संकल्प उठिला चंचळ । तयासि बोलिजे केवळ । आदिनारायण ॥ ३ ॥ मूळमाया जगदीश्वर । त्यासि म्हणिजे षड्गुणेश्वर । अष्टधा प्रकृतीचा विचार । तेथें पाहा ॥ ४ ॥ ऐलीकडे गुणक्षोभिणी[१] । तेथें जन्म घेतला त्रिगुणीं । मूळ ओंकाराची मांडणी । तेथूनि जाणावी ॥ ५ ॥ अकार उकार मकार । तिन्ही मिळोन ओंकार । पुढें पंचभूतांचा विस्तार । विस्तारला ॥ ६ ॥ आकाश म्हणिजे अंतरात्म्यासी । तयापासोनि जन्म वायूसी । तया वायूपासून तेजासी । जन्म जाहला ॥ ७ ॥ वायूचा कातरा घसवटे । तेणें उष्णें वन्हि पेटे । सूर्यबिंब तें प्रगटे । तये ठायीं ॥ ८ ॥ वारा वाजतो शीतळ । तेथें निर्माण झालें जळ । तें जळ आळूनि भूगोळ । निर्माण झाला ॥ ९ ॥ त्या भूगोळाचे पोटीं । अनंत बीजांचिया कोटी । पृथ्वीपाण्या होतां भेटी । अंकुर निघती ॥१०॥ पृथ्वीवरी वल्ली नानारंग । पत्र पुष्पांचे तरंग । नाना स्वाद तेथें मग । फळें जाहलीं ॥ ११ ॥ पत्रें पुष्पें फळें मूळें । नाना वर्णें नाना रसाळें । नाना धान्यें अन्नें केवळें । तेथून जाहलीं ॥१२॥ अन्नापासूनि झालें रेत । रेतापासून प्राणी निपजत । ऐशी हे रोकडी प्रचीत । उत्पत्तीची ॥ १३ ॥ अंडज जारज स्वेदज उद्भिज । पृथ्वी पाणी सकळांचें बीज । ऐसें हें नवल चोज । सृष्टिरचनेचें ॥१४॥ चारी खाणी चारी वाणी । चौऱ्यांयशी लक्ष जीवयोनी । निर्माण झाले लोक तिन्ही । पिंडब्रह्मांड ॥१५॥ मुळीं अष्टधा प्रकृती । अवघे पाण्यापासून जन्मती । पाणी नसतां मरती । सकळ प्राणी ॥ १६ ॥ नव्हे अनुमानाचें बोलणें । याचा बरा प्रत्यय घेणें । वेद शास्त्रें पुराणें । प्रत्ययें घ्यावीं ॥ १७ ॥ जें आपल्या प्रत्यया येईना । तें अनुमानिक घ्यावें ना । प्रत्ययेंविण सकळ जना । व्यवसाय[२] नाहीं ॥ १८ ॥ व्यवसाय प्रवृत्ति निवृत्ति । दोहोंकडे पाहिजे प्रचीती । प्रचीतीविण अनुमानें असती । ते विवेकहीन ॥ १९ ॥ ऐसा सृष्टिरचनेचा विचार । संकलितें[३]

---

१. त्रिगुणांना प्रगट करणारी. २. निश्चितपणा. ३. संक्षेपानें.

बोलिला प्रकार । आतां विस्ताराचा संहार । तोही ऐका ॥ २० ॥ मुळापासून शेवटवरी । अवघा अंतरात्माचि करी । करी आणि विवरी । यथायोग्य ॥२१॥ पुढें संहार निरोपिला । श्रोतीं पाहिजे ऐकिला । इतुक्या उपरी झाला । समास पूर्ण ॥२२॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे त्रयोदशदशके उभारणीनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. प्रळय.

श्रीगणेशाय नमः ॥ पृथ्वीस होईल अंत । भूतांस मांडेल कल्पांत । ऐसा समाचार साद्यंत । शास्त्रीं निरोपिला ॥ १ ॥ शतवर्ष अनावृष्टी । तेणें जळेल हे सृष्टी । पर्वत मांती[1] ऐसी पृष्टी[2] । भूमीची तडके ॥ २ ॥ बारा कळीं सूर्यमंडळा । किरणापासूनी निघती ज्वाळा । शत वरुषें भूगोळा । दहन होय ॥ ३ ॥ सिंदूरवर्ण वसुंधरा । ज्वाळा लागती फणिवरा[3] । तो आहाळोन[4] सरारां । विष वमी ॥ ४ ॥ त्या विषाच्या ज्वाळा निघती । तेणें पाताळें जळती । महापावकें[5] भस्म होती । पाताळलोक ॥ ५ ॥ तेथें महाभूतें खवळती । प्रळयवात सुटती । प्रळयपावक वाढती । चहूंकडे ॥ ६ ॥ तेथें अक्रा रुद्र खवळले । बारा[6] सूर्य कडाडिले । पावकमात्र एकवटिले । प्रळयकाळीं ॥ ७ ॥ वायु विजांचे तडाके । तेथें पृथ्वी अवघीच तडके । कठिणत्व अवघेंचि फांके । चहूंकडे ॥ ८ ॥ तेथें मेरूची कोण गणना । कोण सांभाळील कोणा । चंद्र सूर्य तारागणा । मूस जाहली ॥९॥ पृथ्वीनें विरी[7] सांडिली । अवघी धगधगायमान झाली । ब्रह्मांडभट्टी जळोन गेली । एकसरा ॥ १० ॥ जळानें विरी[7] सांडिली । विशेष महावृष्टि झाली । तेणें पृथ्वी मिळाली । जळामध्यें ॥ ११ ॥ भाजला चुना जळीं विरे । तैसा पृथ्वीस धीर न धरे । विरी सांडूनियां त्वरें । जळीं मिळाली ॥ १२ ॥ शेष कूर्म वराह गेला । पृथ्वीचा आधार तुटला । सत्त्व[7] सांडून जळाला । मिळोन गेली ॥ १३ ॥ तेथें प्रळयमेघ उचलले । कठिण घोषें गर्जिन्नले । अखंड

---

१. मावतील. २. पृष्ठभाग. ३. शेषाला. ४. पोळून जाऊन ५. प्रलयाग्नीनें. ६. मित्र, रवि, सूर्य, भानु, खग, पूषा, हिरण्यगर्भ, मरीचि, आदित्य, सविता, अर्क, व भास्कर हे बारा सूर्य. ७. शक्ति, जिवटपणा.

विजा कडकडिले । ध्वनि घोष ॥ १४ ॥ पर्वतप्राय पडती गारा । पर्वत उडती ऐसा वारा । निबिड तया अंधकारा । उपमाच नाहीं ॥ १५ ॥ सिंधु नद्या एकवटल्या । मेणों नभींहूनि रिचवल्या[1] । संधी नाहीं धारा मिळाल्या । अखंड पाणी ॥ १६ ॥ तेथें मत्स्य कूर्म सर्प पडती । पर्वतासारखे दिसती । गर्जना होतां मिसळती । जळांत जळें ॥ १७ ॥ सप्त सिंधु आवरणीं गेले । आवरण वेढे मोकळे झाले । जळरूप झालिया खवळले । प्रळयपावक ॥ १८ ॥ ब्रह्मांडा ऐसा तप्त लोहो । शोषी जलाचा समूहो । तैसें जळा झालें पाहो । अपूर्व मोठें ॥ १९ ॥ तेणें आटोन गेलें पाणी । असंभाव्य माजला वन्ही । तया वन्हीस केली झडपणी । प्रळयवातें ॥ २० ॥ दीपास पालव[2] घातला । तैसा प्रळयपावक विझाला । पुढें वायु प्रबळला । असंभाव्य ॥ २१ ॥ उदंड पोकळी थोडा वारा । तेणें वितळोन गेला सारा । पंचभूतांचा पसारा । आटोपला ॥ २२ ॥ महद्भूत मूळमाया । विस्मरणें वितुळे काया । पदार्थमात्र राहावया । ठाव नाहीं ॥ २३ ॥ दृश्य हलकल्लोळें[3] नेलें । जड चंचळ वितुळलें । या उपरि शाश्वत उरलें । परब्रह्म तें ॥ २४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे त्रयोदशदशके प्रळयनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. काहाणी.

श्रीगणेशाय नमः ॥ कोणी एक दोघे जण[4] । पृथ्वी फिरती उदासीन । कालक्रमणें लागून । कथा आरंभिली ॥ १ ॥ श्रोता पुसे वक्तयासी । काहणी सांगा बरवीसी । वक्ता म्हण श्रोतयांसी । सावध ऐका ॥ २ ॥ एक स्त्रीपुरुषें होतीं । उभयतांमध्यें बहु प्रीती । एकरूपेंचि वर्तती । भिन्न नाहीं ॥ ३ ॥ ऐसा कांहींएक काळ लोटला । तयांस एक पुत्र[5] झाला । कार्यकर्ता आणी भला । सर्वविषयीं ॥ ४ ॥ पुढें त्यासही झाला कुमर[6] । तो पित्याहून आतुर[7] । कांहीं तर्दर्थे[8] चतुर । व्यापकपणें[9] ॥ ५ ॥ तेणें व्याप उदंड केला । बहुत कन्या पुत्र व्याला । उदंड लोक संचिला । नाना प्रकारें ॥ ६ ॥ त्याचा

---

१. ओतल्या. २. फुंकर. ३. हाहाकारें. ४. प्रकृति व पुरुष. ५. सत्वगुण; विष्णु. ६. रजोगुण; ब्रह्मा. ७. चंचळ. ८. बापाच्या निमे. ९. कर्तृत्वानें.

पुत्र जो ज्येष्ठ[1] । तो अज्ञान आणि रागीट । अथवा चुकतां नीट । संहार करी ॥ ७ ॥ पिता[2] उगाच बैसला । लेंकें[3] बहुत व्याप केला । सर्व जाणता भला । ज्येष्ठ पुत्रें[3] ॥ ८ ॥ नातू[4] त्याचें अर्ध जाणे । पणतू[1] तो कांहींच नेणे । चुकतांचि संहारणें । महाक्रोधी ॥ ९ ॥ लेंक[3] सकळांचें पाळण करी । नातू[4] मेळवी वरच्यावरी[5] । पणतू[1] चुकल्या संहार करी । अकस्मात ॥ १० ॥ नेमस्तपणें वंश वाढला । विस्तार उदंडचि झाला । ऐसा बहुत काळ गेला । आनंदरूप ॥ ११ ॥ विस्तार वाढला गणवेना । वडिलांस कोणीच मानीना । परस्परें किंतु मना । बहुत पडिले ॥ १२ ॥ उदंड घरकलह लागला । तेणें कित्येक संहार झाला । विपट[6] पडिलें थोर थोरांला । बेबंद जाहलें ॥ १३ ॥ नेणपणें भरीं भरले । मग ते अवघे संहारले । जैसे यादव निमाले । उन्मत्तपणें ॥ १४ ॥ बाप[2] लेंकें[3] नातू[4] पणतू[1] । सकळांचा झाला निःपातू । कन्यापुत्र हेतुमातूं[7] । अणुमात्र नाहीं ॥ १५ ॥ ऐसी काहाणी जो विवरला । तो जन्ममृत्यूपासून सुटला । श्रोता वक्ता धन्य झाला । प्रचीतीनें ॥ १६ ॥ ऐसी काहाणी अपूर्व जे ते । उदंड वेळ होते जाते । इतुकें बोलून गोसावी ते । निवांत जाहले ॥ १७ ॥ आमची काहाणी सरो । तुमचे अंतरीं भरो । ऐसें हें बोलणें विवरो । कोणी तरी ॥ १८ ॥ चुकत वाकत आठवलें । तितुकें संकाळित बोलिलें । न्यून पूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ॥ १९ ॥ ऐसी काहाणी निरंतर । विवेकें ऐकती नर । दास म्हणे जगदुद्धार । तेचि करिती ॥ २० ॥ त्या जगदुद्धाराचें लक्षण । केलें पाहिजे विवरण । सार निवडावें निरूपण । यासी बोलिजे ॥ २१ ॥ निरूपणीं प्रत्ययें विवरावें । नाना तत्वकोडें उकलावें । समजतां समजतां व्हावें । निःसंदेह ॥ २२ ॥ विवरोन पाहतां अष्टदेह । पुढें सहजाचि निःसंदेह । अखंड निरूपणें राहे । समाधान ॥२३॥ तत्वांचा गलबला जेथें । निवांत कैसें असेल तेथें । या कारणें गुली[8]परतें । कोणी एकें असावें ॥२४॥ ऐसा सूक्ष्म संवाद । केलाचि करावा विशद । पुढिले समासीं लघुबोध । सावध ऐका ॥ २५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे त्रयोदशदशके काहाणीनिरूपणं नाम पंचम समासः ॥ ५ ॥

---

१. तमोगुण; शंकर. २. मूळ पुरुष. ३. सत्वगुण; विष्णु. ४. रजोगुण; ब्रम्हा. ५. पुनःपुन्हा. ६. वांकडें. ७. कन्यापुत्रांचा हेतु किंवा गोष्ट. ८. गलबल्यापासून दूर.

## ६. लघुबोध.[1]

श्रीगणेशाय नमः ॥ जे जे बोलिजेती पंचतत्वें । त्यांचीं अभ्यासावीं नांवें । तदुपरी स्वानुभवें । रूपें जाणावीं ॥ १ ॥ यामध्यें शाश्वत कोण । आणि अशाश्वत कोण । ऐसें करावें विवरण । प्रत्ययाचें ॥ २ ॥ पंचभूतांचा विचार । नांव रूप सारासार । तोचि बोलिजेल निर्धार। सावध ऐका ॥३॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश । नांवें बोलिलीं सावकाश । आतां रूपाचा विश्वास । श्रवण करावा ॥ ४ ॥ पृथ्वी म्हणिजे ते धरणी । आप म्हणिजे तें पाणी । तेज म्हणिजे अग्नि तरणी[2] । सतेजादिक ॥ ५ ॥ वायु म्हणिजे तो वारा । आकाश म्हणिजे पैस सारा । आतां शाश्वत तें विचारा । आपुले मनीं ॥ ६ ॥ एक शीत चांचपावें । म्हणिजे वर्म पडे ठावें । तैसें थोडया अनुभवें । बहुत जाणावें ॥ ७ ॥ पृथ्वी रचते आणि खचते । हें तों प्रत्ययास येतें । नाना रचना होत जाते । सृष्टीमध्यें ॥ ८ ॥ म्हणोन रचतें तें खचतें । आप तेंहि आटोन जातें । तेजहि प्रगटोन विझतें । वारेंही न राहे ॥ ९ ॥ अवकाश नाममात्र आहे । तेंहि विचारितां न राहे । एवं पांचभौतिक राहे । हें तों घडेना ॥ १० ॥ ऐसा पांच भूतांचा विस्तार । नाशवंत हा निर्धार । शाश्वत आत्मा निराकार । सत्य जाणावा ॥ ११ ॥ तो आत्मा कोणास कळेना । ज्ञानेंविण आकळेना । म्हणोनिया संतजनां । विचारावें ॥ १२ ॥ विचारितां सज्जनांसी । ते म्हणती कीं अविनाशी । जन्म मृत्यु आत्मयासी । बोलोंच नये ॥ १३ ॥ निराकारीं भासे आकार । आणि आकारीं भासे निराकार । निराकार आणि आकार । विवेकें ओळखावा ॥ १४ ॥ निराकार म्हणावा नित्य । आकार म्हणावा अनित्य । यासि बोलिजे नित्यानित्य । विचारणा ॥ १५ ॥ सारीं भासे असार । आणि असारीं भासे सार । सारासार विचार । शोधून पाहतां ॥ १६ ॥ पांचभौतिक तें मायिक । परंतु भासे अनेक । आणि आत्मा एक । व्यापून असे ॥ १७ ॥ चहूं भूतांमध्यें गगन । तैसें गगनीं असे सघन[3] । नेहटून[4] पाहतां अभिन्न[5] । गगन आणि वस्तु ॥१८॥ उपाधियोगेंचि आकाश । उपाधि नसतां निराभास । निरा-

१ शिंगणवाडी येथे शिवाजी महाराजांस श्रीसमर्थांनीं हा उपदेश केला, असें म्हणतात. २. सूर्य. ३. दाट. ४. बारकाईनें. ५. एकच.

भास तें अविनाश । तैसें गगन ॥ १९ ॥ आतां असो हे विवंचना । परंतु जें पाहतां नासेना । तगे तेंचि अनुमाना । विवेकें आणावें ॥२०॥ परमात्मा तो निराकार । जाणिजे हाचि विचारसार । आणि आपण कोण हा विचार। पाहिला पाहिजे ॥ २१ ॥ देहास अंत येतां । वायु जातो तत्वतां । लटिकें म्हणाल तरी आतां । श्वासोच्छ्वास धरावा ॥ २२ ॥ श्वास कोंडतां देह पडे। देह पडतां म्हणती मडें । मड्यास कर्तव्य न घडे । कदाकाळीं ॥ २३ ॥ देहावेगळा वायु न करी । वायुवेगळा देह न धरी । विचार पाहतां कांहींच न करी । एका वेगळें एक ॥ २४ ॥ उगेंच पाहतां मनुष्य दिसे । विचार घेतां कांहींच नसे । अभेदभक्तीचें लक्षण ऐसें । ओळखावें ॥ २५ ॥ कर्ता आपण ऐसें म्हणावें । तरी आपले इच्छेसारिखें व्हावें । इच्छेसारिखें न होतां मानावें । अवघेंचि वाव ॥ २६ ॥ म्हणोन कर्ता नव्हे कीं आपण । तेथें भोक्ता कैंचा कोण । हेंचि विचाराचें लक्षण । अविचारें न घडे ॥ २७ ॥ अविचार आणि विचार । जैसा प्रकाश आणि अंधकार । विकार आणि निर्विकार । एक नव्हे कीं ॥ २८ ॥ जेथें नाहीं विवंचना । तेथें कांहींच चालेना । खरें तेंचि अनुमाना । कदा न ये ॥२९॥ प्रत्ययासि बोलिजे न्याय। अप्रत्यय तो अन्याय । जात्यंधास[1] परीक्षा काय । नाना रत्नांची ॥ ३० ॥ म्हणोन ज्ञाता धन्य धन्य । जो निर्गुणासि अनन्य । आत्मनिवेदनें[2] मान्य । परम पुरुष ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे त्रयोदशदशके लघुबोधनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. प्रत्यय.

श्रीगणेशाय नमः ॥ निर्मळ निश्चळ निराभास । तयास दृष्टांत आकाश । आकाश म्हणिजे अवकाश । पसरला पैस ॥ १ ॥ आधीं पैस मग पदार्थ । प्रत्यक्ष पाहतां यथार्थ । प्रत्यक्षेंविण पाहतां व्यर्थ । सकळ कांहीं ॥ २ ॥ ब्रह्म म्हणिजे तें निश्चळ । आत्मा म्हणिजे तो चंचळ । तयास दृष्टांत केवळ । वायु जाणावा ॥ ३ ॥ घटाकाश दृष्टांत ब्रह्माचा । घटीं बिंब दृष्टांत आत्म्याचा । विवरितां अर्थ दोहींचा । भिन्न आहे ॥ ४ ॥ भूत म्हणिजे जि-

---

१. जन्मांधास. २. देहसमर्पण केल्यानें.

तुकें झालें । झालें तितुकें निमालें । चंचळ आलें आणि गेलें । ऐसें जाणावें ॥ ५ ॥ अविद्या जड आत्मा चंचळ । जड कर्पूर आत्मा अनळ । दोन्ही जळोन तात्काळ । विझोन जाती ॥ ६ ॥ ब्रह्म आकाश निश्चळ जाती । आत्मा वायु चंचळ जाती । परीक्षवंत परीक्षिती । खरें कीं खोटें ॥ ७ ॥ जड अनेक आत्मा एक । ऐसा आत्मानात्मविवेक । जगा वर्तवी जगन्नायक । तयास म्हणावें ॥ ८ ॥ जड अनात्मा चेतवी आत्मा । सर्वी वर्ते सर्वात्मा । अवघा मिळोन चंचळ आत्मा । निश्चळ नव्हे ॥ ९ ॥ निश्चळ तें परब्रह्म । तेथें नाहीं दृश्यभान । विमळ ब्रह्म तें निर्भ्रम । जैसें तैसें ॥ १० ॥ आधीं आत्मानात्मविवेक थोर । मग सारासारविचार । सारासारविचारें संहार । प्रकृतीचा ॥ ११ ॥ विचारें प्रकृति संहारे । दृश्य असतांच वोसरे । अंतरात्मा निर्गुणीं संचरे । अध्यात्मश्रवणें ॥ १२ ॥ चढता अर्थ लागला । तरी अंतरात्मा चढतचि गेला । उतरल्या अर्थें उतरला । भूमंडळीं ॥ १३ ॥ अर्थासारिखा आत्मा होतो । जिकडे नेला तिकडे जातो । अनुमानें संदेहीं पडतो । कांहीं एक ॥ १४ ॥ निःसंदेह अर्थ चालिला । तरी आत्मा निःसंदेहचि झाला । अनुमान अर्थें झाला । अनुमानरूपी ॥ १५ ॥ नवरसिक अर्थ चाले । श्रोते तद्रूपचि झाले । चाटपणें होऊन गेले । चाटचि अवघे ॥ १६ ॥ जैसा जैसा पडे प्रसंग । तैसे गुहिन्यांचे[1] रंग । या कारणें उत्तम मार्ग पाहोन । धरावा ॥ १७ ॥ उत्तम अन्नें बोलत गेले । तरी मन अन्नाकारचि झालें । लावण्य वनितेचें वर्णिलें । तरी मन तेथेंचि बैसे ॥१८॥ पदार्थवर्णन आघवें । किती म्हणोन सांगावें । परंतु अंतरीं समजावें । होय कीं नव्हे ॥ १९ ॥ जें जें देखिलें आणि ऐकिलें । तें अंतरीं सदृढ बैसलें । हित अनहित परीक्षिलें । परीक्षवंतीं ॥ २० ॥ या कारणें सर्व सांडावें । एक देवास धुंडावें । तरी वर्म पडे ठावें । कांहीं एक ॥ २१ ॥ नाना सुखें देवें केलीं । लोकें तयास चुकलीं । ऐसीं चुकतांच मेलीं । जन्मवरी ॥ २२ ॥ सर्व सांडून शोधा मजला । ऐसा देवचि बोलिला[2] । लोकीं शब्द अमान्य केला । भगवंताचा ॥ २३ ॥ म्हणोनि नाना दुःखें भोगिती । सर्वकाळ कष्टी होती । मनीं सुखाचि इच्छिती । परी तें कैचें ॥ २४ ॥ उदंड सुख जया

१. सरड्याचे. २. 'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज'—गीता, अ. १८.

लागलें। वेडे तयास चुकले। सुख सुख म्हणतांच मेले। दुःख भोगित ॥ २५ ॥ शाहण्यानें ऐसें न करावें। सुख होय तेंचि करावें। देवास धुंडीत जावें। ब्रह्मांडापरतें ॥ २६ ॥ मुख्य देवचि ठायीं पडला। मग काय उणें तयाला। लोक वेडे विवेकाला। सांडूनि जाती ॥ २७॥ विवेकाचें फळ तें सुख। अविवेकाचें फळ तें दुःख। यांत मानेल तें अवश्यक। केलें पाहिजे ॥ २८ ॥ कर्तयासि ओळखावें। यासि विवेक म्हणावें। विवक सांडितां व्हावें। परम दुःखी ॥ २९ ॥ आतां असो हें बोलणें। कर्त्यास ओळखणें। आपलें हित विचक्षणें। चुकों नये ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे त्रयोदशदशके प्रत्ययनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. कर्तृलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रोता म्हणे वक्तयासी। कोण कर्ता निश्चयेंसी। सकळ सृष्टि ब्रह्मांडासी। कोणें केलें ॥ १ ॥ तंव बोलिले सभानायक। जे बोलिके एकाहून एक। या बोलण्याचें कौतुक। श्रोतीं सादर परिसावें ॥२॥ एक म्हणती कर्ता देव। एक म्हणती कोण देव। आपुलाला अभिप्राव। सृष्टीमध्यें बोलती ॥ ३ ॥ उत्तम मध्यम कनिष्ठ। भावार्थें बोलतीस्पष्ट। आपुलाली उपासना[3] श्रेष्ठ। मानिती जनीं ॥ ४॥ कोणी एक ऐसें म्हणती। कर्ता देव मंगळमूर्ती[4]। एक म्हणती सरस्वती। सर्व करी ॥ ५ ॥ एक म्हणती कर्ता भैरव। एक म्हणती खंडेराव। एक म्हणती बीरदेव। एक म्हणती भगवती ॥ ६॥ एक म्हणती नरहरी। एक म्हणती बनशंकरी। एक म्हणती सर्व करी। नारायण ॥ ७ ॥ एक म्हणती श्रीराम कर्ता। एक म्हणती श्रीकृष्ण कर्ता। एक म्हणती भगवंत कर्ता। केशवराज ॥ ८ ॥ एक म्हणती पांडुरंग। एक म्हणती श्रीरंग। एक म्हणती झोटिंग। सर्व करी ॥ ९ ॥ एक म्हणती मुंज्या कर्ता। एक म्हणती सूर्य कर्ता। एक म्हणती अग्नि कर्ता। सर्व कांहीं ॥ १० ॥ एक म्हणती लक्ष्मी करी। एक म्हणती मारुती करी। एक म्हणती धरित्री करी। सर्व कांहीं ॥ ११ ॥ एक म्हणती तुकाई। एक म्हणती यमाई। एक म्हणती सटवाई। सर्व करी ॥ १२ ॥

---

१. वृक्षाला फळें लागतात तसें. २. शहाण्यानें. ३. उपास्य दैवत. ४. गणपती.

एक म्हणती भार्गव कर्ता । एक म्हणती वामन कर्ता । एक म्हणती परमात्मा कर्ता । एकचि आहे ॥ १३ ॥ एक म्हणती विरंणा कर्ता । एक म्हणती बस्वंणा[1] कर्ता । एक म्हणती रेवंणा[1] कर्ता । सर्व कांहीं ॥ १४ ॥ एक म्हणती खळेया[2] कर्ता । एक म्हणती स्वामी कार्तिक कर्ता । एक म्हणती व्यंकटेश कर्ता । सर्व कांहीं ॥ १५ ॥ एक म्हणती गुरु कर्ता । एक म्हणती दत्त कर्ता । एक म्हणती मुख्य कर्ता । वोढ्या[3] जगन्नाथ ॥ १६ ॥ एक म्हणती ब्रह्मा कर्ता । एक म्हणती विष्णु कर्ता । एक म्हणती महेश कर्ता । निश्चयेंसी ॥ १७ ॥ एक म्हणती पर्जन्य कर्ता । एक म्हणती वायु कर्ता । एक म्हणती करून अकर्ता । निर्गुण देव ॥ १८ ॥ एक म्हणती माया करी । एक म्हणती जीव करी । एक म्हणती सर्व करी । प्रारब्धयोग ॥ १९ ॥ एक म्हणती प्रयत्न करी । एक म्हणती स्वभाव करी । एक म्हणती कोण करी । कोण जाणे ॥ २० ॥ ऐसा कर्त्यांचा विचार । पुसतां भरला बाजार । आतां कोणाचें उत्तर । खरें मानावें ॥ २१ ॥ जिहीं जो देव मानिला । कर्ता म्हणती तयाला । ऐसा लोकांचा गलबला । वोसरेना ॥ २२ ॥ आपुलाल्या साभिमानें । निश्चय केला मनें । याचा विचार पाहणें । घडेचिना ॥ २३ ॥ बहुत लोकांचा बहु विचार । अवघा राहों द्या बाजार । परंतु याचा विचार । ऐसा आहे ॥ २४ ॥ श्रोतीं व्हावें सावधान । निश्चयें तोडावें अनुमान । प्रत्ययें मानावें प्रमाण । जाणते पुरुषीं ॥ २५ ॥ जें जें कर्तयानें केलें । तें तें त्या उपरी झालें । कर्त्या पूर्वीं आढळलें । न पाहिजे कीं ॥ २६ ॥ केलें तें पांचभौतिक । आणि पांचभौतिक ब्रह्मादिक । तरी भूतांशें पांचभौतिक । केलें तें घडेना ॥ २७ ॥ पंचभूतांस वेगळें करावें । मग कर्त्यांस वोळखावें । पांचभौतिक स्वभावें । कर्त्यांत आलें ॥ २८ ॥ पंचभूतांवेगळें निर्गुण । तेथें नाहीं कर्तेपण । निर्विकारासि विकार कोण । लावूं शके ॥ २९ ॥ निर्गुणास कर्तव्य न घडे । सगुण झाल्यांत सांपडे । आतां कर्तव्यता कोणीकडे । पडे पाहा ॥ ३० ॥ लटिक्याचा कर्ता कोण । हें पुसणेंचि अप्रमाण । म्हणोन हें प्रमाण । जें स्वभावेंचि जाहलें ॥ ३१ ॥ एक सगुण एक निर्गुण । कोठें लावूं कर्तेपण । या अर्थाचें विवरण । बरें पाहा ॥ ३२ ॥ सगुणें सगुण केलें । तरी

१. जैन लोकांचे देव. २. कोंकणांतील एक दैवत. ४. ओढ्या प्रांतांतील.

तें पूर्वींच आहे झालें । निर्गुणास कर्तव्य लाविलें । न वचे कदा ॥ ३३ ॥ येथें कर्ता दिसेना । प्रत्यय आणावा अनुमाना । दृश्य सत्यत्वें असेना । म्हणोनियां ॥ ३४ ॥ केलें तें अवघेंचि लटिकें । तरी कर्ता हें बोलणेंचि फिकें । वक्ता म्हणे रे विवेकें । बरें पाहा ॥३५॥ बरें पाहातां प्रत्यय आला । तरी कां करावा गलबला । प्रचीत आलिया आपणाला । अंतर्यामीं ॥३६॥ आतां असो हें बोलणें । विवेकी तोचि हें जाणे । पूर्वपक्ष लागे उडवणें । येऱ्हवीं अनिर्वाच्य ॥ ३७ ॥ तंव श्रोता करी प्रश्न । देहीं सुखदुःख भोक्ता कोण । पुढें हेंचि निरूपण । बोलिलें असे ॥ ३८ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे त्रयोदशदशके कर्तृलक्षणनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. आत्मविवरण.

श्रीगणेशाय नमः ॥ आत्म्यास शरीरयोगें । उद्वेग चिंता करणें लागे । शरीरयोगें आत्मा तगे । हें तों प्रगटचि आहे ॥ १ ॥ देह अन्नचि खाईना । तरी आत्मा कदापि तगेना । आत्म्याविण चेतना । देहास कैंची ॥ २ ॥ हें एका वेगळें एक । करूं जातां निरर्थक । उभययोगें कोणी एक । कार्य चाले ॥ ३ ॥ देहाला नाहीं चेतना । आत्म्यास पदार्थ उचलेना । स्वप्नभोजनें भरेना । पोट कांहीं ॥ ४ ॥ आत्मा स्वप्न अवस्थेंत जातो । परंतु देहामध्येंहि असतो । निद्सुरेपणें[२] खाजवितो । चमत्कार पाहा ॥ ५ ॥ अन्नरसें वाढे शरीर । शरीराप्रमाणें विचार । वृद्धपणीं तदनंतर । दोन्हीं ल्हानाळती[३] ॥ ६ ॥ उन्मत्त द्रव्यें[४] देह खातो । देहयोगें आत्मा भुलतो । विस्मरणें शुद्धि सांडितो । सकळ कांहीं ॥ ७ ॥ देहानें घेतलें विष । आत्मा जाय सावकाश । वाढणें मोडणें आत्मयास । नेमस्त आहे ॥ ८ ॥ वाढणें मोडणें[५] जाणें येणें । सुखदुःख देहाचेनि गुणें । नाना प्रकारें भोगणें । आत्मयासि घडे ॥ ९ ॥ वारूळ म्हणिजे पोकळ । मुंग्यांचे मार्गचि सकळ । तैसेंचि हें केवळ । शरीर जाणावें ॥ १० ॥ शरीर नाडीचा खेटा । नाडीमध्यें पोकळ वाटा । ल्हान थोर सगटा । दाटल्या नाडी ॥ ११ ॥ प्राणी अन्नोदक घेतो । त्यांचा अन्नरस होतो । त्यास वायु प्रवर्ततो । श्वासोच्छ्वासें ॥१२॥

---

१. शंका. २. झोंपेंत. ३. क्षीण होतात. ४. मादक पदार्थ. ५. खेंचाखेंच.

नाडीद्वारा धांवे जीवनें[१] । जीवनामध्यें खेळे पवनें[२] । त्या पवनासरिसा जाण। आत्माहि विचरे[३] ॥ १३ ॥ तृषेनें शोषलें शरीर । आत्म्यास कळे हा विचार । मग उठोन धांवे शरीर । उदकाकडे ॥ १४ ॥ उदक मागे शब्द बोलवी । मार्ग पाहोन शरीर चालवी । शरीर अवघेंच हालवी । प्रसंगानुसार ॥ १५ ॥ क्षुधा लागते ऐसें जाणतो । मग देहाला उठवितो । अचावाचा बोलवितो । ज्यासी त्यासी ॥ १६ ॥ बायकोस म्हणे झालें झालें । देह सोंवळें करूनि आणिलें । पायांत भरोन चालविलें । तांतडी तांतडी ॥ १७ ॥ त्यास पात्रावरी बैसविलें । नेत्रीं भरोन पात्र पाहिलें । हातांकरवीं आरंभिलें । आपोशन ॥१८॥ हातांकरवीं ग्रास उचलवी । मुखीं जाऊनि मुख पसरवी। दांतांकरवीं चाववी । नेटें नेटें ॥१९॥ आपण जिव्हेमध्यें खेळे । पाहतो परिमळ सोहळे । केश काढी खडा कळे । तत्काळ थुंकी ॥ २० ॥ अळणी कळतां मीठ मागे । बायलेस म्हणे अगे कांगे । डोळे तापून पाहों लागे । रागें रागें ॥२१॥ गोडी लागतांच आनंदे । गोडी नसतां परम खेदे । वांकडी गोष्टी अंतरीं भेदे । आत्मयासी ॥ २२ ॥ नाना अन्नांची गोडी । नाना रसस्वाद निवडी । तिखट लागतांच मस्तक झाडी । आणि खोंकी ॥ २३ ॥ मिरपुडी घातली फार । कायसें करितें खापर । जिव्हेकरवीं कठिणोत्तर । बोलवी रागें ॥ २४ ॥ आज उदंड जेविला । सवेंच तांब्या उचलिला । घळघळां घेऊं लागला । सावकाश ॥ २५ ॥ देहीं सुखदुःख भोक्ता । तो एक आत्माचि पाहतां । आत्म्याविण देह वृथा । मडें होय ॥ २६ ॥ मनाच्या अनंत वृत्ती । जाणणें तेचि आत्मस्थिती[४] । त्रैलोक्यीं जितुक्या व्यक्ती । तदंतरीं आत्मा ॥ २७ ॥ जगामध्यें जगदात्मा । विश्वामध्यें विश्वात्मा । सर्व चालवी सर्वात्मा । नाना रूपें ॥ २८ ॥ हुंगे चाखे देखे ऐके । मृदु कठिण वोळखे । शीत उष्ण ठाउकें । तात्काळ होय ॥ २९ ॥ सावधपणें लाघवी[५] । बहुत करी उठाठेवी । या धूर्ताच्या उर्गवी[६] । धूर्तचि करी ॥ ३० ॥ वायूसरिसा परिमळ येतो । परी तो परिमळ वितळोन जातो । वायु धुळी घेऊन येतो । परी तोहि जाय ॥३१॥ शीत उष्ण वायूसरिसें । सुवासें अथवा कुवासें । असिजे परी सावकाशें । तगणें न घडे ॥ ३२ ॥ वायूसरिसे रोग येती । वायूस-

१. पाणी. २. वायु. ३. वावरतो. ४. आत्मस्वरूप. ५. चतुर. ६. उलगडा.

रसीं भूतें धांवती । धूर आणि धुकट येती । वायूसवें ।। ३३ ।। वायूसवें कांहींच जगेना । आत्म्यासवें वायु तगेना । आत्म्याची चपळता जाणा । अधिक आहे ।। ३४ ।। वायु कठिणास अडतो । आत्मा कठिणास भेदून जातो । कठिण पाहों तरी तो । छेद नाहीं ।। ३५ ।। वायु झडझडां वाजे । आत्मा कांहींच न वाजे । मौनेंचि अंतरीं समजे । विवरोन पाहतां ।। ३६ ।। शरीरास बरें केलें । तें आत्मयासि पावलें । शरीरयोगें झालें । समाधान ।।३७।। देहावेगळे उपाय नाना । करितां आत्म्यास पावेना । समाधान पावे वासना । देहाचेनी ।। ३८ ।। देहआत्मयांचें कौतुक । पाहों जातां अनेक । देहावेगळी आडणुक । आत्म्यास होय ।। ३९ ।। एक असतां उदंड घडे । वेगळें पाहतां कांहींच न घडे । विवेक त्रैलोक्यीं पवाडे । देहात्मयोगें ।।४०।। इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे त्रयोदशदशके आत्मविवरणं नाम नवमः समासः ।। ९ ।।

---

## १०. बोध.

श्रीगणेशाय नमः ।। पालेमाळा सुमनमाळा । फळमाळा बीजमाळा । पाषाणमाळा कवडेमाळा । सूत्रें चालतां ।। १ ।। स्फटिकमाळा मोहोरमाळा । काष्ठमाळा गंधमाळा । धातुमाळा रत्नमाळा । जाळया वेली चांदवे ।। २ ।। परी हें तंतूनें चालतें । तंतु नसतां विस्काळित होतें । तैसें म्हणों आत्मयातें । तरी साहित्य[1] न पडे ।। ३ ।। तंतूस मणी ओंविला । तंतु मध्येंचि राहिला । आत्मा सर्वांगीं व्यापला । पाहाना कां ।। ४ ।। आत्मा चपळ सहज गुणें । दोरी काय चळों जाणे । म्हणोनि दृष्टांत देणें । विहित नव्हे ।। ५ ।। नाना वल्लींत जळांश । उसामध्यें दाटला रस । परी तो रस आणि बाकस[2] । एक नव्हे ।। ६ ।। देहीं आत्मा देह अनात्मा । त्याहून पर तो परमात्मा । निरंजनास उपमा । असेचिना ।।७।। रायापासूनि रंकवरी । अवघ्या मनुष्यांच्या हारी[3] । सगट समान सरी । कैसी करावी ।। ८ ।। देव दानव मानव । नीच योनि हीन जीव । पापी सुकृती अभिप्राव । उदंड आहे ।। ९ ।। एकांशें[4] जग चाले । परी सामर्थ्य वेगळालें । एकासंगें मुक्त केलें । एकासंगें रौरव ।। १० ।। साकर माती पृथ्वी होय । परी ते माती खातां न ये । गरळ आप

---

१. दृष्टांत योग्य होत नाहीं. २. चिपाड. ३. ओळी. ४. एकाच तत्त्वानें.

नव्हे काय । परी तें खोटें ॥ ११ ॥ पुण्यात्मा आणि पापात्मा । दोहींकडे अंतरात्मा । साधु भोंदू सीमा । सांडूंच नये ॥ १२ ॥ अंतर एक तों खरें । परी सांगातें घेऊं नयेती माहारें । पंडित आणि चाट पोरें । एक कैसीं ॥ १३ ॥ मनुष्य आणि गधडे । राजहंस आणि कोंबडें । राजे आणि माकडें । एक कैसीं ॥ १४ ॥ भागीरथीचें जळ आप । मोरी संवदणी[१] तेंहि आप । कुश्चिळ उदक अल्प । सेववेना ॥ १५ ॥ या कारणें आचारशुद्ध । त्याउपरी विचारशुद्ध । वीतरागी[२] आणि सुबुद्ध । ऐसा पाहिजे ॥ १६ ॥ शूराहूनि मानिले लंडी[३] । तरी युद्धप्रसंगीं नकोंडी[४] । श्रीमंत सांडूनि बराडी[५] । सेवितां कैसें ॥ १७ ॥ एका उदकें सकळ झालें । परी पाहोन पाहिजे सेविलें । सगट अवघेंचि[७] सेविलें । तरी तें मूर्खपण ॥ १८ ॥ जीवनाचें झालें अन्न । अन्नाचें झालें वमन । परी वमनाचें भोजन । करितां न ये ॥ १९ ॥ तैसें निंद्य सोडूनि द्यावें । वंद्य तें हृदयीं धरावें । सत्कीर्तीनें भरावें । भूमंडळ ॥२०॥ उत्तमास उत्तम माने । कनिष्ठास तें न माने । म्हणोन करंटे देवानें । करून ठेविले ॥ २१ ॥ सांडा अवघें करंटपण । धरावें उत्तम लक्षण । हरिकथा पुराणश्रवण । नीतिन्यायें ॥ २२ ॥ वर्तायाचा विवेक । राजी राखणें सकळ लोक । हळुहळु पुण्यश्लोक[६] । करीत जावें ॥ २३ ॥ मुलांचें चालीनें चालावें । मुलांच्या अनुमतें बोलावें । तैसें जनास शिकवावें । हळुहळू ॥ २४ ॥ मुख्य मनोगत राखणें । हीं चातुर्याचीं लक्षणें । चतुर तो चैतुरांग[८] जाणे । इतर ते वेडे ॥२५॥ वेड्यास वेडें म्हणूं नये । वर्म कदापि बोलूं नये । तरीच घडे दिग्विजय । निस्पृहासी ॥२६॥ उदंड स्थळीं उदंड प्रसंग । जाणोनि करणें यथासांग । प्राणिमात्रांचा अंतरंग । होऊन जावें ॥ २७ ॥ मनोगत राखोन जातां । परस्परें होय अवस्था[९] । मनोगत तोडितां व्यवस्था । बरी नाहीं ॥ २८ ॥ या कारणें मनोगत । राखेल तो मोठा महंत । मनोगत राखतां समस्त । वोढोन येती ॥ २९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे त्रयोदशदशके बोधनिरूपणं नाम दशमः समासः ॥१०॥ ओंवी ३००.

---

१. वस्त्र धुण्याचें धोब्याचें भांडें. २. वैराग्यशील. ३. भितरे. ४. घाण, फाजिती. ५. आशाळभूत. ६. पवित्र कीर्तीचे. ७. सर्व अंगें. ८. जिवलग. ९. सोय.

# दशक चौदावा.

## १. निस्पृहलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका निस्पृह शिकवण । युक्ति बुद्धि शहाणपण । जणें राहे समाधान । निरंतर ॥ १ ॥ सोपा मंत्र परी नेमस्त । साधें औषध गुणवंत । साधें बोलणें सप्रचीत[१] । तैसें माझें ॥ २ ॥ तात्काळचि अवगुण जाती । उत्तम गुणाची होय प्राप्ती । शब्द औषध तीव्र श्रोतीं । साक्षेपें सेवावें ॥ ३ ॥ निस्पृहता धरूं नये । धारिली तरी सोडूं नये । सोडिली तरी हिंडूं नये । वोळखीमध्यें ॥ ४ ॥ कांता दृष्टीस राखूं नये । गोडी मनास चाखवूं नये । धारिष्ट चळतां दाखवूं नये । मुख आपुलें ॥ ५ ॥ एके स्थळीं राहूं नये । कानकोंडें[२] साहूं नये । द्रव्य दारा पाहूं नये । आळकेपणें[३] ॥ ६ ॥ आचारभ्रष्ट होऊं नये । दिल्या द्रव्य घेऊं नये । उणा शब्द येऊं नये । आपणावरी ॥ ७ ॥ भिक्षेविषयीं लाजूं नये । बहुत भिक्षा घेऊं नये । पुसतांहि देऊं नये । ओळखी आपुली ॥ ८ ॥ धड मळिण नेसूं नये । गोड अन्न खाऊं नये । दुराग्रह करूं नये । प्रसंगें वर्तावें ॥ ९ ॥ भोगीं मन असूं नये । देहदुःखें त्रासूं नये । पुढें आशा धरूं नये । जीवित्वाची ॥ १० ॥ विरक्ति गळों देऊं नये । धारिष्ट चळों देऊं नये । ज्ञान मळिण होऊं नये । विवेकबळें ॥ ११ ॥ करुणाकीर्तन सोडूं नये । अंतरध्यान मोडूं नये । प्रेमतंतु तोडूं नये । सगुणमूर्तीचा ॥ १२ ॥ पोटीं चिंता धरूं नये । कष्टें खेद मानूं नये । समयीं धीर सांडूं नये । कांहीं केल्या ॥ १३ ॥ अपमानितां सिणों नये । निखंदितां कष्टों नये । धिक्कारितां झुरों नये । कदाकाळीं ॥ १४ ॥ लोकलाज धरूं नये । लाजवितां लाजूं नये । खिजवितां खिजूं नये । विरक्तपुरुषें ॥ १५ ॥ शुद्धमार्ग सांडूं नये । दुर्जनासि तंडूं नये । संबंध पडों देऊं नये । चांडाळासी ॥ १६ ॥ तपिळपण[४] धरूं नये । भांडवितां भांडूं नये । उडवितां उडों नये । निजस्थिती आपुली ॥ १७ ॥ हांसवितां हांसूं नये । बोलवितां बोलूं नये । चालवितां चालूं नये । क्षणक्षणां

---

१. अनुभवाचें. २. लाजिरवाणें. ३. आशाळभूत होऊन. ४. तापटपणा.

॥ १८ ॥ एक वेष धरूं नये । एक साज करूं नये । एक देशीं होऊं नये । अपण करावें ॥ १९ ॥ सलगी पडों देऊं नये । प्रतिग्रह घेऊं नये । सभेमध्यें वैसूं नये । सर्वकाळ ॥२०॥ नेम अंगीं लावूं नये । भरंवसा कोणास देऊं नये । अंगीकार करूं नये । नेमस्तपणाचा[१] ॥ २१ ॥ नित्यनेम सांडूं नये । अभ्यास बुडों देऊं नये । परतंत्र होऊं नये । कांहीं केल्या ॥२२॥ स्वतंत्रता मोडूं नये । निरपेक्षा तोडूं नये । परापेक्ष[२] होऊं नये । क्षणक्षणां ॥ २३ ॥ वैभव दृष्टीं पाहों नये । उपाधिसुखें राहों नये । एकांत[३] मोडों देऊं नये । स्वरूपस्थितीचा ॥ २४ ॥ अनर्गळता[४] धरूं नये । लोकनिंद्य तें करूं नये । कोठें तरी होऊं नये । आसक्त कदा ॥ २५ ॥ परंपरा तोडूं नये । उपासना मोडूं नये । ज्ञानमार्ग सोडूं नये । कदाकाळीं ॥ २६ ॥ कर्ममार्ग सांडूं नये । वैराग्य मोडों देऊं नये । साधन भजन खंडूं नये । कदाकाळीं ॥ २७ ॥ अतिवाद करूं नये । अनीति पोटीं धरूं नये । रागें भरीं भरों नये । भलतीकडे ॥ २८ ॥ न मानी त्यास सांगों नये । कंटाळवाणें बोलों नये । बहुसाल असों नये । एके स्थळीं ॥ २९ ॥ कांहीं उपाधि करूं नये । केली तरी धरूं नये । धरिली तरी सांपडूं नये । उपाधीमध्यें ॥ ३० ॥ थोरपणें असूं नये । महत्व धरून बैसूं नये । कांहीं मान इच्छूं नये । कोठें तरी ॥ ३१ ॥ साधेपण सांडूं नये । सानपण मोडूं नये । बलात्कारें जोडूं नये । आभिमान अंगीं ॥ ३२ ॥ अधिकारेंविण सांगूं नये । दाटून उपदेश देऊं नये । कानकोंडा करूं नये । परमार्थ आपुला ॥ ३३ ॥ कठिण शब्द बोलूं नये । कठिण आज्ञा करूं नये । कठिणता धरूं नये । कोणे विषयीं ॥ ३४ ॥ कठिण वैराग्य सांडूं नये । कठिण अभ्यास मोडूं नये । कठिण धीरत्व सोडूं नये । कांहीं केल्या ॥ ३५ ॥ आपण आसक्त होऊं नये । केल्याविण सांगूं नये । बहुसाल मागूं नये । शिष्यवर्गासी ॥३६॥ उद्धट शब्द बोलूं नये । इंद्रियस्मरण करूं नये । शाक्तमार्गें भरूं नये । मुक्तपणें कदा ॥ ३७ ॥ नीचकृत्यीं लाजों नये । वैभव होतां माजों नये । क्रोधें भरीं भरों नये । जाणपणें ॥ ३८ ॥ थोरपणें चुकों नये । न्याय नीती सांडूं नये । अप्रमाण वर्तों नये । कांहीं केल्या ॥ ३९ ॥ कळल्याविण बोलूं नये । अनुमानें निश्चय करूं नये । सांगतां दुःख धरूं नये । मूर्खपणें ॥ ४० ॥

---

१. दुराग्रहाचा. २. परावलंबी. ३. एकाग्र चिंतन. ४. स्वैर वर्तन.

सावधपण सोडूं नये । व्यापकपण सांडूं नये । कदा सुख मानूं नये । नि-
[1]सुकपणाचें ॥ ४१ ॥ विकल्प पोटीं धरूं नये । स्वार्थआज्ञा करूं नये ।
केली तरी टाकूं नये । आपणां पुढें ॥ ४२ ॥ प्रसंगेंविण बोलूं नये । अन्वयें-
विण गाऊं नये । विचारेंविण जाऊं नये । अविचारपंथें ॥ ४३ ॥ परोप-
कार सांडूं नये । परपीडा करूं नये । विकल्प पडों देऊं नये । कोणीएकासी
॥ ४४ ॥ संशयात्मक बोलूं नये । बहुत निश्चय करूं नये । निर्वाहेंविण
धरूं नये । ग्रंथ हातीं ॥ ४५ ॥ जाणपणें पुसों नये । अहंभाव दिसों नये ।
सांगेन ऐसें म्हणों नये । कोणी एकासी ॥ ४६ ॥ ज्ञानगर्व धरूं नये । स-
हसा छळणा करूं नये । कोठें वाद घालूं नये । कोणीएकासी ॥ ४७ ॥
नेणपण सांडूं नये । महंतपण सोडूं नये । द्रव्यासाठीं हिंडूं नये । हरि-
कीर्तन करीत ॥ ४८ ॥ स्वार्थबुद्धि जडों नये । कारभारीं पडों नये । कार्य-
कर्ते होऊं नये । राजद्वारीं ॥ ४९ ॥ कोणास भार घालूं नये । जडें[3] भिक्षा
मागों नये । भिक्षेसाठीं सांगूं नये । परंपरा आपुली ॥ ५० ॥ सोयरिकींत
पडों नये । मध्यवर्ती घडों नये । प्रपंचाची जडों नये । उपाधि अंगीं ॥
५१ ॥ प्रपंच प्रस्थीं जाऊं नये । बाष्कळ अन्न खाऊं नये । पाहुण्यासारिसें
घेऊं नये । आमंत्रण कदा ॥ ५२ ॥ श्राद्ध पक्ष सटी[6] सामासें । शांति फळ-
शोपन बारसें । भोग राहणें बहुवसें । नवस व्रतें उद्यापनें ॥ ५३ ॥ तेथें
निस्पृहें जाऊं नये । त्यांचें अन्न खाऊं नये । येळिलवाणें करूं नये । स्वयें
आपणां ॥ ५४ ॥ लग्नमुहूर्तीं जाऊं नये । पोटासाठीं गाऊं नये । मोलें कीर्तन
करूं नये । कोठें तरी ॥ ५५ ॥ आपली भिक्षा सांडूं नये । वारें अन्न खाऊं
नये । निस्पृहासि घडों नये । मोलें यात्रा ॥ ५६ ॥ मोलें सुकृत करूं
नये । मोलें पुजारी होऊं नये । दिलें तरी घेऊं नये । इनाम निस्पृहें ॥ ५७ ॥
कोठें मठ करूं नये । केला तरी तो धरूं नये । मठपति होऊन बैसों नये ।
निस्पृह पुरुषें ॥ ५८ ॥ निस्पृहें अवघेंच करावें । परी आपण तेथें न सांप-
डावें । परस्परें उभारावें । भक्तिमार्गासी ॥ ५९ ॥ प्रयत्नेंविण राहों नये ।
आळस दृष्टीस आणूं नये । देह असतां पाहों नये । वियोग उपासनेचा ।

१. आळसाचें. २. सोडीवांचून. ३. फार. ४. मध्यस्थी. ५. बंडजावांत. ६. षष्ठी. ७. षाण्मासिक श्राद्ध. ८. भुतें अंगात खेळवणें. ९. व्रतसमाप्ति. १०. मिषें.

६० ॥ उपाधीमध्यें पडों नये । उपाधि अंगीं जडों नये । भजनमार्ग मोडूं नये । निःसंगपणें ॥ ६१ ॥ बहु उपाधि धरूं नये । उपाधीविण कामा न ये । सगुण भक्ति सोडूं नये । वि[१]भक्ति खोटी ॥ ६२ ॥ बहुसाल धांवों नये । बहुसाल राहों नये । बहु कष्ट करूं नये । आ[२]सुदें खोटें ॥ ६३ ॥ बहुसाल बोलूं नये । अबोलणें कामा न ये । बहु अन्न जेवूं नये । उपवास खोटा ॥ ६४ ॥ बहुसाल निजों नये । बहुत निद्रा मोडों नये । बहु नेम धरूं नये । बाष्कळ खोटें ॥ ६५ ॥ बहु जनीं असों नये । बहु अरण्य सेवूं नये । बहु देह पाळूं नये । आत्महत्या खोटी ॥ ६६ ॥ बहु संग धरूं नये । संतसंग सोडूं नये । कर्मठपण कामा न ये । अनाचार खोटा ॥ ६७ ॥ बहु लौकिक सांडूं नये । लोकांआधीन होऊं नये । बहु प्रीति कामा नये । निष्ठुरता खोटी ॥ ६८ ॥ बहु संशय धरूं नये । मुक्तमार्ग कामा न ये । बहु साधनीं पडों नये । साधनेंविण खोटें ॥ ६९ ॥ बहु विषय भोगूं नये । विषयत्याग करितां न ये । देहलोभ धरूं नये । बहु त्रास खोटा ॥ ७० ॥ वेगळा अनुभव घेऊं नये । अनुभवेंविण कामा न ये । आत्मस्थिति बोलों नये । स्तब्धता खोटी ॥ ७१ ॥ मन उरों देऊं नये । मनेंविण कामा न ये । अलक्ष वस्तु लक्षितां न ये । लक्षेंविण खोटें ॥ ७२ ॥ मन बुद्धि अगोचर । बुद्धीविण अंधकार । जाणिवेचा घडो विसर । नेणीव खोटी ॥ ७३ ॥ ज्ञातेपण धरूं नये । ज्ञानेंविण कामा न ये । अतर्क्य वस्तु तर्कूं नये । तर्केंविण खोटें ॥ ७४ ॥ दृश्यस्मरण कामा न ये । विस्मरण पडों देऊं नये । कांहीं चर्चा करूं नये । केल्याविण न चले ॥ ७५ ॥ जगीं भेद कामा न ये । वर्णसंकर करूं नये । आपुला धर्म बुडऊं नये । अभिमान खोटा ॥ ७६ ॥ आशाबद्ध बोलों नये । विवेकेंविण चालों नये । समाधान हालों नये । कांहीं केल्या ॥ ७७ ॥ अबद्ध पोथी लिहों नये । पोथीविण कामा न ये । अबद्ध[३] कदा वाचूं नये । वाचिल्याविण खोटें ॥ ७८ ॥ निस्पृहें वक्तृत्व सोडूं नये । आशंका घेतां भांडों नये । श्रोतयाचा मानूं नये । वीट कदा ॥ ७९ ॥ हे शिकवण धरितां चित्तीं । सकळ सुखें वो[४]ळंगिती । अंगीं बाणे महंती । अकस्मात ॥ ८० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्दशदशके निस्पृहनिरूपण नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

१. अभक्तपणा. २. आयतें. ३. अव्यवस्थित. ४. प्राप्त होतात.

## २. भिक्षा.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्राह्मणाची मुख्य दीक्षा । मागीतली पाहिजे भिक्षा । ओंभवती[1] या पक्षा । रक्षिलें पाहिजे ॥ १ ॥ श्लोक ॥ भिक्षाहारी निराहारी भिक्षा नैव प्रतिग्रहः ॥ सदसद्वाहभिक्षान्नं सोमपानं दिने दिने ॥ १ ॥ टीका ॥ भिक्षा मागोन जो जेविला । तो निराहारी बोलिला । प्रतिग्रहावेगळा[2] झाला । भिक्षा मागतां ॥ २ ॥ संतासंत[3] जे जन । तेथें कोरान्न[4] मागोन करी जो भोजन । तेणें केलें अमृतपान । प्रतिदिनीं ॥ ३ ॥ ऐसा भिक्षेचा महिमा । भिक्षा माने सर्वोत्तमा । ईश्वराचा[5] अगाध महिमा । तोहि भिक्षा मागे ॥ ४ ॥ दत्त गोरक्ष आदिकरूनी । सिद्ध भिक्षा मागती जनीं । निस्पृहता भिक्षेपासुनी । प्रगट होय ॥ ५ ॥ वार लावून बैसला । तरी तो पराधीन झाला । तैसीच नित्यावळीला[6] । स्वतंत्रता कैंची ॥ ६ ॥ आठां दिवसां धान्य मेळविलें । तरी तें कंटाळवाणें झालें । प्राणी एकाएकीं चेवले । नित्य नूतनतेपासूनी ॥ ७ ॥ नित्य नूतन हिंडावें । उदंड देशाटण करावें । तरीच भिक्षा मागतां बरवें । श्लाघ्यवाणें ॥ ८ ॥ अखंड भिक्षेचा अभ्यास । तयास वाटेना परदेश । जिकडे तिकडे स्वदेश । लोकत्रयीं ॥ ९ ॥ भिक्षा मागतां किंकों[7] नये । भिक्षा मागतां लाजों नये । भिक्षा मागतां भागों नये । परिभ्रमणें ॥ १० ॥ भिक्षा आणी चमत्कार[8] । चाकाटती[9] लहान थोर । कीर्ति वर्णी निरंतर । भगवंताची ॥ ११ ॥ भिक्षा म्हणिजे कामधेनू । सदा फळ नव्हे सामान्य । भिक्षेस करी जो अमान्य । तो करंटा योगी ॥ १२ ॥ भिक्षेनें वोळखी होती । भिक्षेनें भ्रम चुकती । सामान्य भिक्षा मान्य करिती । सकळ प्राणी ॥ १३ ॥ भिक्षा म्हणिजे निर्भय स्थिती । भिक्षेनें प्रगटे महंती । स्वतंत्रता ईश्वरप्राप्ती । भिक्षागुणें ॥ १४ ॥ भिक्षेस नाहीं अडथळा । भिक्षाहारी तो मोकळा । भिक्षेकरितां सार्थक वेळा । काळ जातो ॥ १५ ॥ भिक्षा म्हणजे अमरवेल्ली[10] । जिकडे तिकडे लगडली । अवकाळीं फलदायिनी झाली । निर्लज्जासी ॥१६॥ पृथ्वीमध्यें देश नाना ।

१. 'ओं भवती भिक्षां देहि' (मातोश्री, भिक्षा घाला!) २. दान घेण्याच्या दोषानें रहित. ३. चांगले वाईट. ४. धान्यादिक. ५. शंकर. ६. नित्य जेवणास गेल्यानें. ७. त्रासूं नये. ८. अद्भुत कृत्यें. ९. चकित होतात. १०. कल्पवृक्ष.

फिरतां उपवासी मरेना । कोणे एके ठायीं जना । जड नव्हे ॥ १७ ॥ गोरक्ष[1] वाणिज्य[2] कृषी[3] । त्याहून प्रतिष्ठा भिक्षेसी । विलंबों नये झोळीसी । कांहीं केल्या ॥ १८ ॥ भिक्षे ऐसें नाहीं वैराग्य । वैराग्यापरतें नाहीं भाग्य । वैराग्य नसतां अभाग्य । एकदेशी ॥ १९ ॥ कांहीं भिक्षा आहे म्हणावें । अल्प-संतोषी असावें । बहुत आणितां व्यावें । मुष्टि एक ॥ २० ॥ सुखरूप भिक्षा मागणें । ऐसीं निस्पृहतेचीं लक्षणें । मृदु वाग्विलास[4] करणें । परम सौख्यकारी ॥ २१ ॥ ऐसी भिक्षेची स्थिती । अल्प बोलिलों यथामती । भिक्षा वाचवी विपत्ती । होणार काळीं ॥ २२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्दशदशके भिक्षानिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. कवित्वलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ कवित्वशब्द सुमनमाळा[5] । अर्थ परिमळ आगळा । तेणें संतषट्पदकुळा[6] । आनंद होय ॥ १ ॥ ऐशी माळा अंतःकरणीं । गुंफून पूजा रामचरणीं । ओंकारतंतु[7] अखंडपणीं । खंडोंचि नये ॥ २ ॥ परोपकाराकारणें । कवित्व अवश्य करणें । तया कवित्वाचीं लक्षणें । बोलिजेती ॥ ३ ॥ जेणें घडे भगवद्भक्ती । जेणें घडे विरक्ती । ऐशिया कवित्वाची युक्ती । आधीं वाढवावी ॥ ४ ॥ क्रियेविण शब्दज्ञान । तया न मानिती सज्जन । ह्मणोन देव प्रसन्न । अनुतापें करावा ॥ ५ ॥ देवाचेनि प्रसन्नपणें । जें जें घडे बोलणें । तें अत्यंत श्लाघ्यवाणें । या नांव प्रासादिक ॥ ६ ॥ धीट पाठ प्रासादिक । ऐसें बोलती अनेक । तरी हा त्रिविध विवेक । बोलिजेल ॥ ७ ॥ धीट म्हणिजे धीटपणें केलें । जें जें आपुल्या मनास आलें । बळेंचि कवित्व रचिलें । या नांव धीट बोलिजे ॥ ८ ॥ पाठ म्हणिजे पाठांतर । बहुत पाहिलें ग्रंथांतर । तयासारिखें उत्तर । आपणहि केलें ॥ ९ ॥ शीघ्रचि कवित्व केलें । दृष्टीं पडिलें तें वर्णिलें । भक्तीवांचून जें झालें । या नांव धीटपाठ ॥ १० ॥ कामिक रसिक शृंगारिक । वीर हास्य प्रस्ताविक । कौतुक विनोद अनेक । या नांव धीटपाठ ॥ ११ ॥ मन

---

१. गोरक्षण. २. व्यापार. ३. शेती. ४. भाषण. ५. कवितेचे शब्दरूप फुलांच्या माळा. ६. साधुरूप भ्रमरसमुदायाला. ७. ओंकारस्मरणरूप तंतु. ८. स्तुतिपर.

झालें कामाकार[1] । तैसेचि निघती उद्गार । धीटपाठें परपार[2] । पाविजेल नाहीं ॥ १२ ॥ व्हावया उदरशांती । करणें लागे नरस्तुती । तेथें केली जे व्युत्पत्ती । या नांव धीटपाठ ॥ १३ ॥ कवित्व नसावें धीटपाठ । कवित्व नसावें खटपट । कवित्व नसावें उद्धट । पाषांडमत ॥ १४ ॥ कवित्व नसावें वादांग । कवित्व नसावें रसभंग । कवित्व नसावें रंगभंग । दृष्टांतहीन ॥ १५ ॥ कावत्व नसावें पाल्हाळ । कवित्व नसावें बाष्कळ । कवित्व नसावें कुटिल । लक्षूनियां ॥ १६ ॥ हीन कवित्व नसावें । बोलिलेंचि न बोलावें । छंदभंग न करावें । मुद्राहीनें[3] ॥ १७ ॥ व्युत्पत्तिहीन तर्कहीन । कळाहीन शब्दहीन । भक्ति ज्ञान वैराग्यहीन । कवित्व नसावें ॥ १८ ॥ भक्तिहीन जें कवित्व । तेंचि जाणावें ढोंगमत । आवडीविण वक्तृत्व । कंटाळवाणें ॥ १९ ॥ भक्तीविण जो अनुवाद । तोचि जाणावा विनोद । प्रीतीविण संवाद । घडे केवीं ॥ २० ॥ असो धीटपाठ तें ऐसें । नाथिलें अहंतेचें पिसें । आतां प्रासादिकें[4] तें कैसें । सांगिजेल ॥ २१ ॥ वैभव कांता कांचन । ज्यासि वाटे हें वमन । अंतरीं लागलें ध्यान । सर्वोत्तमाचें ॥ २२ ॥ जयास घडीनें घडी । भगवंतीं लागे आवडी । चढती वाढती गोडी । भगवद्भजनाची ॥ २३ ॥ जो भगवद्भजनेंविण । जाऊं नेदी एक क्षण । सर्वकाळ अंतःकरण । भक्तिरंगें रंगलें ॥ २४ ॥ जया अतरीं भगवंत । अचल राहिला निवांत । तो स्वभावें जें बोलत । तें ब्रह्मनिरूपण ॥ २५ ॥ अंतरीं बैसला गोविंद । तेणें लागला भक्तिछंद । भक्तीविण अनुवाद । आणिक नाहीं ॥ २६ । आवडी लागली अंतरीं । तैशीच वदे वैखरी[5] । भावें करुणाकीर्तन करी । प्रेमभरें नाचत ॥२७॥ भगवंतीं लागलें मन । तेणें नाठवे देहभान । शंका लज्जा जाते पळून । दुरी ठेली ॥२८॥ तो प्रेमरंगें रंगला । तो भक्तिमदें मातला । तेणें अहंभाव घातला । पायांतळीं ॥ २९ ॥ गात नाचत निःशंक । तयास कैंचे दिसती लोक । दृष्टीं त्रैलोक्यनायक । वसोनि ठेला ॥ ३० ॥ ऐसा भगवंतीं रंगला । आणिक कांहीं नलगे त्याला । स्वइच्छा वर्णू लागला । ध्यान कीर्ति प्रताप ॥३१॥ नाना ध्यानें नाना मूर्ती । नाना प्रताप नाना कीर्ती । तयापुढें नरस्तुती । तृणतुल्य वाटे ॥ ३२ ॥ असो ऐसा भगवद्भक्त । जो ये

---

१. विषयांत गुंग. २. पैल तीर. ३. लक्षणहीन. ४. ईश्वरप्रसादाचें. ५. वाणी.

संसारीं विरक्त । तया मानिती मुक्त । साधु जन ॥ ३३ ॥ त्याचे भक्तीचें कौतुक । त्या नांव प्रासादिक । सहज बोलतां विवेक । प्रगट होय ॥ ३४ ॥ ऐका कवित्वलक्षण । केलेंचि करूं निरूपण । जेणें निवे अंतःकरण । श्रोतयांचें ॥ ३५ ॥ कवित्व असावें निर्मळ । कवित्व असावें रसाळ । कवित्व असावें प्रांजळ[1] । अन्वयाचें[1] ॥ ३६ ॥ कवित्व असावें भक्तिबळें । कवित्व असावें अर्थागळें[2] । कवित्व असावें वेगळें । अहंतेसी ॥ ३७ ॥ कवित्व असावें कीर्तिवाड[3] । कवित्व असावें रम्य गोड । कवित्व असावें जाड । प्रतापविषयीं ॥ ३८ ॥ कवित्व असावें सोपें । कवित्व असावें अल्परूपें । कवित्व असावें प्रज्ञासाक्षेपें[4] । प्रबंधाचें ॥ ३९ ॥ मृदु मंजुळ कोमळ । भव्य अद्भुत विशाळ । गौल्य[5] माधुर्य रसाळ । भक्तिरसें ॥ ४० ॥ अक्षरबंध पदबंध । नाना चातुर्य प्रबंध । नाना कौशल्यता छंदबंध । धाटी मुद्रा अनेक ॥ ४१ ॥ नाना युक्ति नाना बुद्धी । नाना कळा नाना सिद्धी । नाना अर्थान्वयें साधीं । या नांव कवित्व ॥ ४२ ॥ नाना साहित्य[6] नाना दृष्टांत । नाना तर्क धातुमंत[7] । नाना संमति सिद्धांत । पूर्वपक्षेंसी ॥ ४३ ॥ नाना गति नाना व्युत्पत्ती । नाना मति नाना स्फूर्ती । नाना धारणा नाना धृती । या नांव कवित्व ॥ ४४ ॥ शंका आशंका प्रत्यंतरें[8] । नाना वाक्यें शास्त्राधारें । तुटे संशय निर्धारें । निर्धारितां ॥ ४५ ॥ नाना प्रसंग नाना विचार । नाना तत्वचर्चासार । नाना योग नाना विवर[9] । या नांव कवित्व ॥४६॥ नाना साधनें पुरश्चरणें । नाना तपें तीर्थाटणें । नाना संदेह फेडणें । या नांव कवित्व ॥४७॥ जेणें अनुताप उपजे । जेणें लौकिकें[10] लाजे । जेणें ज्ञान उपजे । या नांव कवित्व ॥ ४८ ॥ जेणें ज्ञान हें प्रबळे । जेणें वृत्ति हे मावळे । जेणें भक्तिमार्ग कळे । या नांव कवित्व ॥४९॥ जेणें देहबुद्धि तुटे । जेणें भवसिंधु आटे । जेणें भगवंत प्रगटे । या नांव कवित्व ॥ ५० ॥ जेणें सद्वस्तु भासे । जेणें भास[11] हा निरसे । जेणें भिन्नत्वें[12] नासे । या नांव कवित्व ॥ ५१ ॥ जेणें सद्बुद्धि लागे । जेणें पाषांड भंगे । जेणें विवेक जागे । या

१. स्पष्ट अर्थाचें. २. अर्थानें भरलेलें. ३. थोर कीर्तीचें. ४. बुद्धि खर्चून व प्रयत्न करून रचिलेलें. ५. गोडी. ६. अलंकार. ७. व्याकरणशुद्ध. ८. निरनिराळीं प्रमाणें. ९. स्पष्टीकरणें. १०. प्रापंचिक जन. ११. भासणारें जग. १२. भेदबुद्धि.

नांव कवित्व ॥ ५२ ॥ जेणें घडे समाधान । जेणें तुटे संसारबंधन । जयास मानिती सज्जन । या नांव कवित्व ॥ ५३ ॥ ऐसें कवित्वलक्षण । सांगतां तें असाधारण । परंतु कांहीं एक निरूपण । बुझावया केलें ॥ ५४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्दशदशके कवित्वलक्षणनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. कीर्तनलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ कलियुगीं कीर्तन करावें । केवळ कोमळ कुशळ गावें । कठिण कर्कश कुटें[1] सांडावें । एकीकडे ॥१॥ खटखट खुंटून टाकावी । खळखळ खळासि न करावी । खरें खोटें खवळों न द्यावी । वृत्ति आपुली ॥२॥ गर्वगाणें गाऊं नये । गातां गातां गळों नये । गौप्य गुज गर्जों नये । गुण गावे ॥ ३ ॥ घष्टणी[3] घिसणी[3] घस्मरपणें[3] । घसरघसरूं घसरवाणें । घुमघुमोंचि घुमणें । योग्य नव्हे ॥ ४ ॥ नाना नामें भगवंताचीं । नाना ध्यानें सगुणाचीं । नाना कीर्तनें कीर्तीचीं । अद्भुत करावीं ॥ ५ ॥ चकचक चुकावेना । चाट चावट चाळवेना । चरचर चुरचुर लागेना । ऐसें करावें ॥ ६ ॥ छळछळ छळणा करूं नये । छळितां छळितां छळों नये । छळणें छळणा करूं नये । कोणी एकाची ॥ ७ ॥ जी जी जी जी म्हणावें ना । जो जो जागे तो तो पावेना । जप जपों जनीं जनार्दना । संतुष्ट करावें ॥ ८ ॥ झिरपे झरे पाझरे जळ । झळके दुरून भळाळ । झडझड झळकती सकळ । प्राणी तेथें ॥ ९ ॥ या या या या म्हणावें नलगे । या या या या उपाय नलगे । या या या या कांहींच नलगे । सुबुद्धासी ॥१०॥ टक टक टक करूं नये । टाळाटाळी टिकों नये । मट मट मट लावूं नये । कंटाळवाणी ॥११॥ ठस ठोंबेस[4] टकावेना । ठक ठक ठक करवेना । ठाके ठमके ठसावेना । मूर्तिध्यान ॥ १२ ॥ डळमळ डळमळ डकों नये । डगमग डगमग कामा न ये । डळ डळ डळ चुकों नये । हेकाडपणें ॥ १३ ॥ ढिसाळ ढाळा ढळतीं कुंचे । ढोंबला ढुसगण डुले नाचे । ढळेचि ना ढिग ढिगाचे । कंटाळवाणें ॥ १४ ॥ नाना नेटक नागर[5] । नाना नम्र गुणागर । नाना

---

१. पुष्कळ. २. मनास लागे असें. ३. घांसाघीस. ४. अक्षरशत्रु. ५. सुंदर.

नेमक मधुर । नेमस्त गाणें ॥ १५ ॥ ताल तंबुरे तान माने । तालबद्ध तंतगाणें । धूर्त तार्किक तानमानें । तल्लीन होती ॥ १६ ॥ थरथरा थरकती रोमांच । थै थै थै स्वरें उंच । थरि थरि थिरावे नाच । प्रेमळ भक्तांचा ॥ १७ ॥ दक्षदाक्षिण्यें[3] दाटलें । बंदें प्रबंदें कोंदाटलें । दमदम दुमों लागलें । संगीतगाणें ॥ १८ ॥ धूर्त तूर्त धांवोनि आला । धिगबुद्धीनें धिग्ग झाला । धाकें धाकें धोकला । रंग अवघा ॥ १९ ॥ नाना नाटक नेटकें । नाना मानें तुकें कौतुकें । नाना नेमक अनेकें । विद्यापात्रें ॥ २० ॥ पाप पळोन गेलें दुरी । पुण्य पुष्कळ प्रगटे वरी । परतपरतों[2] परअंतरीं । चटक लागे ॥ २१ ॥ फुकट फाकट फटवणें नाहीं । फटकळ फुगडी पिंगा नाहीं । फिकें फसंकट फोल नाहीं । बकध्यानीं ॥ २२ ॥ बरें बरें बरें म्हणती । बावा बावा उदंड करिती । बळें बळेंचि बोलाविती । कथेलागीं ॥ २३ ॥ भला भला भला लोकीं । भक्तिभावें भव्य अनेकीं । भूषण भाविकलोकीं । परोपकारें ॥ २४ ॥ मानेल तरी मानावें मनें । मत्त न व्हावें ममतेनें । मी मी मी मी बहुतजनें । म्हणिजेत आहे[7] ॥ २५ ॥ एक टेंकत एकापाशीं । येऊं येऊं येती झडेसी[3] । या या या या असें तयांसी । म्हणिजेत आहे ॥ २६ ॥ राग रंग सालसुरंगें । अंतर संगीतरागें । रत्नपरीक्षा रत्नामार्गें । धावती लोक ॥ २७ ॥ लवलवां लवती लोचन । लकलकां लकलें मन । लपलपों लपती जन । आवडीनें ॥ २८ ॥ वचनें वाउगीं वदेना । वावरें विवरें वसेना । वक्तृत्वें निवर्वा जना । विनीत[4] होउनी ॥ २९ ॥ सारासार समस्तांला । शिकऊं शिकऊं जनाला । साहित्य संगीत सज्जनाला । बरें वाटे ॥ ३० ॥ खरें खोटें खरें वाटलें । खर्खर खुर्खुर खुंटलें । खोटें खोटेपणें गेलें । म्हणोनिया ॥ ३१ ॥ शाहणें शोधितां शोधेना । शास्त्रार्थ श्रुति बोधेना । शुक सारिका शमेना । शब्द तयांचा ॥ ३२ ॥ हर्षें हर्षें हांसिला । हाहा होहोनें भुलला । हित होईना तयाला । परत्रींचें ॥ ३३ ॥ लक्षावें लक्षितां अलक्षीं । लक्षिलें लोचनातें लक्षी । लागलें लय तें अलक्षीं । विहंगममार्गें[8] ॥ ३४ ॥ क्षेत्र क्षेत्रज्ञ[9] क्षोभतो । क्षमेनें क्षमून क्षमवितो । क्षमणें क्षोभणें क्षे-

---

पुनःपुनः. ३. काकुळतीस. ४. नम्र. ५. परलोकींचें. ६. डोळावर झेप घालतो त्याप्रमाणें सत्वर. ८. शरीर. ९. जीव.

व्रज तो । सर्वां ठायीं ॥ ३५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्दश दशके कीर्तनलक्षणनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. हरिकथा.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां हरिकथेचें लक्षण । श्रोतीं केला होता प्रश्न । सावध होऊन विचक्षण । परिसोत आतां ॥ १ ॥ हरिकथा कैसी करावी । रंगें कैसी भरावी । जेणें पाविजे पदवी । रघुनाथकृपेची ॥ २ ॥ सोनें आणि परिमळें[1] । इक्षुदंडा[2] लागती फळें । गौल्यें[3] माधुर्य रसाळें । तरी ते अपूर्वता ॥ ३ ॥ तैसा हरिदास आणि विरक्त । ज्ञाता आणि प्रेमळ भक्त । व्युत्पन्न[4] आणि वादरहित । तरी हेही अपूर्वता ॥ ४ ॥ रागज्ञानी ताळज्ञानी । सकळ कळा ब्रह्मज्ञानी । निरभिमानें वर्ते जनीं । तरी हेही अपूर्वता ॥ ५ ॥ मत्सर नाहीं जयासी । तो अत्यंत प्रिय सज्जनासी । चतुरंगें[5] जाणे मानसीं । अंतर्निष्ठ ॥ ६ ॥ जयंत्यादिकें नाना पर्वें । तीर्थें क्षेत्रें जीं अपूर्वें । जेथें वसिजे देवाधिदेवें । सामर्थ्यरूपें ॥ ७ ॥ तया तीर्थांतें न मानिती । शब्दज्ञानें मिथ्या म्हणती । तयां पामरां श्रीपती । जोडेल कैंचा ॥ ८ ॥ निर्गुण नेलें संदेहानें । सगुण नेलें ब्रह्मज्ञानें । दोहींकडे अभिमानें । वोस केलें ॥ ९ ॥ पुढें असतां सगुण मूर्ती । निर्गुण कथा जे करिती । प्रतिपादून उच्छेदिती । तेचि पढतमूर्ख ॥ १० ॥ ऐशी न कीजे हरिकथा । अंतर पडे उभयपंथा । परिसा लक्षणें आतां । हरिकथेचीं ॥ ११ ॥ सगुणमूर्तीपुढें भावें । करुणा-कीर्तन करावें । नाना ध्यानें वर्णावें । प्रताप कीर्तीतें ॥ १२ ॥ ऐसें गातां स्वभावें । रसाळ कथा वोढवे । सर्वांतरीं हेलावे[6] । प्रेमसुख ॥ १३ ॥ कथा रचायाची खूण । सगुणीं नाणावें[7] निर्गुण । न बोलावे दोष गुण । पुढिलांचे[8] कदा ॥ १४ ॥ देवाचें वर्णावें वैभव । नाना प्रकारीं महत्व । सगुणीं ठेवूनिया भाव । हरिकथा करावी ॥ १५ ॥ लाज सांडून जनांची । आस्था सांडून धनाची । नित्य नवी कीर्तनाची । आवडी धरावी ॥ १६ ॥ नम्र होऊनि राजांगणीं । निःशंक जावें लोटांगणीं । करतालिकीं[9] नृत्यें[10] वाणी ।

---

१. सुवासिक २. उंसास. ३. गोडी. ४. विद्वान् ५. सर्व अंगें. ६. उचंबळून येते. ७. न आणावें. ८. दुसऱ्यांचे. ९. टाळ्या. १०. नाचणें.

नामघोषें गर्जावीं ॥ १७ ॥ एकाची कीर्ति एकापुढें । वर्णितां साहित्य[1] न पडे । म्हणोनिया पवाडे[2] । जेथील तेथें ॥ १८ ॥ मूर्ति नसतां सगुण । श्रवणीं बैसले साधुजन । तरी अद्वैतनिरूपण । अवश्य करावें ॥ १९ ॥ नाहीं मूर्ति नाहीं सज्जन । श्रवणीं बैसले भाविक जन । तरी करावें कीर्तन । प्रस्तावि[3]क वैराग्यें ॥ २० ॥ शृंगारादि नवरसिक । त्यामध्यें सांडावें एक । स्त्रियादिकांचें कौतुक । वर्णूंच नये ॥ २१ ॥ लावण्य स्त्रियांचें वर्णितां । विकार बाधिजे तत्वतां । धारिष्टापासोन श्रोता । चळे तात्काळ ॥ २२ ॥ म्हणोनि तें त्यागावें । जें बाधक साधकां स्वभावें । घेतां अंतरीं ठसावे । ध्यान स्त्रियांचें ॥ २३ ॥ लावण्य स्त्रियांचें ध्यान । कामाकार[4] झालें मन । कैंचें आठवेल भजन । ईश्वराचें ॥ २४ ॥ स्त्री वर्णितां सुखावला । लावण्याचे भरीं भरला । तो स्वयें जाणावा चेवला । ईश्वरापासूनी ॥ २५ ॥ हरिकथेसि भावबळें । गेला रंग तो तुंबळे । निमिष एक जरी आकळे । ध्यानीं परमात्मा ॥ २६ ॥ ध्यानीं गुंतलें मन । कैंचें आठवेल जन । निःशंक निर्लज्ज कीर्तन । करितां रंग माजे ॥ २७ ॥ रागज्ञान तालज्ञान । स्वरज्ञानेंसि व्युत्पन्न । अर्थान्वयाचें कीर्तन । करूं जाणे ॥ २८ ॥ छप्पन्न भाषा नाना कळा । कंठमाधुर्य कोकिळा । परी तो भक्तिमार्ग वेगळा । भक्तचि जाणती ॥ २९ ॥ भक्तांस देवाचें ध्यान । देवावांचून नेणती आन । कळावंताचें मन । कळाकार झालें ॥ ३० ॥ श्रीहरीवांचून जे कळा । ते जाणवी अवकळा[5] । देव सांडून वेगळा । प्रत्यक्ष पडिला ॥ ३१ ॥ सर्पीं वेढिलें चंदनासी । निधानीं आड विवसी[6][7] । नाना कळा देवासी । आड तैशा ॥ ३२ ॥ सोडून देव सर्वज्ञ । नादामध्यें व्हावें मग्न । हेंचि प्रत्यक्ष विघ्न । आडवें आलें ॥ ३३ ॥ एक मन तें गुंतलें स्वरीं । कोणें चिंतावा श्रीहरी । बळेंच धरूनियां चोरीं । शुश्रूषा[8] घेतली ॥ ३४ ॥ करितां देवाचें दर्शन । आडवें आलें रागज्ञान । तेणें धरूनियां मन । स्वरामार्गें लाविलें ॥ ३५ ॥ भेटों जातां राजद्वारीं । मध्येंचि धरिला बेगारी । कळावंतां तैशी परी । कळेनें केली ॥३६॥ मन ठेवून ईश्वरीं । जो कोणी हरिकथा करी ।

---

१. भाषण लोकांस पटत नाहीं. २. वर्णन. ३. पश्चातापयुक्त. ४. कामेच्छेनें व्याप्त. ५. अवदसा. ६. भूमींतील ठव्यास. ७. पिशाच्च. ८. सेवा.

तोचि एक संसारीं। धन्य जाणावा ॥ ३७ ॥ जयास हरिकथेची गोडी। उठे नित्य नवी आवडी। तयास झाली जोडी। सर्वोत्तमाची ॥३८॥ हरिकथा मांडली जेथें। सर्व सांडून धांवे तेथें। आलस्य निद्रा दवडून स्वार्थें। हरिभक्तीसि सादर ॥ ३९ ॥ हरिभक्तांचिये घरीं। नीच कृत्य अंगिकारी। साह्यभूत सर्वांपरी। सांक्षेपें होय ॥ ४० ॥ तया नांव हरिदास। जयास नामीं विश्वास। येथूनि हा समास। संपूर्ण झाला ॥ ४१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्दशदशके हरिकथानिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. चातुर्यलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ रूप लावण्य अभ्यासितां न ये। सहज गुणास न चले उपाय। कांहीं तरी धरावी सोय। आगंतुक गुणाची ॥ १ ॥ काळें माणूस गोरें होयना। वोढाळास यत्न चालेना। मुक्यास वाचा फुटेना। हा सहज गुण ॥२॥ आंधळें डोळस होईना। बधिर तें ऐकेना। पांगुळ पाय घेईना। कांहीं केल्या ॥३॥ कुरूपतेचीं लक्षणें। किती म्हणोन सांगणें। रूप लावण्य या कारणें। पालटेना ॥ ४ ॥ अवगुण सोडितां जाती। उत्तम गुण अभ्यासितां येती। कुविद्या सांडूनि अभ्यासिती। शाहणे विद्या ॥ ५ ॥ मूर्खपण सांडितां जातें। शाहणपण शिकतां येतें। कारभार करितां उमजतें। सकळ कांहीं ॥ ६ ॥ ऐसी प्रचीत येते मना। तरी स्वहित कां कराना। सन्मार्गें चालतां जाणा। सज्जना माने ॥ ७ ॥ मान्यता आवडे जीवीं। तरी उपेक्षा कां करावी। चातुर्यैविण उंच पदवी। कदापि नाहीं ॥ ८ ॥ अंतर्कळा[२] शृंगारावी। नाना परी उमजवावी। संपदा मेळवून भोगावी। सावकाश ॥ ९ ॥ देह नेटकें शृंगारिलें। परी तें चातुर्यैविण नासलें। गुणेंविण साजिरें केलें। बाष्कळ जैसें ॥ १० ॥ यत्न करीना ना शिकेना। शरीर तेंहि कष्टवीना[१]। उत्तम गुण घेईना। सदा कोपी ॥ ११ ॥ आपण दुसरियास करावें। तेणें सवेंचि उसणें घ्यावें। जना कष्टवितां कष्टावें। लागेल बहू ॥ १२ ॥ न्यायें वर्तेल तो शाहणा। अन्यायी तो दैन्यवाणा। नाना चातुर्याच्या खुणा। चतुर जाणे ॥ १३ ॥ जें बहुतांस मानलें। तें

---

१. श्रम करून. २. अंतःकरण.

बहुतीं मान्य केलें । येर तें व्यर्थचि गेलें । जगनिंद्य ॥ १४ ॥ लोकीं आपणास बोलावें । किंवा अववेंचि कोसळावें । आपणासि समाधान फावे । ऐसें करावें ॥१५॥ समाधानें समाधान वाढे । मैत्रीनें मैत्री जडे । मोडितां क्षणमात्रें मोडे । बरेपण ॥ १६ ॥ अहो कांहो अरे कां रे । जनीं ऐकिजे कीं रे । कळत असतांच कां रे । निकामीपण ॥ १७॥ चातुर्यें शृंगारे अंतर । वस्त्रें शृंगारे शरीर । दोहींमध्यें कोण सार । बरें पाहा ॥ १८ ॥ बाह्यात्कारें शृंगारिलें । तेणें लोकांच्या हातास काय आलें । चातुर्यें बहुतां संरक्षिलें । नाना परी ॥ १९ ॥ (बरें खावें बरें जेवावें । बरें ल्यावें बरें नेसावें । समस्तांस बरें म्हणावें । ऐसें वाटे ॥ २० ॥ तनें मनें झिजावें । तेणें भलें म्हणोन घ्यावें । उगेंचि कल्पितां सिणावें । वाउगें जनीं ॥ २१ ॥ लौकिकीं कार्यभाग आवडे । तो कार्यभाग जेथें घडे । लोक सहजचि वोढे । कामासाठीं ॥२२॥ म्हणोन दुसऱ्यास सुखी करावें । तेणें आपण सुखी व्हावें । दुसऱ्यास कष्टवितां कष्टावें । लागेल स्वयें ॥ २३ ॥ हें तों प्रगटचि आहे । पाहिल्याविण कामा न ये । समजणें हाचि उपाय । सर्वत्रांसी ॥ २४ ॥ समजले आणि वर्तले । तेचि भाग्यपुरुष झाले । या वेगळे उरले । ते करंटे पुरुष)। २५ ॥ जितुका व्याप तितुकें वैभव । वैभवासारिखा हावभाव । समजला तरि उपाव । प्रगटचि आहे ॥ २६ ॥ आळसें कार्यभाग नासतो । साक्षेपें होत होत होतो । दिसते गोष्टी कळेना तो । शाहणा कैसा ॥२७॥ मैत्री करितां होतें कृत्य । वैर करितां होतो मृत्यु । बोलिलें हें सत्य कीं असत्य । ओळखावें ॥ २८ ॥ आपणास शाहणें करूं नेणे । आपलें हित आपण नेणे । जनीं मैत्रिकी राखों नेणे । वैर करी ॥ २९ ॥ ऐसे प्रकारीचें जन । त्यास म्हणावें अज्ञान । तयापाशीं समाधान । कोण पावे ॥३०॥ आपण एकाकी एकला । सृष्टींत मांडत चालिला । बहुतांमध्यें एकल्याला । यश कैचें ॥ ३१ ॥ बहुतांचे मुखीं उरावें । बहुतांचे अंतरीं भरावें । उत्तम गुणीं विवरावें । प्राणीमात्रांसी ॥ ३२ ॥ शहाणे करावे जन । पतित करावें पावन । सृष्टीमध्यें भगवद्भजन । वाढवावें ॥ ३३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्दशदशके चातुर्यलक्षणनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. युगधर्म.

श्रीगणेशाय नमः ॥ नाना वेष नाना आश्रम[1] । सर्वांचें मूळ गृहस्थाश्रम । जेथें पावती विश्राम । त्रैलोक्यवासी ॥ १ ॥ देव ऋषि मुनि योगी । नाना तापसी वीतरागी । पितृ आदिकरूनि विभागी । अतीत अभ्यागत ॥ २ ॥ गृहस्थाश्रमीं निर्माण झाले । आपुला आश्रम टाकून गेले । परंतु गृहस्था-गृहीं हिंडों लागले । कीर्तिरूपें ॥ ३ ॥ या कारणें गृहस्थाश्रम । सकळांमध्यें उत्तमोत्तम । परंतु पाहिजे स्वधर्म । आणि भूतदया ॥ ४ ॥ जेथें षट्कर्में[2] चालती । विधियुक्त क्रिया आचरती । वाङ्माधुर्यें बोलती । प्राणिमात्रांसी ॥ ५ ॥ सर्व प्रकारें नेमक । शास्त्रोक्त करणें कांहीं एक । त्याहीमध्यें अलौकिक । तो हा भक्तिमार्ग ॥ ६ ॥ पुरश्चरणीं काया क्लेशी । दृढव्रती परम सायासी । जगदीशावेगळें जयासी । थोर नाहीं ॥ ७ ॥ काया वाचा जीवें प्राणें । कष्टे भगवंताकारणें । मनें घेतलें धरणें । भजनमार्गीं ॥ ८ ॥ ऐसा भगवंताचा भक्त । विशेष अंतरीं विरक्त । संसार सोडून झाला मुक्त । भगवंताकरणें ॥ ९ ॥ अंतरापासून वैराग्य । तेंचि जाणावें महद्भाग्य । लोलंगतेएवढें[3] अभाग्य । आणिक नाहीं ॥ १० ॥ राजे राज्य सोडून गेले । भगवंताकारणें हिंडों लागले । कीर्तिरूपें पावन झाले । भूमंडळीं ॥ ११ ॥ ऐसा जो योगीश्वर । अंतरीं प्रत्ययाचा विचार । उकलूं जाणे अंतर । प्राणिमात्रांचें ॥ १२ ॥ ऐशी वृत्ति उदासीन । त्याहिवरी विशेष आत्मज्ञान । दर्शनमात्रें समाधान । पावती लोक ॥ १३ ॥ बहुतांसि करी उपाय । तो जनांच्या वाटया न ये । अखंड जयाचें हृदय । भगवद्रूप ॥ १४ ॥ जनांस दिसे हा दुश्चित । परी तो असे सावचित । अखंड जयाचें चित्त । परमेश्वरीं ॥ १५ ॥ उपासनामूर्तिध्यानीं । अथवा आत्मानुसंधानीं । नाहीं तरी श्रवणमननीं । निरंतर ॥ १६ ॥ पूर्वजांच्या पुण्यकोटी । संग्रहीं असिल्या गांठी । तरीच ऐसियाची भेटी । होय जनांसी ॥ १७ ॥ प्रचीतीविण जें ज्ञान । तें अवघेंच अनुमान । तेथें कैंचें परत्रसाधन[4] । प्राणियांसी ॥ १८ ॥

---

१. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास हे चार आश्रम. २. यजन, याजन, दान, प्रतिग्रह, अध्ययन आणि अध्यापन हीं ब्राह्मणांचीं सहा कर्तव्यें. ३. भोगांची हांव असणें यासारखें. ४. परलोकाची प्राप्ति.

या कारणें मुख्य प्रत्यय । प्रचीतीविण कामा न ये । उपायासारिखा अपाय । ब्राह्मणे जाणती ॥ १९ ॥ वेडे संसार सांडून गेले । तरी ते कष्ट कष्टोंच मेले । दोहींकडे अंतरले । इहलोक परत्रीं[1] ॥ २० ॥ रागेंरागें निघोन गेला । तरी तो भांडभांडोंच मेला । बहुत लोक कष्टी केला । आपणहि कष्टी ॥ २१ ॥ निघोन गेला परी अज्ञान । त्याचे संगतीस लागले जन । गुरुशिष्य दोघे समान । अज्ञानरूपें ॥ २२ ॥ आशाबद्ध अनाचारी । निघोन गेला देशांतरीं । तरी तो अनाचारचि करी । जनांमध्यें ॥ २३ ॥ गृहीं पोटेंविण कष्टती । कष्टी होऊन निघोन जाती । त्यास ठायीं ठायीं मारिती । चोरीं भरतां ॥ २४ ॥ संसार मिथ्या ऐसा कळला । ज्ञान समजोन निघोन गेला । तेणें जन पावन केला । आपणा ऐसा ॥ २५ ॥ एके संगतीनें तरती । एके संगतीनें बुडती । या कारणें सत्संगती । बरी पाहावी ॥ २६ ॥ जेथें नाहीं विवेकरीक्षा । तेथें कैंची असेल दीक्षा । घरोघरीं मागतां भिक्षा । कोठेंहि मिळेना ॥ २७ ॥ जो दुसऱ्याचें अंतर जाणे । देश काळ प्रसंग जाणे । तया पुरुषा काय उणें । भूमंडळीं ॥ २८ ॥ नीच प्राणी गुरुत्व पावला । तेथें आचारचि बुडाला । वेद शास्त्र ब्राह्मणाला । कोण पुसे ॥ २९ ॥ ब्रह्मज्ञानाचा विचारु । त्याचा ब्राह्मणासीच अधिकारु । वर्णांनां ब्राह्मणो गुरुः[2] । ऐसें हें वचन ॥ ३० ॥ ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले । गुरुत्व सांडून झाले । शिष्य शिष्याचे ॥ ३१ ॥ कित्येक दावलमलकास[3] जाती । कित्येक पिरासी भजती । कित्येक तुरुक[4] होती । आपुले इच्छेनें ॥ ३२ ॥ ऐसा कलियुगीं आचार । कोठें राहिला विचार । पुढें पुढें वर्णसंकर । होणार आहे ॥ ३३ ॥ गुरुत्व आलें नीच याती । कांहीं एक वाढली महंती । शूद्र आचार बुडविती । ब्राह्मणांचा ॥ ३४ ॥ हें ब्राह्मणास कळेना । त्याची वृत्ति वळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥ ३५ ॥ राज्य नेलें म्लेंच्छक्षेत्रीं[5] । गुरुत्व नेलें कुपात्रीं । आपण अत्रीं ना परत्रीं । कांहींच नाहीं ॥ ३६ ॥ ब्राह्मणास ग्रामण्यानें[6] बुडविलें । विष्णूनें श्रीवत्स मिरविलें । त्याच विष्णूनें शापिलें । परशुरामा ॥ ३७ ॥ आम्हीहि तेचि ब्राह्मण । दुःखें

---

१. या लोकीं आणि परलोकीं. २. चारी वर्णांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ. ३. एक यवनांचा देव आहे त्यास. ४. म्लेंच्छ ५. म्लेंच्छ राजपुरुषांनीं. ६. घरकलहामुळें.

बोलिलों हें वचन । वडील गेले ग्रामणी करून । आह्मां भोंवते ॥ ३८ ॥ आतांच्या ब्राह्मणीं काय केलें । अन्न मिळेना ऐसें झालें । तुह्मां बहुतांचे प्रचीतीस आलें । किंवा नाहीं ॥ ३९ ॥ बरें वडिलांस काय म्हणावें । ब्राह्मणांचें [1]अदृष्ट जाणावें । प्रसंगें बोलिलें स्वभावें । क्षमा कीजे ॥ ४० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्दशदशके युगधर्मनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. अखंड ध्यान.

श्रीगणेशाय नमः ॥ बरें ऐसा प्रसंग झाला । झाला तो होऊन गेला । आतां ब्राह्मणीं आपणाला । शाहणें करावें ॥१॥ देव पूजावा विमळहस्तीं । तेणें भाग्य पाविजे समस्तीं । मूर्ख अभक्त अव्यवस्थीं । दरिद्र भोगिजे ॥२॥ आधीं देवास ओळखावें । मग अनन्यभावें भजावें । अखंड ध्यान धरावें । सर्वोत्तमाचें ॥ ३ ॥ सर्वांमध्यें जो उत्तम । तया नांव सर्वोत्तम । आत्मानात्मविवेकवर्म । ठायीं पाडावें ॥ ४ ॥ जाणजाणों देह रक्षी । आत्मा द्रष्टा अंतरसाक्षी । पदार्थमात्रास परीक्षी । जाणपणें ॥ ५ ॥ तो सकळ देहांमध्यें वर्ततो । इंद्रि[2]यग्राम चेष्टवितो । प्रचीतीनें प्रत्यय येतो । प्राणिमात्रांसी ॥६॥ प्राणिमात्रीं [3]जगदंतरें । म्हणोनि राखावीं अंतरें । दाता भोक्ता परस्परें । सकळ कांहीं ॥ ७ ॥ देव वर्तते जगदंतरीं । तोचि आपुले अंतरीं । त्रैलोक्यींचे प्राणिमात्रीं । बरें पाहा ॥ ८ ॥ मुळीं पाहणार तो एकला । सकळां ठायीं विभागला । देहप्रकृतीनें झाला । भिन्न भिन्न ॥ ९ ॥ भिन्न भासे देहाकारें । प्रस्तुत एकचि अंतरें । बोलणें चालणें निर्धारें । त्यासीच घडे ॥ १० ॥ आपुले पारखी सकळ लोक । पक्षी श्वापद पश्वादिक । किडा मुंगी देहधारक । सकळ प्राणी ॥ ११ ॥ खेचरें[4] भूचर वनचर । नाना प्रकारींचे जळचर । चारी खाणी विस्तार । किती म्हणोन सांगावा ॥ १२ ॥ समस्त जाणिवेनें वर्तती । रोकडी पाहावी प्रचीती । त्याची आपुली संगती । अखंड आहे ॥ १३ ॥ जगदंतरें बोलला धणी । किती एकवटील प्राणी । परी तो ओ-

---

१. दैव. २. सर्व इंद्रियें. ३. परमेश्वर जगदंतरीं आहे म्हणून प्राणिमात्रानें एकमेकांचीं मनें राखावीं असा भाव. ४. आकाशांत वावरणारे.

ळखावयाची करणी । आपणापासीं ॥ १४ ॥ हें आपणाकडेच येतें । राजी राखावें समस्तांतें । देहासि बरें करावें तें । आत्मयासि पावे ॥१५॥ दुर्जन प्राणी त्यांतील देव । त्याचा लाताड स्वभाव । रागास आला जरी रात्र । तरी तंडों नये ॥ १६ ॥ प्रसंगीं सांडीच करणें । पुढें विवेकें विवरणें । विवेकें सज्जनचि होणें । सकळ लोकीं ॥ १७ ॥ आत्मत्त्वीं दिसतो भेद । हा अवघाचि देहसंबंध । एका जीवनें नाना स्वाद । औषधीभेदें ॥१८॥ गरळ आणि अमृत झालें । परी आपपण नाहीं गेलें । साक्षित्वें आत्मयासि पाहिलें । पाहिजे तैसें ॥ १९ ॥ अंतर्निष्ठ जो पुरुष । तो अंतर्निष्ठेनें विशेष । जगामध्यें जो जगदीश । तो तयास ओळखे ॥ २० ॥ नयनेंचि पाहावे नयन । मनें शोधावें मन । तैसाचि हा भगवान । सकळां घटीं ॥ २१ ॥ तेणेंविण कार्यभाग अडे । सकळ कांहीं तेणेंचि घडे । प्राणी विवेकीं पवाडे । तेणेंचि योगें ॥ २२ ॥ जागृतीस व्यापार घडतो । संबंध तयासीच पडतो । स्वप्नामध्यें घडे जो तो । येणेंचि न्यायें ॥ २३ ॥ अखंड ध्यानाचें लक्षण । अखंड देवाचें स्मरण । याचें कळतां विवरण । सहजचि घडे ॥ २४ ॥ सहज सांडूनि सायास । हाचि कोणी एक दोष । आत्मा सांडून अनात्म्यास[1] । ध्यानीं धरिती ॥ २५ ॥ परी तें धरितांहि धरवेना । ध्यानीं येती व्यक्ति नाना । उगेचि कष्टविती मना । कासावीस करूनी ॥ २६ ॥ मूर्तिध्यान करितां सायासें । तेथें एकाचें एक दिसे । भासों नये तेंचि भासे । विलक्षण ॥२७॥ ध्यान देवाचें धरावें । किंवा देवालयाचें करावें । हेंचि बरवें विवरावें । आपुले ठायीं ॥ २८ ॥ देह देऊळ आत्मा देव । कोठें धरूं पाहतां भाव । देव ओळखोन जीव । तेथेंचि लावावा ॥ २९ ॥ अंतर्निष्ठा ध्यान ऐसें । दंडकध्यान[2] अनारिसें । प्रयत्नेंविण सकळ पिसें । अनुमानध्यान ॥ ३० ॥ अनुमानें अनुमान वाढे । ध्यान धरितां सर्वेचि मोडे । उगेचि कष्टती बापुडे । स्थूळध्यानें ॥ ३१ ॥ देवास देहधारी कल्पिती । तेथें नाना विकल्प उठती । भोगणें लागे विपत्ती । देहयोगें ॥ ३२ ॥ ऐसें मनीं आठवतें । विचारितां भलतेंचि होतें । दिसों नये तेंचि दिसतें । नाना स्वप्नीं ॥ ३३ ॥ दिसतें तें सांगतां न ये । बळें भावार्थ धरितां न ये । साधक कासाविस होय । अंत-

१. आत्मा नव्हे त्यास; अर्थात् स्वरूपज्ञानावांचून. २. लोकरीतीचें ध्यान.

यामीं ॥ ३४ ॥ सांगोपांग घडे ध्यान । त्यास साक्षी आपुलें मन । मनामध्यें विकल्पदर्शन । होऊंच नये ॥ ३५ ॥ फुटकें मन एकवटिलें । तेणें तुटकें ध्यान केलें । तेथें कोण सार्थक झालें । पाहाना कां ॥ ३६ ॥ अखंड ध्यानें न घडे हित । तरी तो जाणावा पतित । हाचि अर्थ सावचित्त । बरा पाहावा ॥ ३७ ॥ ध्यान धरितें कोण । ध्यानीं आठवितें तें कोण । दोनीमध्यें अनन्य लक्षण । असिलें पाहिजे ॥ ३८ ॥ अनन्य सहजाचि आहे । साधक शोधून पाहे । ज्ञानी तो विवरोन राहे । समाधानें ॥ ३९ ॥ ऐशीं हीं प्रत्ययाचीं कामें । प्रत्ययेंविण बोलिजे भ्रमें । लोकदंडकसंभ्रमें[1] । चालती प्राणी ॥ ४० ॥ दंडकध्यानाचें[2] लक्षण । धरूनि बैसले अवलक्षण । प्रमाण आणि अप्रमाण । बाजारी नेणती ॥ ४१ ॥ मिथ्या समाचार उठविती । वाउग्याच बोंबा घालिती । मनास आणितां अंतीं । अवघेंच मिथ्या ॥ ४२ ॥ कोणी एक ध्यानस्थ बैसला । कोणी एक शिकवी त्याला । मुकुट काढून माळा घाला । म्हणिजे बरें ॥ ४३ ॥ मनाच्या येथें काय दुष्काळ । जे आंखूड कल्पिली माळ । सांगते ऐकते केवळ । मूर्ख जाणावे ॥ ४४ ॥ प्रत्यक्ष कष्ट करावे न लागती । दोरें फुलें गुंफावीं न लागती । कल्पनेची माळ थिटी करिती । काय निमित्त ॥ ४५ ॥ बुद्धीविण प्राणी सकळ । ते ते अवघेचि बाष्कळ । तया मूर्खांसि खळखळ । कोणें करावी ॥ ४६ ॥ जेणें जैसा परमार्थ केला । तैसाच पृथ्वीवरी दंडक[3] चालिला । सातां पांचांचा बळावला । साभिमान ॥ ४७ ॥ प्रत्ययेंविण साभिमान । रोगी मारिले झांकून । तेथें अवघेंचि अनुमान । ज्ञान कैंचें ॥ ४८ ॥ सर्व साभिमान सांडावा । प्रत्ययें विवेक मांडावा । माया पूर्वपक्ष खंडावा । विवेकबळें ॥ ४९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्दशदशके अखंडध्याननिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. शाश्वत ब्रह्म.

श्रीगणेशाय नमः ॥ पिंडाचें पाहिलें कौतुक । शोधिला आत्मानात्मविवेक । पिंड अनात्मा आत्मा एक । सकळ कर्ता ॥ १॥ आत्म्यास अन-

---

१. लोकरीतीच्या मार्गानें. २. लोकाचाराचें ध्यान. ३. परिपाठ.

न्यता[1] बोलिली । ते विवेकें प्रत्यया आली । आतां पाहिजे समजली । ब्रह्मांडरचना ॥ २ ॥ आत्मानात्मविवेक पिंडीं । सारासारविचार ब्रह्मांडीं । विवरतां विवरतां हे गोडी । घेतली पाहिजे ॥ ३ ॥ पिंड कार्य ब्रह्मांड कारण । याचें करावें विवरण । हेंचि पुढें निरूपण । बोलिलें असे ॥ ४ ॥ असार म्हणिजे नाशवंत । सार म्हणिजे शाश्वत । जयास होईल कल्पांत[2] । तें सार नव्हे ॥ ५ ॥ पृथ्वी जळापासूनि झाली । पुढें ते जळीं मिळाली । जळाची उत्पत्ति वाढली । तेजापासुनी ॥ ६ ॥ तेज झालें वायूपासुनी । वायु झडपी तयालागुनी । तेज जाऊन दाटणी । वायूचीच जाहली ॥ ७ ॥ तें जळ तेथें शोषिलें । महातेजें आटोनि गेलें । पुढें तेजचि उरलें । सावकाश ॥ ८ ॥ वायु गगनापासूनि झाला । मागुता तेथेंचि विराला । ऐसा हा कल्पांत बोलिला । वेदांतशास्त्रीं ॥ ९ ॥ गुणमाया मूळमाया । परब्रह्मीं पावती लया । तें परब्रह्म विवराया । विवेक पाहिजे ॥ १० ॥ सर्व उपाधींचा शेवट । तेथें नाहीं दृश्य खटपट । निर्गुण ब्रह्म घनदाट । सकळां ठायीं ॥ ११ ॥ उदंड कल्पांत जाहला । तरी नाश नाहीं त्याला । मायात्यागें शाश्वताला । वोळखावें ॥ १२ ॥ देव अंतरात्मा सगुण । सगुणें पाविजे निर्गुण । सगुणज्ञानें निर्गुण । होत असे ॥ १३ ॥ कल्पनेतीत जें निर्मळ । तेथें नाहीं मायामळ । मिथ्यात्वें दृश्य सकळ । होत जातें ॥ १४ ॥ जें होतें आणि सर्वेचि जातें । तें तें प्रत्ययास येतें । जेथें होणें जाणें नाहीं तें । विवेकें ओळखावें ॥ १५ ॥ एक ज्ञान एक अज्ञान । एक जाणावें विपरीत ज्ञान । हे त्रिपुटी होय क्षीण । तेंचि ज्ञान ॥ १६ ॥ वेदांत सिद्धांत धादांत । तयाची पाहावी प्रचीत । निर्विकारी सदोदित । जेथें तेथें ॥ १७ ॥ तें ज्ञानदृष्टीनें पाहावें । पाहोन अनन्य राहावें । मुख्य आत्मानिवेदन जाणावें । याचें नांव ॥ १८ ॥ दृष्टीस दिसतें तें दृश्य । मनासि भासतें तो भास । दृश्यभासातीत अविनाश । परब्रह्म तें ॥ १९ ॥ पाहों जातां दुरिच्या दुरी । परब्रह्म सबाह्य अंतरीं । अंतचि नाहीं अनंत सरी[3] । कोणासी द्यावी ॥ २० ॥ चंचळ तें स्थिरावेना । निश्चळ तें कदापि चळेना । आभाळ येतें जातें गगना । चळण नाहीं ॥ २१ ॥ जें विकारे वाढे मोडे । तेथें शा-

१. अभिन्नता; त्याहून भिन्न कांहींच नाहीं अशी स्थिति. २. नाश. ३. बरोबरी.

श्वतता कैंची घडे । कल्पांत होतांचि विघडे । सकळ कांहीं ॥ २२ ॥ जे अंतरींच भ्रमले । मायासंभ्रमें संभ्रमले । तयांस हें कैसें उकले । अव्हाटें[1] चक्र ॥ २३ ॥ भिडेनें व्यवहार निवडेना । भिडेनें सिद्धांत कळेना । भिडेनें देव आकळेना । अंतर्यामीं ॥ २४ ॥ वैद्याची प्रचीत येईना । आणि भीडही उल्लंघेना । तरी रोगी वांचेना । ऐसें जाणावें ॥ २५ जेणें राजा वोळखिला । तो राजा म्हणेना भलत्याला । जेणें देव वोळखिला । तो देवरूपी ॥ २६ ॥ जयास मायिकांची[2] भीड । तें काय बोलेल द्वाड । विचार पाहतां उघड । सकळ कांहीं ॥ २७ ॥ भीड मायेऐलीकडे । परब्रह्म तें पैलीकडे । पैलीकडे ऐलीकडे । सदोदित ॥ २८ ॥ लटिकयाची भीड धरणें । भ्रमें भलतेंच करणें । ऐशीं नव्हेत कीं लक्षणें । विवेकाचीं ॥ २९ ॥ खोटें अवघेंच सांडावें । खरें प्रत्ययें ओळखावें । मायात्यागें समजावें । परब्रह्म तें ॥ ३० ॥ ते मायेचें लक्षण । तेंचि पुढें निरूपण । सुचित्तपणें विवरण । केलें पाहिजे ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्दशदशके शाश्वतब्रह्मनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १० माया.

श्रीगणेशाय नमः ॥ माया दिसे परी नासे । वस्तु न दिसे परि न नासे । माया सत्य वाटे परि मिथ्या असे । निरंतर ॥ १ ॥ करंटा पडोन उताणा । करी नानापरी कल्पना । परी तें कांहींच घडेना । तैसी माया ॥ २ ॥ द्रव्यदारेचें स्वप्नवैभव । नाना विलासें हावभाव । क्षणिक वाटे परी माव । तैसी माया ॥ ३ ॥ गगनीं गंधर्वनगरें । दिसताती नाना प्रकारें । नाना रूपें नाना विकारें । तैसी माया ॥ ४ ॥ लक्ष्मी रायविनोदांची[3] । बोलतां वाटे साची । मिथ्या प्रचीत तेथींची । तैसी माया ॥ ५ ॥ दसऱ्याच्या सुवर्णांचे लौटे[4] । लोक म्हणती परी ते खोटे । परी सर्वत्र राहाटे । तैसी माया ॥ ६ ॥ मेल्याचा महोत्सव करणें । सतीचें वैभव वाढवणें । मसणीं जाऊन रुदन करणें । तैसी माया ॥ ७ ॥ राखेसि म्हणती लक्षुमी । दुसरी भारदोरी[5] लक्षुमी । तिसरी नाममात्र लक्ष्मी । तैसी माया ॥ ८ ॥ मुळीं बाळविधवा नारी ।

---

१. गूढ, अगम्य. २. जगाची. ३. बहुरूप्याची. ४. भारे. ५. भारलेली दोरी.

तिचें नाम जन्मसावित्री । कुबेर हिंडे घरोघरीं । तैसी माया ॥ ९ ॥ दशावतारांतील कृष्णा । उपजे जीर्णवस्त्राची तृष्णा । कां नदी नामें पयोष्णा । तैसी माया ॥ १० ॥ बहुरूपांतील रामराव । ग्रामस्थांपुढें दाखवी हावभाव । कां महाराज म्हणोनि लाघव । तैसी माया ॥ ११ ॥ देव्हारीं असे अन्नपूर्णा । आणि गृहीं अन्नचि मिळेना । नामें सरस्वती शिकेना । सुभाषित ॥ १२ ॥ सुणेंसि व्याघ्र नाम ठेविलें । पुत्रासि इंद्र नामें पाचारिलें । कुरूप परी आळविलें । सुंदरा ऐसें ॥ १३ ॥ मूर्ख नामें सकळकळा । रासभी नामें कोकिळा । नातरी डोळसाचा डोळा । फुटका जैसा ॥ १४ ॥ मातंगीचें नाम तुळसी । चर्मिकेचें नाम काशी । बोलती अतिशूद्रिणीसी । भागीरथी ऐसें ॥ १५ ॥ साउली आणि अंधकार । एक होतां तेथींचा विचार । उगाच दिसे भासमात्र । तैसी माया ॥ १६ ॥ श्रवणं बोटें संधी करतळ । रविरश्मीं दिसती इंगळ । रम्य आरक्त रंगकल्लोळ । तैसी माया ॥ १७ ॥ भगवें वस्त्र देखतां मनाला । वाटे अग्निच लागला । विवंचितां प्रत्यय आला । तैसी माया ॥ १८ ॥ जळीं चरणकरांगुळें । आखूड लांब किरकोळें । विपरीत काणे दिसती जळें । तैसी माया ॥ १९ ॥ भोवंडीनें पृथ्वी कलथली । कामिणीनें पिंवळी झाली । सन्निपातें अवस्था अनुभाविली । तैसी माया ॥ २० ॥ कोणी एक पदार्थविकार । उगाच दिसे भासमात्र । अन्याचा अन्य प्रकार । तैसी माया ॥ २१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्दशदशके मायानिरूपणं नाम दशमः समाप्तः ॥ १० ॥ ओंवी ४०६.

---

# दशक पंधरावा.

## १. चातुर्य.

श्रीगणेशाय नमः ॥ अस्थिमांसांचीं शरीरें । त्यांत राहिजे जीवेश्वरें । नानाविकारीं विकारें । प्रवीण होईजे ॥ १ ॥ घनवट पोंचट स्वभावें । वि-

---

१. कुत्र्यास. २. गाढवी. ३. चांडाळणीचें. ४. चांभारणीचें. ५. कान. ६. सूर्यकिरणांतून पाहतां. ७. निखाऱ्यासारखे लाल. ८. तरंग. ९. काविळीनें. १०. कामक्रोधादि मनोविकारांनीं. ११. वृद्धिक्षयादि देहविकारांनीं.

वरोन जाणिजे जीवें । व्हावें न व्हावें आघवें । जीव जाणे ॥ २ ॥ एकीं मागमागोन घेणें । एकां न मागतांच देणें । प्रचीतीनें सुलक्षणें । वोळखावीं ॥ ३ ॥ जीव जीवांत घालावा । आत्मा आत्म्यांत मिसळावा । राहाराहोन शोध घ्यावा । परांतराचा ॥ ४ ॥ जाणीव नेणिवेस आलें । ढिलेपणें हेवांड झालें । नेमस्तपणें शोभलें । दृष्टीपुढें ॥ ५ ॥ तैसेंचि हें मनासि मन । विवेकें जावें मिळोन । ढिलेपणें अनुमान । होत आहे ॥ ६ ॥ अनुमानें अनुमान वाढतो । भिडेनें कार्यभाग नासतो । या कारणें प्रत्यय तो । आधीं पाहावा ॥७॥ दुसऱ्याचे जीवींचें कळेना । परांतर तें जाणवेना । वश्य होती लोक नाना । कोण्या प्रकारें ॥ ८ ॥ अक्कल सांडून पैरती[२] । लोक वशीकरणें[३] करिती । अपूर्णपणें हळू पडती । ठायीं ठायीं ॥ ९ ॥ जगदीश आहे जगदंतरीं । चेटकें करावीं कोणावरी । जो कोणी विवेकें विवरी । तोचि श्रेष्ठ ॥ १० ॥ श्रेष्ठ कार्य करी तो श्रेष्ठ । कृत्रिम करी तो कनिष्ठ । कर्मानुसार प्राणी नष्ट । अथवा भले ॥ ११ ॥ राजे जाती राजपंथें । चोर जाती चोरपंथें । वेडा ठके अल्पस्वार्थें । मूर्खपणें ॥ १२ ॥ मूर्खास वाटे मी शाहणा । परी तो वेडा दैन्यवाणा । नाना चातुर्याच्या खुणा । चतुर जाणे ॥ १३ ॥ जो जगदंतरीं मिळाला । तो जगदंतरचि झाला । अैत्रीं परैत्रीं[४] तयाला । काय उणें ॥१४॥ बुद्धि देणें भगवंताचें । बुद्धीविना माणूस काचें । राज्य सांडून फुकाचें । भीक मागे ॥१५॥ जें जेथें निर्माण झालें । तें तें तयास मानलें । अभिमान देऊन गोविलें । ठायीं ठायीं ॥१६॥ अवघेचि ह्मणती आम्ही थोर । अवघेचि म्हणती आम्ही सुंदर । अवघेचि म्हणती चतुर । भूमंडळीं ॥ १७॥ ऐसा विचार आणितां मना । कोणीच लहान म्हणवीना । जाणते आणिती अनुमाना । सकळ कांहीं ॥१८॥ आपुलाल्या साभिमानें । लोक चालिले अनुमानें । परंतु हें विवेकानें । पाहिलें पाहिजे ॥१९॥ लटिकयाचा साभिमान घेणें । सत्य अवघेंच सांडणें । मूर्खपणाचीं लक्षणें । तीं हीं ऐशीं ॥ २० ॥ सत्याचा जो अभिमान । तो जाणावा निरभिमान । न्याय अन्याय समान । कदापि नव्हे ॥२१॥ न्याय म्हणिजे तो शाश्वत । अन्याय म्हणिजे तो अशाश्वत । बाष्कळ आणि नेमस्त । एक कैसें ॥ २२ ॥ एक उघड भाग्य भो-

१. गुंतागुंत. २. दूर. ३. मंत्रानें लोक वश करणें. ४. इहपरलोकीं.

गिती । एक तस्कर[1] पळोन जाती । एकाची प्रगट महंती । एकाची कानकोंडी ॥ २३ ॥ आचारविचारेंविण । जें जें करणें तो तो क्षीण । धूर्त आणि विचक्षण । तेचि शोधावे ॥ २४ ॥ उदंड बाजारी मिळाले । परी ते धूर्तांचि आकळिले । धूर्तांपासीं कांहीं न चले । बाजाऱ्याचें ॥२५॥ या कारणें मुख्य मुख्य । तयांसी करावें सख्य । येणेंकरितां असंख्य । बाजारी मिळती ॥२६॥ धूर्तांसि धूर्तंचि आवडे । धूर्त धूर्तांच पवाडे[2] । उगेचि हिंडती वेडे । कार्यैंविण ॥ २७ ॥ धूर्तांसि धूर्तपण कळलें । तेणें मनासी मन मिळालें । परी हें गुप्तरूपें केलें । पाहिजे सर्व ॥ २८ ॥ समर्थांचें राखितां मन । तेथें येती उदंड जन । जन आणि सज्जन । आर्जव करिती ॥ २९ ॥ वोळखीनें वोळखी साधावी । बुद्धीनें बुद्धि बोधावी । नीतिन्यायें वाट रोधावी । पाखंडाची ॥ ३० ॥ वेष धरावा बावळा । अंतरीं असाव्या नाना कळा । सगट लोकांचा जिव्हाळा । मोडूंच नये ॥ ३१ ॥ निस्पृह आणि नित्य नूतन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान । प्रकट जाणता सज्जन । दुर्लभ जगीं ॥ ३२ ॥ नाना जिन्नस पाठांतरें । निवती सकळांचीं अंतरें । चंचळपणें तदनंतरें । सकळा ठायीं ॥ ३३ ॥ एकेठायीं बैसोनि राहिला । तरी मग व्यापचि बुडाला । सावधपणें ज्याला त्याला । भेटी द्यावी ॥ ३४ ॥ भेटभेटों उरी राखणें । हीं चातुर्याची लक्षणें । मनुष्यमात्र उत्तमगुणें । सावधान पावें ॥ ३५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके चातुर्यनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥१॥

---

## २. निस्पृहलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ पृथ्वीमध्यें नानाशरीरें । उदंड दाटलीं लाहानथोरें । पालटती मनोविकारें । क्षणक्षणां ॥ १ ॥ जितुक्या मूर्ति तितुक्या प्रकृती[3] । सारिख्याच नसती आदिअंतीं । नेमचि नाहीं पाहावें किती । काय म्हणोनी ॥ २ ॥ कितेक म्लेंच्छ होऊन गेले । कितेक फिरंगणांत[4] आटले । देशभाषेनें रोधिले । कितीएक ॥ ३ ॥ महाराष्ट्र[5] देश थोडा उरला । राजकारणें लोक रोधिला । अवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥ ४ ॥ कित्येक युद्धप्रसंगीं गुंतले । तेणें गुणें उन्मत्त झाले । रात्रंदिवस करूं लागले

---

१. चोर. २. मिसळतो. ३. स्वभाव. ४. ख्रिस्ती जातींत. ५. मराठ्यांचा.

युद्धचर्चा ॥ ५ ॥ उद्म्यास व्यासंग लागला । अवकाश नाहींसा झाला । अवघा पोटधंदा लागला । निरंतर ॥ ६ ॥ षट्दर्शनें[१] नाना मतें । पाषांडें उठलीं बहुतें । पृथ्वीमध्यें जेथें तेथें । उपदेशिती ॥ ७ ॥ स्मार्तीं आणि वैष्णवीं । उरलीं सुरलीं नेलीं आघवीं । ऐशी पाहतां गाथागोवी । उदंड जाहली ॥ ८ ॥ कित्येक कामनेचे भक्त । ठायीं ठायीं झाले आसक्त । युक्त अथवा अयुक्त । पाहतो कोण ॥९ ॥ या गलबल्यामध्यें गलबला । कोणीं कोणीं वाढविला । त्यास देखों शकेनासा झाला । वैदिक लोक ॥१०॥ त्यांहिमध्यें हरिकीर्तन । तेथें वोढले कित्येक जन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान । कोण पाहे ॥ ११ ॥ या कारणें ज्ञान दुर्लभ । पुण्यें घडे अलभ्य लाभ । विचारवंता सुलभ । सर्व कांहीं ॥ १२ ॥ विचार सकळांला सांगतां न ये । उदंड येती अंतरायें[२] । उपाय योजितां अपाय । आडवे येती ॥ १३ ॥ त्यांहिमध्यें जो तीक्ष्ण । रिकामा जाऊं नेदी क्षण । धूर्त तार्किक विचक्षण । सकळांस मानें ॥ १४ ॥ नानाजिन्नस उदंड पाठ । वदों लागले घडघडाट । अव्हाटांची[३] केली वाट । सामर्थ्यबळें ॥ १५ ॥ प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें । जाणे सकळांचीं अंतरें । निरूपणें तदनंतरें । चटक लागे ॥ १६ ॥ मतें मतांतरें सगट । प्रत्यय बोलून करी सपाट । दंडक सांडून नीट । वेधी जनां ॥ १७ ॥ नेमकें भेदकें वचनें । अखंड पाहे प्रसंगमानें । उदासवृत्तीच्या गुमानें[४] । उठोन जातो ॥ १८ ॥ प्रत्यय बोलोन उठोन गेला । चटक लागली लोकांला । नाना मार्ग सांडून त्याला । शरण येती ॥ १९ ॥ परी तो कोठें आढळेना । कोणे स्थळीं सांपडेना । वेष पाहतां हीनदीना । सारिखा दिसे ॥ २० ॥ उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें । तेथें यश कीर्ति प्रतापें । सीमा सांडिली ॥ २१ ॥ ठायीं ठायीं भजन लावी । आपण तेथून चुकवी । मत्सरमताची गोंवी[५] । लागोंच नेदी ॥ २२ ॥ खनाळांमध्यें[६] जाऊन राहे । तेथें कोणीच न पाहे । सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ २३ ॥ अवघडस्थळीं कठिण लोक[७] । तेथें राहणें नेमक । सृष्टीमध्यें सकळ लोक । धुंडीत येती ॥ २४ ॥ तेथें कोणाचें चालेना । अणुमात्र अ-

---

१. सौर, शाक्त, गाणपत्य, शैव, वैष्णव आणि स्कांद हीं सहा मतें. २. आडवाटांची. ३. अडथळे. ४. बळानें. ५. संबंध. ६. दरीखोऱ्यांत. ७. स्थान.

नुमानेना । कट घालून राजकारणा । लोकां लावी ॥ २५ ॥ लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद झाले । भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥ २६ ॥ ठायींठायीं उदंड थोंबे[1] । मनुष्यमात्र तितुकें झोंबे । चहूंकडे उदंड लांबे । परमार्थबुद्धी ॥ २७ ॥ उपासनेचा गजर । स्थळोस्थळीं थोरथोर । प्रत्ययानें प्राणिमात्र । सोडविले ॥ २८ ॥ ऐसें कैवांड[2] उदंड जाणे । तेणें लोक होती शाहणे । जेथें तेथें प्रत्यय बाणे । प्राणिमात्रासीं ॥ २९ ॥ ऐशी कीर्ति करून जावें । तरीच संसारास यावें । दास म्हणे हें स्वभावें । संकेतें बोलिलें ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके निस्पृहलक्षणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. श्रेष्ठ अंतरात्मा.

श्रीगणेशाय नमः ॥ मुळांपासून[3] सैरावैरा । अवघा पंचीकरण पसारा । त्यांत साक्षित्वाचा दोरा । तोहि तत्वरूप[4] ॥ १ ॥ दुरस्तां दाटल्या फौजा । उंच सिंहासनीं राजा । याचा विचार समजा[5] । अंतर्यामीं ॥ २ ॥ देहमात्र अस्थिमांसाचें । तैसेंचि जाणावें नृपतीचें[6] । मुळापासून सृष्टीचें । तत्वरूप[4] ॥ ३ ॥ रायाचे सत्तेनें चालतें । परंतु अवघीं पंचभूतें । मुळीं अधिक जाणीवेचें तें । अधिष्ठान आहे ॥ ४ ॥ विवेकें बहुत पैसावले । म्हणोन अवतारी बोलिले । मनु चक्रवर्ती झाले । येणेंचि न्यायें ॥ ५ ॥ जेथें उदंड जाणीव । तेचि तितुके सदैव[7] । थोडे जाणीवेनें निर्दैव[8] । होती लोक ॥ ६ ॥ व्याप आटोप करीती । धक्के चपेटे सोसिती । तेणें प्राणी सदैव होती । देखतदेखतां ॥ ७ ॥ ऐसें हें आतां वर्ततें । मूर्ख लोकांस कळेना तें । विवेकी मनुष्य समजतें । सकळ कांहीं ॥ ८ ॥ थोर लहान बुद्धीपाशीं । सगट कळेना लोकांसी । आधीं उपजले तयांसी । थोर म्हणती ॥ ९ ॥ वयें धाकुटा नृपती । वृद्ध तयास नमस्कार करिती । विचित्र विवेकाची गती । कळली पाहिजे ॥ १० ॥ सामान्य लोकांचें ज्ञान । तें अवघेंच अनुमान ।

---

१. समुदाय. २. कारस्थान. ३. मूळमायेपासून. ४. पंचभौतिक. ५. जाणिवेचा. ६. फौजेच्या मध्यभागीं राजा, त्याप्रमाणें जगताचे अंतरीं जाणीव म्हणजे साक्षित्व आहे. परंतु राजा व फौज हे जसे सर्व देहच, त्याप्रमाणें जगत् व साक्षित्व हें सर्व पंचभौतिकच होय. ७. भाग्यवान्. ८. भाग्यहीन.

दीक्षादंडकाचें लक्षण । येणेंचि पाडें ॥११॥ नव्हे कोणास म्हणावें । सामान्यास काय ठावें । कोण कोणास म्हणावें । किती म्हणोनी ॥१२॥ धाकुटा भाग्यास चढला । तरी तुच्छ करिती तयाला । या कारणें सलगीच्या लोकांला । दुरी धरावें ॥१३॥ नेमस्त कळेना वचन । नेमस्त न ये राजकारण । उगेचि धरिती थोरपण । मूर्खपणें ॥ १४ ॥ नेमस्त कांहींच कळेना । नेमस्त कोणीच मानीना । आधीं उपजलें त्या थोरपणा । कोण पुसे ॥ १५ ॥ वडिलां वडिलपण नाहीं । धाकुट्या धाकुटेपण नाहीं । ऐसें बोलती त्यांस नाहीं । शहाणपण ॥ १६ ॥ गुणेंविण वडिलपण । हें तों अवघेंच अप्रमाण । त्याची प्रचीत प्रमाण । थोरपणीं ॥ १७ ॥ तथापि वडिलांस मानावें । वडिलें वडिलपण जाणावें । नेणतां पुढें कष्टावें । थोरपणीं ॥ १८ ॥ तस्मात् वडिल अंतरात्मा । जेथें चेतला तेथें महिमा । हें प्रगटचि आहे आम्हां । शब्द नाहीं ॥१९॥ या कारणें कोणी एकें । शाहाणपण शिकावें विवेकें । विवेक न शिकतां तुकें । तुटोन जाती ॥ २० ॥ तुक तुटलें म्हणिजे गेलें । जन्मास येऊन काय केलें । बळेंच सांदीस घातलें । आपणासी ॥ २१ ॥ सगट बायका शिव्या देती । सांदीस पडला ऐसें म्हणती । मूर्खपणाची प्राप्ती । ठाकून आली ॥ २२ ॥ ऐसें कोणी एकें न करावें । सर्व सार्थकाचि करावें । कळेना तरी विवरावें । ग्रंथांतरीं ॥ २३ ॥ शाहण्यास कोणी तरी बाहती । मूर्खास लोक दवडून देती । जीवास आवडे संपत्ती । तरी शाहणें व्हावें ॥ २४ ॥ अहो या शहाणपणाकारणें । बहुतांचे कष्ट करणें । परंतु शहाणपण शिकणें । हें उत्तमोत्तम ॥ २५ ॥ जो बहुतांस मानला । तो जाणावा शाहाणा झाला । जनीं शाहण्या मनुष्याला । काय उणें ॥ २६ ॥ आपुलें हित न करी लौकिकीं । तो जाणावा आत्मघातकी । त्या मूर्खा एवढा पातकी । आणिक नाहीं ॥ २७ ॥ आपण संसारीं कष्टतो । लोकां करवीं रागेजोन घेतो । जनांमध्यें शहाणा तो । ऐसें न करी ॥ २८ ॥ साधकां शिकविलें स्वभावें । मानेल तरी सुखें घ्यावें । मानेना तरी सांडावें । एकीकडे ॥ २९ ॥ तुह्मी श्रोते परम दक्ष । अलक्ष्यास लाविता लक्ष । हें तों सामान्य प्रत्यक्ष । जाणतसां ॥३०॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके श्रेष्ठअंतरात्मनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

## ४. शाश्वत ब्रह्म.

श्रीगणेशाय नमः ॥ पृथ्वीपासून झालीं झाडें । झाडापासून होती लांकडें । लांकडें भस्मोन पुढें । पृथ्वीच होय ॥१॥ पृथ्वीपासून वेल होती । नाना जिन्नस फांपावती । वाळोन कुजोन मागुती । पृथ्वीच होय ॥ २ ॥ नाना धान्यांचीं नाना अन्नें । मनुष्यें कारिती भोजनें । नाना विष्ठा नाना वमनें । पृथ्वीच होय ॥ ३ ॥ नाना पक्ष्यादिकीं भक्षिलें । तरी पुढें तैसेंचि झालें । वाळोन भस्म होऊन गेलें । पुनः पृथ्वी ॥४॥ मनुष्यें मरतांच ऐका । कृमि भस्म मृत्तिका । ऐशा काया पडती अनेका । पुढें पृथ्वी ॥ ५ ॥ नाना लुणें पदार्थ कुजती । पुढें त्यांची होय माती । नाना किडे मरोन जाती । पुढें पृथ्वी ॥ ६ ॥ पदार्थ दाटले अपार । किती सांगावा विस्तार । पृथ्वीवांचून थार । कोणास नाहीं ॥ ७ ॥ झाडपाले आणि तृण । पशु भक्षितां होतें शेण । खात मूत भस्म मिळोन । पुन्हा पृथ्वी ॥ ८ ॥ उत्पत्ति स्थिति संहारतें । तें तें पृथ्वीस मिळोन जातें । जितुकें होतें आणि जातें । पुनः पृथ्वी ॥ ९ ॥ नाना बीजांचिया राशी । विरुढोन लागती गगनासी । पुढें शेवटीं पृथ्वीसी । मिळोन जाती ॥१०॥ लोक नाना धातु[1] पुरिती । बहुतां दिवसां होय माती । सुवर्ण पाषाणांची गती । तैसीच आहे ॥११॥ मातीचें होतें सुवर्ण । आणि मृत्तिकेचे होती पाषाण । महा अग्निसंगें भस्मोन । पृथ्वीच होय ॥ १२ ॥ सुवर्णाचें रज[2] होतें । रज शेवटीं कुजोन जातें । रस होऊन वितुळतें । पुनः पृथ्वी ॥ १३ ॥ पृथ्वीपासून धातु[1] निपजती । अग्निसंगें भस्म होती । तया रसाची होय जगती[3] । कठिणरूपें ॥ १४ ॥ नाना जळासि गंधी उठे । तेथें पृथ्वीचें रूप प्रगटे । दिवसेंदिवस जळ आटे । पुढें पृथ्वी ॥ १५ ॥ पत्रें पुष्पें फळें येती । नाना जीव खाऊन जाती । ते जीव मरतां जगती । नेमस्त होय ॥ १६ ॥ जितुका कांहीं झाला आकार । तितुक्यास पृथ्वी आधार । होती जाती प्राणिमात्र । शेवटीं पृथ्वी ॥ १७ ॥ हें किती म्हणोन सांगावें । विवेकें अवघेंचि जाणावें । खाजणीभाजणीचें[4] समजावें । मूळ तैसें ॥ १८ ॥ आप आळोन पृथ्वी झाली । पुनः आपींच विराली । अग्नियोगें भस्म झाली । म्हणोनियां ॥ १९ ॥ आप झालें तेजा-

१. सोनें, रुपें इत्यादि. २. बारीक कण. ३. पृथ्वी. ४. उभारणी-संहारणीचें.

पासुनी। पुढें तेजें घेतलें शोषूनी। तें तेज झालें वायूचेनी। पुढें वायु झडपी॥ २०॥ वायु गगनीं निर्माण झाला। पुढें गगनींच विराला। ऐसें खाजणीभाजणीला। बरें पाहा॥ २१॥ जें जेथें निर्माण होतें। तें तेथें लया जातें। येणें रीती पंचभूतें। नाश पावती॥ २२॥ भूत म्हणिजे निर्माण झालें। पुनः मागुतें निमालें। पुढें शाश्वत उरलें। परब्रह्म तें॥ २३॥ तें परब्रह्म जों कळेना। तों जन्ममृत्यु चुकेना। चार खाणी जीव नाना। होणें घडे॥ २४॥ जडाचें मूळ तें चंचळ। चंचळाचें मूळ तें निश्चळ। निश्चळास नाहीं मूळ। बरें पाहा॥ २५॥ पूर्वपक्ष म्हणिजे झालें। सिद्धांत म्हणिजे निमालें। पक्षातीत जें संचलें। परब्रह्म तें॥ २६॥ हें प्रचीतीनें जाणावें। विचारें खुणेसि बाणावें। विचारेंविण शिणावें। तेंचि मूर्खपण॥ २७॥ ज्ञानी भिडेनें दडपिला। निश्चळ परब्रह्म कैंचें त्याला। उगाच करिती गलबला। मायेमध्यें॥ २८॥ माया निःशेष नासली। पुढें स्थिति कैसी उरली। विचक्षणें विवरिली। पाहिजे स्वयें॥ २९॥ विशेष मायेचें निरसन। होतां आत्मनिवेदन। वाच्यांश नाहीं विज्ञान[१]। कैसें जाणावें॥३०॥ लोकांचे बोलीं जो लागला। तो अनुमानेंचि बुडाला। या कारणें प्रत्ययाला। पाहिलेंचि पाहावें॥ ३१॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके शाश्वतब्रह्मनिरूपणं नाम चतुर्थः समासः॥ ४॥

---

## ५. चंचललक्षण.

श्रीगणेशाय नमः॥ दोघां[२] ऐशीं तीनें[३] चालती। अगुणीं[४] अष्टधा प्रकृती। अधोर्ध्व[५] सांडून वर्तती। इंद्रफणी ऐशी॥ १॥ पर्णतोंडें[६] भक्षितो पर्णजा[६]। मूळ बापासें मारी वोजा[७]। चुकाऱ्या[८] गेला रोजा[९]। चौघांजणांचा

१. अनुभवाचें ज्ञान. २. प्रकृति व पुरुष; म्हणजे मूळमाया. ३. त्रिगुण; म्हणजे गुणमाया. ४. निर्गुणाचे ठिकाणीं. ५. खालीं नव्हे, वर नव्हे; इंद्रधनुष्याप्रमाणें अंतरिक्षांत. ६. अग्नि, आप, पृथ्वी व वनस्पती असा उत्पत्तिक्रम आहे; तेव्हां वनस्पत्यादिकांस अग्नि भक्षण करितो असा अर्थ. (?) ७. पंचभूतांच्या उत्पत्तिक्रमानें पाहतां पृथ्वी उदकास शोषते, उदक तेजास विझवितें, इत्यादि. (?) ८. कुशलतेनें. ९. पृथ्वी, आप, तेज व वायु यांचें मुख्य तत्त्व आकाश; अंतरात्मा.

॥ २ ॥ देवें[1] देवालयामध्यें[2] लपला । देऊळ पूजितां पावे त्याला । सृष्टीमध्यें ज्याला त्याला । ऐसेंचि आहे ॥ ३ ॥ दोनी नामें[3] एकासि[4] पडिलीं । लोकीं नेमस्त कल्पिलीं । विवेकें प्रत्ययें पाहिलीं । तों एकचि नाम ॥ ४ ॥ नाहीं पुरुष ना वनिता[5] । लोकीं कल्पिलें तत्वतां । याचा बरा शोध घेतां । कांहीं नाहीं ॥ ५ ॥ स्त्री नदी पुरुष खळाळ[6] । ऐसें बोलती सकळ । विवरोन पहातां निवळ । देहँ नाहीं ॥ ६ ॥ आपण आपणास कळेना । पाहों जातां आकळेना । कशास कांहींच मिळेना । उदंडपणें ॥७॥ एकलाचि उदंड झाला । उदंडाचि एकला पडिला । आपणासि आपला गलबला । सोसवेना ॥ ८ ॥ एक असोन फुटी पडली । फुटी असोन स्थिति एकली । विचित्र कळा पैसावली । प्राणिमात्रीं ॥ ९ ॥ वल्लीमध्यें जळ संचरे । कोरडेपणें हें वावरे । बोलेवांचून न थिरे । कांहीं केल्या ॥ १० ॥ झाडामध्यें केलीं आळीं । झाडें धांवती निराळीं । कित्येक झाडें अंतराळीं । उडोन जाती ॥ ११ ॥ भूमिपासून वेगळीं झालीं । परी नाहींत वाळलीं । निराळींच बळावलीं । जेथें तेथें ॥ १२ ॥ देवाकरितां चालतीं झाडें । देव[1] नसतां होतीं लांकडें । नीटचि आहे कुंवाडें । सर्वथा नव्हे ॥ १३ ॥ झाडापासून झाडें होतीं । तीं हीं अंतरिक्ष जाती । मुळांनीं भेदिली जगती[10] । कदापि नाहीं ॥ १४ ॥ झाडास झाडाचें खात पाणी । घालूनि पाळिती प्रतिदिनीं । बोलकीं झाडें शब्दमथनीं । विचार घेती ॥ १५ ॥ होणार तितुकें आधींच झालें । मग कल्पकल्पून बोलिलें । जाणत्यास कळलें । सकळ कांहीं ॥ १६ ॥ समजलें तरी उमजेना । उमजलें तरी समजेना । प्रत्ययेंविण अनुमानेना । सकळ कांहीं ॥ १७ ॥ सर्वत्रांचा वडील कोण । हेचि पाहावी ओळखण । भेटे आपणास आपण । जगदंतरें ॥ १८ ॥ अंतर्निष्ठांची[11] उंच कोटी । बहिर्मुखांची[12] संगती खोटी । मूर्ख काय समजेल गोष्टी । शाहणे जाणती ॥ १९ ॥ अंतरें राखतां राजी । भलत्यास भलताच नें[13] वांजी[13] । अंतर न राखतां भाजी । मिळणार नाहीं ॥ २० ॥ ऐसें वर्ततें प्रत्यक्ष । अलक्ष्यीं लावावें लक्ष । दक्षास भेटतां दक्ष ।

१. आत्मा. २. शरीरामध्यें. ३. प्रकृति व पुरुष. ४. आत्म्यास. ५. स्त्री. ६. ओढा. ७. अवयवरचना. ८. आकाशांत. ९. गूढ. १०. पृथ्वी. ११. स्वरूपचिंतन करणाराची. १२. व्यवहारांत गढलेल्याची. १३. पीडा न करी.

समाधान होतें ॥ २१ ॥ मनास मिळतां मन । पाहोन येती निरंजन[1] । चं-
चळचक्र[2] उल्लंघून । पैलाड जाती ॥ २२ ॥ एकदां जाऊन पाहून आले ।
मग तें सन्निध देखिलें । चर्मचक्षू लक्षिलें । न वचे कदा ॥ २३ ॥ नाना श-
रीरीं चंचळ । अखंड करी चळवळ । परब्रह्म तें निश्चळ । सर्वां ठायीं ॥ २४ ॥
चंचळ धांवे एकीकडे । वोस पडे दुसरीकडे । चंचळ पुरे सर्वांकडे । हें तों घ-
डेना ॥ २५ ॥ चंचळ चंचळास पुरेना । अवघें चंचळ विवरेना । निश्चळ अ-
पार अनुमाना । कैसें येतें ॥ २६ ॥ गगनीं चालिली हवाई[3] । कैसी पावेल
पार पदवी । जातां मध्येंचि विझावी । हा स्वभाव तिचा ॥ २७ ॥ मनो-
धर्म एकदेशी । कैचीं आकळील वस्तूसी । निर्गुण सांडून अपैसीं[4] । सर्व
ब्रह्म म्हणे ॥ २८ ॥ नाहीं सारासार विचार । तेथें अवघा एककार । खरें
सांडून खोटें पोर । नेणतें घेतें ॥ २९ ॥ ब्रह्मांडाचें महाकारण । तेथूनि हें
पंचीकरण । महावाक्याचें विवरण । वेगळेंच असे ॥ ३० ॥ महतत्व मह-
द्भूत । तोचि जाणावा भगवंत । उपासना हे समास । येथून झाली ॥ ३१ ॥
कर्म उपासना आणि ज्ञान । त्रिकांड[5] वेद हे प्रमाण । ज्ञानाचें होतें विज्ञान ।
परब्रह्मीं ॥ ३२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके चंचळ-
लक्षणनिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. चातुर्यलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ पिंड्यापासून[6] कृष्णें[7] झालें । भूमंडळीं विस्तारिलें ।
तेणेंविण उमजलें । हें तों घटेना ॥ १ ॥ आहे तरी स्वल्प लक्षण । सर्वत्रांची
सांठवण । अधम आणि उत्तम गुण । तेथेंचि असती ॥ २ ॥ महीसुत[8] सर-
साविला । सरसाऊन द्विधा केला । उभयतां मिळोन चालला । कार्यभाग
॥ ३ ॥ श्वेताश्वेतास[9] गांठी पडतां । मध्यें कृष्णें[10] मिश्रित होतां । इहलोक-
साधकर्ता[11] । होत आहे ॥ ४ ॥ विवरतां याचा विचार । मूर्ख तोचि होय
चतुर । सद्यःप्रचीत साक्षात्कार । परलोकींचा ॥ ५ ॥ सकळांस जें मान्य ।

---

१. शुद्ध ब्रह्म. २. मायेचें चक्र. ३. बाण. ४. आपल्याशींच. ५. तीन भागांचा.
६. सर्वांचें मूळ ब्रह्म त्यापासून. ७. माया. ८. अहंकार. ९. सत्वगुणाची व रजो-
गुणाची. १०. तमोगुण. ११. जगाची राहटी.

तोंचि होतसे सामान्य । सामान्यास अनन्य । होइजेत नाहीं ॥ ६ ॥ उत्तम मध्यम कनिष्ठ रेखा । अदृष्टींची गुप्त रेखा । तत्वाचा अनुभव सारिखा । होत नाहीं ॥ ७ ॥ चौदा पिळ्यांचे पवाडे[1] । सांगती ते शाहणे कीं वेडे । ऐक्यता घडे कीं न घडे । ऐसें पाहावें ॥ ८ ॥ रेखा तितुकी पुसोन जाते । प्रत्यक्ष प्रत्यया येते । डोळेझांकणी करावी ते । काय निमित्त ॥ ९ ॥ बहुतांचे बोलीं लागले । ते प्राणी अनुमानीं बुडाले । मुख्य निश्चय चुकले । प्रत्ययाचा ॥ १० ॥ उदंडाचें उदंड ऐकावें । परी तें प्रत्ययें पाहावें । खरें खोटें निवडावें । अंतर्यामीं ॥ ११ ॥ कोणासि नव्हे म्हणों नये । समजावे अपाय उपाय । प्रत्यय घ्यावा बहुत काय । बोलोनियां ॥ १२ ॥ माणूस हेकाड आणि कांचें[2] । मान्य करावें तयाचें । येणेंप्रकारें बहुतांचें । अंतर राखावें ॥ १३ ॥ अंतरीं पीळ पेंच वळसा[3] । तोंचि वाढवी बहुवसा । तरी मग शाहणा कैसा । निवडूं जाणे ॥ १४ ॥ वेडे करावे शाहाणे । तरीच जिणें श्लाघ्यवाणें । उगेंच वादांगें[4] वाढवणें । हें मूर्खपण ॥ १५ ॥ मिळोन जाऊन मिळवावे । पडी घेऊन उलथावे । कांहींच कळों न द्यावें । विवेकबळें ॥ १६ ॥ दुसऱ्याचे चालणीं चालावें । दुसऱ्याचे बोलणीं बोलावें । दुसऱ्याच्या मनोगतें जावें । मिळोनियां ॥ १७ ॥ जो दुसऱ्याच्या हितावरी । तो विपट[5] कांहींच न करी । मानत मानत विवरी । अंतर तयाचें ॥ १८ ॥ आधीं अंतर हातीं घ्यावें । मग हळुहळु उकलावें । नाना उपायें न्यावें । परलोकासी ॥ १९ ॥ हेकाडास हेकाड मिळाला । तेथें गलबलाचि झाला । कलह उठतां चातुर्याला । ठाव कैंचा ॥ २० ॥ उगीच करिती बडबड । परी करून दाखवणें हें अवघड । परस्थळ साधणें जड । कठिण आहे ॥ २१ ॥ धक्के चपेटे सोसावे । नीच शब्द सोशीत जावे । प्रस्तावोन परावे । आपले होती ॥ २२ ॥ प्रसंग जाणोन बोलावें । जाणपण कांहींच न घ्यावें । लीनता धरून जावें । जेथें तेथें ॥ २३ ॥ कुग्रामें अथवा नगरें । पाहावीं घरांचीं घरें । भिक्षामिषें लहान थोरें । परीक्षून सोडावीं ॥ २४ ॥ भोंवतां[6] कांहीं तरी सांपडे । विचक्षण लोकीं मैत्री घडे । उगेंच बैसतां कांहीं न घडे । फिरणें विवरणें ॥ २५ ॥ सावधपणें सर्व जाणावें । वर्तमान आधींच घ्यावें । जाऊं

१. वर्णनें. २. कच्चें. ३. कपट. ४. वादाचा प्रसंग. ५. आनिष्ट. ६. फिरल्यानें.

नये तिकडे जावें । विवेकेंसहित ॥ २६ ॥ नाना जिन्नस पाठांतरें । निवती सकळांचीं अंतरें । लिहोन देतां परोपकारें । सीमा सांडिली ॥ २७ ॥ जैसें जयास पाहिजे । तैसें तयासि दीजे । तरी मग श्रेष्ठ होइजे । सकळां मान्य ॥ २८ ॥ भूमंडळीं सकळां मान्य । तो म्हणूं नये सामान्य । कित्येक लोक अनन्य । तया पुरुषासी ॥ २९ ॥ ऐशीं चातुर्याचीं लक्षणें । चातुर्यें दिग्विजय करणें । मग तयास काय उणें । जेथें तेथें ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके चातुर्यलक्षणनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. अधोर्ध्वलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ नाना विकारांचें मूळ । ते हे मूळमायाच केवळ । अचंचळीं जे चंचळ । सूक्ष्मरूपें ॥ १ ॥ मूळमाया जाणिवेची । मुळींच्या मूळसंकल्पाची । वोळखी षड्गुणेश्वराची । येणेंचि न्यायें ॥ २ ॥ प्रकृतिपुरुष शिवशक्ती । अर्धनारीनटेश्वर म्हणती । परी ते अवघी जगज्योती । मूळ त्यासी ॥ ३ ॥ संकल्पाचें लक्षण । तेचि मूळमाया जाण । वायु आणि त्रिगुण । पंचभूतें ॥ ४ ॥ पाहतां कोणी एक वेल । त्याच्या मुळ्या असती खोल । पत्रें पुष्पें फळें केवळ । मुळाचपासीं ॥ ५ ॥ याहि वेगळे नाना रंग । आकार विकार तरंग । नाना स्वाद अंतरंग । मुळामध्यें ॥ ६ ॥ तेंचि मूळ फोडून पाहतां । कांहींच नाहीं वाटे आतां । पुढें वाढतां वाढतां । दिसों लागे ॥ ७ ॥ कड्यावरील वेल निघाला । अधोमुखें बळें चालिला । फांपावोन पुढें आला । भूमंडळीं ॥ ८ ॥ तैशी मूळमाया जाण । पंचभूतें आणि त्रिगुण । मुळीं आहेत हें प्रमाण । प्रत्ययें जाणावें ॥ ९ ॥ अखंड वेल पुढें वाढला । नाना विकारीं शोभला । विकाराचा विकार झाला । असंभाव्य ॥ १० ॥ नाना फडगरें फुटलीं । नाना जुंबाडें वाढलीं । अनंत अग्रें चालिलीं । सृष्टीमध्यें ॥ ११ ॥ कित्येक फळें तीं पडती । सवेंचि आणिक निघती । ऐशीं होती आणि जाती । सर्वकाळ ॥ १२ ॥ एक वेलचि वाळले । पुनः तेथेंचि फुटले । ऐसे आले आणि गेले । कितीएक ॥ १३ ॥ पानें झडती आणि फुटती । पुष्पें फळें तेणेंचि रीती । मध्यें जीव हे जगती ।

असंभाव्य ॥ १४ ॥ अवघा वेलचि करपतां । मुळापासोन पुनः होतो । ऐसा अवघा विचार जो तो । प्रत्यक्ष जाणावा ॥ १५ ॥ मूळ खाणोन काढिलें । प्रत्ययज्ञानें निर्मूळ केलें । तरी मग वाढणेंचि राहिलें । सकळ कांहीं ॥ १६ ॥ मुळीं बीज शेवटीं बीज । मध्यें जळरूप बीज । ऐसा हा स्वभाव सहज । विस्तारला ॥ १७ ॥ मुळामधील ज्या गोष्टी । सांगतां हे बीजसृष्टी । जेथील अंश तेथें कष्टी । न होतां जातो ॥ १८ ॥ जातो येतो पुनः जातो । ऐशा प्रत्यावृत्ति[1] करितो । परंतु आत्मज्ञानी जो तो । अन्यथा न घडे ॥ १९ ॥ न घडे ऐसें जरी म्हणावें । तरी कांहीं तरी लागे जाणावें । अंतरींच पडे ठावें । सकळांस कैचें ॥ २० ॥ तेणेंसीच कार्यभाग करिती । परंतु तयास नेणती । दिसेना ते काय करिती । बापुडे लोक ॥२१ विषयभोग तेणेंचि घडे । तेणेंविण कांहींच न घडे । स्थूळ[2] सांडून सूक्ष्मीं[3] पवाडे । ऐसा पाहिजे ॥ २२ ॥ जें आपलेंचि अंतर । तद्रूपचि जगदंतर । शरीरभेदाचे विकार । वेगळाले ॥ २३ ॥ अंगुळीची अंगुळीस वेदना । एकीची एकीस कळेना । हात पाय अवयव नाना । येणेंचि न्यायें ॥ २४ ॥ अवयवाचें अवयव नेणे । मां[4] तो पराचें काय जाणे । परांतर या कारणें । जाणवेना ॥ २५ ॥ एकेंचि उदकें सकळ वनस्पती । नाना अग्रें भेद दिसती । खुडिलीं तितुकींच सुकती । येर तीं टवटवीत ॥ २६ ॥ येणेंचि न्यायें भेद झाला । कळेना एकाचें एकाला । जाणपणें आत्मयाला । भेद नाहीं ॥ २७ ॥ आत्मत्वीं भेद न दिसे । हें प्रकृतीकारितां भासे । तरि जाणतचि असे । बहुतेक ॥ २८ ॥ देखोन ऐकोन जाणती । शाहणे अंतरीं परीक्षिती । धूर्त ते अवघेचि समजती । गुप्तरूपें ॥ २९ ॥ जो बहुतांचें पाळण करी । तो बहुतांचें अंतर विवरी । धूर्तपणें ठाउकें करी । सकळ कांहीं ॥ ३० ॥ आधीं मनोगत पाहती । मग विश्वास धरिती । प्राणिमात्र येणेंचि रीती । वर्तताहे ॥ ३१ ॥ स्मरणामागें विस्मरण । रोकडी प्रचीत प्रमाण । आपलें ठेवणें आपण । चुकताहे ॥ ३२ ॥ आपलेंच आपणा स्मरेना । बोलिलें तें आठवेना । उठती अनंत कल्पना । ठाउक्या कैंच्या ॥ ३३ ॥ ऐसें हें चंचळ चक्र । कांहीं नीट कांहीं वक्र । झाला राव अथवा शक्र । तरी स्मरणास्मरणें ॥ ३४ ॥ स्मरण म्हणिजे देव । विस्मरण

१. फेरे. २. दृश्य आकार. ३. ब्रम्हाकडे. ४. मग.

म्हणिजे दानव । स्मरणविस्मरणें मानव । वर्तती आतां ॥ ३५ ॥ म्हणोन दैवी आणि दानवी[1] । संपत्ति[2] द्विधा जाणावी । प्रचीत मानसीं आणावी । विवेकेंसहित ॥ ३६ ॥ विवेकें विवेक जाणावा । आत्म्यानें आत्मा ओळखावा । नेत्रें नेत्रचि पाहावा । दर्पणींचा ॥ ३७ ॥ स्थूळें स्थूळ खाजवावें । सूक्ष्में सूक्ष्म समजावें । खुणेनें खुणेसि बाणावें । अंतर्यामीं ॥ ३८ ॥ विचारें जाणावा विचार । अंतरें जाणावें अंतर । अंतरें जाणावें परांतर । होऊनियां ॥ ३९ ॥ स्मरणामाजी विस्मरण । हेंचि भेदाचें लक्षण । एकदेशी परिपूर्ण । होत नाहीं ॥ ४० ॥ पुढें शिके मागें विसरे । पुढें उजेड मागें अंधारें । पुढें स्मरे मागें विस्मरे । सकळ कांहीं ॥ ४१ ॥ तुर्या[3] जाणावी स्मरण । सुषुप्ति[4] जाणावी विस्मरण । उभयतां शरीरीं जाण । वर्तती आतां ॥ ४२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके अधोर्ध्वनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. सूक्ष्म जीव.

श्रीगणेशाय नमः ॥ रेणूहून सूक्ष्म किडे । त्यांचें आयुष्य निपट थोडें । युक्ति बुद्धि तेणेंचि पाडें । तयांमध्यें ॥ १ ॥ ऐसे नाना जीव असती । पाहों जातां न दिसती । अंतःकरणपंचकाची स्थिती । तेथेंहि आहे ॥ २ ॥ त्यापुरतें त्यांचें ज्ञान । विषय इंद्रियें समान । सूक्ष्म शरीरें विवरोन । पाहतो कोण ॥ ३ ॥ त्यास मुंगी महाथोर । नेणों चालिला कुंजर[5] । मुंगीस सुताचा पूर । ऐसें बोलती ॥ ४ ॥ ते मुंगीसमान शरीरें । उदंड असती लहान थोरें । समस्तांमध्यें जीवेश्वरें[6] । वस्ति कीजे ॥ ५ ॥ ऐशिया किडियांचा संभार । उदंड दाटला विस्तार । अत्यंत साक्षेपी[7] जो नर । तो विवरोन पाहे ॥ ६ ॥ नाना क्षेत्रीं नाना किडे । त्यांस भासती पर्वताएवढे । आयुष्यहि तेणेंचि पाडें[8] । उदंड वाटे ॥ ७ ॥ पक्ष्यायेवढें लहान नाहीं । पक्ष्यायेवढें थोर नाहीं । सर्प आणि मत्स्य पाहीं । येणेंचि पाडें ॥ ८ ॥ मुंगीपासून थोरथोरें । चढती वाढती शरीरें । त्यांचीं निर्धारितां अंतरें । कळों येती ॥ ९ ॥

---

१. आसुरी. २. सद्गुणसंपत्ति. ३. समाधि. ४. झोंप. ५. हत्ती. ६. जीव तोच ईश्वर, त्यानें. ७. प्रयत्नशील. ८. प्रमाणानें.

नाना वर्णे नाना रंग । नाना जीवांचे तरंग । एक सुरंग एक विरंग । किती म्हणोन सांगावें ॥ १० ॥ एक सुकुमारें एक कठोरें । निर्माण केलीं जगदीश्वरें । सुवर्णासारिखीं शरीरें । देदीप्यमानें ॥ ११ ॥ शरीरभेद अहंकारभेद । वाचाभेद देहभेद । अंतरीं वसिजे अभेद । एकरूपें ॥ १२ ॥ एक त्रासकें एक मारकें । पाहों जातां नाना कौतुकें । कितीएक अमोलिकें । सृष्टीमध्यें ॥ १३ ॥ ऐशीं अवघीं विवरोन पाहे । ऐसा प्राणी कोण आहे । आपुल्यापुरतें जाणोन राहे । किंचिन्मात्र ॥ १४ ॥ नवखंड हे वसुंधरा[१] । सप्तसागरांचा फेरा । ब्रह्मांडाबाहेरील नीरा[२] । कोण पाहे ॥ १५ ॥ त्या नीरामध्यें जीव असती । पाहों जातां असंख्याती । त्या विशाळ जीवांची स्थिती । कोण जाणे ॥ १६ ॥ जेथें जीवन तेथें जीव । हा उत्पत्तीचा स्वभाव । पाहतां याचा अभिप्राव । उदंड असे ॥ १७ ॥ भूगर्भी[३] नाना नीरें । त्या नीरामध्यें शरीरें । नाना जिन्नस लहान थोरें । कोण जाणे ॥ १८ ॥ एक प्राणी अंतरिक्ष असती । तिहीं नाहीं देखिली क्षिती[१] । वारिच्यावरी उडोन जाती । पक्ष फुटल्यानंतर ॥ १९ ॥ नाना खेचरें[४] आणि भूचरें[५] । नाना वनचरें आणि जळचरें । चौऱ्यायशीं लक्ष योनिप्रकार । कोण जाणे ॥ २० ॥ उष्ण तेज वेगळें करूनी । जेथें तेथें जीवयोनी । कल्पनेपासून होतो प्राणी । कोण जाणे ॥ २१ ॥ एक नाना सामर्थ्यें केले । एक इच्छेपासून झाले । एक शब्दासारिसे पावले । शापदेह ॥ २२ ॥ एक देह बाजीगरीचे[६] । एक देह वोडंबरीचे[७] । एक देह देवतांचे । नाना प्रकारें ॥ २३ ॥ एक क्रोधापासून झाले । एक तपापासून जन्मले । एक उःशापें पावले । पूर्व देह ॥ २४ ॥ ऐसें भगवंताचें करणें । किती म्हणोन सांगणें । विचित्र मायेच्या गुणें । होत जातें ॥ २५ ॥ नाना अवघड करणी केली । कोणीं देखिली ना ऐकिली । विचित्र कळा समजली । पाहिजे सर्व ॥ २६ ॥ थोडें बहुत समजलें । पोटापुरती विद्या शिकलें । प्राणी उगेंच गर्वे गेलें । मी ज्ञाता म्हणोनी ॥ २७ ॥ ज्ञानी एक अंतरात्मा । सर्वांमध्यें सर्वात्मा । त्याचा कळावया महिमा । बुद्धी कैंची ॥ ॥ २८ ॥ सप्तकंचुक[८] ब्रह्मांड । त्यांत सप्तकंचुक पिंड । त्या पिंडामध्यें उदंड ।

---

१. पृथ्वी. २. पाण्यास. ३. पृथ्वीचे पोटीं. ४. पक्षी. ५. मनुष्यें, पशु वगैरे. ६. जादूचे. ७. राक्षसी मायेचे. ८. सात कंचुक म्हणजे आवरणें ज्यास आहेत तें.

प्राणी असती ॥ २९ ॥ आपुल्या देहांतील न कळे । मा तें अवघें कैंचें कळे । लोक होती उतावळे । अल्प ज्ञानें ॥ ३० ॥ अणुरेणुऐसे जिन्नस । त्यांचे आम्ही विराटपुरुष । आमुचें उदंडचि आयुष्य । त्यांच्या हिशोबें ॥ ३१ ॥ त्यांच्या रीती त्यांचे दंडक । वर्तायाचे असती अनेक । जाणे सर्वहि कौतुक । ऐसा कैंचा ॥ ३२ ॥ धन्य परमेश्वराची करणी । अनुमानेना अंतःकरणीं । उगीच अहंता पापिणी । वोढा लावी ॥ ३३ ॥ अहंता सांडून विवरणें । कित्येक देवाचें करणें । पाहतां मनुष्याचें जिणें । थोडें आहे ॥ ३४ ॥ थोडें जिणें अर्धपुडी काया । गर्व करिताती रडाया । शरीर अवघें पडावया । वेळ नाहीं ॥ ३५ ॥ कुश्चिळ ठायीं जन्मलें । आणि कुश्चिळ रसेंचि वाढलें । यास म्हणती थोरलें । कोण्या हिशोबें ॥ ३६ ॥ कुश्चिळ आणि क्षणभंगुर । अखंड व्यथा चिंतातुर । लोक उगेच म्हणती थोर । वेडेपणें ॥ ३७ ॥ काया माया दो दिवसांची । आदिअंतीं अवघें ची ची । झांकातापा करून उगेची । थोरीव दाविती ॥ ३८ ॥ झांकिलें तरी उपंढरें पडे । दुर्गंधी सुटे जिकडे तिकडे । जो कोणी विवेकीं पवाडे । तोचि धन्य ॥ ३९ ॥ उगेंच कासया तंडावें । मोडा अहंतेचें पुंडावें । विवेकें देवास धुंडावें । हें उत्तमोत्तम ॥ ४० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके सूक्ष्मजीवनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

## ९. पिंडोत्पत्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ चौखाणीचे प्राणी होती । अवघे उदकेंचि वाढती । ऐसे होती आणि जाती । असंख्यात ॥ १ ॥ तत्त्वाचें शरीर झालें । अंतरात्म्यासगट वळलें । त्याचें मूळ जों शोधिलें । तों उदकरूप ॥ २ ॥ शरत्काळींचीं शरीरें । पिळपिळों झिरपती नीरें । उभय रेतें एकत्रें । मिसळती रक्तीं ॥ ३ ॥ अन्नरस देहरस । रक्तरेतें बांधे मूस । रसद्रवें सावकाश । वाढों लागे ॥ ४ ॥ वाढतां वाढतां वाढलें । कोमळाचें कठिण झालें । पुढें उदक पैसावलें । नाना अवयवीं ॥ ५ ॥ संपूर्ण होतां बाहेर पडे । भूमीस पडतां मग तें रडे । अवघ्यांचें अवघें घडे । ऐसें आहे ॥ ६ ॥ कुंडी वाढे कुबुद्धि

१. मग. २. क्षणभंगुर ३. संपत्ति. ४. जन्ममरणकाळीं. ५. उघडें. ६. शरीर.

वाढे । मुळापासूनि अववें घडें । अवघेंच वाढे आणि मोडे । देखतां देखतां ॥ ७ ॥ पुढें अवघें शरीर । दिवसेंदिवस जाहलें थोर । सुचों लागला विचार । कांहीं कांहीं ॥ ८ ॥ फळामध्यें बीज आलें । तेणें न्यायें येथें जाहलें । ऐकतां देखतां उमजलें । सकळ कांहीं ॥ ९ ॥ बीजें उदकें अंकुरती । उदक नसतां उडोन जाती । एके ठायीं उदक माती । होतां बरें ॥ १० ॥ दोहींमध्यें असतां बीज । भिजोन अंकुर सहज । वाढतां वाढतां पुढें रिझें[१] । उदंड जाहे ॥ ११ ॥ जिकडे मुळया धांव घेती । तिकडे अग्रें हेलावती । मुळें अग्रें द्विधा होती । बीजापासूनी ॥ १२ ॥ मुळया चालिल्या पाताळीं । झाडें धांवती अंतराळीं । नाना पत्रीं पुष्पीं फळीं । लगडलीं झाडें ॥ १३ ॥ फळांवडील सुमनें[२] । सुमनां वडील पानें । पानांवडील अनुसंधानें[३] । काष्टें अवघीं ॥ १४ ॥ काष्टांवडील मुळया बारीक । मुळयांवडील तें उदक । उदक आळोनि कौतुक । भूमंडळाचें ॥ १५ ॥ याची ऐशी आहे प्रचीती । तेव्हां सकळां वडील जगती । जगतीवडील मूर्ती । आपोनारायणाची[४] ॥ १६ ॥ तया-वडील अग्निदेव । अग्निवडील वायुदेव । वायुदेवावडील स्वभाव । अंतरात्म्या-चा ॥ १७ ॥ सकळां वडील अंतरात्मा । त्यासि नेणे तो दुरात्मा । दुरात्मा म्हणिजे दूर आत्मा । अंतरला तया ॥ १८ ॥ जवळीं असोन चुकलें । प्रत्ययास नाहींसें केलें । उगेंचि आलें आणि गेलें । देवाचकारितां ॥ १९ ॥ म्हणोन सकळां वडील देव । त्यासि होतां अनन्यभाव । मग हे प्रकृतीचा स्वभाव । पालटों लागे ॥२०॥ करी आपुला व्यासंग । कदापि नव्हे ध्यान-भंग । बोलणें चालणें व्यंग । पडोंच नेदी ॥२१॥ जें वडिलीं निर्माण केलें । तें पाहिजे पाहिलें । काय काय वडिलीं केलें । किती पाहावें ॥ २२ ॥ तो वडील जेथें चेतला । तोचि भाग्यपुरुष झाला । अल्प चेतनेमें तयाला । अल्प भाग्य ॥ २३ ॥ तया नारायणाला मनीं । अखंड आठवावें ध्यानीं । मग ते लक्ष्मी तयापासुनी । जाईल कोठें ॥ २४ ॥ नारायण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी । या कारणें तोषवावी । कोणी[५] तरी कायां ॥२५॥ उपासना शोधून पाहिली । तों ते विश्वपाळिती झाली । न कळे लीला परीक्षिली । न वचे कोणा ॥ २६ ॥ देवाची लीला देवेंविण । आणिक दुसरा

---

१. मौज. २. फुलें. ३. संबंधानें, नात्यानें. ४. जलदेवतेची. ५. कोणीही जीव.

पाहे कोण । पाहणें तितुकें आपण । देवचि असे ॥ २७ ॥ उपासना सकळां ठायीं । अंतरात्मा कोठें नाहीं । या कारणें ठायीं ठायीं । रामें आटोपिलें ॥२८॥ ऐशी माझी उपासना । आणितां न ये अनुमाना । नेऊनि घाली निरंजना-। पैलीकडे ॥ २९ ॥ देवाकारितां कर्में चालतीं । देवाकारितां उपासक होती । देवाकारितां ज्ञानी असती । कितीएक ॥ ३० ॥ नाना शास्त्रें नाना मतें । देवचि बोलिला समस्तें । नेमकानेमक व्यस्ताव्यस्तें । कर्मानुसार ॥ ३१ ॥ देवास अवघें लागे करावें । त्यांत घेऊं ये तितकें घ्यावें । अधिकारासारखें बोलावें । म्हणिजे बरें ॥ ३२ ॥ आवाहन[1] विसर्जनें । ऐसेंचि बोलिलें वि-धानें[2] । पूर्वपक्ष[3] झाला येथून । सिद्धांत पुढें ॥ ३३ ॥ वेदांत सिद्धांत धों-दांत[4] । प्रचीत प्रमाण नेमस्त । पंचीकरण सोडून हित । वाक्यार्थ पाहावा ॥ ३४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके पिंडोत्पत्तिनिरूपणं नाम नवम समासः ॥ ९ ॥

---

## १०. सिद्धांत.

श्रीगणेशाय नमः ॥ गगनीं अवघेंचि होत जातें । गगनाऐसें तगेना तें । निश्चळीं चंचळ तें । येणेंचि न्यायें ॥ १ ॥ आंधार दाटला बळें । वाटे गगन झालें काळें । रविकिरणें तें पिंवळें । सर्वेचि वाटे ॥ २ ॥ उदंड हिंव जेव्हां पडिलें । गमे गगन थंड झालें । उष्णझळेनें वाळलें । ऐसें वाटे ॥ ३ ॥ ऐसें जें कांहीं वाटलें । तें तें झालें आणि गेलें । आकाशासारखें तगलें । हें तों घ-डेना ॥ ४ ॥ उत्तम जाविणेचा जिन्नस । समजोन पाहे सावकाश । निरा-भास तें आकाश । भास मिथ्या ॥ ५ ॥ उदक पसरे वायु पसरे । अंतरात्मा अत्यंतचि पसरे । तत्वें तत्व अवघेंचि पसरे । अंतर्यामीं ॥ ६ ॥ चळतें आणि चळेना तें । अंतरीं अवघेंच कळतें । विवरणेंचि निवळतें । प्राणि-मात्रांसी ॥ ७ ॥ विवरतां विवरतां शेवटीं । निवृत्तिपदीं अखंड भेटी । ज्ञा-लियानें तुटी । होणार नाहीं ॥ ८ ॥ जेथें ज्ञानाचें होतें विज्ञान । आणि मनाचें होतें उन्मन । तत्वनिरसन अनन्य । विवेकें होतें ॥ ९ ॥ वडिलास शोधून पाहिलें । तों चंचळाचें निश्चळ झालें । देवभक्तपण गेलें । तये ठायीं

---

१. मायेची उभारणी-संहारणी. २. रीत. ३. शंकावचन. ४. स्वानुभव.

॥ १० ॥ ठाव म्हणतां पदार्थ नाहीं । पदार्थमात्र मुळींच नाहीं । जैसें तैसें बोलों कांहीं । कळावया ॥ ११ ॥ अज्ञानशक्ति निरसली । ज्ञानशक्ति माव-ळली । वृत्तिशून्य कैसी झाली । स्थिति पहा ॥ १२ ॥ मुख्य शक्तिपात तो ऐसा । नाहीं चंचळाचा वळसा[1] । निवांतीं निवांत कैसा । निर्विकारी ॥ १३ ॥ चंचळाचा विचार पालटे । तें चंचळचि तेथें आटे । चंचळ निश्चळ घनवटे । हें तों घडेना ॥ १४ ॥ महावाक्याचा विचार । तेथें संन्याशासि अधिकार । दैवी कृपेचा जो नर । तोहि विवरोन पाहे ॥ १५ ॥ संन्यासी म्हणिजे षडंगन्यासी[2] । विचारवंत सर्व संन्यासी । आपुली करणी आपणा-पासीं । निश्चयेंसी ॥ १६ ॥ जगदीश बोलल्यावरी । तेथें कोण अनुमान करी । आतां असो हें विचारी । विचार जाणती ॥ १७ ॥ जे जे विचारी स-मजले । ते ते निःसंग होऊन गेले । देहाभिमानी जे उरले । ते देहाभिमान लक्षिती ॥ १८ ॥ लक्षीं[3] बैसलें अलक्ष[4] । उडोनि गेला पूर्वपक्ष । हेतुरूपें अं-तरसाक्ष । तोहि मावळला ॥ १९ ॥ आकाश आणि पाताळ । दोन्ही नामें अंतराळ । काढितां दृश्याचें पडळ[5] । अखंड झालें ॥ २० ॥ तें तों अखंडाचि आहे । मन उपाधि लक्षून पाहे । उपाधिनिरासें राहे । शब्द कैसा ॥ २१ ॥ शब्दपर[6] कल्पने पैर[7] । मनबुद्धि अगोचर[8] । विचारें पहावा विचार । अंत-र्यामीं ॥ २२ ॥ पहातां पहातां कळों येतें । कळलें तितुकें व्यर्थ जातें । अव-घड कैसें बोलावें तें । कोण्या प्रकारें ॥ २३ ॥ वाच्यार्थ वाच्यांशें शोधिला । अलक्षीं लक्ष्यांश बुडाला । पुढें समजोन बोला । कोणी करी ॥ २४ ॥ शा-श्वतास शोधीत गेला । तेणें ज्ञानी साच झाला । विकार सांडून मिळाला । निर्विकारीं ॥२५॥ दुःस्वप्न उदंड देखिलें । जागें होतां लटिकें झालें । पुनः जरी तें आठवलें । तरी तें मिथ्या ॥ २६ ॥ प्रारब्धयोगें देह असे । असे अथवा नासे । विचार अंतरीं बैसे । चळेना ऐसा ॥ २७ ॥ बीज अग्नीनें भाजलें । त्याचें वाढणेंचि खुंटलें । ज्ञात्यास तैसें झालें । वासनाबीज ॥२८॥ विचारें निश्चळ झाली बुद्धि । बुद्धीपासीं कार्यसिद्धी । पाहतां वडिलांची बुद्धि । निश्चळीं गेली ॥ २९ ॥ निश्चळास ध्यातां निश्चळ । चंचळास ध्यातां

१. वेष्टन. २. षड्विकारांचा त्याग करणारा. ३. चित्तांत. ४. ब्रह्म. ५. पडदा. ६. शब्दातीत. ७. पलीकडे. ८. अगम्य.

चंचळ । भूतांस ध्यातां केवळ । भूत होय ॥ ३० ॥ जो पावला शेवटवरी । तयास हें कांहींच न करी । अंतर्निष्ठा बाजिगिरी । तैसी माया ॥ ३१ ॥ मिथ्या ऐसें कळों आलें । विचारोन सदृढ झालें । अवघें भयचि उडालें । अकस्मात ॥३२॥ उपासनेचें उत्तीर्ण[1] व्हावें । भक्तें भजन वाढवावें । अंतरीं विवेकें उमजावें । सकळ कांहीं ॥ ३३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके सिद्धांतनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी ३३७.

# दशक सोळावा.

## १. वाल्मीकिस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ धन्य धन्य तो वाल्मीक । ऋषीमाजी पुण्यश्लोक । जयाचेनि हा त्रिलोक । पावन जाहला ॥ १ ॥ भविष्य आणि शतकोटी । हें तों नाहीं देखिलें दृष्टी । धांडोळितां सकळ सृष्टी । श्रुत नव्हे ॥२॥ भविष्याचें एक वचन । कदाचित झालें प्रमाण । तरी आश्चर्य मानिती जन । भूमंडळींचे ॥ ३ ॥ नसतां रघुनाथ अवतार । नाहीं पाहिला शास्त्राधार । रामकथेचा विस्तार । विस्तारला जेणें ॥ ४ ॥ ऐसा जयाचा वाग्विलास[2] । ऐकोनि संतोषला महेश । मग विभागिलें त्रैलोक्यास । शतकोटि रायायण ॥ ५ ॥ जयाचें कवित्व शंकरें पाहिलें । इतरां न वचे अनुमानलें । रामउपासकांस झालें । परम समाधान ॥ ६ ॥ ऋषि होते थोर थोर । बहुतीं केला कवित्वविचार । परी वाल्मीकासारिखा कवीश्वर । न भूतो न भविष्यति[3] ॥ ७ ॥ पूर्वी केलीं दुष्ट कर्में । परी पावन झाला रामनामें । नाम जपतां दृढ नेमें । पुण्यें सीमा सांडिली ॥ ८ ॥ उफराटें नाम म्हणतां वाचे । पर्वत फुटले पापाचे । ध्वज उभारले पुण्याचे । ब्रह्मांडावरुते ॥९॥ वाल्मीकें जेथें तप केलें । तें वन पुण्यपावन झालें । शुष्ककाष्ठीं अंकुर फुटले । तपोबळें जयाच्या ॥ १० ॥ पूर्वी होता वाल्हा कोळी । जीवघातुक भूमंडळीं । तोचि वंदिजे सकळीं । विबुधीं आणि ऋषीश्वरीं ॥ ११ ॥ उपरति[4] आणि

१. उतराई. २. भाषाप्रावीण्य. ३. झाला नाहीं व होणारही नाहीं. ४. वैराग्य.

अनुताप । तेथें कैंचें उरेल पाप । देहांततपें[1] पुण्यरूप । दुसरा जन्म जाहला ॥ १२ ॥ अनुतापें आसन घातलें । देहाचें वारुळ जाहलें । तेंचि नाम पुढें पडिलें । वाल्मीक ऐसें ॥ १३ ॥ वारुळास वल्मीक बोलिजे । म्हणोन वाल्मीक नाम साजे । जयाच्या तीव्र तपें झिजे । हृदय तापसांचें ॥ १४ ॥ जो तापसांमाजीं श्रेष्ठ । जो कवीश्वरांमध्यें वरिष्ठ । जयाचें बोलणें स्पष्ट । निश्चयाचें ॥ १५॥ जो निष्ठावंताचें मंडण । रघुनाथभक्तीचें भूषण । ज्याची धारणा असाधारण । साधकांस दृढ करी ॥ १६ ॥ धन्य वाल्मीक ऋषीश्वर । समर्थ जो कवीश्वर । तयासि माझा नमस्कार । साष्टांग भावें ॥१७॥ वाल्मीक ऋषि बोलिला नसता । तरी आम्हांस कैंची रामकथा । म्हणोनिया समर्था । काय म्हणोनि वर्णावें ॥ १८ ॥ रघुनाथकीर्ति प्रगट केली । तेणें तयाची महिमा वाढली । भक्तमंडळी सुखी जाहली । श्रवणमात्रें ॥ १९ ॥ आपुला काळ सार्थक केला । रघुनाथकीर्तीमध्यें बुडाला । भूमंडळीं उद्धारिला । बहुत लोक ॥ २० ॥ रघुनाथभक्त थोर थोर । महिमा जयांचा अपार । त्या समस्तांचा किंकर[2] । रामदास म्हणे ॥ २१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षोडशदशके वाल्मीकिस्तवननिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. सूर्यस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ धन्य धन्य हा सूर्यवंश । सकळ वंशांमध्यें विशेष । मार्तंड[3]-मंडळाचा प्रकाश । फांकला भूमंडळीं ॥ १ ॥ सोमा[4]अंगीं असे लांछन । एकापक्षीं[5] होय क्षीण । रविकिरण फांकतां आपण । कळाहीन होय ॥ २ ॥ या कारणें सूर्यापुढें । दुसरी साम्यता न घडे । ज्याच्या प्रकाशें उजेडे । प्राणिमात्रांसीं ॥३॥ नाना धर्में नाना कर्में । उत्तमें मध्यमें अधमें । सुगमें दुर्गमें नित्यनेमें । सृष्टीमध्यें चालती ॥ ४ ॥ वेदशास्त्रें आणि पुराणें । मंत्र यंत्र नाना साधनें । संध्या स्नान पूजाविधानें । सूर्याविणें बापुडीं ॥५॥ नाना योग नाना मतें । पाहों जातां असंख्यातें । जाती आपुलाल्या पंथें । सूर्य उदय झालिया ॥ ६ ॥ प्रापंचिक अथवा पारमार्थिक । कार्य करणें

---

१. देहपात करणाऱ्या तपानें. २. सेवक. ३. सूर्य. ४. चंद्रावर. ५. कृष्णपक्षीं.

कोणी एक। दिवसेंविण निरर्थक। सार्थक नव्हे ॥ ७ ॥ सूर्याचें अधिष्ठान डोळे। डोळे नसतां सर्व आंधळे। या कारणें कांहींच न चले। सूर्याविण ॥ ८ ॥ म्हणाल अंध कवित्वें करिती। तरी हेही सूर्याचीच गती। थंड झालिया आपुली मती। मग मतिप्रकाश कैंचा ॥ ९ ॥ उष्ण प्रकाश तो सूर्याचा। शीत प्रकाश तो चंद्राचा। उष्णत्व नसतां देहाचा। घात होतो ॥ १० ॥ या कारणें सूर्याविण। सहसा न चले कारण। श्रोते तुम्ही विचक्षण। शोधून पाहा ॥ ११ ॥ हरिहरांच्या अवतारमूर्ती। शिवशक्तीच्या अनंत व्यक्ती। यांपूर्वीं होता गभस्ती[1]। आतांही आहे ॥ १२ ॥ जितुके संसारासी आले। तितुके सूर्याखालीं वर्तले। अंतीं देह त्यागून गेले। प्रभाकरा देखतां ॥ १३ ॥ चंद्र ऐलीकडे झाला। क्षीरसागर मथूनि काढिला। चवदा[2] रत्नांमध्यें आला। बंधु लक्ष्मीचा ॥ १४ ॥ विश्वचक्षु हा भास्कर। ऐसें जाणती लहान थोर। या कारणें दिवाकर[1]। श्रेष्ठाहून श्रेष्ठ ॥ १५ ॥ अपार नभमार्ग क्रमणें। ऐसेंच प्रत्यहीं येणें जाणें। या लोकोपकाराकारणें। आज्ञा समर्थाची ॥ १६ ॥ दिवस नसतां अंधकार। सर्वांसि न कळे सारासार। दिवसेंविण तस्कर। कां दिवाभीत[3] पक्षी ॥ १७ ॥ सूर्यापुढें आणिक दुसरें। कोण आणावें समोरें। तेजोराशि निर्धारें। उपमेरहित ॥ १८ ॥ ऐसा हा सविता सकळांचा। पूर्वज होय रघुनाथाचा। अगाध महिमा मानवी वाचा। काय म्हणोन वर्णावा ॥ १९ ॥ रघुनाथवंश पूर्वापार। एकाहून एक थोर। मज मतिमंदास हा विचार। काय कळे ॥२०॥ रघुनाथाचा समुदाव। तेथें गुंतला अंतर्भाव[4]। म्हणोनि वर्णितां महत्त्व। वाग्दुर्बळ[5] मी ॥ २१ ॥ सकळ दोषांचा परिहार। करितां सूर्यास नमस्कार। स्फूर्ति वाढे निरंतर। सूर्यदर्शन घेतां ॥ २२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षोडशदशके सूर्यस्तवननिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

१. सूर्य. २. लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, सुरा, धन्वंतरी, चंद्र, गाई, ऐरावत, रंभा, सात मुखांचा अश्व, विष, धनु, शंख, आणि अमृत हीं चौदा रत्नें. ३. घुबड. ४. मनोभाव. ५. वाणीनें दुर्बळ.

## ३. पृथ्वीस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ धन्य धन्य हे वसुमती । इचा महिमा वर्णावा किती । प्राणिमात्र तितुके राहती । तिच्या आधारें ॥ १ ॥ अंतरिक्ष राहती जीव । तोहि पृथ्वीचा स्वभाव । देह जड नसतां जीव । कैसे लगती ॥२॥ जाळिती पोळिती कुदळिती । नांगरिती उकरिती खणिती । मळमूत्र तिजवरी करिती । आणि वमनें ॥ ३ ॥ नासकें कुजकें जर्जर । पृथ्वीविण कैंचा थार । देहांतकाळीं शरीर । तिजवरी पडे ॥ ४ ॥ बरें वाईट सकळ कांहीं । पृथ्वीविण थार नाहीं । नाना धातु द्रव्य तेंही । भूमीचे पोटीं ॥ ५ ॥ एकास एक संहारिती । प्राणी भूमीवरी असती । भूमि सांडूनि जाती । कोणीकडे ॥ ६ ॥ गड कोट पुरें पट्टणें । नाना देश कळती अटणें[1] । देव दानव मानवां राहणें । पृथ्वीवरी ॥ ७ ॥ नाना रत्नें हिरे परिस । नाना धातु द्रव्यांस । गुप्त प्रगट करावयास । पृथ्वीविण नाहीं ॥ ८ ॥ मेरु मंदर हिमाचल । नाना अष्ट कुळाचेल[2] । नाना पक्षी मत्स्य व्याळें[3] । भूमंडळीं ॥ ९ ॥ नाना समुद्रापैलीकडे । भोंवतें आवरणोदकाचें कडें । असंभाव्य उठले कडे । भूमंडळाचे ॥ १० ॥ त्यामध्यें गुप्त विवरें । लहान थोरें अपारें । तेथें निबिड अंधकारें । वस्ती कीजे ॥ ११ ॥ आवरणोदक तें अपार । त्याचा कोण जाणे पार । उदंड दाटले जलचर । असंभाव्य मोठे ॥ १२ ॥ त्या जीवनास आधार पवन । निबिड दाट आणि घन । फुटों शकेना जीवन । कोणीकडे ॥ १३ ॥ त्या प्रभंजनास[4] आधार । कठिणपणें अहंकार । ऐसा हा भूगोलाचा पार । कोण जाणे ॥ १४ ॥ नाना पदार्थांच्या[5] खाणी । धातुरत्नांच्या वाटणी । कल्पतरु चिंतामणी । अमृतकुंडें ॥ १५ ॥ नाना द्वीपें नाना खंडें । वसती उद्वसें उदंडें । तेथें नाना जीवांचीं बंडें । वेगळालीं ॥ १६ ॥ मेरूभोंवते कडे कापले । असंभाव्य कडोशे पडिले । निबिड तरु लागले । नानाजिनसी ॥ १७ ॥ त्यासन्निध लोकालोक[6] । जेथें सूर्याचें फिरे चाक[7] । चंद्राद्रि द्रोणाद्रि मैनाक । महागिरी ॥ १८ ॥ नाना देशीं पाषाण-

---

१. फिरण्यानें. २. कुलाचल सात प्रसिद्ध आहेतः—महेंद्रो मलयः सह्यः शक्तिमान् मधमादनः ॥ विंध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ॥ ३. सर्प. ४. वायूस. ५. ओसाड. ६. एक पर्वत. ७. रथ परत फिरतो.

भेद । नाना जिनसी मृत्तिकाभेद । नाना विभूती छंदभेद । नाना खाणी ॥ १९ ॥ बहुरत्ना वसुंधरा । ऐसा पदार्थ कैंचा दुसरा । अफाट पडली सैरावैरा । जिकडे तिकडे ॥ २० ॥ अवघी पृथ्वी फिरोन पाहे । ऐसा प्राणी कोण आहे । दुजी तुळणा न साहे । धरणीविषयीं ॥ २१ ॥ नाना वल्ली नाना पिकें । देशोदेशीं अनेकें । पाहों जातां सारिख्यास सारिखें । एकहि नाहीं ॥ २२ ॥ स्वर्ग मृत्यु पाताळें । अपूर्व रचिलीं तिन्ही ताळें[1] । पाताळलोकीं महाव्याळें[2] । वस्ती कीजे ॥ २३ ॥ नाना वल्ली बीजांची खाणी । ते हे विशाळ धरणी । अभिनव कर्त्याची करणी । होऊनि गेली ॥ २४ ॥ गड कोट नाना नगरें । पुरें पट्टणें मनोहरें । सकळां ठायीं जगदीश्वरें । वस्ती कीजे ॥ २५ ॥ महा बळी होऊनि गेले । पृथ्वीवरी चौताळले । सामर्थ्यें राहिले । हें तो घडेना ॥ २६ ॥ असंभाव्य हे जगती । जीव किती येती जाती । नाना अवतारपंगती । भूमंडळावरी ॥ २७ ॥ सध्या रोकडें प्रमाण । कांहीं करावें नलगे अनुमान । नानाप्रकारें जीवन । पृथ्वीचेनि आधारें ॥ २८ ॥ कित्येक भूमि माझी म्हणती । शेवटीं आपणचि मरोनि जाती । कित्येक काळ होतां जगती । जैसी तैसी ॥ २९ ॥ ऐसा पृथ्वीचा महिमा । दुसरी काय द्यावी उपमा । ब्रह्मादिकांपासोनी आम्हां । आश्रयचि ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षोडशदशके पृथ्वीस्तवननिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. आपस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ आतां सकळांचें जन्मस्थान । सकळ जीवांचें जीवन । जयास आपोनारायण । ऐसें बोलिजे ॥ १ ॥ पृथ्वीस आधार आवरणोदक । सप्तसिंधूचें शुद्धोदक । नाना मेघांचें मेघोदक । भूमंडळीं चालिलें ॥ २ ॥ नाना नद्या नाना देशीं । वाहत मिळाल्या सागरासी । लहान थोर पुण्यराशी । अगाध महिमे ॥ ३ ॥ नद्या पर्वताहून कोसळल्या । नाना सांकडींमध्यें रिचवल्या[3] । धबधबां खळखळां चालिल्या । असंभाव्य ॥ ४ ॥ कूप[4] वापी[5] सरोवरें । उदंड तळीं थोरथोरें । निर्मळें उचंबळती नीरें । नाना

१. स्थळें. २. महाभुजंगानें. ३. शिरल्या. ४. आड. ५. विहिरी.

देशीं ॥ ५ ॥ गायमुखें पाट जाती । नाना कालवे वाहती । नाना झरे झिरपती । झरती नीरें ॥ ६ ॥ डुरे[1] विहरे पाझर । पर्वत फुटोन वाहे नीर । ऐसे उदकाचे प्रकार । भूमंडळीं ॥ ७ ॥ जितुके गिरी तितुक्या धारा । कोसळती भयंकरा । पाभळें[2] वोहळ अपारा । उकळ्या सांडिती ॥ ८ ॥ भूमंडळींचें जळ आघवें । किती म्हणोनि सांगावें । नाना कारंजीं आणावें । बांधोनि पाणी ॥ ९ ॥ डोहो डबकें खबोंडीं[3] टांकीं । नाना गिरीकंदरीं अनेकीं । नाना जळें नाना लोकीं । वेगळालीं ॥ १० ॥ तीर्थें एकाहून एक । महापवित्र पुण्यदायक । अगाध महिमा शास्त्रकारक । बोलोन गेले ॥ ११ ॥ नाना तीर्थांचीं पुण्योदकें । नाना स्थळोस्थळीं शीतळोदकें । तैशींच नाना उष्णोदकें । ठायीं ठायीं ॥ १२ ॥ नाना वल्लीमध्यें जीवन । नाना फळीं फुलीं जीवन । नाना कंदीं जीवन । गुणकारक ॥ १३ ॥ क्षारोदकें शुद्धोदकें । विषोदकें पीयूषोदकें[4] । नाना स्थळांतरीं उदकें । नाना गुणांचीं ॥ १४ ॥ नाना इक्षु[5]दंडांचे रस । नाना फळांचे नाना रस । नानाप्रकारींचे गोरस[6] । मद पारा गूळ अन्न ॥ १५ ॥ नाना मुक्ताफळांचें पाणी । नाना रत्नीं तळपे पाणी । नाना शस्त्रांमध्यें पाणी । नाना गुणांचें ॥ १६ ॥ शुक्र[7] शोणित[8] लाळ मूत्र स्वेद । नाना उदकांचे नाना भेद । विवरोन पाहतां विशद । होत जातें ॥ १७ ॥ उदकाचे देह केवळ । उदकाचेंच भूमंडळ । चंद्रमंडळ सूर्यमंडळ । उदकाकरितां ॥ १८ ॥ क्षारसिंधु[9] क्षीरसिंधु । सुरासिंधु आज्यसिंधु । दधिसिंधु इक्षुरससिंधु । शुद्ध सिंधु उदकाचा ॥ १९॥ ऐसें उदक विस्तारलें । मुळापासूनि शेवटास आलें । मध्येंहि ठायीं ठायीं उमटलें । ठायीं ठायीं गुप्त ॥ २० ॥ जे जे बीजीं मिश्रित झालें । तो तो स्वाद[10] घेऊनि उठिलें । उंसामध्यें गोडीस आलें । परम सुंदर ॥ २१ ॥ उदकाचा बांधा हें शरीर । उदकचि पाहिजे तदनंतर[11] । उदकाचा उत्पत्ति विस्तार । किती म्हणोनि सांगावा ॥ २२ ॥ उदक तारक उदक मारक । उदक नाना सुखदायक । उदकाचा विवेक । अलौकिक आहे ॥ २३ ॥ भूमंडळीं धांवे नीर । नाना ध्वनि

१. कुवे. २. झरा. ३. लहान पाणटाकें. ४. अमृतोदकें. ५. उंसाचे. ६. दूध वगैरे. ७. रेत. ८. रक्त. ९. क्रमानें मिठाचा, दुधाचा, मद्याचा, तुपाचा, दह्याचा, उंसाच्या रसाचा व पाण्याचा असे हे सप्तसागर. १०. रुचि. ११. शरीर बनल्यावर.

त्या सुंदर । धबाबां धबाबां थोर । रिचवती धारा ॥२४॥ ठायीं ठायीं डोह तुंबती । विशाळ तळीं डबाबिती । चबाबिती थबाबिती । कालवे पाट ॥२५॥ एकी पालथ्या[1] गंगा वाहती । उदकें सन्निधाचि असती । खळाळां झरे वाहती । भूमीचे पोटीं ॥ २६ ॥ भूमिगर्भीं डोह भरले । कोणी देखिले ना ऐकिले । ठायीं ठायीं झरे झाले । विद्युल्लतांचे[2] ॥ २७ ॥ पृथ्वीतळीं पाणी भरलें । पृथ्वीमध्यें पाणी खेळे । पृथ्वीवरी प्रगटलें । उदंड पाणी ॥२८॥ स्वर्ग मृत्यु पाताळीं । एक नदी तिहीं ताळीं[3] । मेघोदक अंतराळीं । पृथ्वीवरी वृष्टि करी ॥ २९ ॥ पृथ्वीचें मूळ जीवन । जीवनाचें मूळ दहन[4] । दहनाचें मूळ पवन । थोराहून थोर ॥ ३० ॥ त्याहून थोर परमेश्वर । महद्भूतांचा विचार । त्याहून थोर परात्पर । परब्रह्म जाणावें ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षोडशदशके आपस्तवननिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. अग्निस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ धन्य धन्य हा वैश्वानर[4] । होय रघुनाथाचा श्वशुर । विश्वव्यापक विश्वंभर । पिता जानकीचा ॥ १ ॥ ज्याच्या मुखें भगवंत भोक्ता । जो ऋषींचा फळदाता । तमं[5] हिमं[6] रोगहर्ता । भर्ता विश्वजनांचा ॥ २ ॥ नाना वर्ण नाना भेद । जीवमात्रांस अभेद । अभेद आणि परम शुद्ध । ब्रह्मादिकांसी ॥३॥ अग्नीकरितां सृष्टि चाले । अग्नीकरितां लोक धाले । अग्नीकरितां सकळ झाले । लहान थोर ॥ ४ ॥ अग्नीनें आळलें भूमंडळ । लोकांस राहाया झालें स्थळ । दीप दीपिका नाना ज्वाळ । जेथें तेथें ॥५॥ पोटामध्यें जठराग्नी । तेणें क्षुधा लागे जनीं । अग्नीकरितां भोजनीं । रुचि येते ॥ ६ ॥ अग्नि सर्वांगीं व्यापक । उष्मे राहे कोणी एक । उष्ण नसतां सकळ लोक । मरोन जाती ॥ ७ ॥ आधीं अग्नि मंद होतो । पुढें प्राणी तो नासतो । ऐसा हा अनुभव येतो । प्राणिमात्रांसी ॥ ८ ॥ असतां अग्नीचें बळ । शत्रु जिंके तात्काळ । अग्नि आहे तावत्काळ । जिणें आहे ॥ ९ ॥ नाना रस निर्माण झाले । अग्नीकरितां निपजले । महारोगी आरोग्य झाले । निमिषमात्रें ॥ १० ॥ सूर्य सकळांहून विशेष । सूर्या उपरि अग्निप्रकाश ।

---

१. भूमीखालून. २. विजा पडून. ३. स्थळीं. ४. अग्नि. ५. अंधकार. ६. थंडी.

रात्रिभागीं लोक अग्नीस । साह्य करिती ॥ ११ ॥ अंत्यज-गृहींचा अग्नि आणिला । त्यास दोष नाहीं बोलिला । सकळां गृहीं पवित्र झाला । वैश्वानरू ॥ १२ ॥ अग्निहोत्र नाना याग । अग्नीकरितां होती सांग । अग्नि तृप्त होतां मग । प्रसन्न होय ॥ १३ ॥ देव दानव मानव । अग्नीकरितां झाले सर्व । सकळ जनांस उपाव । अग्नि आहे ॥ १४ ॥ लग्नें करिती थोर थोर । नाना दारूंचा प्रकार । भूमंडळीं यात्रा थोर । दारूनें शोभती ॥१५॥ नाना लोक रोगी होती । उष्ण औषधें सेविती । तेणें लोक आरोग्य होती । वन्हीकरितां ॥ १६ ॥ ब्राह्मणास तन मन । सूर्यदेव हुताशन । एतद्विषयीं अनुमान । कांहींच नाहीं ॥ १७ ॥ लोकांमध्यें जठरानळ । सागरीं आहे वडवानळ । भूगोलाबाहेर आवरणानळ । शिवनेत्रीं विद्युल्लता ॥ १८॥ कुपीपासूनि अग्नि होतो । उंच दर्पणीं अग्नि निघतो । काष्ठमंथनीं प्रगटतो । चकमकेनें ॥ १९ ॥ अग्नि सकळां ठायीं आहे । कठिण घसणीं प्रगट होये । आग्यासर्पें दग्ध होये । गिरिकंदरें ॥२०॥ अग्नीकरितां नाना उपाय । अग्नीकरितां नाना अपाय । विवेकेंविण सकळ होय । निरर्थक ॥२१॥ भूमंडळीं लहान थोर । सकळांस वन्हीचा आधार । अग्निमुखें परमेश्वर । संतुष्ट होय ॥२२॥ ऐसा अग्नीचा महिमा । बोलिजे तितुकी उणी उपमा । उत्तरोत्तर अगाध महिमा । अग्निपुरुषाचा ॥ २३ ॥ जीत असतां सुखी करी । मेल्या प्रेत भस्म करी । सर्वभक्षक त्याची थोरी । काय म्हणोन सांगावी ॥२४॥ सकळ सृष्टीचा संहार । प्रळय करी वैश्वानर । वैश्वानरें पदार्थमात्र । कांहींच उरेना ॥ २५॥ नाना होम उदंड करिती । घरोघरीं वैश्वदेव चालती । नाना क्षेत्रीं दीप जळती । देवापाशीं ॥२६॥ दीपाराधनें नीरांजनें । देव वोवाळिजे जनें । खरें खोटें निवडणें । दिव्य होतां ॥ २७ ॥ अष्टधा प्रकृति लोक तिन्ही । सकळ व्यापूनि राहिला वन्ही । अगाध महिमा वदनीं । किती म्हणोनि बोलावा ॥ २८ ॥ चारी शृंगें त्रिपदीं जात । दोन शिरें सप्त हात । ऐसा बोलिला शास्त्रार्थ । प्रचीतीविणें ॥ २९ ॥ ऐसा वन्हि उष्णमूर्ती । तो मी बोलिलों यथामती । न्यून पूर्ण क्षमा श्रोतीं । केली पाहिजे ॥ ३० ॥ इति

१. महार-मांग. २. अग्नि. ३. सूर्यकांत मण्यामध्यें. ४. घर्षणानें. ५. विस्तव हातीं घेऊन प्रमाण करणें. ६. तीन पायांनीं चालतो. ७. प्रचीतीविण कीं काय ?

श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षोडशदशके अग्निस्तवननिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. वायुस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ धन्य धन्य हा वायुदेव । याचा विचित्र स्वभाव । वायूकारितां सकळ जीव । वर्तती जनीं ॥ १ ॥ वायूकरितां श्वासोच्छ्वास । नाना विद्यांचा अभ्यास । वायूकरितां शरीरास । चळण घडे ॥ २ ॥ चळण वळण प्रसारण । निरोधन आणि आकुंचन । प्राणं[1] अपानं[1] व्यानं[1] उदान[1] । समानं[1] वायू ॥ ३ ॥ नागं[2] कूर्मं[2] कृकलं[2] वायू । देवदत्तं[2] धनंजयू । ऐसे हे वायूचे स्वभावू । उदंड असती ॥ ४ ॥ वायु ब्रह्मांडीं प्रगटला । ब्रह्मांडदेवतांस पुरवला । तेथून पिंडीं प्रगटला । नाना गुणें ॥ ५ ॥ स्वर्गलोकीं सबळ देव । तैसेच पुरुषार्थी दानव । मृत्युलोकींचे मानव । विख्यात राजे ॥ ६ ॥ नरदेहीं नाना भेदें । अनंत भेदांचीं श्वापदें । वनचरें जळचरें आनंदें । क्रीडा करिती ॥ ७ ॥ त्या समस्तांमध्यें वायु खेळे । खेचरकुळें[3] अवघें चळे । उठती वन्हीचे उमाळे । वायूकारितां ॥ ८ ॥ वायु मेघांचें भरण भरी । सर्वेंचि पिटून परते सारी । वायुऐसा कारभारी । दुसरा नाहीं ॥ ९ ॥ परी ते आत्मयाची सत्ता । वर्ते शरीरीं तत्वतां । परी व्यापकपणें या समर्था । तुलना नाहीं ॥ १० ॥ गिरीहून दाट फौजा । मेघ उठिले स्वामिकाजा । गर्जगर्जोनि तडकती विजा । वायुबळें ॥ ११ ॥ चंद्र सूर्य नक्षत्रमाळा । ग्रहमंडळें मेघमाळा । ये ब्रह्मांडीं नाना कळा । वायूकरितां ॥ १२ ॥ एकवटलें तें निवडेना । कालवलें तें वेगळें होईना । तैसें हें बेचाड नाना । केवीं कळे ॥ १३ ॥ वायु सुटे सरारा । असंभाव्य पडती गारा । तैसे जीव हे नीरासरिसे पडती ॥ १४ ॥ वायुरूपें कमळकळा[4] । तोचि आधार जळा । तया जळाच्या आधारें भूगोळा । शेषें धरिलें ॥ १५ ॥ शेषास पवनांचा[5] आहार । आहारें फुगे शरीर । तरी मग घेतला भार । भूमंडळाचा ॥ १६ ॥ महाकूर्माचें[6] शरीर भलें । ब्रह्मांड पालथें घातलें । एवढें शरीर तें राहिलें । वायू-

---

१. हे पांच प्राण वायु. २. हे पांच उपप्राण. ३. सर्व पक्षी. ४. हा वायुरूप कमळाचा कळा आहे. ५. वायूचा. ६. कूर्मावतार ( कासव ).

चेनि ॥ १७ ॥ वराहें आपुले दंतीं । पृथ्वी धरिली होती । तयाची एवढी शक्ती । वायुबळें ॥ १८ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर । चवथा आपण जगदीश्वर । वायुस्वरूपविचार । विवेकी जाणती ॥ १९ ॥ तेहतीस कोटी सुरवर । अठ्यायशीं सहस्र ऋषीश्वर । सिद्धयोगी भारेंभार । वायूकरितां ॥ २० ॥ नवकोटी कात्यायनी । छपन्नकोटि चामुंडिणी । औट कोटि भूतखाणी । वायुरूपें ॥ २१॥ भूतें दैवतें नाना शक्ती । वायुरूपें त्यांच्या व्यक्ती । नाना जीव नेणों किती । भूमंडळीं ॥ २२ ॥ पिंडीं ब्रह्मांडीं पुरवला । बाहेर कंचुकास[1] गेला । सकळां ठायीं पुरवला । समर्थ वायु ॥ २३ ॥ ऐसा हा समर्थ पवन । हनुमंत जयाचा नंदन । रघुनाथस्मरणीं तन मन । हनुमंताचें ॥२४॥ हनुमंत वायूचा प्रसिद्ध । पित्यापुत्रास नाहीं भेद । म्हणोनि दोघेहि अभेद । पुरुषार्थविषयीं ॥ २५ ॥ हनुमंतास बोलिजे प्राणनाथ । येणें गुणें हा समर्थ । प्राणेंविण सकळ व्यर्थ । होत जातें ॥ २६ ॥ मागें मृत्यु आला हनुमंता । तेव्हां वायु रोधला होता । सकळ देवांस अवचिता । प्राणांत मांडलें ॥२७॥ देव सकळ मिळोन । केलें वायूचें स्तवन । वायु प्रसन्न होऊन । मोकळे केले ॥ २८ ॥ म्हणोनि प्रतापी थोर । हनुमंत ईश्वरी अवतार । याचा पुरुषार्थ सुरवर । पाहतचि राहिले ॥ २९ ॥ देव कारागृहीं होते । हनुमंतें देखिलें अवचितें । संहार करून लंकेभोंवतें । विटंबूनि पाडिलें ॥ ३० ॥ उसणें घेतलें देवांचें । मूळ शोधिलें राक्षसांचें । मोठें कौतुक पुच्छकेतूचें[2] । आश्चर्य वाटे ॥ ३१ ॥ रावण होता सिंहासनावरी । तेथें जाऊन ठोंसरे मारी । लंकेमध्यें निरोध करी । उदक कैंचें ॥३२॥ देवांस आधार वाटला । मोठा पुरुषार्थ देखिला । मनामध्यें रघुनाथाला । करुणा करिती ॥ ३३ ॥ दैत्य अवघे संहारिले । देव तात्काळ सोडिले । प्राणिमात्र सुखी जाहले । त्रैलोक्यवासी ॥ ३४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षोडशदशके वायुस्तवननिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. महद्भूतस्तवन.

श्रीगणेशाय नमः ॥ पृथ्वीचें मूळ जीवन । जीवनाचें मूळ अग्न । अ-

---

१. आवरण करण्यास. २. पुच्छ हाच ध्वज ज्याचा अशा हनुमंताचें.

ह्मीचें मूळ पवन । मागां निरूपिलें ॥ १ ॥ आतां ऐका पवनाचें मूळ । तो हा अंतरात्माचि केवळ । अत्यंतचि चंचळ । सकळांमध्यें ॥ २ ॥ तो येतो जातो दिसेना । स्थिर होऊन बैसेना । ज्याचें रूप अनुमानेना । वेदस्मृतींसी ॥ ३ ॥ मुळीं मुळींचें स्फुरण । तेंचि अंतरात्म्याचें लक्षण । जगदीश्वरापासूनि त्रिगुण । पुढें जाहले ॥ ४ ॥ त्रिगुणापासूनि झालीं भूतें । पावलीं स्पष्टदशेतें । त्यां भूतांचें रूप तें । विवेकें ओळखावें ॥ ५ ॥ त्यांमध्यें मुख्य आकाश । चौं भूतांमध्यें विशेष । त्याच्या प्रकाशें प्रकाश । सकळ कांहीं ॥ ६ ॥ एक विष्णु महद्भूत । ऐसा भूतांचा संकेत । परंतु याची प्रचीत । पाहिली पाहिजे ॥ ७ ॥ विस्तारें बोलिलीं भूतें । त्या भूतांमध्यें व्यापक तें । विवरोन पाहतां येतें । प्रत्ययासी ॥ ८ ॥ आत्मयाच्या चपळपणापुढें । वायु तो किती बापुडें । आत्म्याचें चपळपण रोकडें । समजोन पाहावें ॥ ९ ॥ आत्म्यावेगळें कर्म चालेना । आत्मा दिसेना आढळेना । गुप्तरूपें विचार नाना । पाहोन सोडी ॥ १० ॥ पिंडब्रह्मांड व्यापून भरलें । नाना शरीरीं विकासलें । विवेकी जनास भासलें । जगदंतरीं ॥ ११ ॥ आत्म्याविण देह चालती । हें तों न घडे कल्पांतीं । अष्टधा प्रकृतीच्या व्यक्ती[1] । रूपासि आल्या ॥ १२ ॥ मुळापासूनि शेवटवरी । सकळ कांहीं आत्माच करी । आत्म्यापैलीकडे निर्विकारी । परब्रह्म तें ॥ १३ ॥ आत्मा शरीरीं वर्ततो । इंद्रियग्रामें[2] चेष्टवितो । नाना सुखदुःखें भोगितो । देहात्मयोगें ॥ १४ ॥ सप्तकंचुक[3] हें ब्रह्मांड । त्यामध्यें सप्तकंचुक[3] पिंड । त्या पिंडामध्यें आत्मा जड । विवेकें वोळखावा ॥ १५ ॥ शब्द ऐकोन समजतो । समजोन प्रत्युत्तरें देतो । कठिण मृदु शीतोष्ण जाणतो । त्वचेमध्यें ॥ १६ ॥ नेत्रीं भरोन पदार्थ पाहणें । नाना पदार्थ परीक्षणें । उंच नीच समजणें । मनामध्यें ॥ १७ ॥ क्रूरदृष्टी सौम्यदृष्टी । कपटदृष्टी कृपादृष्टी । नाना प्रकारच्या गोष्टी । भेद जाणे ॥ १८ ॥ जिव्हेमध्यें नाना स्वाद[4] । निवडून जाणे भेदाभेद । जें जें जाणे तें तें विशद । करूनि बोले ॥ १९ ॥ उत्तम अन्नाचे परिमळ । नाना सुगंध परिमळ । नाना फळांचे परिमळ । घ्राणेंद्रियें जाणे ॥ २० ॥ जिव्हेनें स्वाद घेणें बोलणें । पाणींद्रियें[5] घेणें देणें । पादेंद्रियें

---

१. आकृति. २. इंद्रियसमूह. ३. सात आवरणांचें. ४. रुचि. ५. हातानें.

येणें जाणें । सर्वकाळ ॥ २१ ॥ शिश्नेंद्रियें सुरतभोग । गुदेंद्रियें मलोत्सर्ग । मनेंकरूनि सकळ सांग । कल्पूनि पाहे ॥ २२ ॥ ऐसे व्यापार परोपरी । त्रिभुवनीं एकलाचि करी । त्याची वर्णावया थोरी । दुसरा नाहीं ॥ २३ ॥ त्याविण दुसरा कैंचा । जे महिमा सांगावा तयाचा । व्याप आटोप आत्मयाचा । न[1] भूतो न भविष्यति[2] ॥ २४ ॥ चौदाहि विद्या चौसष्ट कळा । धूर्तपणाच्या नाना कळा । वेदशास्त्रपुराण जिव्हाळा । तेणेंविण कैंचा ॥ २५ ॥ इहलोकींचा आचार । परलोकीं सारासारविचार । उभय लोकींचा निर्धार । आत्माच करी ॥ २६ ॥ नाना मतें नाना भेद । नाना संवाद वेदवाद । नाना निश्चय भेदाभेद । आत्माच करी ॥ २७ ॥ मुख्य तत्व विस्तारलें । तेणें तयास रूप आणिलें । येणेंकारितां सार्थक झालें । सकळ कांहीं ॥ २८ ॥ लिहिणें वाचणें पाठांतर करणें । पुसणें सांगणें अर्थ करणें । गाणें वाजवणें नाचणें । आत्म्याचकारितां ॥ २९ ॥ नाना सुखें आनंदतो । नाना दुःखें कष्टी होतो । देह धरितो आणि सोडितो । नाना प्रकारें ॥ ३० ॥ एकलाच नाना देह धरी । एकलाच नटे परोपरी । नटनाट्य कळाकुसरी । त्याविण नाहीं ॥ ३१ ॥ एकलाचि झाला बहुरूपी । बहुरूपी बहु साक्षेपी[3] । बहुरूपें बहु प्रतापी । आणि लंडी[4] ॥ ३२ ॥ एकलाच विस्तारला कैसा । पाहे बहुविध तमासा । दंपत्याविण कैसा । विस्तारला ॥ ३३ ॥ स्त्रियांस पाहिजे पुरुष । पुरुषांस पाहिजे स्त्रीविष । ऐसा आवडीचा संतोष । परस्परें ॥ ३४ ॥ स्थूलाचें[5] मूळ तें लिंग[6] । लिंगामध्यें हे प्रसंग । येणेप्रकारें जग । प्रत्यक्ष चाले ॥ ३५ ॥ पुरुषांचा जीव स्त्रियांचे जीवीं । ऐशी होते उठाठेवी । परी या सूक्ष्माची गोवी । समजली पाहिजे ॥ ३६ ॥ स्थूळाकारितां वाटे भेद । सूक्ष्मीं अवघेंच अभेद । ऐसें बोलणें प्रसिद्ध । प्रत्यया आलें ॥ ३७ ॥ बायकोनें बायकोस भोगिलें । ऐसें नाहीं कीं घडलें । बायकोस अंतरीं लागलें । ध्यान पुरुषाचें ॥ ३८ ॥ स्त्रीस पुरुष पुरुषास वधू । ऐसा आहे हा संबंधू । या कारणें सूक्ष्म संवादू । सूक्ष्मींच आहे ॥ ३९ ॥ पुरुषइच्छेमध्यें प्रकृती । प्रकृतीमध्यें पुरुषव्यक्ती । प्रकृतिपुरुष बोलती । येणें न्यायें ॥ ४० ॥ पिंडावरून ब्रह्मांड पाहावें । प्रचीतीनें प्रचीतीस घ्यावें । उमजेना तरी उमजावें ।

---

१. अलौकिक. २. खटपटो. ३. भितरा. ४. शरीराचें. ५. मन.

विवरविवरोनी ॥ ४१ ॥ द्वैतइच्छा होते मुळीं । तरी ते आली भूमंडळीं । भूमंडळीं आणि मुळीं । रुजु पाहावें ॥ ४२ ॥ येथें मोठा झाला साक्षेप । फिटला श्रोतयांचा आक्षेप । जे प्रकृतिपुरुषांचें रूप । निवडोन गेलें ॥४३॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षोडशदशके महद्भूतस्तवननिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. अंतरात्मा.

श्रीगणेशाय नमः ॥ नमूं गणपती मंगलमूर्ती । जयाचेनि मतिस्फूर्ती । लोक भजती स्तवन करिती । आत्मयाचें ॥ १ ॥ नमूं वैखरी वागीश्वरी[1] । अभ्यंतरीं प्रकाश करी । नाना भरोवरीं[2] विवरी । नाना विद्या ॥ २ ॥ सकळ नामामध्यें नाम । रामनाम उत्तमोत्तम । श्रम जाऊन विश्राम । चंद्रमौळी[3] पावला ॥ ३ ॥ नामाचा महिमा थोर । रूप कैसें उत्तरोत्तर । परात्पर परमेश्वर । त्रैलोक्यधर्ता ॥ ४ ॥ आत्माराम चहूंकडे । लोक वावडे जिकडे तिकडे । देह पडे मृत्यु घडे । आत्म्याविण ॥ ५ ॥ जीवात्मा शिवात्मा परमात्मा । जगदात्मा विश्वात्मा गुप्तात्मा । आत्मा अंतरात्मा सर्वात्मा । देव दानव मानवीं ॥ ६ ॥ सकळ मार्ग बोलती चालती । अवतार पंगतीची गती । आत्म्याकारितां होत जाती । ब्रह्मादिक ॥ ७ ॥ नादरूप ज्योतिरूप । सूक्ष्मरूप सत्तारूप । चैतन्यरूप सुखरूप । द्रष्टारूप जाणिजे ॥ ८ ॥ नरोत्तम वीरोत्तम । पुरुषोत्तम रघूत्तम । सर्वोत्तम उत्तमोत्तम । त्रैलोक्यवासी ॥ ९ ॥ नाना खटपट आणि चटपट । नाना लटपट आणि झटपट । आत्मा नसतां सर्व सपाट । चहूंकडे ॥ १० ॥ आत्म्याविण वेडें कुडें[4] । आत्म्याविण मडें बापुडें । आत्म्याविण थडें रोकडें । शरीराचें ॥ ११ ॥ आत्मज्ञानी समजे मनीं । पाहे जनीं आत्मयालागुनी । भुवनीं आणि त्रिभुवनीं । आत्म्याविण वोस ॥ १२ ॥ परम सुंदर आणि चतुर । जाणे सकळ सारासार । आत्मयाविण अंधकार । उभय लोकीं ॥ १३ ॥ सर्वांगीं सिद्ध सावध । नाना भेद नाना वेध । नाना खेद आणि आनंद । तेणेंचिकारितां ॥ १४ ॥ रंक अथवा ब्रह्मादिक । एकचि चालवी अनेक । पाहावा नित्यानित्यविवेक । को-

---

१. सरस्वती. २. विस्तारानें. ३. शंकर. ४ खोटें.

णी एकें ॥ १५ ॥ ज्याचे घरीं पद्मिनी[1] नारी । आत्मा तंववरी आवडी तरी । आत्मा गेलिया शरीरीं । तेज कैंचें ॥ १६ ॥ आत्मा दिसेना ना भासेना । बाह्यात्कारें अनुमानेना । नाना मनांच्या कल्पना । आत्मयाचेनी ॥ १७ ॥ आत्मा शरीरीं वास्तव्य करी । अवघें ब्रह्मांड विवरी भरी । वासना[2] भावना[3] परोपरी । किती ह्मणोन सांगाव्या ॥ १८ ॥ मनाच्या अनंत वृत्ती । अनंत कल्पना धरिती । अनंत प्राणी सांगों किती । अंतरात्म्याचें ॥१९ ॥ अनंत राजकारणें धरणें । कुबुद्धि सुबुद्धि विवरणें । कळों न देणें चुकावणें । प्राणिमात्रांसी ॥ २० ॥ एकास एक जपती टपती । एकास एक खपती लपती । शत्रुपणाची स्थिती गती । चहूंकडे ॥ २१ ॥ पृथ्वीमध्यें परोपरी । एकास एक सिंतरी[4] । कित्येक भक्त परोपरी । परोपकार करिती ॥ २२ ॥ एक आत्मा अनंत भेद । देहपरत्वें घेतो स्वादें[5] । आत्मा ठायींचा अभेद । भेदहि धरी ॥ २३ ॥ पुरुषास स्त्री पाहिजे । स्त्रीस पुरुष पाहिजे । नवरीस नवरी पाहिजे । हें तों घडेना ॥ २४ ॥ पुरुषांचा जीव स्त्रियांचे जीवीं । ऐशी नाहीं उठाठेवी । विषयसुखाची गोवी । तेथें भेद आहे ॥ २५ ॥ ज्या प्राण्यास जो आहार । तेथेंचि होती तत्पर । पशूचे आहारीं नर । अनादरें वर्तती ॥ २६ ॥ आहारभेद देहभेद । गुप्त प्रगट उदंड भेद । तैसाचि जाणावा आनंद । वेगळाला ॥ २७ ॥ सिंधुगर्भींचीं नीरें । त्या नीरामधील शरीरें । आवरणोदकींचीं जळचरें । अत्यंत मोठीं ॥ २८ ॥ सूक्ष्मदृष्टी आणितां मना । शरीरांचा अंत लागेना । मं[6] तो अंतरात्मा अनुमाना । कैसा येतो ॥ २९ ॥ देहात्मयोग शोधूनि पाहिला । तेणें कांहीं अनुमानला । स्थूळ सूक्ष्मांचा गलबला । गाथागोवी ॥ ३० ॥ गाथागोवी उगवावयाकारणें । केलीं नाना निरूपणें । अंतरात्मा कृपाळूपणें । बहुतां मुखें बोलला ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षोडशदशके अंतरात्मनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

## ९. उपासना.

श्रीगणेशाय नमः ॥ पृथ्वीमध्यें लोक नाना । त्यांस नाना उपासना ।

१. अत्यंत सुंदर. २. इच्छा. ३. कल्पना. ४. फसवितो. ५. रुचि. ६. मग.

भावार्थें प्रवर्तले भजना । ठायीं ठायीं ॥ १ ॥ आपुलाल्या देवास भजती । नाना स्तुति स्तवनें करिती । जे ते निर्गुण म्हणती । उपासनेसी ॥२॥ याचा कैसा आहे भाव । मज सांगिजे अभिप्राव । अरे हा स्तुतीचा स्वभाव । ऐसा आहे ॥ ३ ॥ निर्गुण म्हणिजे बहुगुण । बहुगुणी अंतरात्मा जाण । सकळ आहे प्रमाण । प्रचीत पाहा ॥ ४ ॥ सकळ जनास मानावें तें । एका अंतरात्म्यास पावतें । अधिकारपरत्वें तें । मान्य कीजे ॥५॥ श्रोता म्हणे हें अनुमान । मुळीं घालावें जीवन । तें पावे पानोपान । हे सद्यःप्रचीती ॥ ६॥ वक्ता म्हणे तुळसीवरी । उदक घालावें पात्रभरी । परी न थिरे[१] निमिषभरी । भूमीस भेदे ॥ ७ ॥ थोर वृक्षास कैसें करावें । शेंड्यास पात्र कैसें न्यावें । त्याचा अभिप्राय देवें । मज निरूपावा ॥८॥ पर्जन्याचें उदक पडतें । तें तों मुळाकडेच येतें । हाताचि पावेना तेथें । काय करिती ॥९॥ सकळांस मूळ सांपडे । ऐसें पुण्य कैंचें घडे । साधुजनांचें पवाडे । विवेकीं मन ॥१०॥ तथापि वृक्षाचेनि पडिपाडें[२] । जीवन घालितां कोठें पडे । ये गोष्टीचें सांकडें । कांहींच नाहीं ॥ ११ ॥ मागील आशंकेचें निरसन । होतां जाहलें समाधान । आतां गुणास निर्गुण । कैसे म्हणती ॥ १२ ॥ चंचळपणें विकारलें । सगुण ऐसें बोलिलें । येर तें निर्गुण उरलें । गुणातीत ॥ १३ ॥ वक्ता म्हणे हा विचार । शोधून पाहावें सारासार । अंतरीं राहतां निर्धार । नांव नाहीं ॥ १४ ॥ विवेकेंचि तो मुख्य राजा । आणि सेवकाचें नांव राजा । याचा विचार समजा । विवाद खोटा ॥ १५ ॥ कल्पांतप्रळयीं जें उरलें । तें निर्गुण ऐसें बोलिलें । येर तें अवघेंचि जाहलें । मायेमध्यें ॥ १६ ॥ सेना शहर बाजार । नाना यात्रा लहान थोर । शब्द उठती अपार । कैसे निवडावे ॥ १७ ॥ काळामध्यें पर्जन्यकाळ । मध्यरात्री होतां निवळ । नाना जीव बोलती सकळ । कैसे निवडावे ॥१८॥ नाना देश भाषा मतें । भूमंडळीं असंख्यातें । बहु ऋषि बहु मतें । कैसीं निवडावीं ॥ १९ ॥ वृष्टि होतांच अंकुर । सृष्टीवरी निघती अपार । नाना तंतु लहान थोर । कैसे निवडावे ॥२०॥ खेचरें[३] भूचरें[४] जळचरें । नाना प्रकारींचीं शरीरें । नाना रंग चित्रविचित्रें । कैसीं निवडावीं ॥ २१ ॥ कैसें दृश्य आकारलें । नाना प्रकारें

१. थिरते. २. तुलनेनें. ३. पक्षी. ४. पशु वगैरे.

विकारलें । उदंडचि पैसावलें । कैसें निवडावें ॥ २२ ॥ पोकळीमध्यें गंधर्व-नगरें । नाना रंग लहान थोरें । बहुत व्यक्ति बहु प्रकारें । कैशीं निवडावीं ॥२३॥ दिवसरजनीचा प्रकार । चांदणें आणि अंधकार । विचार आणि अविचार । कैसा निवडावा ॥२४॥ विसर आणि आठवण । नेमस्त आणि बाष्कळपण । प्रचीत आणि अनुमान । येणें रीती ॥ २५ ॥ न्याय आणि अन्याय । होय आणि न होय । विवेकेंविण काय । उमजों जाणे ॥ २६ ॥ कार्यकर्ता आणि निकामी । शूर आणि कुकर्मी । धार्मिक आणि अधर्मी । कळला पाहिजे ॥ २७ ॥ धनाढ्य आणि दिवाळखोर । साव आणि तस्कर । खरें खोटें हा विचार । कळला पाहिजे ॥ २८ ॥ वरिष्ठ आणि कनिष्ठ । भ्रष्ट आणि अंतर्निष्ठ । सारासारविचार स्पष्ट । कळला पाहिजे ॥२९॥ इति श्री-दासबोधे गुरुशिष्यसंवादे षोडशदशके उपासनानिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. गुणभूत.

श्रीगणेशाय नमः ॥ पंचभूतें चाले जग । पंचभूतांची लगबग । पंचभूतें गेलिया मग । काय आहे ॥ १ ॥ श्रोता वक्तयास बोले । भूतांचे महिमे वाढविले । आणि त्रिगुण कोठें गेले । सांगा स्वामी ॥ २ ॥ अंतरात्मा पांचवें भूत । त्रिगुण त्याचे अंगभूत । सावध करूनियां चित्त । बरें पाहा ॥ ३ ॥ भूत म्हणिजे जितुकें झालें । त्रिगुण झाल्यांत आले । इतुकेन मूळ खंडलें । आशंकेचें ॥ ४ ॥ भूतांवेगळें कांहीं नाहीं । भूतजातें[2] हें सर्वही । एका वेगळें एक कांहीं । घडेचि ना ॥ ५ ॥ आत्म्याचेनि झाला पवन । पवनाचेनि प्रगटे अग्न । अग्नीपासून जीवन । ऐसें बोलती ॥ ६ ॥ जीवन अवघें डबाबिलें[3] । तें रविमंडळें आळलें । वन्हिवायूचेनि झालें । भूमंडळ ॥ ७ ॥ वन्हि वायु रवि नसतां । तरी होती उदंड शीतळता । ते शीतळते-मध्यें उष्णता । येणेंचि न्यायें ॥ ८ ॥ अवघें वर्मास वर्म केलें । तरीच एवढें कांपावलें । देहमात्र तितुके झाले । वर्माकरितां ॥ ९ ॥ अवघें शीतळचि असतें । तरी प्राणिमात्र मरोनि जाते । अवघ्या उष्णेंचि करपतें । सकळ

---

१. आकाशांत भासमान् होणारें नगर. २. भूतापासून झालेलें. ३. भरलें.

कांहीं ॥ १० ॥ भूमंडळ आळोनि गोठलें । तें रविकिरणें वाळोन गेलें । मग सहजचि देवें रचिलें । उपायासी ॥ ११ ॥ म्हणोनि केला पर्जन्यकाळ । थंड झालें भूमंडळ । पुढें उष्णकाळीं शीतळ । शीतकाळ जाणावा ॥ १२ ॥ शीतकाळें कष्टले लोक । कर्पोनि गेले वृक्षादिक । म्हणोनि पुढें कौतुक । उष्णकाळाचें ॥ १३ ॥ त्याहिमध्यें प्रातःकाळ । मध्यान्हकाळ सायंकाळ । शीतकाळ उष्णकाळ । निर्माण केले ॥ १४ ॥ ऐसें एकामागें एक केलें । विल्हे[1]नें नेमस्त लाविलें । येणेंकरितां जगले । प्राणिमात्र ॥ १५ ॥ नाना रसें रोग कठिण । म्हणोनि औषधी केल्या निर्माण । परंतु सृष्टिरचनेचें विवरण । केलें पाहिजे ॥ १६ ॥ देहमूळ रक्त रेत । त्या आपाचे होती दांत । ऐशी भूर्मडळीं प्रचीत । नाना रत्नांची ॥१७ ॥ सकळांसि मूळ जीवन बांधा[2] । जीवनें चाले सकळ धंदा । जीवनेंविण हरि गोविंदा । प्राणी कैंचे ॥ १८ ॥ जीवनाचें मुक्ताफळ । शुक्रासारिखें सुढाळ । हिरे माणिक इंद्रनीळ । तेजाळ झाले ॥ १९ ॥ महिमा कोणाचा सांगावा । तेजाळ कर्दम[3]चि आघवा । वेगळा वेगळा निवडावा । कोण्या प्रकारें ॥ २० ॥ परंतु बोलिलें कांहीं एक । मनास कळावया विवेक। जनामध्यें तार्किक लोक । समजती अवघें ॥२१॥ अवघें समजलें हें घडेना। शास्त्राशास्त्रांसि पडेना । अनुमानें निश्चय होईना। कांहीं एक ॥ २२ ॥ अगाध गुण भगवंताचे । शेष वर्णूं न शके वाचे । वेद विधि[4] तेहि कांचे[5] । देवेंविण ॥ २३ ॥ आत्माराम सकळां पाळी । अवघें त्रैलोक्य संभाळी । तया एकेंविण धुळी । होय सर्वत्रांची ॥ २४ ॥ जेथें आत्माराम नाहीं । तेथें उरों न शके कांहीं । त्रैलोक्यींचे प्राणी सर्वही । प्रेतरूपी ॥ २५ ॥ आत्मा नसतां येती मरणें। आत्म्याविण कैचें जिणें । बरा विवेक समजणें । अंतर्यामीं ॥ २६ ॥ समजणें जें विवेकाचें । तेंहि आत्म्याविण कैंचें । कोणी एकें जगदीशाचें । भजन करावें ॥२७॥ उपासना प्रगट झाली। तरी हे विचारणा कळली । या कारणें पाहिजे केली । विचारणा देवाची ॥२८॥ उपासनेचा मोठा आश्रय । उपासनेविण निराश्रय । उदंड केलें तरी तो जय । प्राप्त नाहीं ॥ २९ ॥ समर्थांची नाहीं पाठी । तयास भलताच कुटी । या कारणें उठाउठी । भजन करावें ॥ ३० ॥ भजन साधन अभ्यास । येणेंचि

१. क्रमानें. २. कारण. ३. पंचभूतांचें मिश्रण. ४. ब्रह्मदेव. ५. अपुरे.

पाविजे परलोकास । दास म्हणे हा विश्वास । धरिला पाहिजे ॥२१॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षोडशदशके गुणभूतनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी ३०२.

# दशक १७ वा.

## १. देवबलात्कार.

श्रीगणेशाय नमः ॥ निश्चळ ब्रह्मीं चंचळ आत्मा । सकळां पर जो परमात्मा । चैतन्य साक्षी ज्ञानात्मा । षड्गुणेश्वर ॥१॥ सकळ जगाचा ईश्वर । म्हणोनि नामें जगदीश्वर । तयापासून विस्तार । विस्तारला ॥ २ ॥ शिवशक्ति जगदीश्वरी । प्रकृतिपुरुष परमेश्वरी । मूळमाया गुणेश्वरी । गुणक्षोभिणी ॥ ३ ॥ क्षेत्रज्ञ[1] द्रष्टा[2] कूटस्थ[3] साक्षी । अंतरात्मा सर्व लक्षी । शुद्धसत्व महत्तत्व परीक्षी । जाणता साधु ॥ ४ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर । नाना पिंडीं[4] जीवेश्वर । त्यांस भासती प्राणिमात्र । लहान थोर ॥५॥ देव देवळामध्यें बैसला । न भजतां मारितो देहाला । म्हणोनि त्याच्या भेणें तयाला । भजती लोक ॥ ६ ॥ जे वेळेसि भजन चुकलें । ते तेव्हां पछाडिले । आवडीनें भजों लागले । सकळ लोक ॥ ७ ॥ जें जें जेव्हां ओक्षेपिलें[5] । तें तें तात्काळचि दीधलें । त्रैलोक्य भजों लागलें । येणें प्रकारें ॥ ८ ॥ पांचां विषयांचा[6] नैवेद्य । जेव्हां पाहिजे तेव्हां सिद्ध । ऐसें न करितां सद्य । रोग होती ॥ ९ ॥ जेणें काळें नैवेद्य पावेना । तेणें काळें देवँ राहेना । भाग्य वैभव पदार्थ नाना । सांडून जातो ॥ १० ॥ जातो तों कळों देईना । कोणास ठाऊक होईना । देवेंविण अनुमानेना । कोणास देव ॥ ११ ॥ देव पहावयाकारणें । देउळें लागती पाहणें । कोठें तरी देउळाच्या गुणें । देव प्रगटे ॥ १२ ॥ देउळें म्हणिजे नाना शरीरें । तेथें राहिजे जीवेश्वरें[7] । नाना शरीरें नाना प्रकारें । अनंत भेद ॥ १३ ॥ चालती बोलती देउळें । त्यांमध्यें राहिजे राउळें । जितुकीं देउळें तितुकीं सकळें । कळलीं

१. देहादींस जाणणारा. २. जगद्वास पाहणारा. ३. गुप्तरूपानें राहणारा. ४. शरीरांत. ५. मागितलें. ६. शब्द, स्पर्श इत्यादींचा. ७. जीवात्मा. ८. देवानें.

पाहिजे ॥ १४ ॥ मत्स्य कूर्म वराह देउळें । भूगोल धरिला सर्वकाळें । कराळें विक्राळें निर्मळें । कितीएक ॥ १५ ॥ कितीएक देउळीं सौख्य पाहे । भरितें अवघे सिंधूस आहे । परी तें सर्वकाळ न राहे । अशाश्वत ॥ १६ ॥ अशाश्वताचा मस्तकमणी । जयाची एवढी करणी । दिसेना तरी काय झालें धनी । तयासीच म्हणावें ॥ १७ ॥ उद्भवोन्मुख[1] होतां अभेद । विमुख होतां उदंड खेद । ऐसा अधोर्ध्वें[2] संवाद । होत जातो ॥ १८ ॥ सकळांचें मूळ दिसेना । भव्य भारी आणि भासेना । निमिष एक वसेना । एके ठायीं ॥ १९ ॥ ऐसा अगाध परमात्मा । कोण जाणे त्याचा महिमा । तुझी लीला सर्वोत्तमा । तूंचि जाणसी ॥ २० ॥ संसारास आलियाचें सार्थक । जेथें नित्यानित्यविवेक । इहलोक आणि परलोक । दोन्ही साधिले ॥ २१ ॥ मननशीळ लोकांपासीं । अखंड देव अहर्निशीं । पाहतां त्यांच्या पूर्वसंचितांसी[3] । जोडा नाहीं ॥ २२ ॥ अखंड योग म्हणोनि योगी । योग नाहीं तो वियोगी । वियोगी तोहि योगी । योगबळें ॥ २३ ॥ भल्याची महिमा ऐशी । जे सन्मार्ग लावी लोकांसी । पोहणार असतां बुडतयासी । बुडों नेदी ॥ २४ ॥ स्थूळसूक्ष्म तत्त्वझाडा । पिंडब्रह्मांडाचा निवाडा । प्रचीत पाहे ऐसा थोडा । भूमंडळीं ॥ २५ ॥ वेदांतींचें पंचीकरण । अखंड तयाचें विवरण । महावाक्यें अंतःकरण । रहस्य पाहे ॥ २६ ॥ जे पृथ्वीमध्यें विवेकी असती । धन्य तयांची संगती । श्रवणमात्रें पावती गती । प्राणिमात्र ॥ २७ ॥ सत्संग आणि उत्तम गुण । सत्संग आणि सच्छास्त्रश्रवण । अखंड होतसे विवरण । नाना परोपकारांचें ॥ २८ ॥ जे सत्कीर्तीचे पुरुष । ते परमेश्वराचे अंश । धर्मस्थापनेचा हव्यास । तेथेंचि वसे ॥ २९ ॥ विशेष सारासारविचार । तेणें होय जगदुद्धार । संगत्यागें निरंतर । होऊन गेले ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके देवबलात्कारनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. शिवशक्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्रह्म निर्मळ निश्चळ । जैसें गगन अंतराळ । निरा-

---

१. विश्वोत्पत्तीचा विचार करितां. २. विश्व आणि ब्रम्ह. ३. पुण्यास.

कारें केवळ। निर्विकारी ॥ १ ॥ अंतचि नाहीं तें अनंत । शाश्वत आणि सदोदित। असंत[1] नव्हे तें संत। सर्वकाळ ॥ २ ॥ परब्रह्म तें अविनाश। जैसें आकाश अवकाश। न तुटे न फुटे सावकाश। जैसें तैसें ॥ ३ ॥ तेथें ज्ञान ना अज्ञान। तेथें स्मरण ना विस्मरण। तेथें अखंड निर्गुण। निरव[2]-लंबी ॥ ४ ॥ तेथें चंद्र सूर्य ना पावक । नव्हे काळोख प्रकाश। उपाधी-वेगळें एक। निरुपाधि ब्रह्म ॥ ५ ॥ निश्चळीं स्मरण चेतलें। त्यास चैतन्य ऐसें कल्पिलें। गुणसमानत्वें झालें। गुणसाम्य ऐसें ॥ ६ ॥ गगनीं आली अभ्रच्छाया[3]। तैशी जाणिजे मूळमाया। उद्भव आणि विलया। वेळ नाहीं ॥ ॥ ७ ॥ निर्गुणीं गुणविकार। तोचि षड्गुणेश्वर। अर्धनारी नटेश्वर। तयासि म्हणिजे ॥ ८ ॥ आदिशक्ति शिवशक्ति। मुळीं आहे सर्वशक्ति। तेथून पुढें नाना व्यक्ती। निर्माण झाल्या ॥ ९ ॥ तेथून पुढें शुद्ध सत्व। रजतमाचें गूढत्व। तयासि म्हणिजे महत्तत्व। गुणक्षोभिणी[4] ॥ १० ॥ मुळीं असेचि ना व्यक्ती। तेथें कैंची शिवशक्ती। ऐसें म्हणाल तरी चित्तीं। सावधान असावें ॥ ११ ॥ ब्रह्मांडावरून पिंड। अथवा पिंडावरून ब्रह्मांड। अधोर्ध्व पाहतां निवाड। कळों येतें ॥ १२ ॥ बीज फोडून आणिलें मना। तेंथें फळ तों दिसेना। वाढत वाढत पुढें नाना। फळें येती ॥ १३ ॥ फळ फोडितां बीज दिसे। बीज फोडितां फळ नसे । तैसा विचार असे। पिंड-ब्रह्मांडीं ॥ १४ ॥ नरनारी दोन्ही भेद। पिंडीं दिसती प्रसिद्ध। मुळीं न-सतां विशद। होतील कैसीं ॥ १५ ॥ नाना बीजरूप कल्पना। तींत काय एक असेना। सूक्ष्म म्हणोन भासेना। एकाएकीं ॥ १६ ॥ स्थूळाचें मूळ तें वासना। ते वासना आधीं दिसेना। स्थूळा वेगळें अनुमानेना। सकळ कांहीं ॥ १७ ॥ कल्पनेची सृष्टि केली। ऐशीं वेदशास्त्रें बोलिलीं। दिसेना म्हणोन मिथ्या केलीं। न पाहिजेत कीं ॥१८॥ पडदा एकेक जन्माचा। तेथें विचार कळेल कैंचा। परंतु गूढत्व हा नेमाचा। ठाव आहे ॥ १९ ॥ नाना पुरुषांचे जीव। नाना स्त्रियांचे जीव। एकचि परी देहस्वभाव। वेगळाले ॥ २० ॥ नवरीस नवरी नलगे। ऐसा भेद दिसों लागे। पिंडावरून उमगे। ब्रह्मांडबीज ॥२१॥ नवरीचें मन नवऱ्यावरी। नवऱ्याचें मन नवरीवरी। ऐशी

१. असत्. २. आश्रयरहित. ३. ढगांची सांवली. ४. त्रिगुणांस चाळविणारी.

वासनेसी परी । मुळींहून पाहावी ॥ २२ ॥ वासना मुळींच अभेद । देहसंबंधें झाला भेद । तुटतां देहाचा संबंध । भेद गेला ॥ २३ ॥ नरनारींचें बीज कारण । शिवशक्तीमध्यें जाण । देह धरितां प्रमाण । कळों आलें ॥ २४ ॥ नाना प्रचीतींच्या वासना । एकाचें एकास कळेना । तीक्ष्ण[1] दृष्टीनें अनुमाना । कांहींसें येतें ॥ २५ ॥ बाळकास वाढवी जननी । हें तों नव्हे पुरुषाचेनी । उपाधि वाढे जयाचेनी । ते हे वनिता[2] ॥ २६ ॥ वीट नाहीं कंटाळा नाहीं । आलस्य नाहीं त्रास नाहीं । इतुकी माया कोठेंचि नाहीं । माते वेगळी ॥ २७ ॥ नाना उपाधि वाढवूं जाणे । नाना मायेनें गोवूं जाणे । नाना प्रीति लावूं जाणे । नाना प्रपंचाची ॥ २८ ॥ पुरुषास स्त्रीचा विश्वास । स्त्रीस पुरुषाचा संतोष । परस्परें वासनेस । बांधोन टाकिलें ॥ २९ ॥ ईश्वरें मोठें सूत्र केलें । मनुष्यमात्र गुंतोन राहिलें । लोभाचें गुंडाळें केलें । उगवेना ऐसें ॥ ३० ॥ ऐसी परस्परें आवडी । स्त्रीपुरुषांची महा गोडी । हे मुळींहून चालली रोकडी । विवेकें पाहावी ॥ ३१ ॥ मुळीं सूक्ष्म निर्माण झालें । पुढें स्पष्ट दिसोन आलें । उत्पत्तीचें कार्य चाले । उभयतांकरितां ॥ ३२ ॥ मुळीं शिवशक्ती हें तों खरें । पुढें झाली वधुवरें । चौऱ्याशीं लक्ष विस्तारें । विस्तारली जे ॥ ३३ ॥ येथें शिवशक्तीचें रूप केलें । श्रोतीं मनास पाहिजे[3] आणिलें । विवरल्याविण बोलिलें । तें व्यर्थ जाणावें ॥ ३४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तदशदशके शिवशक्तिनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. श्रवणोपदेश.

श्रीगणेशाय नमः ॥ थांबा थांबा ऐका ऐका । आधींच ग्रंथ सोडूं नका । सांगीतलें तें ऐका । सावधपणें ॥ १ ॥ श्रवणामध्यें सार श्रवण । तें हें अध्यात्मनिरूपण । सुचित्त करूनि अंतःकरण । ग्रंथामध्यें विवरावें[3] ॥ २ ॥ श्रवण मननाचा विचार । निजध्यासें साक्षात्कार । रोकडा मोक्षाचा उधार । बोलोंच नये ॥ ३ ॥ नाना रत्नें परीक्षितां । अथवा वजनें करितां । उत्तम सोनें पुंटीं[4] घालितां । सावधान असावें ॥ ४ ॥ नाना नाणीं मोजून घेणें ।

---

१. सूक्ष्म विचारानें. २. बायको. ३. पाहावें. ४. मुशींत.

नाना परीक्षा करणें । विवेकी मनुष्यास बोलणें । सावधानें असावें ॥ ५ ॥ जैसें लाखोलीचें धान्य । निवडोन वेंचितां होतें मान्य । सगट मोजितां अमान्य । देव क्षोभे ॥ ६ ॥ एकांतीं नाजुक कारभार । तेथें असावें अति तत्पर । त्याच्या कोटिगुणें विचार । अध्यात्मग्रंथीं ॥ ७ ॥ काहण्या कथा गोष्टी पवाडे[1] । नाना अवतारचरित्रें वाड । त्यां समस्तांमध्यें जाड । अध्यात्मविद्या ॥ ८ ॥ गत गोष्टीस ऐकिलें । तेणें काय हातासि आलें । म्हणती पुण्य प्राप्त झालें । तरी तें दिसेना कीं ॥ ९ ॥ तैसें नव्हे अध्यात्मसार । हा प्रचीतीचा विचार । कळतां अनुमानाचा संहार । होत जातो ॥ १० ॥ मोठे मोठे येऊन गेले । आत्म्याकारितांच वर्तले । त्या आत्म्याचा महिमा बोले । ऐसा कवण ॥ ११ ॥ युगानुयुग एकटा एक । चालवितो तिन्ही लोक । त्या आत्म्याचा विवेक । पाहिलाच पाहावा ॥ १२ ॥ प्राणी आले येऊन गेले । ते जैसे जैसे वर्तले । ते वर्तणुकेचें कथन केलें । इच्छेसारिखें ॥ १३ ॥ जेथें आत्मा नाहीं दाट । तेथें अवघें सरसपाट । आत्म्याविण बापुडें काष्ठ[2] । काय जाणे ॥ १४ ॥ ऐसें वरिष्ठ आत्मज्ञान । दुसरें नाहीं या समान । सृष्टीमध्यें विवेकी जन । तेचि हें जाणती ॥ १५ ॥ पृथ्वी आणि आप तेज । यांचा पृथ्वीमध्यें समज । अंतरात्मा तत्वबीज । तें वेगळेंचि राहिलें ॥ १६ ॥ वायूपासून पैलीकडे । जो कोणी विवेकें पवाडे । जवळींच आत्मा सांपडे । तया पुरुषासी ॥ १७ ॥ वायुप्रकाशें[3] गुणमाया । प्रकृतिपुरुष मूळमाया । सूक्ष्मरूपें प्रचीत येया । कठिण आहे ॥ १८ ॥ मायादेवीच्या धांदली । सूक्ष्मीं कोण मन घाली । समजला त्याची तुटली । संदेहवृत्ती ॥ १९ ॥ मूळमाया चौथा देह । झाला पाहिजे निःसंदेह । देहातीत होऊन राहे । धन्य तो साधु ॥ २० ॥ विचारें ऊर्ध्व चढती । तयासी ऊर्ध्वगती[4] । येरां सकळां अधोगती । पदार्थज्ञानें ॥ २१ ॥ पदार्थ चांगले दिसती । परी ते सर्वेचि नासती । अतोभ्रष्टस्ततोभ्रष्ट[5] होती । लोक तेणें ॥ २२ ॥ या कारणें प्रकृतिज्ञान । नाना जिनसांचें अनुमान । सर्व सांडूनि निरंजन । धुंडीत जावें ॥ २६ ॥ अष्टांगयोग पिंडज्ञान । त्याहून थोर तत्वज्ञान[6] । त्याहून थोर आ-

---

१. पोवाडे. २. लांकडासारखें निर्जीव शरीर. ३. वायूचा उद्भव. ४. सद्गति. ५. याला मुकला व त्यालाही मुकला. ६. महदादि तत्त्वांचें ज्ञान.

त्मज्ञान । तें पाहिलें पाहिजे ।। २४ ।। मूळमायेचे शेवटीं । हरिसंकल्प मुळीं उठी । उपासनायोगें मिठी । तेथें घातली पाहिजे ।। २५ ।। मग त्या पैलीकडे जाण । निखळ ब्रह्म निर्गुण । निर्मळ निश्चळ त्याची खूण । गगनासारिखी ॥ २६ ॥ येथून तेथवरी दाटलें । प्राणिमात्रास भेटलें । पदार्थमात्रीं लिगटलें । व्यापून आहे ।। २७ ॥ त्याऐसें नाहीं थोर । सूक्ष्माहूनि सूक्ष्मविचार । पिंडब्रह्मांडांचा संहार । होतां कळे ॥ २८ ॥ अथवा पिंडब्रह्मांड असतां । विवेकप्रळय पाहों जातां । शाश्वत कोण हें तत्वतां । उमजों लागे ॥ २९ ॥ करून अवघा तत्वझाडा । सारासारांचा निवाडा । सावधपणें ग्रंथ सोडा । सुखेनैव ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तदशदशके श्रवणोपदेशनिरूपणं नाम तृतीयः समासः ।। ३ ।।

---

## ४. अनुमान.

श्रीगणेशाय नमः ।। बहुत जनांसि उपाय । वक्त्यास पुसतां त्रासूं नये । बोलतां बोलतां अन्वय । सांडूंच नये ॥ १ ॥ श्रोतयानें आशंका घेतली । ते तात्काळ पाहिजे फेडिली । स्वगोष्टीनें स्वगोष्टी पेंचली । ऐसें न व्हावें ॥ २ ॥ पुढें धरितां मागें पेंचला । मागें धरितां पुढें उडाला । ऐसा सांपडताचि गेला । ठायीं ठायीं ॥ ३ ॥ पोहणारचि गुचक्या खातो । जनांस कैसा काढूं पाहतो । आशय लोकांचा राहत जातो । ठायीं ठायीं ॥ ४ ॥ आपणचि बोलिला संहार । आपणचि बोलिजे सर्वसार । दुस्तर मायेचा पार । दाविला पाहिजे ॥ ५ ॥ जें जें सूक्ष्म नाम घ्यावें । त्याचें रूप बिंबवूनि द्यावें । तरीच वक्ता म्हणवावें । विचारवंत ॥६॥ ब्रह्म कैसें मूळमाया कैसी । अष्टधा प्रकृति शिवशक्ति कैसी । षड्गुणैश्वर्याची स्थिती कैसी । गुणसाम्याची ॥ ७ ॥ अर्धनारी नटेश्वर । प्रकृतिपुरुषांचा विचार । गुणक्षोभिणी तदनंतर । त्रिगुण कैसे ॥ ८ ॥ पूर्वपक्ष कोठून कोठवरी । वाच्यांश लक्ष्यांशाची परी । सूक्ष्म नाना विचार करी । धन्य तो साधु ॥ ९ ॥ नाना पाल्हाळीं पडेना । बोलिलेंचि बोलवेना । मौनगर्भ अनुमाना ।

---

१. 'एकोऽहं बहु स्याम्' (मी एक आहें तो पुष्कळ होईन.) असा ईशसंकल्प. २. ज्याचा गर्भ (स्वरूप) सांगण्यास शब्द नाहींत तें मौनगर्भ; ब्रह्म.

आणून सोडी ॥ १० ॥ घडी एक विमळब्रह्म । घडी एक सर्व ब्रह्म । द्रष्टा साक्षी सत्ता ब्रह्म । क्षण एक ॥ ११ ॥ निश्चळ तेंचि झालें चंचळ । चंचळ तेंचि ब्रह्म केवळ । नाना प्रसंगीं खळखळ । निवाडा नाहीं ॥ १२ ॥ चळतें आणि निश्चळ । अवघें चैतन्याचि केवळ । रूपें वेगळालीं प्रबळ । बोलवेना ॥ १३ ॥ उगीच करी गाथागोवी[1] । तो लोकांस कैसा उगवी[2] । नाना निश्चय नाना गोवी[1] । होत जाते ॥ १४ ॥ भ्रमास म्हणे परब्रह्म । परब्रह्मास म्हणे भ्रम । ज्ञातेपणाचा संभ्रम[3] । बोलोन दावी ॥ १५ ॥ घाली शास्त्रांचें दडपण । प्रचीतीविण निरूपण । पुसों जातां उगाच शीण । अत्यंत मानी ॥१६॥ ज्ञात्यास आणि पदार्थभिडा[4] । तो काय बोलेल बापुडा । सारासारांचा निवाडा । झाला पाहिजे ॥ १७ ॥ वैद्य मात्रेची स्तुति करी । मात्रा गुण कांहींच न करी । प्रचीतीविण तैसी परी । ज्ञानाची झाली ॥ १८ ॥ जेथें नाहीं सारासार । तेथें अवघा अंधकार । नाना परीक्षांचे विचार । राहिले तेथें ॥ १९ ॥ पाप पुण्य स्वर्ग नरक । विवेक आणि अविवेक । सर्व ब्रह्मीं काय एक । सांपडलें नाहीं ॥ २० ॥ पावन आणि तें पतन । दोनी मानिलीं तत्समान । निश्चय आणि अनुमान । ब्रह्मरूप ॥२१॥ ब्रह्मरूप झालें आघवें । तेथें काय निवडावें । अवघी साकरचि टाकावें । काय कोठें ॥२२॥ (तैसें सार आणि असार । अवघा झाला एकंकार । तेथें बळावला अविचार । विचार कैंचा ॥ २३ ॥ वंद्य निंद्य एक झालें । तेथें काय हातास आलें । उन्मत्त द्रव्यें[5] जे भुलले । ते भलतेंचि बोलती ॥२४॥ तैसा अज्ञानभ्रमें भुलला । सर्व ब्रह्म म्हणोन बैसला । महापापी आणि भला । एकचि मानी ॥ २५ ॥ सर्वसंगपरित्याग । अवासवा विषयभोग । दोघे एकचि मानितां मग । काय उरलें ॥ २६ ॥ भेद ईश्वर करून गेला । तो याच्या बापाचेनि न वचे मोडिला । मुखामध्यें घांस घातला । तो अपानीं घालावा ॥२७॥ ज्या इंद्रियास जो भोग । तो तो करी यथासांग । ईश्वराचें केलें जग । मोडितां उरेना ॥ २८ ॥ अवघी भ्रांतीची ठकाठकी । प्रचीतीविण गोष्टी लटकी । वेड लागलें जे बटकी । ते भलतेंचि बोले ॥२९॥ प्रत्ययज्ञाता सावधान । त्याचें ऐकावें निरूपण । आत्मसाक्षात्काराची

१. गोंधळ. २. समजावी. ३. डौल. ४. लोभी. ५. मद्यानें.

खूण । तात्काळ बाणे ॥ ३० ॥ वेडें वांकडें जाणावें । आंधळें पाउलीं वोळखावें । बाष्कळ बोलणें सांडावें । वमन जैसें ॥३१॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तदशदशके अनुमाननिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. अजपा.

श्रीगणेशाय नमः ॥ एकवीस सहस्र साहाशें जपा । नेमून गेली ते अजपा[1] । विचार पाहतां सोपा । सकळ कांहीं ॥ १ ॥ मुखीं नासिकीं असिजे प्राणें । तयास अखंड येणें जाणें । याचा विचार पाहाणें । सूक्ष्मदृष्टीं ॥ २ ॥ मुळीं पाहतां एक स्वर । त्याचा तार[2] मंद[2] घोर[2] । त्या घोराहून सूक्ष्म विचार । अजपेचा ॥ ३ ॥ सं[3] रि ग म प ध नि सं[3] । सरिमात्रें कासयास । प्रथम स्वर मातृकांस । म्हणोन पाहावें ॥ ४ ॥ परे[4] वाचेहून वर्ते । आणि पश्यंती[5] खालतें । स्वरांचें जन्मस्थान तें । तेथून उठे ॥५॥ एकांतीं उगीच बैसावें । तेथें हें समजोन पाहावें । अखंड घ्यावें सोडावें । प्रभंजनासी[6] ॥ ६ ॥ एकांतीं मौन धरून बैसे । सावध पाहतां कैसें भासे । सोहं सोहं ऐसे । शब्द होती ॥ ७ ॥ उच्चारेंविण जे शब्द । ते जाणावे सहज शब्द । प्रत्यया येती परंतु नाद । कांहींच नाहीं ॥८॥ ते शब्द सांडून बैसला । तो मौनी म्हणावा भला । योगाभ्यासाचा गलबला । या कारणें ॥ ९॥ एकांतीं मौन धरून बैसला । तेथें कोण शब्द झाला । सोहं ऐसा भासला । अंतर्यामीं ॥१०॥ धारितां सो टाकितां हं । अखंड चाले सोहं सोहं । याचा विचार पाहतां बहू । विस्तारला॥११॥देहधारक तितुका प्राणी । स्वेदज उद्भिज्जादिक खाणी । श्वासोच्छ्वास नसतां प्राणी । कैसे जगती ॥ १२॥ ऐशी हे अजपा सकळांसी । परंतु कळे जाणत्यासी । सहज सांडून सायासीं । पडोंच नये ॥ १३ ॥ सहज देव असताचि असे । सायासें देव फुटे नासे । नाशवंत देवासि विश्वासे । ऐसा कवण ॥ १४ ॥ जगदंतराचें दर्शन । सहज घडे अखंड ध्यान । आत्मइच्छेनें जन । सकळ वर्तती ॥ १५ ॥ आत्मयाचें समाधान । घडे तैसेंचि आसन । सांडणें फिटलें समर्पण । तयासीच होय ॥१६॥

---

१. श्वासोच्छ्वास; न करतां आपोआप होणारा जप. २. हे स्वरांचे तीन प्रकार. ३. हे सप्त स्वर. ४. वाणीचें आद्यस्थान. ५. वाणीचें द्वितीय स्थान. ६. वायूस.

यज्ञपुरुष पोटीं असती । तयांस अवदानें[1] सकळ देती । लोक आज्ञेमध्यें असती । आत्मयाचे ॥ १७ ॥ सहज देव जपध्यानें । सहज बोलणें स्तुति स्तवनें । सहज घडे तें भगवानें । मान्य कीजे ॥१८॥ सहज समजायाकारणें । नाना हठयोग[2] करणें । परंतु एकाएकीं समजणें । घडत नाहीं ॥१९॥ द्रव्य चुकतें दारिद्र येतें । तैळीं[3] लक्ष्मी वैरी वर्तते । प्राणी काय करील तें । ठाऊकें नाहीं ॥ २० ॥ तळघरामध्यें उदंड द्रव्य । भिंतीमध्यें घातलें द्रव्य । स्तंभीं तुळवटीं द्रव्य । आपण मध्यें ॥ २१ ॥ लक्ष्मीमध्यें करंटा नांदे । त्याचें दरिद्र अधिक सांधे[4] । नवल केलें परमानंदें । परम पुरुषें ॥ २२ ॥ एक पाहती एक खाती । ऐशी विवेकाची गती । प्रवृत्ति अथवा निवृत्ती । येणेंचि न्यायें ॥ २३ ॥ अंतरीं वसतां नारायणें । लक्ष्मीस काय उणें । ज्याची लक्ष्मी तो आपण । बळकट धरावा ॥ २४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तदशदशके अजपानिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. देहात्मा.

श्रीगणेशाय नमः ॥ आत्मा देहामध्यें असतो । नाना सुखदुःखें भोगितो । शेवटीं शरीर सांडून जातो । एकाएकीं ॥ १ ॥ शरीरशक्ति तारुण्यपणीं । नाना सुखें भोगिती प्राणी । अशक्त होतां वृद्धपणीं । दुःखें भोगिती ॥ २ ॥ मरावें ना ऐशी आवडी । हात पाय खोडून प्राण सोडी । नाना दुःखें अवघडी । वृद्धपणीं ॥ ३ ॥ देहात्मयाचे संगतीं । कांहींएक सुख भोगिती । चर्फडोंचर्फडून जाती । देहांतकाळीं ॥ ४ ॥ ऐसा आत्मा दुःखदायक । एकाचे प्राण घेती एक । आणि शेवटीं निरर्थक । कांहींच नाहीं ॥ ५ ॥ ऐसा दों दिवसांचा भ्रम । त्यास म्हणती परब्रह्म । नाना दुःखाचा संभ्रम[5] । मानून घेतला ॥ ६ ॥ दुःखीं होऊन चर्फडून गेले । तेथें काय समाधान झालें । कांहीं एक सुख भोगिलें । तों सर्वेच दुःख ॥ ७ ॥ जन्मदारभ्य[6] आठवावें । म्हणिजे अवघें पडेल ठावें । नाना दुःखें भोगावें । काय म्हणोन ॥ ८ ॥ ऐशी आत्म्याची संगती । नाना दुःखें प्राप्त होतीं । दैन्यवाणे होऊन जाती । प्राणिमात्र ॥ ९ ॥ कांहीं आनंद कांहीं खेद । ज.

---

१. आहुति. २. कष्ट. ३. खालीं, वर. ४. वाढतें. ५. प्रसंग. ६. जन्मापासून.

न्मवरी पडिला संबंध । नाना प्रकारीं विरुद्ध । ताडातोडी[1] ॥ १० ॥ निद्राकाळीं ढेंकूण पिसा । नाना प्रकारीं वळसा[2] । नाना उपायें वळसा । त्यांस होय ॥ ११ ॥ भोजनकाळीं माशा येती । नाना पदार्थ उंदीर नेती । पुढें त्यांचीहि फजिती । मार्जारें करिती ॥ १२ ॥ उवा चामवा गोचिड । गांधलें कानटे उदंड । एकास एक चर्फड । दोहींकडे ॥ १३ ॥ विंचू सर्प वाघ रिसें । सुसर लांडगे माणसांस माणसें । परस्परें सुखसंतोषें । एकहि नाहीं ॥ १४ ॥ चौऱ्यायशीं लक्ष उत्पत्ति । एकास एक भक्षिती । नाना पिडा दुःखणीं किती । काय म्हणोन सांगावें ॥ १५ ॥ ऐशी अंतरात्माची करणी । नाना जीव दाटले धरणीं । परस्परें संहारणी । एक एकाची ॥ १६॥ अखंड रडती चर्फडती । विवळविवळों प्राण देती । मूर्ख प्राणी त्यांस म्हणती । परब्रह्म ॥ १७ ॥ परब्रह्म जाणार नाहीं । कोणास दुःख देणार नाहीं । स्तुति निंदा दोनी नाहीं । परब्रह्मीं ॥ १८ ॥ उदंड शिव्या दिधल्या । तितुक्या अंतरात्म्यास लागल्या । विचार पाहतां प्रत्ययास आल्या । यथातथ्य[3] ॥ १९ ॥ धगडीचा बटकीचा लंवडीचा । गधडीचा कुत्रीचा वोंगळीचा । ऐसा हिशेब शिव्यांचा । किती म्हणोन सांगावा ॥ २० ॥ इतकें परब्रह्मीं लागेना । तेथें कल्पनाचि चालेना । ताडातोडीचें ज्ञान मानेना । कोणी एकासी ॥ २१ ॥ सृष्टीमध्यें सकळ जीव । सकळांस कैंचें वैभव । या कारणें ठायाठाव । निर्मिला देवें ॥ २२ ॥ उदंड लोक बाजारींचे । जें जें आलें तें तें वेंचे । उत्तम तितुकें भाग्याचे । लोक घेती ॥ २३ ॥ येणेंचि न्यायें अन्न-वसनें[4] । येणेंचि न्यायें देवतार्चन । येणेंचि न्यायें ब्रह्मज्ञान । प्राप्तव्यासारिखें ॥ २४ ॥ अवघेचि लोक सुखी असती । संसार गोड करून नेती । महाराजे वैभव भोगिती । तें करंट्यास कैंचें ॥ २५ ॥ परंतु अंतीं नाना दुःखें । तेथें होतें सकट सारिखें । पूर्वीं भोगिलीं नाना सुखें । अंतीं दुःख सोसवेना ॥ २६ ॥ प्राण शरीर सोडीना । कठिण दुःख सोसवेना । मृत्युदुःख सकळ जनां । कासावीस करी ॥ २७ ॥ नाना अवयवहीन झालें । तैसेंचि पाहिजे वर्तलें । प्राणी अंतकाळीं गेलें । कासावीस होउनी ॥ २८ ॥ रूप लावण्य आवघें जातें । शरीरसामर्थ्य तेंही जातें । कोणी नसतां मर-

१. घोटाळा. २. उपद्रव. ३. खरोखर. ४. वस्त्र.

तें। आपद आपदों ॥ २९ ॥ अंतकाळीं दैन्य दीन । सकाळिकांस तत्समान। ऐसें चंचल अवलक्षण । दुःखकारी ॥ ३० ॥ भोगून अभोक्ता म्हणती । हे तों अवघीच फजिती । लोक उगेच बोलती । पाहिल्याविण ॥ ३१ ॥ अंतकाळ आहे कठिण । शरीर सोडीना प्राण । बराड्यासारिखें लक्षण । अंतकाळीं ॥ ३२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तदशदशके देहात्मनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. जगज्जीवन.

श्रीगणेशाय नमः ॥ मुळीं उदक निवळ असतें । नाना वल्लीमध्यें जातें । संगदोषें तैसें होतें । अम्ल तीक्ष्ण कडवट ॥ १ ॥ आत्मा आत्मपणें असतो । देहासंगें विकारतो । साभिमानें भरीं भरतो । भलतीकडे ॥ २ ॥ बरी संगति सांपडली । जैशी उंसास गोडी आली । विषयवल्ली फोपावली । घातकी प्राणी ॥ ३ ॥ अठरा भार वनस्पती । गुण सांगावे ते किती । नाना देहांचे संगती । आत्मयास होय ॥ ४ ॥ त्यामध्यें कोणी भले । ते संतसंगें निवाले । देहाभिमान सांडून गेले । विवेकबळें ॥ ५ ॥ उदकाचा नाशचि होतो । आत्मा विवेकें निघतो । ऐसा आहे प्रत्यय तो । विवेकें पाहावा ॥ ६ ॥ ज्यासी स्वहितचि करणें । त्यास किती म्हणोन सांगणें । हें ज्याचें त्याणें समजणें । सकळ काहीं ॥ ७ ॥ आपला आपण करी कुडावा । तो आपला मित्र जाणावा । आपला नाश करी तो समजावा । वैरी ऐसा ॥८॥ आपलें आपण अनहित करावें । त्यास आडवें कोणें रिघावें । एकांतीं जाऊन जीवें । मारी आपणासी ॥ ९ ॥ जो आपला आपण घातकी । तो आत्महत्यारा पातकी । या कारणें विवेकी । धन्य साधु ॥ १० ॥ पुण्यवंता सत्संगती । पापिष्ठास असत्संगती । गति आणि अवगती । संगतियोगें ॥ ११ ॥ उत्तम संगति धरावी । आपली आपण चिंता करावी । अंतरीं बरी विवरावी । बुद्धि जाणत्याची ॥ १२ ॥ इहलोक आणि परलोक । जाणता तो सुखदायक । नेणत्याकरितां अविवेक । प्राप्त होतो ॥ १३ ॥ जाणता देवाचा अंश । नेणता म्हणजे तो राक्षसांश । यामध्यें जें विशेष । तें जाणो-

---

१. हाल होऊन. २. दीनवाणें. ३. आंबट. ४. तिखट. ५. रक्षण.

न ध्यावें ॥ १४ ॥ जाणता तो सकळां मान्य । नेणता होतो अमान्य । जेणें करितां होइजे धन्य । तेंचि ध्यावें ॥ १५ ॥ साक्षेपी शाहाण्याची संगती । तेणें साक्षेपी शाहाणे होती । आळसी मूर्खांची संगती । होती आळसी मूर्ख ॥ १६ ॥ उत्तमसंगतीचें फळ सुख । अधमसंगतीचें फळ दुःख । आनंद सांडूनियां शोक । कैसा घ्यावा ॥ १७ ॥ ऐसें हें प्रगट दिसे । जनामध्यें उदंड भासे । प्राणिमात्र वर्ततसे । उभययोगें ॥ १८ ॥ एका योगें सकळ योग । एका योगें सकळ वियोग । विवेकयोगें सकळ प्रयोग । करीत जावे ॥ १९ ॥ अवचितें सांकडींत पडिलें । तरी तेथून पाहिजे निघालें । निघोन जातां झालें । परम समाधान ॥ २० ॥ नाना दुर्जनांचा संग । क्षणक्षणा मनोभंग । या कारणें कांहीं रंग । राखोन जावें ॥ २१ ॥ शाहाणा यत्नी त्याच्या गुणें । पाहों जातां काय उणें । सुख संतोष भोगणें । नाना श्लाघ्यता[1] ॥ २२ ॥ आतां लोकीं ऐसें आहे । सृष्टीमध्यें वर्तताहे । जो कोणी समजोन पाहे । त्यास घडे ॥ २३ ॥ बहुरत्ना वसुंधरा । जाणजाणों विचार करा । समजतां प्रत्यय अंतरा- । माजी येतो ॥ २४ ॥ दुर्बळ आणि संपन्न । वेडें आणि व्युत्पन्न । हें अखंडदंडायमान[2] । असतचि असे ॥ २५ ॥ एक भाग्यपुरुष मोडती । एक नवे भाग्यवंत होती । तैशीच विद्या व्युत्पत्ती । होत जाते ॥ २६ ॥ एक भरे एक रितें । रितें मागुतें भरतें । भरतें तेंहि रितें होतें । काळांतरीं ॥ २७ ॥ ऐशी हे सृष्टि चालिली । संपत्ति दुपाराची साउली । वयसा[1] तरी निघोन गेली । हळुहळू ॥ २८ ॥ बाळ तारुण्य आपलें । वृद्धपणीं प्रचीतीस आलें । ऐसें जाणोन सार्थक केलें । पाहिजे कोणी ऐकें ॥ २९ ॥ देह जैसें केलें तैसें होतें । यत्न केल्या कार्य साधतें । तरी मग कष्टावें तें । काय निमित्त ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तदशदशके जगज्जीवननिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. तत्वविवरण.

श्रीगणेशाय नमः ॥ नाभीपासून उन्मेषवृत्ती[3] । तेचि परा जाणिजे श्रोतीं । ध्वनिरूप पश्यंती । हृदयीं वसे ॥ १ ॥ कंठापासून नाद झाला ।

---

१. कीर्ति. २. अखंड दंड (काठी) असावा तसें, अस्खलित. ३. अंतःस्फुरण.

मध्यमा वाचा बोलिजे त्याला । उच्चार होतां अक्षराला। वैखरी बोलिजे ॥२॥ नाभिस्थानीं परा वाचा । तोचि ठाव अंतःकरणाचा । अंतःकरणपंचकाचा । निवाडा ऐसा ॥ ३ ॥ निर्विकल्पीं जें स्फुरण । उगेंच असतां आठवण । तें जाणावें अंतःकरण । जाणती कळा ॥ ४ ॥ अंतःकरणीं आठवलें । पुढें होय नव्हेसें गमलें । करूं न करूं ऐसें वाटलें । तेंचि मन ॥ ५ ॥ संकल्प विकल्प तेंचि मन । तेणें करितां अनुमान । पुढें निश्चय तोचि जाण । रूप बुद्धीचें ॥ ६ ॥ करीनचि अथवा न करीं । ऐसा निश्चय करी । तेचि बुद्धि आहे अंतरीं । विवेकें जाणावी ॥ ७ ॥ जे वस्तूचा निश्चय केला । पुढें तेचि चिंतूं लागला । तें चित्त बोलिल्या बोला । यथार्थ मानावें ॥ ८ ॥ पुढें कार्याचा अभिमान धरणें । हें कार्य तों अगत्य करणें । अशा कार्यास प्रवर्तणें । तोचि अहंकारु ॥ ९ ॥ ऐसें हें अंतःकरणपंचक । पंच वृत्ति मिळोन एक । कार्यभागें प्रकारपंचक । वेगळालें ॥ १० ॥ जैसे पांचही प्राण । कार्यभागें वेगळाले जाण । नाहीं तरी वायूचें लक्षण । एकचि असे ॥ ११ ॥ सर्वांगीं व्यान नाभीं समान । कंठीं उदान गुदीं अपान । मुखीं नासिकीं प्राण । नेमस्त जाणावा ॥ १२ ॥ बोलिलें हें प्राणपंचक । आतां ज्ञानेंद्रियपंचक । श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा नासिक । ऐशीं हीं ज्ञानेंद्रियें ॥ १३ ॥ वाचा पाणि[1] पाद शिश्न गुद । हीं कर्मेंद्रियें प्रसिद्ध । शब्द स्पर्श रूप रस गंध । ऐसें हें विषयपंचक ॥ १४ ॥ अंतःकरण प्राणपंचक । ज्ञानेंद्रिय कर्मेंद्रियपंचक । पांचवें विषयपंचक । ऐशीं हीं पांच पंचकें ॥ १५ ॥ ऐसे हे पंचवीस गुण । मिळोन सूक्ष्म देह जाण । यांचा कर्दम[2] बोलिला श्रवण । केलें पाहिजे ॥ १६ ॥ अंतःकरण व्यान श्रवण वाचा । शब्द विषय आकाशाचा । पुढें विस्तार वायूचा । बोलिला असे ॥ १७ ॥ मन समान त्वचा पाणी । स्पर्श विषय हा पवनीं । ऐसे हे अडांखे[3] साधूनी । कोठा करावा ॥ १८ ॥ बुद्धि उदान नयन चरण । रूप विषयाचें दर्शन । संकेतें बोलिलें मन । घालूनि पाहिजे ॥ १९ ॥ चित्त अपान जिव्हा शिश्न । रस विषय आप जाण । पुढें ऐका सावधान । पृथ्वीचें रूप ॥ २० ॥ अहंकार प्राण घ्राण । गुद गंध विषय जाण । ऐसें केलें निरूपण । शास्त्रमतें ॥ २१ ॥

१. हात. २. मिश्रण. ३. पडताळे. ४. कोष्टक.

ऐसा हा सूक्ष्म देह । पाहतां होइजे निःसंदेह । येथें मन घालूनि पाहे । त्यासि हें उमजे ॥ २२ ॥ ऐसें सूक्ष्म देह बोलिलें । पुढें स्थूळ निरूपिलें । आकाश पंचगुणें वर्तलें । कैसें स्थूळीं ॥ २३ ॥ काम क्रोध शोक मोह भय । पंचविध आकाशाचा अन्वय[१] । पुढें पंचविध वायु । निरूपिला ॥ २४ ॥ चळण वळण प्रसरण । निरोध आणि आकुंचन । हें पंचविध लक्षण । प्रभंजनाचें[२] ॥ २५ ॥ क्षुधा तृषा आलस्य निद्रा मैथुन । हे तेजाचे पंचविध गुण । आतां पुढें आपलक्षण । निरूपिलें पाहिजे ॥ २६ ॥ शुक्र[३] शोणित[४] लाळ मूत्र स्वेद[५] । हा पंचविध आपाचा भेद । पुढें पृथ्वी विशद । केली पाहिजे ॥ २७ ॥ अस्थि मांस त्वचा नाडी रोम । हे पृथ्वीचे पंचविध धर्म । ऐसें स्थूळ देहाचें वर्म । बोलिलें असे ॥ २८ ॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश । हे पांचांचे पंचवीस । ऐसे मिळोनि स्थूळदेहास । बोलिजेतें ॥ २९ ॥ तिसरा देह कारण अज्ञान । चौथा देह महाकारण ज्ञान । हे चारी देह निरसितां विज्ञान । परब्रह्म तें ॥ ३० ॥ विचारें चौदेहां वेगळें केलें । मीपण तत्वासरिसें गेलें । अनन्य आत्मनिवेदन झालें । परब्रह्मीं ॥ ३१ ॥ विवेकें चुकला जन्ममृत्यु । नरदेहीं साधिलें महत्कृत्य । भक्तियोगें कृतकृत्य । सार्थक झालें ॥ ३२ ॥ इति श्रीपंचीकरण[६] । केलेंचि करावें विवरण । लोहाचें होतें सुवर्ण । परिसाचेनि योगें ॥ ३३ ॥ हाहि दृष्टांत घडेना । परिसाचेनि परिस करवेना । शरण जातां साधुजना । साधुचि होइजे ॥ ३४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तदशदशके तत्वविवरणनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. तनुचतुष्टय.

श्रीगणेशाय नमः ॥ स्थूळ सूक्ष्म कारण महाकारण । ऐसे हे चार देह जाण । जागृति स्वप्न सुषुप्ति[७] पूर्ण । तुर्या[८] जाणावी ॥ १ ॥ विश्व तैजस प्राज्ञ । प्रत्यगात्मा हे अभिमान । नेत्रस्थान कंठस्थान । हृदयस्थान मूर्धा[९] तो ॥ २ ॥ स्थूळ भोग प्रविविक्त[१०] भोग । आनंदभोग आनंदावभास[११] भोग । ऐसे

---

१. संबंध. २. वायूचें. ३. रेत. ४. रक्त. ५. घाम. ६. पंचभूतांचें मिश्रण. ७. झोंप. ८. समाधि. ९. मस्तक. १०. स्वप्नांतील भोग. ११. समाधींतील महानंद.

चारी भोग । चौदेहाचे ॥३॥ अकार उकार मकार । अर्ध मात्रा तो ईश्वर । ऐशा मात्रा चार । चौ देहांच्या ॥ ४ ॥ तमोगुण रजोगुण । सत्वगुण शुद्ध सत्वगुण । ऐसे हे चार गुण । चौदेहांचे ॥ ५ ॥ क्रियाशक्ति द्रव्यशक्ति । इच्छाशक्ति ज्ञानशक्ती । ऐशा ह्या चार शक्ती । चौदेहांच्या ॥ ६ ॥ ऐशीं हीं बत्तीस तत्वें । दोहींचीं पन्नास तत्वें । अवघीं मिळोन ब्यायशीं तत्वें । अज्ञान आणि ज्ञान ॥७॥ ऐशीं हीं तत्वें जाणावीं । जाणोन मायिक ओळखावीं । आपण साक्षी निरसावी । येणें रीतीं ॥ ८ ॥ साक्षी म्हणिजे तें ज्ञान । ज्ञानें ओळखावें अज्ञान । ज्ञानाज्ञानांचें निरसन । देहासरिसें ॥ ९ ॥ ब्रह्मांडीं देह कल्पिले । विराट हिरण्यगर्भ बोलिले । ते हे विवेकें निरासिले । आत्मज्ञानें ॥ १० ॥ आत्मानात्मविवेक पाहतां । सारासारविचार करितां । पंचभूतांची मायिक वार्ता । प्रचीत आली ॥ ११ ॥ अस्थि मांस त्वचा नाडी रोम । हे पांचहि पृथ्वीचे गुणधर्म । प्रत्यक्ष शरीरीं हें वर्म । शोधून पाहावें ॥ १२ ॥ शुक्र शोणित लाळ मूत्र स्वेद । हे आपाचे पंच भेद । तत्वें समजोन विशद । करून घ्यावीं ॥ १३ ॥ क्षुधा तृषा आलस्य निद्रा मैथुन । हे पांचहि तेजाचे गुण । या तत्वांचें निरूपण । केलेंचि करावें ॥ १४ ॥ चळण वळण प्रसरण । निरोधन आणि आकुंचन । हे पांचहि वायूचे गुण । श्रोतीं जाणावे ॥ १५ ॥ काम क्रोध शोक मोह भय । हा आकाशींचा पर्याय । हे विवारिल्याविणें काय । उमजों जाणे ॥ १६ ॥ असो ऐसें हें स्थूळ शरीर । पंचवीस तत्वांचा विस्तार । आतां सूक्ष्म देहाचा विचार । बोलिजेल ॥ १७ ॥ अंतःकरण मन बुद्धि चित्त अहंकार । आकाश पंचकाचा विचार । पुढें वायु निरुत्तर । होऊन ऐका ॥ १८ ॥ व्यान समान उदान । अपान आणि प्राण । ऐसे हे पांचहि गुण । वायुतत्त्वाचे ॥ १९ ॥ श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । हे पांचहि तेजाचे गुण । आतां आप सावधान । होऊन ऐका ॥२०॥ वाचा पाणि पाद शिश्न गुद । हे आपाचे गुण प्रसिद्ध । आतां पृथ्वी विशद । निरूपिली ॥ २१ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध । हे पृथ्वीचे गुण विशद । ऐसे हे पंचवीस तत्त्वभेद । सूक्ष्म देहाचे ॥ २२ ॥

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तदशदशके तनुचतुष्टयनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

———

## १०. सिद्ध.

श्रीगणेशाय नमः ॥ आवरणोदकीं[1] हाटकेश्वर[2] । त्यास न घडे नमस्कार । महिमा अत्यंतचि थोर । तया पाताळलिंगाचा ॥ १ ॥ परंतु तेथें जाववेना । शरीरें दर्शन घडेना । विवेकें आणावें अनुमाना । तया ईश्वरासी ॥ २ ॥ सातां समुद्रांचे वेढे । उदंड भूमि पैलीकडे । शेवटीं तुटले कडे । भूमंडळाचे ॥ ३ ॥ सात समुद्र वोलांडावे । तेथें जाणें कैसें फावे । म्हणोनि विवेकीं असावें । साधुजनें ॥ ४ ॥ जें आपणास नव्हे ठावें । तें जाणतयास पुसावें । मनोगतीनें फिरावें । हें तों घडेना ॥ ५ ॥ जें चर्मदृष्टीस नव्हे ठावें । तें ज्ञानदृष्टीनें पाहावें । ब्रह्मांड विवरोन राहावें । समाधानें ॥ ६ ॥ मध्यें आहे भूमीचें पडळ[3] । म्हणोन आकाश आणि पाताळ । तें पडळ नसतां अंतराळ । चहूंकडे ॥ ७ ॥ तयास परब्रह्म म्हणावें । जें उपाधीवेगळें स्वभावें । जेथें दृश्यमायेच्या नांवें । शून्याकार ॥ ८ ॥ दृष्टीचें देखणें दृश्य । मनाचें देखणें भास । मनातीत निराभास । विवेकें जाणावा ॥ ९ ॥ दृश्यभास अवघा बिघडे । विवेकी तेथें पहुडे[4] । भूमंडळीं ज्ञाते । थोडे सूक्ष्मदृष्टीचे ॥ १० ॥ वाच्यांश वाचेनें बोलावा । न बोलतां लक्ष्यांश जाणावा । निर्गुण अनुभवास आणावा । गुणाचेनि योगें ॥ ११ ॥ नाना गुणांस आहे नाश । निर्गुण तें अविनाश । ढोबळयाहून विशेष । सूक्ष्म देखणें ॥ १२ ॥ जें दृष्टीस न पडे ठावें । तें एकोन जाणावें । श्रवणमननें पडे ठावें । सकळ कांहीं ॥ १३ ॥ अष्टधेचे[5] जिन्नस नाना । उदंड पाहतां कळेना । अवघें सगट पिटावेना । कोणी एक ॥ १४ ॥ सगट सारिखी स्थिति झाली । तेथें परीक्षाच बुडाली । चवी नेणतां कालविली । नाना अन्नें ॥ १५ ॥ टोणपा नव्हे गुणग्राहक । मूर्खास कळेना विवेक । विवेक आणि अविवेक । एकचि म्हणती ॥ १६ ॥ उंच नीच कळेना ज्याला । तेथें अभ्यासचि बुडाला । नाना अभ्यासेंविण प्राणियाला । सुटका कैंची ॥ १७ ॥ वेड लागोन झाले ओंगळ । त्यांस सारिखेंच वाटे सकळ । ते जाणावे बाष्कळ । विवेकी नव्हेती ॥ १८ ॥ ज्यास अखंड होतो नाश । त्यासीच म्हणती अविनाश । बहूचें[6]-

१. पृथ्वीला उदकाचें जें आवरण आहे, त्यांत. २. पाताळांतील एक शिवाचें स्थान. ३. पडदा. ४. विसांवा घेतो. ५. अष्टधा प्रकृतीचे. ६. वाचाळ.

कीच्या लोकांस । काय म्हणावें ॥ १९ ॥ ईश्वरें नाना भेद केले । भेदें सकळ सृष्टि चाले । आंधळे परीक्षवंत मिळाले । तेथें परीक्षा कैंची ॥ २० ॥ जेथें परीक्षेचा अभाव । तो टोणपा समुदाव । गुणचि नाहीं गौरव[1] । येईल कैंचें ॥ २१ ॥ खरें खोटें एकचि झालें । तरी विवेकानें काय केलें । असार सांडून सार घेतलें । साधुजनीं ॥ २२ ॥ उत्तम वस्तूची परीक्षा । कैसी घडे नतद्रक्षा[2] । दीक्षाहीनापाशीं दीक्षा । येईल कैंची ॥ २३ ॥ आपलेन वोंगळपणें । दिशा[3] करून शौच नेणे । वेदशास्त्रें पुराणें । त्यास काय कारिती ॥ २४ ॥ आधीं राखावा आचार । मग पाहावा विचार । आचार विचारें पैलपार । पाविजेतो ॥ २५ ॥ जें नेमकास न कळे । तें बाष्कळास केवीं कळे । डोळस ठकती आंधळे । कोण्या कामाचे ॥ २६ ॥ पाप पुण्य स्वर्ग नरक । अवघेंचि मानिलें एक । विवेक आणि अविवेक । काय मानावे ॥ २७ ॥ अमृत विष एक म्हणती । परी विष घेतां प्राण जाती । कुकर्में होते फजिती । सत्कर्में कीर्ति वाढे ॥ २८ ॥ इहलोक आणि परलोक । जेथें नाहीं साकल्यविवेक । तेथें अवघें निरर्थक । सकळ कांहीं ॥ २९ ॥ म्हणोनि सत्संगेंचि जावें । वेदशास्त्रचि श्रवण करावें । उत्तम गुणास अभ्यासावें । नाना प्रयत्नें ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके सिद्धनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी २९७.

---

# दशक अठरावा.

## १. बहु देवस्थान[4].

श्रीगणेशाय नमः ॥ तुज नमूं गजवदना । तुझा महिमाहि कळेना । विद्या बुद्धि देसी जनां । लहान थोरांसी ॥ १ ॥ तुज नमूं सरस्वती । चारी वाचा तुझेनि स्फूर्ती । तुझें निजस्वरूप जाणती । ऐसे थोडे ॥ २ ॥ धन्य धन्य चतुरानना[5] । त्वां केली सृष्टिरचना । वेद शास्त्रां भेद नाना । प्रगट केले ॥ ३ ॥ धन्य विष्णु पालन करिसी । एकांशें सकळ जीवांसी । वाढ-

---

१. महत्त्व. २. भिकान्यास. ३. शौचविधि. ४. पुष्कळ देवस्थानें. ५. ब्रह्मदेवा.

त्रिशी वर्तविशी । जाणजाणों ॥ ४ ॥ धन्य धन्य भोळा शंकर । जयाच्या देण्यास नाहीं पार । रामनाम निरंतर । जपत आहे ॥ ५ ॥ धन्य धन्य इंद्रदेव । सकळ देवांचाहि देव । इंद्रलोकींचें वैभव । काय म्हणोन सांगावें ॥ ६ ॥ धन्य धन्य यमधर्म । सकळ जाणती धर्माधर्म । प्राणिमात्राचें वर्म । ठायीं पाडिती ॥ ७ ॥ त्र्यंकटेशीं महिमा किती । भले उभ्यां अन्न खाती । वडे घिरडीं स्वाद घेती । आतळेस[1] अंपालांचा[2] ॥ ८ ॥ धन्य तूं वो बनशंकरी । उदंड शाकांचिया हारी । विवराविवरों भोजन करी । ऐसा कैंचा ॥ ९ ॥ धन्य भीम गोलांगुळा[3] । कोरवड्यांच्या उदंड माळा । दहीं वडे खातां सकळां । समाधान होय ॥ १० ॥ धन्य तूं गा खंडेराया । भंडोर होय पिंवळी काया । कांदे भरीत रोडगे खाया । सिद्ध होती ॥ ११ ॥ धन्य तुळजा भवानी । भक्तांस प्रसन्न होते जनीं । गुणवैभवास गणी । ऐसा कैंचा ॥ १२ ॥ धन्य धन्य पांडुरंगा । अखंड कथेचा होतो धिंगा[4] । तान मान राग रंगा । नाना प्रकारीं ॥ १३ ॥ धन्य तूं गा क्षेत्रपाळा । उदंड जनां लाविला चाळा । भावें भक्ति कारितां फळा । वेळ नाहीं ॥ १४ ॥ रामकृष्णादिक अवतार । त्यांचा महिमा अपार । उपासनेस बहुत नर । तत्पर झाले ॥ १५ ॥ सकळ देवांचें मूळ । तो हा अंतरात्माचि केवळ । भूमंडळीं भोग सकळ । त्यासीचि घडे ॥ १६ ॥ नाना देव होऊन बैसला । नाना शक्तिरूपें झाला । भोक्ता सकळ वैभवाला । तोचि एक ॥ १७ ॥ याचा पाहतां विचार । उदंड लांबला जोजार । होती जाती देव नर । किती म्हणोनी ॥ १८ ॥ कीर्ति आणि अपकीर्ती । उदंड निंदा उदंड स्तुती । सर्वत्रांची भोगप्राप्ती । अंतरात्म्यासचि घडे ॥ १९ ॥ कोणे देहीं काय करितो । कोणे देहीं काय भोगितो । भोगी त्यागी वीतरागी तो । एकचि आत्मा ॥ २० ॥ प्राणी साभिमानें भुलले । देहाकडे पाहत गेले । मुख्य अंतरात्म्यास चुकले । अंतरीं असोनी ॥ २१ ॥ अरे या आत्म्याची चळवळ पाहे । ऐसा भूमंडळीं कोण आहे । अगाध पुण्यें अनुसंधान राहे । कांहीं एक ॥ २२ ॥ त्या अनुसंधानासारिसें । जळोन जाइजे किल्बिषें[5] । अंतर्निष्ठ ज्ञानी ऐसें । विवरोन पाहती ॥ २३ ॥ अंतर्निष्ठ तितुके तरले । अंतर्भ्रष्ट तितुके बुडाले । बाह्यात्कारें भरंगळले । लोकाचारें

---

१. एक पक्वान्न. २. उडदाचे पिठाच्या वड्या. ३. हनुमंता. ४. गजर. ५. पापें.

॥ २४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टादशदशके बहुदेवस्थाननिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

## २. सर्वज्ञसंग.

श्रीगणेशाय नमः ॥ नेणपणें झालें तें झालें । झालें तें होऊनि गेलें । जाणतेपणें वर्तलें । पाहिजे नेमस्त ॥ १ ॥ जाणत्याची संगति धरावी । जाणत्याची सेवा करावी । जाणत्याची सद्बुद्धि घ्यावी । हळुहळू ॥ २ ॥ जाणत्यापाशीं लिहों शिकावें । जाणत्यापाशीं वाचों शिकावें । जाणत्यापाशीं पुसावें । सकळ कांहीं ॥३॥ जाणत्यास करावे उपकार । जाणत्या ऐसें झिजवावें शरीर । जाणत्याचा पाहावा विचार । कैसा आहे॥४॥ जाणत्याचे संगतीनें भजावें । जाणत्याचे संगतीनें झिजावें । जाणत्याचे संगतीनें रिझावें । विवरविवरों ॥ ५ ॥ जाणत्यापाशीं गावें गाणें । जाणत्यापाशीं वाजवणें । नाना आलाप शिकणें । जाणत्यापाशीं ॥६॥ जाणत्याच्या कांसेस लागावें । जाणत्याचें औषध घ्यावें । जाणता सांगेल तें करावें । पथ्य आधीं ॥ ७ ॥ जाणत्यापाशीं परीक्षा शिकणें । जाणत्यापाशीं तालीम करणें । जाणत्यापाशीं पोहणें । अभ्यासावें ॥ ८ ॥ जाणता बोलेल तैसें बोलावें । जाणता सांगेल तैसें चालावें । जाणत्याचें ध्यान ध्यावें । नाना प्रकारीं ॥ ९ ॥ जाणत्याच्या कथा शिकाव्या । जाणत्याच्या युक्ति समजाव्या । जाणत्याच्या गोष्टी विचाराव्या । सकळ कांहीं ॥ १० ॥ जाणत्याचे पेंच[1] जाणावे । जाणत्याचे पीळ उकलावे । जाणता राखेल तैसे राखावे । लोक राजी ॥ ११ ॥ जाणत्याचे जाणावे प्रसंग । जाणत्याचे घ्यावे रंग[2] । जाणत्याचे स्फूर्तीचे तरंग । अभ्यासावे ॥ १२ ॥ जाणत्याचा साक्षेप[3] घ्यावा । जाणत्याचा तर्क जाणावा । जाणत्याचा उल्लेख[4] समजावा । न बोलतांची ॥ १३ ॥ जाणत्याचें धूर्तपण । जाणत्याचें राजकारण । जाणत्याचें निरूपण । ऐकत जावें ॥ १४ ॥ जाणत्याचीं कवित्वें[4] शिकावीं । गद्य पद्यें ओळखावीं । माधुर्य वचनें समजावीं । अंतर्यामीं ॥ १५ ॥ जाणत्याचे पाहावे प्रबंध । जाणत्याचे वचनभेद[5] । जाणत्याचे नाना संवाद । बरे शोधावे ॥१६॥ जाणत्याची तीक्ष्णता ।

---

१. कौशल्य. २. प्रयत्न. ३. अभिप्राय. ४. कविता. ५. वाक्चातुर्य.

जाणत्याची सहिष्णुता[1] । जाणत्याची उदारता । समजोन घ्यावी ॥ १७ ॥ जाणत्याची नाना कल्पना । जाणत्याची दीर्घसूचना[2] । जाणत्याची विवंचना समजोन घ्यावी ॥ १८ ॥ जाणत्याचा काळ सार्थक । जाणत्याचा अध्यात्मविवेक । जाणत्याचे गुण अनेक । अवघेच घ्यावे ॥ १९ ॥ जाणत्याचा भक्तिमार्ग । जाणत्याचा वैराग्ययोग । जाणत्याचा अवघा प्रसंग । समजोन घ्यावा ॥ २० ॥ जाणत्याचें पाहावें ज्ञान । जाणत्याचें शिकावें ध्यान । जाणत्याचें सूक्ष्म चिन्ह । समजोन घ्यावें ॥ २१ ॥ जाणत्याचें अलिप्तपण । जाणत्याचें विदेहलक्षण[3] । जाणत्याचें ब्रह्मविवरण । समजोन घ्यावें ॥ २२ ॥ जाणता एक अंतरात्मा । त्याचा काय सांगावा महिमा । विद्या कळा गुणसीमा । कोणें करावी ॥ २३ ॥ परमेश्वराचे गुणानुवाद । अखंड करावा गुणसंवाद । तेणें करितां आनंद । उदंड होतो ॥ २४ ॥ परमेश्वरें निर्मिलें तें । अखंड दृष्टीस पडतें । विवरविवरों समजावें तें । विवेकी जनीं ॥२५॥ जितुकें कांहीं निर्माण झालें । तितुकें जगदीश्वरें निर्मिलें । निर्माण वेगळें समजलें । पाहिजे आधीं ॥ २६ ॥ तो निर्माण करितो जनां । परी पाहों जातां दिसेना । विवेकबळें अनुमाना । आणीत जावें ॥ २७ ॥ त्याचें अखंड लागतां ध्यान । कृपाळूपणें देतो दर्शन । सर्वकाळ संभाषण । तद्दर्शींचि[4] करावें ॥ २८ ॥ ध्यान धरीना तो अभक्त । ध्यान धरील तो भक्त । संसारापासून तो मुक्त । भक्तांस करी ॥ २९ ॥ उपासनेचे शेवटीं । देवां भक्तां अखंड भेटी । अनुभवी जाणेल गोष्टी । प्रत्ययाची ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टादशदशके सर्वज्ञसंगनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. निस्पृह.

श्रीगणेशाय नमः ॥ दुर्लभ शरीरीं दुर्लभ आयुष्य । याचा करूं नये नाश । दास म्हणे सावकाश । विवेक पाहावा ॥ १ ॥ न पाहतां उत्तम विवेक । अवघा होतो अविवेक । अविवेकें प्राणी रंक । ऐसा दिसे ॥ २ ॥ हें आपलें आपण केलें । आळसें उदास नागविलें । वाईट संगतीनें बुड-

---

१. सहनशीलता. २. दूरदृष्टि. ३. देहाभिमान नसणें. ४. त्यासंबंधींच.

विलें। देखत देखतां ॥ ३ ॥ मूर्खपणाचा अभ्यास केला। बाष्कळपणें बातला घाला। काम चांडाळ उठिला। तरुणपणीं ॥ ४ ॥ मूर्ख आळसी आणि तरुणा। सर्वांविषयीं दैन्यवाणा। कांहीं मिळेना कोणा। काय म्हणावें ॥ ५ ॥ जें जें पाहिजे तें तें नाहीं। अन्न वस्त्र तेंहि नाहीं। उत्तम गुण कांहींच नाहीं। अंतर्यामीं ॥ ६ ॥ बोलतां येइना बैसतां येइना। प्रसंग कांहींच कळेना। शरीर मन हें वळेना। अभ्यासाकडे ॥ ७ ॥ लिहिणें नाहीं वाचणें नाहीं। पुसणें नाहीं सांगणें नाहीं। नेमस्तपणाचा अभ्यास नाहीं। बाष्कळपणें ॥ ८ ॥ आपणास कांहींच येईना। आणि शिकविलेंहि मानेना। आपण वेडा आणि सज्जना। बोल ठेवी ॥ ९ ॥ अंतरीं एक बाहेरीं एक। ऐसा जयाचा दंडक[1]। परलोकाचें सार्थक। कैसें घडे ॥ १० ॥ आपला संसार नासला। मनामध्यें पस्तावला। तरी मग अभ्यास केला। पाहिजे विवेकाचा ॥ ११ ॥ एकाग्र करूनियां मन। बळेंच धरावें साधन। यत्नीं आळसाचें दर्शन। होऊंच नये ॥ १२ ॥ अवगुण अवघेचि सांडावे। उत्तम गुण अभ्यासावे। प्रबंध पाठ करीत जावे। जाड अर्थें ॥ १३ ॥ पदप्रबंध श्लोकप्रबंध। नाना धाटी मुद्रा छंद। प्रसंगज्ञानेंचि आनंद। होत आहे ॥ १४ ॥ कोणे प्रसंगीं काय म्हणावें। ऐसें समजोन जाणावें। उगेंच वाउगें शिणावें। कासयासी ॥ १५ ॥ दुसऱ्याचें अंतर जाणावें। आदर देखोन म्हणावें। जें आठवेल तें गावें। तेंचि मूर्खपण ॥ १६ ॥ ज्याची जैशी उपासना। तेंचि गावें चुकावें ना। रागज्ञान तालज्ञाना। अभ्यासावें ॥ १७ ॥ साहित्य संगीत प्रसंगमानें। करावीं कथेचीं घमशानें[2]। अर्थांतर श्रवण मननें। काढीत जावें ॥ १८ ॥ पाठ उदंडचि असावें। सर्वकाळ उजळीत जावें। सांगीतले गोष्टीचें असावें। स्मरण अंतरीं ॥ १९ ॥ अखंड एकांत सेवावा। ग्रंथमात्र धांडोळावा। प्रतीत येईल तो घ्यावा। अर्थ मनीं ॥ २० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टादशदशके निस्पृहनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. देहदुर्लभता.

श्रीगणेशाय नमः ॥ देहाकारितां[3] गणेशपूजन। देहाकारितां शारदा[4]-वंदन।

---

१. वागणूक. २. लयलूट. ३. देहाच्या अस्तित्वावर. ४. सरस्वती.

देहाकारितां गुरु सज्जन । संत श्रोते ॥ १ ॥ देहाकारितां कवित्वें चालती । देहाकारितां अध्ययनें करिती । देहाकारितां अभ्यासिती । नाना विद्या ॥२॥ देहाकारितां ग्रंथलेखन । नाना लिपी वोळखण । नाना पदार्थ शोधन । देहाकारितां ॥ ३ ॥ देहाकारितां महाज्ञानी । सिद्ध साधु ऋषि मुनी । देहाकारितां तीर्थाटणीं । फिरती प्राणी ॥४॥ देहाकारितां श्रवण घडे । देहाकारितां मननीं पवाडे । देहाकारितां देहीं आतुडे[1] । परमात्मा ॥५॥ देहाकारितां कर्ममार्ग । देहाकारितां उपासनामार्ग । देहाकरितां ज्ञानमार्ग । भूमंडळीं ॥६॥ योगी वीतरागी[2] तापसी । देहाकारितां नाना सायासी । देहाकारितां आत्मयासी । प्रगटणें घडे ॥७॥ इह लोक आणि परलोक । देहाकारितां सकळ सार्थक । देहाविण निरर्थक । सकळ कांहीं ॥८॥ पुरश्चरणें अनुष्ठानें । गोरांजनें[3] धूम्रपानें । शीतोष्ण पंचाग्निसाधनें । देहाकारितां ॥ ९ ॥ देहाकारितां पुण्यशीळ । देहाकारितां पापी केवळ । देहाकारितां अनर्गळ[4] । शुचिष्मंत[5] ॥ १० ॥ देहाकारितां अवतारी । देहाकारितां वेषधारी । नाना बंडें पाषांडें करी । देहाकरितां ॥ ११ ॥ देहाकारितां विषयभोग । देहाकारितां सकळ त्याग । होती जाती नाना रोग । देहाकारितां ॥१२॥ देहाकारितां नवविधाभक्ती[6] । देहाकारितां चतुर्विधामुक्ती[6] । देहाकारितां नाना युक्ती । नाना मतें ॥ १३ ॥ देहाकारितां दान धर्म । देहाकारितां नाना वर्म । देहाकारितां पूर्वकर्म । म्हणती जनीं ॥१४॥ देहाकारितां नाना स्वार्थ । देहाकारितां नाना अर्थ । देहाकारितां होइजे व्यर्थ । आणि धन्य ॥ १५ ॥ देहाकारितां नाना कळा । देहाकारितां उणा आगळा । देहाकारितां जिव्हाळा । भक्तिमार्गाचा ॥ १६ ॥ नाना सन्मार्ग साधनें । देहाकारितां तुटती बंधनें । देहाकारितां निवेदनें । मोक्ष लाभे ॥ १७ ॥ देह सकळांमध्यें उत्तम । देहीं राहिला आत्माराम । सकळां घटीं पुरुषोत्तम । विवेकी जाणती ॥१८॥ देहाकारितां नाना कीर्ती । अथवा नाना अपकीर्ती । देहाकारितां होती जाती । अवतारमालिका ॥ १९ ॥ देहाकारितां नाना श्रम । देहाकारितां नाना संभ्रम[7] । देहाचेनि उत्तमोत्तम । भोगिती पदें ॥२०॥ देहाकारितां सकळ कांहीं । देहाविण कांहीं नाहीं । आत्मा विरे ठायींचा

१. प्राप्त होतो. २. वैराग्यशील. ३. भगवत्प्रीत्यर्थ आपणास जाळून घेणें. ४. आचारशून्य. ५. सदाचारी. ६. दशक ४ पहा. ७. समारंभ.

ठायीं । नव्हता जैसा ॥ २१ ॥ देह परलोकींचें तारूं । नाना गुणाचा आगरू[1] । नाना रत्नांचा विचारू । देहाचेनी ॥२२॥ देहाचेनि गायनकळा । देहाचेनि संगीतकळा । देहाचेनि अंतर्कळा । ठायीं पडे ॥ २३ ॥ देह ब्रह्मांडाचें फळ । देह दुर्लभचि केवळ । परि देहास निवळ । उमजवावें ॥ २४ ॥ देहाकारितां लाहान थोर । कारिती आपुलाले व्यापार । त्यांहीमध्यें लहान थोर । कितीएक ॥ २५ ॥ जे जे देह धरोन आले । ते ते कांहीं करून गेले । हरिभजनें पावन झाले । किती[5] ॥ २६ ॥ अष्टधा प्रकृतीचें मूळ । संकल्परूप[2]चि केवळ । नाना संकल्प[3] देहफळ । घेऊनि आले ॥ २७ ॥ हरिसंकल्प[4] मुळीं होता । तोचि फळीं पाहावा आतां । नाना देहांतरीं तत्वता । शोधितां कळे ॥ २८ ॥ वेलाचे मुळीं बीज । उदकरूप वेली समज । पुढें फळामध्यें बीज । मुळींच्या अंशें ॥ २९ ॥ मुळाकारितां फळ येतें । फळाकारितां मूळ होतें । येणें रीती होत जातें । भूमंडळ ॥३०॥ असो कांहींएक करणें । कैसें घडे देहाविणें । देह सार्थकीं लावणें । म्हणिजे बरें ॥ ३१ ॥ आत्म्याकारितां देह झाला । देहाकारितां आत्मा तगला । उभययोगें उदंड चालिला । कार्यभाग ॥३२॥ चोरून गुप्तरूपें करावें । तें आत्मयास पडे ठावें । कर्तृत्व याचेनि स्वभावें । सकळ कांहीं ॥ ३३ ॥ देहामध्यें आत्मा असतो । देह पूजितां आत्मा तोषतो । देह पीडितां आत्मा क्षोभतो । प्रत्यक्ष आतां ॥ ३४ ॥ देहावेगळी पूजा पावेना । देहाविण पूजा फावेना । जनीं जनार्दन म्हणोनि जनां । संतुष्ट करावें ॥ ३५ ॥ उदंड प्रगटला विचार । धर्मस्थापना तदनंतर । जेथें पूजेसि अधिकार । पुण्यशरीरीं ॥ ३६ ॥ सगट भजन करूं येतें । परी मूर्खपण अंगीं लागतें । गाढवास पूजितां कळतें । काय त्याला ॥३७॥ पूज्य पूजेसि अधिकार । उगेचि तोषवावे इतर । दुखवूं नये कोणाचें अंतर । म्हणिजे बरें ॥३८॥ सकळ जगदंतरींचा देव । क्षोभतां राहावया कैंचा ठाव । जनांवेगळा जनांस उपाव । आणिक नाहीं ॥ ३९ ॥ परमेश्वराचे अनंत गुण । मनुष्यें काय सांगावी खुण । परंतु अध्यात्मग्रंथश्रवण । होतां उमजे ॥ ४० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टादशदशके देहदुर्लभतानिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

१. खाण. २. स्फूर्तिरूप. ३. वासनेमुळें. ४. ईश्वरसंकल्प. ५. महात्मे.

## ५. करंटपरीक्षा.

श्रीगणेशाय नमः ॥ धान्य उदंड मोजिलें । परी त्या मापें नाहीं भक्षिलें । विवरिल्याविण तैसें झालें । प्राणियासी ॥ १ ॥ पाठ म्हणतां आवरेना । पुसतां कांहींच कळेना । अनुभव पहतां अनुमाना-। मध्यें पडे ॥ २ ॥ शब्दरत्नें परीक्षावीं । प्रत्ययाचीं पाहोन घ्यावीं । येर तीं अवघीं सांडावीं । एकीकडे ॥ ३ ॥ नांव रूप अवघें सांडावें । मग अनुभवास मांडावें । सार असार एकचि करावें । हें मूर्खपण ॥४॥ लेखकें[१] कुशळ समजावें । किंवा उगेंचि वाचावें । येणें दृष्टांतें समजावें । कांहीं तरी ॥ ५ ॥ जेथें नाहीं समजावीस[२] । तेथें अवघी कुसमुस । पुसों जातां वसवस । वक्ता करी ॥ ६ ॥ नाना शब्द एकवटिले । प्रचीतीवीण उपाव केले । परी ते अवघे व्यर्थ गेले । फेंडप्रसंगीं[३] ॥ ७ ॥ पसेवरी वैरण[४] घातलें । तांतडीनें जातें चोढिलें । तेणें पीठ बारीक आलें । हें तों घडेना ॥ ८ ॥ घासामागें घास घेतला । आवकाश नाहीं चावायाला । अवघा बोकणा भारिला । पुढें कैसें ॥ ९ ॥ फेंडाणिशीचें[५] लक्षण । विरंगें[६] जाऊं नेदी क्षण । समस्तांचें अंतःकरण । सांभाळीत जावें ॥ १० ॥ सूक्ष्मनामें सुखें घ्यावीं । तितुकीं रूपें ओळखावीं । ओळखोन समजवावीं । श्रोतयांस ॥ ११ ॥ समस्या[७] पुरतां सुखी होती । श्रोते अवघे आनंदती । अवघे क्षणक्षणां वंदिती । गोसावियासी ॥ १२ ॥ समस्यां पुरतां वंदिती । समस्यां न पुरतां निंदिती । गोसावी चिणचिण करिती । कोण्या हिशेबें ॥ १३ ॥ शुद्ध सोनें पाहून घ्यावें । कसीं लाऊनि तावावें । श्रवण मननें जाणावें । प्रत्ययासी ॥ १४ ॥ वैद्याची प्रचीती येईना । व्यथा परती होईना । आणि रागेजावें जाणा । कोण्या हिशेबें ॥१५॥ खोटें कोठेंचि चालेना । खोटें कोणास मानेना । या कारणें अनुमाना । खरें आणावें ॥ १६ ॥ लिहिणें न येतां व्यापार केला । कांहींएक दिवस चालिला । पुसता सुरनिसं[८] भेटला । तेव्हां खोटें ॥ १७ ॥ सर्व अवघें हिशेबीं ठावें । प्रत्ययसाक्षीनें बोलावें । मग सुरनिसें काय करावें । सांगाना कां ॥ १८ ॥ स्वयें आपणाचि गुंते । समजावीस कैसी होते । नेणतां कोणीएक

---

१. पत्रानें. २. समजूत. ३. चारचौघांत. ४. जात्याचे तोंडचें भरडण. ५. लोकनाकत्वाचें. ६. रिकामा. ७. गूढ प्रश्न. ८. हिशोब तपासणारा अंमलदार.

ते । आपदां लागती ॥ १९ ॥ बळाविण युद्धास गेला । तो सर्वस्वें नागवला । शब्द ठेवावा कोणाला । कोण कैसा ॥ २० ॥ जें प्रचीतीस आलें खरें । तेंचि घ्यावें अत्यादरें । अनुभवाविण जीं उत्तरें । तीं फलकटें जाणावीं ॥२१॥ शिकवूं जातां राग चढे । परंतु पुढें अद्दल घडे । खोटा निश्चय तात्काळ उडे । लोकांमध्यें ॥२२॥ खरें सांडून खोटें घेणें । बकध्यानासि काय उणें । त्रिभुवनीं नारायणें । न्याय केला ॥२३॥ तो न्याय सोडितां शेवटीं । अवघें जगाचि लागे पाठीं । जनीं भांडभांडोनि हिंपुटी । किती व्हावें ॥२४॥ अन्याय बहुतांस पुरवले । हें देखिलें ना ऐकलें । वेडें उगेंच भरीं भरलें । असत्याचे ॥ २५ ॥ असत्य म्हणिजे तेंचि पाप । सत्य म्हणिजे स्वरूप । दोहोंमध्यें साक्षेप । कोणाचा करावा ॥ २६ ॥ मायेमध्यें बोलणें चालणें साचें । माया नसतां बोलणें कैंचें । या कारणें निःशब्दाचें । मूळ शोधावें ॥ २७ ॥ वाच्यांश जाणोन सांडावा । लक्ष्यांश विवरोन घ्यावा । या कारणें निःशब्दमूळाचा गोवा । आढळेना ॥ २८ ॥ अष्टधा प्रकृति पूर्वपक्ष । सांडून अलक्षीं लावावें लक्ष । मननशीळ परम दक्ष । तोचि जाणे ॥ २९ ॥ नाना भूस आणि कण । एकचि म्हणणें अप्रमाण । रस सांडून चोइटिया कोण । शाहणा सेवी ॥ ३० ॥ पिंडीं नित्यानित्यविवेक । ब्रह्मांडीं सारासार अनेक । सकळ शोधूनियां एक । सार घ्यावें ॥ ३१ ॥ मायेकारितां कोणी एक । अन्वय आणि व्यतिरेक । ते माया नसतां विवेक । कैसा करावा ॥ ३२ ॥ तत्वें तत्व शोधावें । महावाक्यीं प्रवेशावें । आत्मनिवेदनें पावावें । समाधान ॥ ३३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टादशदशके करंटपरीक्षानिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. उत्तम पुरुष.

श्रीगणेशाय नमः ॥ नाना वस्त्रें नाना भूषणें । येणें शरीर शृंगारणें । विवेकें विचारें राजकारणें । अंतर शृंगारिजे ॥ १ ॥ शरीर सुंदर सतेज । वस्त्रें भूषणें केलें सज्ज । अंतरीं नसतां चातुर्यबीज । कदापि शोभा न पा-

१. हाल भोगतात. २. ढोंगास. ३. कष्टी. ४. शब्दातीत ब्रम्हाचें. ५. भ्रम, गोंधळ. ६. निरास पावणारी. ७. ब्रह्माचे ठिकाणीं. ८. हा समास शिवाजी महाराजांस अनुलक्षून लिहिला आहे.

विजे ॥ २ ॥ तुंदे[1] हेकोड[2] कठोरवचनी । अखंड बोले साभिमानी । न्याय नीति अंतःकरणीं । घेणार नाहीं ॥ ३ ॥ तर्‍ही[3] शीघ्रकोपी सदा । कदापि न धरी मर्यादा । राजकारण संवादा । मिळोंच नेणे ॥ ४ ॥ ऐसे लौंद[4] बेइमानी । कदापि सत्य नाहीं वचनीं । पापी अपस्मार[5] जनीं । राक्षस जाणावे ॥ ५ ॥ समयासारिखा समय येइना । नेम सहसा चालेना । नेम धरितां राजकारणा । अंतर पडे ॥६॥ अति सर्वत्र वर्जावें । प्रसंग पाहोन चालावें । हटनिग्रहीं न पडावें । विवेकी पुरुषें ॥ ७ ॥ बहुतचि करितां हट । तेथें येऊन पडले तट । कोणी एकाचा शेवट । झाला पाहिजे ॥ ८ ॥ बरें ईश्वर आहे साभिमानी । विशेष तुळजा भवानी । परंतु विचार पाहोनी । कार्य करणें ॥ ९ ॥ अखंडचि सावधाना । बहुत काय करावी सूचना । परंतु कांहींएक अनुमाना । आणिलें पाहिजे ॥ १० ॥ समर्थापाशीं बहुत जन । राहिला पाहिजे साभिमान । निश्चळ करूनियां मन । लोक असती ॥११॥ म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुतां दिवसांचें माजलें बंड । या कारणें अखंड । सावधान असावें ॥ १२ ॥ सकळ कर्ता तो ईश्वर । तेणें केला अंगिकार । तया पुरुषाचा विचार । विरळा जाणे ॥ १३ ॥ न्याय नीति विवेक विचार । नाना प्रसंग प्रकार । परीक्षणें परांतर । देणें ईश्वराचें ॥ १४ ॥ महायत्न सावधपणें । समयीं धारिष्ट धरणें । अद्भुतचि कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥ १५ ॥ यश कीर्ति प्रताप महिमा । उत्तम गुणांसि नाहीं सीमा । नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ॥ १६ ॥ देव ब्राह्मण आचार विचार । कितीक जनांस आधार । सदा घडे परोपकार । देणें ईश्वराचें ॥ १७ ॥ इहलोक परलोक पाहणें । अखंड सावधपणें राहणें । बहुत जनांचें साहणें । देणें ईश्वराचें ॥ १८ ॥ देवाचा कैंपक्ष[6] घेणें । ब्राह्मणाची चिंता वाहणें । बहुत जनांस पाळणें । देणें ईश्वराचें ॥ १९ ॥ धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार । झाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ २० ॥ उत्तम गुणांचा ग्राहक । तर्क तीक्ष्ण विवेक । धर्मस्थापना पुण्यश्लोक[7] । देणें ईश्वराचें ॥२१॥ सकळ गुणांमध्यें सार । तजविजा विवेक विचार । जेणें पाविजे पैलपार ।

---

१. मस्त. २. एककली. ३. तर्‍हेवाईक. ४. दांडगे. ५. दुःखदायक. ६. कैवार. ७. पुण्यकारक कीर्ति.

अरत्रपरत्रींचा ॥ २२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टादशदशके उत्तमपुरुषनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. जनस्वभाव.

श्रीगणेशाय नमः ॥ जनाचा लालुची स्वभाव । आरंभींच म्हणती देव । म्हणजे मजला कांहीं देईल देव । ऐशी वासना ॥ १ ॥ कांहींच भक्ति केली नसतां । आणि इच्छिती प्रसन्नता । जैसें कांहींच सेवा न करितां । स्वामीस मागती ॥ २ ॥ कष्टेंविण फळ नाहीं । कष्टेंविण राज्य नाहीं । केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं ॥ ३ ॥ आळसें काम नासतें । हें तों प्रत्ययास येतें । कष्टाकडे चुकवितें । हीन जन ॥ ४ ॥ आधीं कष्टाचें दुःख सोसिती । ते सुखाचें फळ भोगिती । आधीं आळसें सुखावती । त्यांसि पुढें दुःख ॥ ५ ॥ इहलोक अथवा परलोक । दोहींकडे सारखाच विवेक । दीर्घसूचनेचें कौतुक । कळलें पाहिजे ॥ ६ ॥ मेळविती तितुकें भक्षिती । ते कठिण काळीं मरोन जाती । दीर्घसूचनेनें वर्तती । तेचि भले ॥७॥ इहलोकींचा संचितार्थ । परलोकींचा परमार्थ । संचितेंविण व्यर्थ । जितेचि मेले ॥ ८ ॥ एकदां मेल्यानें सुटेना । पुनः जन्मोजन्मीं यातना । आपणास मारी वांचवीना । तो आत्महत्यारा ॥ ९ ॥ प्रतिजन्मीं आत्मघात । कोणीं करावें गणित । या कारणें जन्म मृत्यु । केवीं चुके ॥ १० ॥ देव सकळ कांहीं करितो । ऐसें प्राणिमात्र बोलतो । याचे भेटीचा लाभ तो । अकस्मात् झाला ॥ ११ विवेकाचा लाभ घडे । जेणें परमात्मा ठायीं पडे । विवेक पाहतां सांपडे । विवेकी जनीं ॥ १२ ॥ देव पाहतां आहे एक । परंतु करितो अनेक । त्या अनेकांस ऐक[3] । म्हणों नये कीं ॥ १३ ॥ देवाचें कर्तृत्व आणि देव । कळला पाहिजे अभिप्राव । कळल्याविण कित्येक जीव । उगेच बोलती ॥ १४ ॥ उगेच बोलती मूर्खपणें । शहाणपण वाढवावयाकारणें । तृप्तीलागीं उपाव करणें । ऐसें झालें ॥ १५ ॥ जिहीं उदंड कष्ट केले । ते भाग्य भोगून गेले । येर ते बोलताचि राहिले । करंटे जन ॥ १६ ॥ करंट्याचें करंटलक्षण । समजोन जाती विचक्षण[4] । भल्याचें उत्तम लक्षण । करंट्यास

---

१. इहपरलोकीं. २. दूरदृष्टीचें. ३. देव. ४. चतुर.

कळेना ॥ १७ ॥ त्याची पैसावली कुबुद्धी । तेथें कैंची असेल शुद्धी । कुबुद्धी तेचि सुबुद्धी । ऐशी वाटे ॥ १८ ॥ मनुष्यें शुद्धीस सांडावें । त्याचें काय खरें मानावें । तेथें विचाराच्या नांवें । शून्याकार ॥ १९ ॥ विचारें इहलोक परलोक । विचारें होतसे सार्थक । विचारें नित्यानित्य विवेक । पाहिला पाहिजे ॥ २० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टादशदशके जनस्वभावनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. अंतर्देव.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्रह्म निराकार निश्चळ । आत्मा सविकार चंचळ । तयास म्हणती सकळ । देव ऐसें ॥ १ ॥ देवाचा ठावचि लागेना । एक देव नेमस्त कळेना । बहुत देवीं अनुमानेना । एक देव ॥ २ ॥ म्हणोनि विचार असावा । विचारें देव शोधावा । बहुत देवांचा गोवा[1] । पडोंच नये ॥ ३ ॥ देव क्षेत्रीं पाहिला । त्यासारिखा धातूचा केला । पृथ्वीमध्यें दंडक[2] चालिला । येणें रीती ॥ ४ ॥ नाना प्रतिमादेवांचें मूळ । तो हा क्षेत्रदेवचि केवळ । नाना क्षेत्रें भूमंडळ । शोधून पाहावें ॥ ५ ॥ क्षेत्रदेव पाषाणाचा । विचार पाहतां तयाचा । तंत लागला मुळाचा । अवतारांकडे ॥ ६ ॥ अवतारी देव संपले । देह धरून वर्तों लागले । त्याहून थोर अनुमानले । ब्रह्मा विष्णु महेश ॥ ७ ॥ त्या तिन्ही देवांस ज्याची सत्ता । तो अंतरात्माचि पाहतां । कर्ता भोक्ता तत्वतां । प्रत्यक्ष आहे ॥ ८ ॥ युगानुयुगें तिन्ही लोक । एकला चालवी अनेक । हा निश्चयाचा विवेक । वेदशास्त्रीं पाहावा ॥ ९ ॥ आत्मा वर्तवितो शरीर । तोचि देव उत्तरोत्तर । जाणीवरूपें कलेवरें[3] । विवेकें वर्तवी ॥ १० ॥ तो अंतर्देव चुकती । धांवा घेऊन तीर्था जाती । प्राणी बापुडे कष्टती । देवास नेणतां ॥ ११ ॥ मग विचारिती अंतःकरणीं । जेथें तेथें धोंडा पाणी । उगेंच वणवण हिंडोनी । काय होतें ॥ १२ ॥ ऐसा ज्यासि विचार कळला । तेणें सत्संग धरिला । सत्संगें देव सांपडला । बहुत जनांसी ॥ १३ ॥ ऐशीं हीं विवेकाचीं कामें । विवेकी जाणतील नेमें । अविवेकी भुलले भ्रमें । त्यांस हें कळेना ॥ १४ ॥ अंतरवेधी[4] अंतर जाणे । बाहेर-[5]

---

१. घोटाळा. २. परिपाठ. ३. शरीर. ४. अंतर्निष्ठ. ५. बहिर्मुख.

मुद्रा कांहींच नेणे । म्हणोनि विवेकी शाहणे । अंतर शोधिती ॥ १५॥ विवेकाविणें जो भाव । तो भावचि अभाव । मूर्खास प्रतिमादेव । ऐसें वचन ॥ १६ ॥ पाहत समजत शेवटास गेला । तोचि विवेकी म्हणावा भला । तत्त्वें सांडूनि पावला । निरंजनीं ॥ १७ ॥ येर जें आकारासि येतें । तें अवघें नासोन जातें । मग गलबल्या वेगळें तें । परब्रह्म जाणावें ॥१८ ॥ चंचळ देव निश्चळ ब्रह्म । परब्रह्मीं नाहीं भ्रम । प्रत्ययज्ञानें निभ्रम । होइजेतें ॥ १९ ॥ प्रचीतीविण जें केलें । तें अवघें व्यर्थ गेलें । प्राणी कष्टकष्टेंचि मेले । कर्मकचाटें ॥ २० ॥ कर्मावेगळें न व्हावें । तरी देवास कासया भजावें । विवेकी जाणती स्वभावें । मूर्ख नेणे ॥ २१ ॥ कांहीं अनुमानलें विचारें । देव आहे जगदंतरें । सगुणाकारितां निर्धारें । निर्गुण पाविजे ॥ २२ ॥ सगुण पाहतां मुळास गेला । सहजचि निर्गुण पावला । संगत्यागें मोकळा झाला । वस्तुरूप ॥ २३ ॥ परमेश्वरीं अनुसंधान । लावितां होइजे पावन । मुख्य ज्ञानेंचि विज्ञान । पाविजेतें ॥ २४ ॥ ऐशीं हीं विवेकाचीं विवरणें । पाहावीं सुचित्त अंतःकरणें । नित्यानित्यविवेकश्रवणें । जगदुद्धार ॥ २५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टादशदशके अंतर्देवनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. निद्रा.

श्रीगणेशाय नमः ॥ वंदूनियां आदिपुरुष । बोलों निद्रेचा विलास । निद्रा आलिया सावकाश । जाणार नाहीं ॥ १ ॥ निद्रेनें व्यापिली काया । आळस अंगमोडे जांभया । तेणें करितां बैसावया । धीर नाहीं ॥ २ ॥ कडकडां जांभया येती । चटाचटां चुटक्या वाजती । डकडकां डुलक्या येती । सावकाश ॥ ३ ॥ एकाचे डोळे झांकती । एकाचे डोळे लागती । एक ते वचकोन पाहती । चहूंकडे ॥ ४ ॥ एक उलथोन पडिले । तिहीं ब्रह्माविणे[१] फोडिले । हुडकोंचे[२] तुकडे झाले । शुद्ध नाहीं ॥ ५ ॥ एक टेंकोन बैसले । तेथेंचि घोरों लागले । एक उताणे पसरले । सावकाश ॥ ६ ॥ कोणी मुरकुंडी घालिती । कोणी कानवडे[३] निजती । कोणी चक्रीं फिरती । चहूंकडे

१. उपाधिशून्य ब्रह्मपदीं. २. एक जातींचें वाद्य, त्याचे. ३. कुशीवर.

॥ ७ ॥ एक हात हालविती । एक पाय हालविती । एक दांत खाती । क-केराटें ॥ ८ ॥ एकांचीं वस्त्रें निघोन गेलीं । तीं नागवींच लोळों लागलीं । एकांचीं मुंडाशीं गडबडलीं । चहूंकडे ॥ ९ ॥ एक निजलीं अस्ताव्यस्तें । एक दिसती जैशीं प्रेतें । दांत पसरोन जैशीं भूतें । वाईट दिसती ॥ १० ॥ एक वोसणतेंचि[1] उठिले । एक अंधारीं फिरों लागले । एक जाऊनि निजले । उकिरड्यावरी ॥ ११ ॥ एक मडकीं उतरती । एक भूमि चांचपती । एक उठोन वाटा लागती । भलतीकडे ॥ १२ ॥ एक प्राणी वोसणती । एक स्फुंदस्फुंदों रडती । एक खदखदां हांसती । सावकाश ॥ १३ ॥ एक हाका मारूं लागले । एक बोंबलत उठिले । एक वचकोन राहिले । आपुले ठायीं ॥१४॥ एक क्षणक्षणां खुरडती । एक डोई खाजविती । एक कण्हों लागती । सावकाश ॥१५॥ एकांच्या लाळा गळल्या । एकांच्या पिका सांडल्या । एकीं लघुशंका केल्या । सावकाश ॥१६॥ एक राऊतें[2] सोडिती । एक कर्पट ढेंकर देती । एक खांकरून थुंकती । भलतीकडे ॥ १७ ॥ एक हगती एक ओकिती । एक खोकती एक शिंकती । एक ते पाणी मागती । निद्सुरे ॥ १८ ॥ एक दुःस्वप्नें निर्बुजले[3] । एक सुस्वप्नें संतोषले । एक ते गाढमूढीं पडिले । सुषुप्तीमध्यें ॥ १९ ॥ इकडे उजेडाया झालें । कोणीं पठण आरंभिलें । कोणीं प्रातःस्मरामि आरंभिलें । हरिकीर्तन ॥ २० ॥ कोणीं आठविल्या ध्यानमूर्ती । कोणी एकांतीं जप करिती । कोणी पाठांतरें उजळिती । नाना प्रकारें ॥२१॥ नाना विद्या नाना कळा । आपलाल्या शिकती सकळा । तान मान गायनकळा । एक गाती ॥ २२ ॥ मागें निद्रा संपली । पुढें जागृती प्राप्त झाली । व्यवसायीं बुद्धि आपली । प्रेरिते झाले ॥२३॥ ज्ञाता तत्त्वें[4] सांडून पळाला । तुरियेपलीकडे गेला । आत्मनिवेदनें झाला । ब्रह्मरूप ॥ २४ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टादशदशके निद्रानिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. श्रोता-अवलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ कोणी एक कार्याचा साक्षेपें[5] । कांहीं तरी वडे विक्षेप ।

---

१. घाबरून. २. अपान वायु. ३. भ्याले. ४. महत्तत्त्व वगैरे. ५. प्रयत्न.

काळसाह्यें तें आपेंआप । होत जातें ॥ १ ॥ कार्यभाग होत चालिला । तेणें प्राणी सुखी झाला । विचारहि सुचों लागला । दिवसेंदिवस ॥ २ ॥ कोणी एक प्राणी जन्मास येतो । कांहीं तरी काळ साह्य होतो । दुःखा उपरी सुख देतो । देव कृपाळूपणें ॥ ३ ॥ अवघाचि काळ जरी साजे । तरी अवघेच होती राजे । कांहीं साजे कांहीं न साजे । ऐसें आहे ॥ ४ ॥ इह-लोक आणि परलोक । साधतां कोणी एक विवेक । अद्भुत होय स्वाभाविक । देणें ईश्वराचें ॥५॥ ऐकिल्याविण कळलें । शिकविल्याविण शाहाणपण आलें । हें देखिलें ना ऐकिलें । भूमंडळीं ॥ ६ ॥ सकळ कांहीं ऐकतां कळे । कळतां कळतां वृत्ति निवळे । नेमस्त मध्यें आकळे । सारासार ॥७॥ श्रवण म्हणिजे ऐकावें । मनन म्हणिजे मनीं धरावें । येणें उपायें स्वभावें । त्रैलोक्य चाले ॥ ८ ॥ श्रवणाआड विक्षेप येती । नानाजिन्नस सांगों किती । सावध असतां प्रत्यय येती । सकळ कांहीं ॥ ९ ॥ श्रवणीं लोक बैसले । बोलतां बोलतां एकाग्र झाले । त्या उपरी जे नूतन आले । ते एकाग्र न होती ॥ १० ॥ मनुष्य बाहेर हिंडून आलें । नाना प्रकारींचे ऐकिलें । उदंड गलवलूं लागलें । उगें असेना ॥ ११ ॥ प्रसंग पाहोन चालती । ऐसे लोक थोडे असती । श्रवणीं नाना विक्षेप होती । ते हे ऐका ॥ १२ ॥ श्रवणीं बैसले ऐकाया । अडों लागलीसे काया । येती कडकडा जांभया । निद्राभरें ॥ १३ ॥ बैसले सुचित्त करूनि मना । परी तें मनचि ऐकेना । मागें होतें ऐकिलें नाना । तेंचि धरून बैसलें॥१४॥ तत्पर केलें शरीर । परी मनामध्यें आणिक विचार । कल्पना कल्पिते विस्तार । किती म्हणोन सांगावा ॥१५॥ जें जें कांहीं श्रवणीं पडलें । तितुकें समजोन विवरलें । तरीच कांहीं सार्थक झालें । निरूपणीं ॥ १६ ॥ मन दिसतें मा धरावें । ज्याचें त्याणें आवरावें । आवरून विवेकें धरावें । अर्थांतरीं ॥ १७ ॥ निरूपणीं येऊन बैसला । परी तो उदंड जेवून आला । बैसतांचि कासावीस झाला । तृषाक्रांत ॥ १८ ॥ आधीं उदक आणविलें । घळघळां उदंड घेतलें । तेणें मळमळों लागलें । उठोनि गेला ॥ १९ ॥ कर्पट ढेंकर उचक्या देती । वारा सरतां मोठी फजिती । क्षणक्षणां उठोन जाती । लघुशंकेसी ॥ २० ॥ दिशेनें कासावीस केला । अवघें सांडून धांवला । निरूपणप्रसंग निवोन गेला ।

अखंड ऐसा ॥ २१ ॥ दृष्टांतीं कांहीं अपूर्व आलें । अंतःकरण तेथेंचि राहिलें । कोठवरी काय वाचिलें । कांहीं कळेना ॥ २२ ॥ निरूपणीं येऊन बैसला । तों विंचवें फणकाविला । कैचें निरूपण झाला । कासाविस ॥ २३ ॥ पोटामध्यें तिडीक उठली । पाठीमध्यें करकें[1] भरलीं । चाळकें[2] चिकुल्यां[3] पुळी झाली । बैसवेना ॥ २४ ॥ पिसोळीं चाऊन पळाला । तेणें प्राणी दुश्चित झाला । कोणें नेटें गलबला केला । तेथेंचि धांवे ॥ २५ ॥ विषयी लोक श्रवणीं येती । ते बायकांकडेच पाहती । चोरटे लोक चोरून जाती । पादरक्षा[4] ॥ २६ ॥ होय नव्हे वाद विवाद । तेणें उदंड झाला खेद । शिव्या गाळी अप्रमाद । होतां चुकला ॥ २७ ॥ कोणी निरूपणीं बैसती । सावकाश गोष्टी लाविती । हरिदास रें रें करिती । पोटासाठीं ॥२८ ॥ बहुत जाणते मिळाले । एकापुढें एक बोले । लोकांचे आशय[5] राहिले । कोण जाणे॥२९॥ माझें होय तुझें नव्हे । ऐशी अखंड जनां सवे । न्यायनीति सांडूनि धांवे । अन्यायाकडे ॥ ३० ॥ आपल्या थोरपणासाठीं । अचावचा तोंड पिटी । न्याय नाहीं तें शेवटीं । परम अन्यायी ॥ ३१ ॥ एकीकडे अभिमान उठे । दुसरीकडे उदंड पेटे । ऐसे श्रोते खरे खोटे । कोण जाणे ॥ ३२ ॥ म्हणोनि जाणते विचक्षण । ते आधींच धरती नेणपण । मूर्ख टोणपा आपण । कांहींच नाहीं ॥ ३३ ॥ आपणाहून देव थोर । ऐसा जयास कळला विचार । सकळ कांहीं जगदंतर । तेंचि राखावें ॥ ३४ ॥ सभेमध्यें कल्होळ झाला । शब्द येतो जाणत्याला । अंतरें राखों नाहीं शिकला । कैसा योगी ॥ ३५ ॥ अखंड आपणास सांभाळिती । क्षुल्लकपण येऊं न देती । थोर लोकांस क्षमा शांती । अगत्य करणें ॥ ३६ ॥ वैर करितां वैरचि वाढे । आपणास दुःख भोगणें घडे । म्हणोनि शाहाण्याचें कुडें[6] । कळों आलें ॥ ३७ ॥ अवगुणापाशीं बैसला गुणी । अवगुण कळतो तत्क्षणीं । विवेकी पुरुषाची करणी । विवेकें होते ॥३८॥ उपाय पर्याय दीर्घ प्रयत्न । विवेकबळें नाना यत्न । करील तयाचें महिमान । तोचि जाणे ॥ ३९ ॥ दुर्जनीं वेढवेढोनि घेतला । बाष्कळ लोकीं घसरिला । विवेकापासून चेव-

१ लचक. २. चाळकबाऊ. ३. चिखलापासून पायांच्या बोटांस फोड येतात ते. ४. जोडे, वाहणा. ५. मनांतील अभिप्राय. ६. कोडें, मर्म.

ला । विवेकी कैसा ॥ ४० ॥ न्याय पर्याय उपाय । मूर्खास हें कळे काय । मूर्खाकारितां चिवडा होय । मजालसीचा[1] ॥ ४१ ॥ मग ते शाहणे नीट कारितीं । स्वयें साहोन साहविती । स्वयें करून कराविती । लोकांकरवीं ॥ ४२ ॥ पृथ्वीमध्यें उदंड जन । जनांमध्येंचि असती सज्जन । जयांकारितां समाधान । प्राणिमात्रांसी ॥ ४३ ॥ तो मनोगतांचीं अंगें जाणें । नाना प्रसंग समय जाणे । संतप्तालागीं निववूं जाणे । नानाप्रकारें ॥ ४४ ॥ ऐसा तो जाणता लोक । समर्थ तयाचा विवेक । त्याचें करणें कांहींएक । जनास कळेना ॥ ४५ ॥ बहुत जनांस चाळवी । नाना मंडळी हालवी । ऐशी हे समर्थ पदवी । विवेकें होते ॥ ४६ ॥ विवेक एकांतीं करावा । जगदीश धारणेनें करावा । लोक आपला आणि परावा । म्हणोंचि नये ॥ ४७ ॥ एकांतीं विवेक ठार्यी पडे । एकांतीं यत्न सांपडे । एकांतीं तर्क वावडे[2] । ब्रह्मांडगोळीं ॥ ४८ ॥ एकांतीं स्मरण करावें । चुकलें निधान पडे ठावें । अंतरात्म्यासरिसें फिरावें । कांहीं तरी ॥ ४९ ॥ जयास एकांत मानला । अवघ्या आधीं कळे त्याला । त्या वेगळा वडीलपणाला । ठावाचि नाहीं ॥५०॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अष्टादशदशके श्रोता-अवलक्षणनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी २८८.

---

# दशक एकोणिसावा.

## १. लेखनक्रिया.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्राह्मणें बाळबोध अक्षर । वडसूनं[3] करावें सुंदर । जें देखतांचि चतुर । समाधान पावती ॥ १ ॥ वाटोळें सरळ मोकळें । वोतलें मषीचें[4] काळें । कुळकुळीत ओळी चालिल्या ढाळें[5] । मुक्तामाळा जैशा ॥२॥ अक्षरमात्र तितुकें नीट । नेमस्त पैस काने नीट । आडव्या मात्रा त्याहि नीट । अर्कुलीं[6] वेलांट्या ॥ ३ ॥ पहिलें अक्षर जें काढिलें । ग्रंथ संपे तों पाहात गेलें । एक टांकेंचि लिहिलें । ऐसें वाटे ॥ ४ ॥ अक्षरांचें काळेपण ।

---

१. समुदायाचा. २. चालतो. ३. वळवून. ४. शाईचें. ५. सहज. ६. रेफ.

टांकाचें ठोंसरपण । तैसेंचि लवण वांकण । सारिखेंचि ॥ ५ ॥ ओळीस ओळी लागेना । अर्कुलीं मात्रा भेदीना । खालींचे ओळीस स्पर्शेना । अथवा लंबाक्षर ॥ ६ ॥ पान शिशानें रेखाटावें । त्यावरी नेमेंचि लिहावें । दूर जवळी न व्हावें । अंतर ओळींचें ॥ ७ ॥ कोठें शोधासि आढळेना । चुकी पाहतां सांपडेना । गरज केली हें घडेना । लेखकापासुनी ॥ ८ ॥ ज्याचें वय आहे नूतन । त्याणें लिहावें जपून । जनासि पडे मोहन । ऐसें करावें ॥९॥ बहु बारीक तरुणपणीं । कामा न ये म्हातारपणीं । मध्यम लिहिण्याची करणी । केली पाहिजे ॥ १० ॥ भोंवतें स्थळ सोडून द्यावें । मध्येंचि चमचमीत लिहावें । कागद झडतांहि झडावें । नलगेचि अक्षर ॥ ११ ॥ ऐसा ग्रंथ जपोन लिहावा । प्राणिमात्रास उपजे हेवा । ऐसा पुरुष पाहावा । म्हणती लोक ॥ १२ ॥ काया बहुत कष्टवावी । उत्कट कीर्ति उरवावी । चटक लावून सोडावी । कांहीं एक ॥ १३ ॥ घट्ट कागद आणावे । जपोन नेमस्त खळावे । लिहिण्याचे सा[२]में असावे । नानापरी ॥ १४ ॥ सुन्या[१]कातऱ्या जागा[३]ईत । ख[४]ळीं घोटा[५]ळी तागाईत । नाना सुरंगमिश्रित । जाणोनि घ्यावे ॥ १५ ॥ नाना देशींचे बोरू आणावे । घट्ट बारीकसर घ्यावे । नाना रंगांचे आणावे । नानाजिनसी ॥ १६ ॥ नानाजिनसी टांकतोडणी । नाना प्रकारें रेखाटणी । चित्र विचित्र करणी । सिसेंलोळ्या ॥ १७ ॥ हिंगूळ संग्रहीं असावे । वाळले आ[६]लीतें पाहोन घ्यावे । सोपे भिजवून वाळवावे । संग्रह [७]मषीचे ॥ १८ ॥ त[८]गटीं इति[९]श्रियें[१०] कराव्या । बंदरी फळया घोंटाव्या । नाना चित्रीं चिताराव्या । उंच चित्रें ॥१९॥ नाना गोफ नाना बा[११]सनें । मेणकापडें सिंदूरवर्णें । पेट्या कुलपें जपणें । पुस्तकाकारणें ॥ २० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशतिदशके लेखनक्रियानिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

---

१. तुरटीचे पाण्यांत भिजवून वाळवावे. २. सामान. ३. समास-फळी. ४. तुरटी. ५. घोंटकवडा. ६. कागद चिवट करण्याचें सामान. ७. अळिता. ८. शाईचें. ९. शेवटीं. १०. 'इति श्री...' इत्यादि ग्रंथसमाप्तिसूचक शब्द. ११. वेष्टनें.

## २. विवरण.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां बोलिले लेखनभेद । आतां ऐका अर्थभेद । नाना प्रकारींचे संवाद । समजोन पाहावे ॥१॥ शब्दभेद अर्थभेद । मुद्राभेद प्रबंधभेद । नाना शब्दांचे शब्दभेद । जाणोनि घ्यावे ॥२॥ नाना आशंका प्रत्युत्तरें । नाना प्रचीत साक्षात्कारें । जेणेंकरितां जगदंतरें[1] । चमत्कारती ॥३॥ नाना पूर्वपक्ष सिद्धांत । प्रत्यय पाहावा नेमस्त । अनुमानाचें अस्ताव्यस्त । बोलोंच नये ॥ ४ ॥ प्रवृत्ति[2] अथवा निवृत्ति[3] । प्रचीतीविण अवघी भ्रांती । गळंग्यामधील जगज्योती[4] । चेतेल कोठें ॥ ५ ॥ हेतु समजोन उत्तर देणें । दुसऱ्याचे जीवींचें समजणें । मुख्य चातुर्याचीं लक्षणें । तीं हीं ऐशीं ॥ ६ ॥ चातुर्याविण खटपट । ते विद्याचि फळकट[5] । सभेमध्यें आटवाट[6] । समाधान कैंचें ॥ ७ ॥ बहुत बोलणें ऐकावें । तेथें मौनचि धरावें । अल्पचिन्हें समजावें । जगदंतर ॥ ८ ॥ बाष्कळामध्यें बैसों नये । उद्धटासि तंडों नये । आपणाकरितां खंडों नये । समाधान जनाचें ॥ ९ ॥ नेणपण सोडूं नये । जाणपणें फुगों नये । नाना जनांचें हृदय । मृदुशब्दें उकलावें ॥ १० ॥ प्रसंग जाणावा नेटका । बहुतांसि जाजूं घेऊं नका । खरें असतांचि नासका । फड होतो ॥ ११ ॥ शोध घेतां आळसों नये । भ्रष्टलोकीं बैसों नये । बैसलें तरी टाकूं नये । मिथ्या दोष ॥ १२ ॥ अंतर आर्ताचें शोधावें । प्रसंगीं थोडेंचि वाचावें । चटक लावून सोडावें । भल्या मनुष्यासी ॥ १३ ॥ मजालसींत[7] बैसों नये । समाराधनेसि जाऊं नये । जातां येळिलेंवाणें[8] होय । जिणें आपुलें ॥ १४ ॥ उत्तम गुण प्रगटवावे । मग भल्यासि बोलतां फावे । भले पाहोन करावे । शोधून मित्र ॥१५॥ उपासनेसारिखें बोलावें । सर्व जन तोषवावे । सगट बरेपण राखावें । कोणी एकासी ॥ १६ ॥ ठायीं ठायीं शोध घ्यावा । मग ग्रामीं प्रवेश करावा । प्राणिमात्र ओळखावा । आप्तपणें ॥ १७ ॥ उंच नीच म्हणों नये । सकळांचें निववावें हृदय । अस्तमानीं जाऊं नये । कोठें तरी ॥ १८ ॥ जगामध्यें जगमित्र । जिव्हेपाशीं असे सूत्र । कोठें तरी स-

१. लोकांचीं मनें. २. प्रपंच. ३. परमार्थ. ४. जगदंतर. ५. व्यर्थ. ६. श्रम. ७. तक्रार. ८. आळ. ९. रिकाम्या लोकांत. १०. पराधीन.

स्पात्र । शोधून काढावें ॥ १९ ॥ कथा होती तेथें जावें । दूर दीनासारिखें बैसावें । तेथील सकल हार्द घ्यावें । अंतर्यामीं ॥२०॥ तेथें भले आढळती । व्यापकेै[2] तेहि कळों येती । हळू हळू मंदगती । रीघ करावी ॥ २१ ॥ सकळांमध्यें विशेष श्रवण । श्रवणाहून थोर मनन । मननें होय समाधान । बहुत जनांचें ॥ २२ ॥ धूर्तपणें सकळ जाणावें । अंतरीं अंतर बाणावें । समजल्याविण शिणावें । कासयासी ॥ २३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशतिदशके विवरणनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. करंटलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ सुचित्त करूनि अंतःकरण । ऐका करंटलक्षण । हें त्यागितां सदैव[3]-लक्षण । अंगीं बाणे ॥ १ ॥ पापाकारितां दारिद्र प्राप्त । दारिद्रें होय पाप संचित । ऐसेंचि होत जात । क्षणक्षणां ॥२॥ या कारणें करंटलक्षणें । ऐकोनि त्यागचि करणें । म्हणजे कांहींएक बाणे । सदैवलक्षण ॥३॥ करंट्यास आळस आवडे । यत्न कदापि नावडे । त्याची वासना वावडे । अधर्मीं सदा ॥४॥ सदा भ्रमिष्ठ निदसुरा । उगोंचि बोले सैरावैरा । कोणी एकाच्या अंतरा । मानेचिना ॥ ५ ॥ लिहों नेणे वाचूं नेणे । सवदासूत घेऊं नेणे । हिशेब कित्येक राखों नेणे । धारणा[4] नाहीं ॥ ६ ॥ हारवी सांडी पाडी फोडी । विसरे चुके नाना खोडी । भल्याचे संगतीची आवडी । कदापि नाहीं ॥ ७ ॥ चाट गडी मेळविले । कुकर्मी मित्र केले । खटनट एकवटिले । चोरटे पापी ॥ ८ ॥ ज्यासि त्यासि कळकटा । स्वयें सदाचा चोरटा । परघातकी धीट मोठा । वाटा पाडी ॥ ९ ॥ दीर्घसूचना सुचेचि ना । न्याय नीति हे रुचेचि ना । पराभिलाषवासना । निरंतर ॥ १० ॥ आळसें शरीर पाळिलें । परंतु पोटाविण गेलें । सुडकें मिळेनालें झालें । पांघरायासि ॥११॥ आळसें शरीर पिळी । अखंड कुशी कोंडोळी[5] । निद्रेचे पाडी सुकाळीं । आपणासी ॥ १२ ॥ जनासि मैत्री करीना । कठिण शब्द बोले नाना । मूर्खपणें आवरेना । कोणी एकासी ॥ १३ ॥ पवित्र लोकांमध्यें भिडावे । वोंगळांमध्यें निःशंक धावे । सदा मनापासून भावे[6] । जननिंद्य क्रिया ॥ १४ ॥

---

१. अभिप्राय. २. उद्योगी. ३. दैववान. ४. बुद्धि. ५. खाजवी. ६. आवडते.

तेथें कैंचा परोपकार । केला बहुतांचा संहार । पापी अनर्थी अपस्मार । सर्व अबुद्धी ॥ १५ ॥ शब्द सांभाळून बोलेना । आवरितां आवरेना । कोणी एकासीं मानेना । बोलणें त्याचें ॥ १६ ॥ कोणी एकासी विश्वास नाहीं । कोणी एकासी सख्य नाहीं । विद्या वैभव कांहींच नाहीं । उगाचि ताठा ॥ १७ ॥ राखावीं बहुतांचीं अंतरें । भाग्य येतें तदनंतरें । ऐशीं विवेकाचीं उत्तरें । ऐकणार नाहीं ॥ १८ ॥ स्वयें आपणास कळेना । शिकविलें तें ऐकेना । तयास उपाय नाना । काय करिती ॥ १९ ॥ कल्पना करी उदंड कांहीं । प्रासव्य तें कांहींच नाहीं । अखंड पडिला संदेहीं । अनुमानाचे ॥ २० ॥ पुण्यमार्ग सांडिला मनें । पाप झडावें कशानें । निश्चय नाहीं अनुमानें । नाश केला ॥ २१ ॥ कांहीं एक पुरतें कळेना । सभेमध्यें बोलों राहेना । वाचाळ लबाड ऐसें जनां । कळों आलें ॥ २२ ॥ कांहीं नेमकपण आपुलें । बहुत जनांसि कळों आलें । तेंचि मनुष्य मान्य झालें । भूमंडळीं ॥ २३ ॥ झिजल्यावांचूनि कीर्ति कैंची । मान्यता नव्हे कीं फुकाची । जिकडे तिकडे होते छी छी । अवलक्षणें ॥ २४ ॥ भल्यांची संगती धरीना । आपणास शाहाणें करीना । तो आपला आपण वैरी जाणा । स्वहित नेणे ॥ २५ ॥ लोकांसि बरें करावें । तें उसणें सवेंचि घ्यावें । ऐसें जयाच्या जीवें । जाणिजेना ॥ २६ ॥ जेथें नाहीं उत्तम गुण । तें करंटपणाचें लक्षण । बहुतांसि न मानें तें अवलक्षण । सहजचि झालें ॥ २७ ॥ कार्याकारण सकळ कांहीं । कार्याविण तों कांहींच नाहीं । निकामीं तो दुःखप्रवाहीं । वाहतचि गेला ॥ २८ ॥ बहुतांसि मान्य थोडा । त्याच्या पापास नाहीं जोडा । निराश्रयीं पडे उवडा । जेथें तेथें ॥ २९ ॥ या कारणें अवगुण त्यागावे । उत्तम गुण समजोन घ्यावे । तेणें मनासारखें फावे । सकळ कांहीं ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशतिदशके करंटलक्षणनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. सदैवलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ मागां बोलिलें करंटलक्षण । तें विवेकें सांडावें संपूर्ण । आतां ऐका सदैवलक्षण । सौख्यदायक ॥ १ ॥ उपजतगुण शरीरीं । परोपकारी नानापरी । आवडे सर्वांचे अंतरीं । सर्वकाळ ॥ २ ॥ सुंदर

अक्षर लिहों जाणे । चपळ शुद्ध वाचों जाणे । अर्थांतर सांगों जाणे । सकळ कांहीं ॥ ३ ॥ कोणाचें मनोगत तोडीना । भल्याची संगति सोडीना । सदैवलक्षणें अनुमाना । आणूनि ठेवी ॥ ४ ॥ तो सकळ जनांसि व्हावा । जेथें तेथें नित्य नवा । मूर्खपणें अनुमानगोवा । कांहींच नाहीं ॥ ५ ॥ नाना उत्तमगुण सत्पात्र । तोचि मनुष्य जगमित्र । प्रगटकीर्ति स्वतंत्र । पराधीन नाहीं ॥ ६ ॥ राखे सकळांचें अंतर । उदंड करी पाठांतर । नेमस्तपणाचा विसर । पडणार नाहीं ॥ ७ ॥ नम्रपणें पुसों जाणे । नेमस्त अर्थ सांगों जाणे । बोला ऐसें वर्तों जाणे । उत्तम क्रिया ॥ ८ ॥ जो मानला बहुतांसी । कोणी बोलों न शके त्यासी । धगधगीत पुण्यराशी । महापुरुष ॥ ९ ॥ तो परोपकार करीतचि गेला । पाहिजे तो ज्याला त्याला । मग काय उणें त्याला । भूमंडळीं ॥ १० ॥ बहुत जन वासे[1] पाहे । वेळेसि तात्काळ उभा राहे । उणें कोणाचें न साहे । तया पुरुषासी ॥ ११ ॥ चौदा विद्या चौसष्ट कळा । जाणे संगीत गायनकळा । आत्मविद्येचा जिव्हाळा । उदंड तेथें ॥ १२ ॥ सकळांसि नम्र बोलणें । मनोगत राखोन चालणें । अखंड कोणी एकाचें उणें । पडोंचि नेदी ॥ १३ ॥ न्याय नीति भजन मर्यादा । काळसार्थक करी सदा । दरिद्रपणाची आपदा । तेथें कैंची ॥ १४ ॥ उत्तम गुणें शृंगारिला । तो बहुतांमध्यें शोभला । प्रगट प्रतापें उगवला । मार्तंड[2] जैसा ॥ १५ ॥ जाणता पुरुष असेल जेथें । कलह कैंचा उठेल तेथें । उत्तम गुणाविषयीं रितें । ते प्राणी करंटे ॥ १६ ॥ प्रपंचीं जाणे राजकारण । परमार्थीं साकल्य[3]विवरण । सर्वांमध्यें उत्तम गुण । त्याचा भोक्ता ॥ १७ ॥ मागें एक पुढें एक । ऐसा कदापि नाहीं दंडक[4] । सर्वत्रांसि अलोकिक । तया पुरुषाची ॥ १८ ॥ अंतरासि लागेल ढका । ऐशी वर्तणुक करूं नका । जेथें तेथें विवेका । प्रगट करी ॥ १९ ॥ कर्मविधि उपासनाविधी । ज्ञानविधि वैराग्यविधी । विशालश्ववक्तृत्वाची बुद्धी । चळेल कैशी ॥२०॥ पाहतां अवघे उत्तम गुण । तयास वाईट म्हणेल कोण । जैसा आत्मा संपूर्ण । सर्वां घटीं ॥ २१ ॥ आपल्या कार्यास तत्पर । लोक असती लहान थोर । तैसाचि करी परोपकार । मनापासूनी ॥ २२ ॥ दुसऱ्याच्या दुःखें दुखावे । दुस-

१. वाट पाहे. २. सूर्य. ३. परब्रम्हाचा विचार ४. वागणूक.

ज्याच्या सुखें सुखावे । अवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ॥ २३ ॥ उदंड मुलें नानापरी । वळिलांचें मन अवघ्यांवरी । तैशी अवघ्यांची चिंता करी । महापुरुष ॥ २४ ॥ जयास कोणाचें सोसेना । तयाची निष्किंचन वासना । धिक्कारितां धिक्कारेना । तोचि महापुरुष ॥ २५ ॥ मिथ्या शरीर निंदिलें । तरी याचें काय गेलें । ज्ञात्यासि आणि जिंकिलें । देहबुद्धीनें ॥ २६ ॥ हें तों अवघें अवलक्षण । ज्ञाता देहीं विलक्षण । कांहीं तरी उत्तमगुण । जनीं दाखवावे ॥ २७ ॥ उत्तम गुणास मनुष्य वेधे । वाईट गुणास प्राणी खेदे । तीक्ष्णबुद्धि लोक साधे । काय जाणती ॥ २८ ॥ लोकीं अत्यंत क्षमा करिती । आलिया लोकांचे प्रचीती । मग ते लोक पाठीं राखिती । नाना प्रकारीं ॥ २९ ॥ बहुतांसि वाटे मी थोर । सर्वमान्य पाहिजे विचार । धीर उदार गंभीर । महापुरुष ॥ ३० ॥ जितुके कांहीं उत्तम गुण । तें समर्थाचें लक्षण । अवगुण तें करंटलक्षण । सहजचि झालें ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशतिदशके सदेवलक्षणनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४ ॥

---

## ५. देहमान्य.

श्रीगणेशाय नमः ॥ मातीचा देव धोंड्याचा देव । सोन्याचा देव रुप्याचा देव । कांस्याचा देव पितळेचा देव । तांब्याचा देव चित्रलेप ॥ १ ॥ रुईच्या लांकडाचे पोंवळयाचे देव । बाण तांदळे नर्मदेचे देव । शाळग्राम काश्मीरदेव । सूर्यकांत सोमकांत ॥ २ ॥ ताम्रनाणीं हेमनाणीं । कोणी पूजिती देवतार्चनीं । चक्रांकित चक्रतीर्थाहूनी । घेऊनि येती ॥ ३ ॥ उदंड उपासनेचे भेद । किती करावे विशद । आपलाले आवडीचा वेध । लागला जनीं ॥ ४ ॥ परी त्या सकळांचेंहि कारण । मुळीं पाहावें स्मरण । त्या स्मरणाचे अंश जाण । नाना दैवतें ॥ ५ ॥ मुळीं द्रष्टा देव तो एक । त्याचे झाले अनेक । समजोन पाहतां विवेक । उमजों लागे ॥ ६ ॥ देहावेगळी भक्ति फावेना । देहावेगळा देव पावेना । या कारणें मूळ भजना । देहचि आहे ॥ ७ ॥ देह मुळींच केला वाव । तरी भजनास कैचा ठाव । म्हणोनि भजनाचा उपाव । देहात्मयोगें ॥ ८ ॥ देहाविण देव कैसा भजावा । देहा-

---

१. दरिद्री. २. निराळा. ३. सोन्याचीं नाणीं. ४. स्फूर्ति.

विण देव कैसा पूजावा । देहाविण महोत्साह कैसा करावा । कोण्या प्रकारें ॥ ९ ॥ अन्न गंध पत्र पुष्प । फल तांबूल धूप दीप । नाना भजनाचा साक्षेप । कोठें करावा ॥ १० ॥ देवाचें तीर्थ कैसें घ्यावें । देवासि गंध कोठें लावावें । मंत्रपुष्प तरी वाहावें । कोणे ठायीं ॥ ११ ॥ म्हणोनि देहाविण अडतें । अवघें सांकडेंचि पडतें । देहाकरितां घडतें । भजन कांहीं ॥ १२ ॥ देव देवता भूतें दैवतें । मुळींचें सामर्थ्य आहे तेथें । अधिकारें नाना दैवतें । भजत जावीं ॥ १३ ॥ नाना देवीं भजन केलें । तें मूळ पुरुषास पावलें । या कारणें सन्मानिलें । पाहिजे सकल कांहीं ॥ १४ ॥ मायावल्ली फांपावली । नाना देहफळीं लगडली । मुळींची जाणीव कळों आली । फळामध्यें ॥ १५ ॥ म्हणोनि येळील न करावें । पाहावें तें येथेंचि पाहावें । ताळा पडतां राहावें । समाधानें ॥ १६ ॥ प्राणी संसार टाकिती । देवास धुंडीत फिरती । नाना अनुमानीं पडती । जेथें तेथें ॥ १७ ॥ लोकांची पाहतां रीती । लोक देवतार्चनें करिती । अथवा क्षेत्रदेव पाहती । ठायीं ठायीं ॥ १८ ॥ अथवा नाना अवतार । ऐकोनि धरिती निर्धार । परी तें अवघें सविस्तर । होऊनि गेलें ॥ १९ ॥ एक ब्रह्मा विष्णु महेश । ऐकोनि म्हणती हे विशेष । गुणातीत जो जगदीश । तो पाहिला पाहिजे ॥ २० ॥ देवास नाहीं स्थान मान । कोठें करावें भजन । हा विचार पाहतां अनुमान । होत जातो ॥ २१ ॥ नसतां देवाचें दर्शन । कैसेनि होइजे पावन । धन्य धन्य ते साधुजन । सकळ जाणती ॥ २२ ॥ भूमंडळीं देव नाना । त्यांची भीड उलंघेना । मुख्य देव तो कळेना । कांहीं केल्या ॥ २३ ॥ कर्तृत्व वेगळें करावें । मग त्या देवासि पाहावें । तरी कांहींएक पडे ठावें । गौप्य गुह्य ॥ २४ ॥ तें दिसेना ना भासेना । कल्पांतींहि नासेना । सुकृतावेगळें विश्वासेना । तेथें मन ॥ २५ ॥ उदंड कल्पिती कल्पना । उदंड इच्छिते वासना । अभ्यंतरींचे तरंग नाना । उदयातें पावती ॥ २६ ॥ म्हणोनि कल्पनारहित । तेंचि वस्तु शाश्वत । अंत नाहीं म्हणोनि अनंत । बोलिजे तया ॥ २७ ॥ हें ज्ञानदृष्टीनें पाहावें । पाहोनि तेथेंचि राहावें । निजध्यासें तद्रूप व्हावें । संगत्यागें ॥ २८ ॥ नाना लीला नाना लाघवें । तें काय जाणिजे बापुड्या जीवें । संतसंगें स्वानुभवें । स्थिति बाणे ॥ २९ ॥ ऐसी सूक्ष्म

स्थिति गती । कळतां चुके अधोगती । सद्गुरुवचनें सद्गती । तत्काळ होते ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशतिदशके देहमान्य-निरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. बुद्धिवाद.

श्रीगणेशाय नमः ॥ परमार्थी आणि विवेकी । त्याचें करणें माने लोकीं। कां जे विवराविवरों चुकी । पडोंच नेदी ॥ १ ॥ जो जो संदेह वाटे मना । तो तो कदापि करीना । आदि अंत अनुमाना । आणून सोडी ॥ २ ॥ स्वतां निस्पृह असेना । त्याचें बोलणेंचि मानेना । कठिण आहे जनार्दनां । राजी राखणें ॥ ३ ॥ कोणी दाटून उपदेश देती । कोणी मध्यवर्ती घालिती । ते सहजचि हलु पडती । लालुचीनें ॥ ४ ॥ जयास सांगावा विवेक । तो जाणावा प्रतिकुंचक । पुढें पुढें नाशक । कारभार होतो ॥ ५ ॥ भावास भाऊ उपदेश देती । पुढें पुढें होते फजिती । वोळखीच्या लोकांत महंती । मांडूंचि नये ॥ ६ ॥ पाहिलें दिसे परी नासे । विवेकी मान्य करिती कैसे । अविवेकी ते जैसे तैसे । मिळती तेथें ॥ ७ ॥ भ्रतार शिष्य स्त्री गुरु । हाहि फटकळ विचारु । नाना भ्रष्टाकारीं प्रकारु । तैसाचि आहे ॥ ८ ॥ प्रगट विवेक बोलेना । झांका तापा करी जना । मुख्य निश्चय अनुमाना । आणूंच नेदी ॥ ९ ॥ हुकीसारिसा भरीं भरे । विवेक सांगतां न धरे । दूर दृष्टीनें पुरे । साधु नव्हती ॥ १० ॥ कोणास कांहींच न मागावें । भगवद्भजन वाढवावें । विवेकबळें जन लावावे । भजनाकडे ॥ ११ ॥ परांतर रक्षायाचीं कामें । बहुत कठिण विवेकवर्मे । स्वइच्छेनें स्वधर्मे । लोकराहाटी ॥ १२ ॥ आपण तुरुक गुरु केला । शिष्यांचा भार मेळविला । नीच यातीनें नासला । समुदाय ॥ १३ ॥ ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या । भक्तमंडळ्या मानाव्या । संतमंडळ्या शोधाव्या । भूमंडळीं ॥ १४ ॥ उत्कृष्ट भव्य तेंचि घ्यावें । मळमळीत अवघेंचि टाकावें । निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ॥ १५ ॥ अक्षर बरें वाचणें बरें । अर्थांतर सांगणें बरें । गाणें नाचणें अवघेंचि बरें । पाठांतर ॥ १६ ॥ दीक्षा बरी मैत्री बरी । तीक्ष्ण बुद्धि राजकारणी बरी ।

---

१. सर्व जनांच्या अंतरात्म्यास. २. प्रतिकूल.

आपणास राखे नाना परी । अलिप्तपणें ॥ १७ ॥ अखंड हरिकथेचा छंद । सकळांस लागे नामवेध । प्रगट जयाचा प्रबोध । सूर्य जैसा ॥ १८ ॥ दुर्जनासि राखों जाणे । सज्जनासि निववूं जाणे । सकळांचे मनींचें जाणे । ज्याचें त्यापरी ॥ १९ ॥ संगतीचें मनुष्य पालटे । उत्तम गुण तात्काळ उठे। अखंड अभ्यासीं लगटे । समुदाय ॥ २० ॥ जेथें तेथें नित्य नवा । जनासि वाटे हा असावा । परंतु लालुचेचा गोवा । पडोंच नेदी ॥ २१ ॥ उत्कृष्ट भक्ति उत्कृष्ट ज्ञान । उत्कृष्ट चातुर्य उत्कृष्ट भजन । उत्कृष्ट योग अनुष्ठान । ठायीं ठायीं ॥ २२ ॥ उत्कृष्ट निस्पृहता धारिली । त्याची कीर्ति दिगंतीं फांकली । उत्कृष्ट भक्तीनें निवाली । जनमंडळी ॥ २३ ॥ कांहींएक उत्कृष्टेंविण । कीर्ति कदापि नव्हे जाण । उगेंच वणवण हिंडोन । काय होतें ॥ २४ ॥ नाहीं देहाचा भरंवसा । केव्हां सरेल वयसा । प्रसंग पडेल कैसा । कोण जाणे ॥ २५ ॥ या कारणें सावधान असावें । जितुकें होईल तितुकें करावें । भगवत्कीर्तीनें भरावें । भूमंडळ ॥ २६ ॥ आपणास जें जें अनुकूळ । तें तें करावें तात्काळ । होइना त्यांस निवळ । विवेक उमजवावा ॥ २७ ॥ विवेकामध्यें सांपडेना । ऐसें तों कांहींच असेना । एकांतीं विवेक अनुमाना । आणून सोडी ॥ २८ ॥ अखंड तजविजा चाळणा जेथें । पाहतां काय उणें तेथें । एकांताविणें प्राणियातें । बुद्धि कैंची ॥ २९ ॥ एकांतीं विवेक करावा । आत्माराम ओळखावा । येथून तेथवरी गोवा । कांहींच नाहीं ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशतिदशके बुद्धिवादनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. यत्न.

श्रीगणेशाय नमः ॥ कथेचें घमंड[1] भरून द्यावें । आपण निरूपणीं विवरावें । उणें पडोंच न द्यावें । कोणीएक विषयीं ॥ १ ॥ भजणार[2] खालीं पडला । तो भजणारीं जाणिला । नेणतां लोक उगाच राहिला । टकमकां पाहात ॥ २ ॥ उत्तर विलंबीं पडिलें । श्रोतयांस कळों आलें । म्हणिजे महत्व उडालें । वक्तयाचें ॥ ३ ॥ थोडें बोलोन समाधान करणें । रागेजोन

---

१. गर्दी उसळून द्यावी. २. उपदेश करणारा.

तरी मन धरणें । मनुष्य वेधीं लावणें । कोणी एक ॥ ४ ॥ सोसवेना चिणचिण केली । तेथें तामस वृत्ति दिसोन आली । अवघी आवडीच उडाली । श्रोतयांची ॥ ५ ॥ कोण कोण राजी राखिले । कोण कोण मनीं भंगले । क्षणक्षणा परीक्षिले । पाहिजेत लोक ॥ ६ ॥ शिष्य विकल्पें रान घेतो । गुरु मागें मागें धांवतो । विचार पाहों जातां तो । विकल्पचि अवघा ॥ ७ ॥ आशाबद्ध क्रियाहीन । नाहीं चातुर्याचें लक्षण । ते महंतीची भणभण । बंद[1] नाहीं ॥ ८ ॥ ऐसे गोसांवी हळु पडती । ठायीं ठायीं कष्टी होती । तेथें संगतीचे लोक पावती । सुख कैंचें ॥ ९ ॥ जिकडे तिकडे कीर्ति माजे । सकळ लोकांस हव्यास उपजे । लोक राजी राखोन कीजे । सकळ कांहीं ॥ १० ॥ परलोकीं[2] वास करावा । समुदाय उगाच पहावा । मागण्याचा तगादा न लावावा । कांहींएक ॥ ११ ॥ जिकडे जग तिकडे जगन्नायक । कळला पाहिजे विवेक । रात्रंदिवस विवेकी लोक । संभाळीत जाती ॥ १२ ॥ जो जो लोक दृष्टीस पडिला । तो तो नष्ट ऐसा कळला । अवघे नष्ट एकला भला । कशावरूनी ॥ १३ ॥ वोस मुलखीं काय पाहावें । लोकांवेगळें कोठें राहावें । तऱ्हे[3] खोटी सोंडतें[4] घ्यावें । कांहींएक ॥ १४ ॥ तस्मात लोकीं वर्ततां नये । त्यास महंती कामा नये । परत्रसाधनाचा उपाय । श्रवण करून असावें ॥ १५ ॥ आपणांस बरें पाहतां न ये । लोक बुडवायाचें कोण कार्य । गोडी आवडी वायां जाय । विकल्पचि अवघा ॥ १६ ॥ अभ्यासें प्रगट व्हावें । नाहीं तरी झांकोन असावें । प्रगट होऊन नासावें । हें बरें नव्हे ॥ १७ ॥ मंद हळुहळु चालतो । चप्रळ कैसा आटोपतो । आरबी[5] फिरवणार तो । कैसा असावा ॥ १८ ॥ हीं धकाधकीचीं कामें । तीक्ष्णबुद्धीचीं वर्में । भोळया भावार्थें संभ्रमें[6] । कैसें घडे ॥ १९ ॥ श्वेत केलें परी वाहेनां[7] । जवारं केलें परी फिरेना । जन मेळविले परी धरीना । अंतर्यामीं ॥ २० ॥ जरी चढती वाढती आवडी उठे । तरीच परमार्थ प्रगटे । घसवस करितां विटे । सगट लोक ॥ २१ ॥ आपलें लोकांस मानेना । लोकांचें आपणास मानेना । अवघा विकल्पचि मना । समाधान कैंचें

१. शिस्त. २. वरच्या स्थानीं, एकांतीं. ३. हट्टीपणा. ४. पड. ५. आरबी घोडा. ६. घोटाळ्यानें. ७. निगा करीना. ८. व्यापार.

॥ २२ ॥ नाशक दीक्षा सिंतरू[1] लोक । तेथें कैंचा असेल विवेक । जेथें बळावला अविवेक । तेथें राहणें खोटें ॥ २३ ॥ बहुत दिवस श्रम केला । शेवटीं अवघाचि वायां गेला । आपणास ठाकेना[2] गलबला । कोणें करावा ॥ २४ ॥ संगीत[3] चालिला तरी तो व्याप । नाहीं तरी अवघाचि संताप । क्षणक्षणां विक्षेप कोप । किती म्हणोन सांगावा ॥ २५ ॥ मूर्खपणें भरंगळती । ज्ञातेपणें कलह करिती । होते दोहींकडे फजिती । लोकांमध्यें ॥ २६ ॥ कारभार आटोपेना करवेना । आणि उगेंहि राहेना । या कारणें सकळ जनां । काय म्हणावें ॥ २७ ॥ नाशक उपाधीस सोडावें । वय सार्थकीं घालावें । परिभ्रमणें कंठावें । कोठें तरी ॥ २८ ॥ परिभ्रमण करवेना । दुसऱ्याचें कांहींच सोसेना । तरी मग उदंड यातना । विकल्पाची ॥ २९ ॥ आतां हें आपणाचपाशीं । बरें विचारावें आपणासी । अनुकूळ पडेल तैशी । वर्तणूक करावी ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशतिदशके यत्ननिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. उपाधिलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ सृष्टीमध्यें बहुत लोक । परिभ्रमणें कळे कौतुक । नाना प्रकारींचे विवेक । आढळों लागती ॥ १ ॥ किती प्रापंचिक जन । अखंड वृत्ती उदासीन । सुखदुःखें समाधान । डंडळेना ॥ २ ॥ स्वभावेंचि नेमक बोलती । सहजचि नेमक चालती । अपूर्व बोलण्याची स्थिती । सकळांसि माने ॥ ३ ॥ सहजचि तालज्ञान येतें । स्वभावेंचि रागज्ञान उमटतें । सहजचि[4] कळत जातें । न्यायनीतिलक्षण ॥ ४ ॥ एखादा आढळे गाजी । सकळ लोक अखंड राजी । सदा सर्वदा आवडी ताजी । प्राणिमात्रांची ॥ ५ ॥ चुकोन उदंड आढळतें । भारी मनुष्य दृष्टीस पडतें । महंताचें लक्षणसें वाटतें । अकस्मात ॥ ६ ॥ ऐसे आढळतां लोक । चमत्कारें गुणग्राहक । क्रिया बोलणें नेमक । प्रत्ययाचें ॥ ७ ॥ (सकळ अवगुणामध्यें अवगुण । आपले अवगुण वाटती गुण । मोठें पाप करंटपण । चुकेना कीं) ॥ ८ ॥ ढोलेंचि काम होतें सदा । जें जपल्यानें नव्हे सर्व-

१. ठक. २. होईना. ३. सुरळीत. ४. सहजासहजीं.

दा। तेथें पीळ पेंचाची आपदा । आढळेचिना ॥ ९ ॥ एकासि अभ्यासितां न ये। एकासि स्वभावेंचि ये । ऐसा भगवंताचा महिमा काय। कैसा कळेना ॥ १० ॥ मोठीं राजकारणें चुकती । राजकारणीं वेढा[1] लागती। नाना चुकीची फजीती । चहूंकडे ॥ ११ ॥ या कारणें चुकों नये । म्हणिजे उदंड उपाय । उपायांचा अपाय । चुकतां होय ॥ १२ ॥ काय चुकलें तें कळेना । मनुष्याचें मनचि वळेना । खवळला अभिमान गळेना । दोहींकडे ॥ १३ ॥ अवघे फडचि नासती । लोकांचीं मनें भंगिती । कोठें चुके ते युक्ती । कांहीं कळेना ॥ १४ ॥ व्यापें[2]विण आटोप केला । तो अवघा सरतचि गेला । अकलेचा बंद नाहीं घातला । दूरदृष्टीनें ॥ १५ ॥ एखादें मनुष्य तें शिळें । त्याचें करणेंचि बावळें । नाना विकल्पांचें जाळें । करून टाकी ॥ १६ ॥ तें आपणासि उकलेना । दुसऱ्यास कांहींच कळेना । नाचे विकल्पें कल्पना । ठायीं ठायीं ॥ १७ ॥ त्या गुप्त कल्पना कोणास कळाव्या । कोणें थेऊन आटोपाव्या । ज्याच्या त्याणें कराव्या । बळकट बुद्धी ॥ १८ ॥ ज्यासि उपाधि आवरेना । तेणें उपाधि वाढवावी ना । सावचित्त करूनियां मना । समाधानें असावें ॥ १९ ॥ धांवधांवोनि उपाधि वेष्टी । आपण कष्टी लोक कष्टी । हे कामा न ये गोष्टी । कुसमुसेची ॥ २० ॥ लोक बहुत कष्टी झाला । आपणहि अत्यंत त्रासला । व्यर्थचि केला गलबला । कासयासी ॥ २१ ॥ असो उपाधीचें काम ऐसें । कांहीं बरें कांहींएक नासे । सकळ समजोन ऐसें । वर्ततां बरें ॥ २२ ॥ लोकांपाशीं भावार्थ कैंचा । आपण जगवावा तयांचा । शेवट उपंढरें[3] कोणाचा । पडोंचि नये ॥ २३ ॥ अंतरात्म्याकडे सकळ लागे । निर्गुणीं हें कांहींच न लागे । नाना प्रकारीं दगे । चंचळामध्यें ॥२४॥ शुद्ध विश्रांतीचें स्थळ । तें एक निर्मळ निश्चळ । तेथें विकारचि सकळ । निर्विकार होती ॥ २५ ॥ उद्वेग अवघे तुटोन जाती । मनास वाटे विश्रांती । ऐशी दुर्लभ परब्रह्मस्थिती । विवेकें सांभाळावी ॥२६॥ आपणास मुळीं उपाधि नाहीं । ऋणानुबंधें मिळाले सर्वही आल्या गेल्याची क्षिति[4] नाहीं । ऐसें झालें पाहिजे ॥ २७ ॥ जो उपाधीस कंटाळला । तो निवांत होऊनि बैसला । आटोपेना तो गलबला । कासयासी

---

१. अडचणींत पडतात. २. आटोक्यावांचून. ३. उणें, हानि. ४. पर्वा.

॥ २८ ॥ कांहीं गलबला कांहीं निवळ । ऐसा कंठित जावा काळ । तेणें-कारितां विश्रांति वेळ । आपणासी फावे ॥२९॥ उपाधि कांहीं राहत नाहीं । समाधानायेवढें थोर नाहीं । नरदेह प्राप्त होत नाहीं । क्षणक्षणां ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशतिदशके उपाधिलक्षणनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. राजकारण.

श्रीगणेशाय नमः ॥ ज्ञानी आणि उदास । समुदायाचा हव्यास । तेणें अखंड सावकाश । एकांत सेवावा ॥ १ ॥ तेथें तजविजा कळती । अखंड चाळणा निघती । प्राणिमात्रांची स्थिती गती । कळों येते ॥ २ ॥ जरी हा चाळणाच करीना । तरी कांहींच उमजेना । हिशेबझाडाच पाहेना । दिवाळखोर ॥३॥ एक मिराशी साधिती । एक सध्यां गमाविती । व्यापक-पणाची स्थिती । ऐशी आहे ॥४॥ जेणें जें जें मनीं धारिलें । तें तें आधींच समजलें । कृत्रिम अवघेंचि खुंटलें । सहजचि येणें ॥ ५ ॥ अखंड राहतां सलगी होते । अतिपरिचयें अवज्ञा घडते । या कारणें विश्रांतीतें । घेतां न ये ॥ ६ ॥ आळसें आळस केला । तरी मग कारभारचि बुडाला । अंतरहेत चुकत गेला । समुदायाचा ॥ ७ ॥ उदंड उपासनेचीं कामें । लावित जावीं नित्यनेमें । अवकाश कैंचा कृत्रिमें । करावयासी ॥८॥ चोर भांडारी करावा । घसरतांच सांभाळावा । गोवा मूर्खपणाचा काढावा । हळू हळू ॥ ९ ॥ ह्या अवघ्या पहिल्याच गोष्टी । प्राणी कोणी नव्हता कष्टी । राजकारणें मंडळ वेष्टी । चहूंकडे ॥१०॥ नष्टासि नष्ट योजावे । वाचाळासि वाचाळ आणावे । आपणावरी विकल्पाचे गोवे । पडोंचि नेदी ॥११॥ कांटीनें कांटी झाडावी । झाडावी परी ते कळों न द्यावी । कळकटपणाची पदवी । असों न द्यावी ॥१२॥ न कळतां करी कार्य जें तें । तें काम तात्काळचि होतें । गिचड्यांत पडतां तें । चमत्कारें नव्हे ॥ १३ ॥ ऐकोनि आवडी लागावी । देखोनि बळकटचि व्हावी । सलगीनें आपली पदवी । सेवकांमध्यें ॥ १४ ॥ कोणी-एक काम करितां होतें । न करितां मागें पडतें । या कारणें ढिलेपण तें । असोंचि नये ॥१५॥ जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ।

जो आपणचि कष्टत गेला । तोचि भला ॥१६॥ अवघ्यांस अवघेंच कळलें । तेव्हां तें रितें पडिलें । या कारणें ऐसें घडलें । न पाहिजे कीं ॥१७॥ मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकांकरवीं करवावें । कित्येक खळ्[1]क उगवावे[2] । राजकारणामध्यें ॥ १८ ॥ बोलके पहिलवान कळकटे । तयासीच घ्यावे झटे । दुर्जनें राजकारण दाटे । ऐसें न करावें ॥ १९ ॥ ग्रामण्य वर्मीं सांपडावें । रगडून पीठचि करावें । करून मागुती सांवरावें । बुडवूं नये ॥ २० ॥ खळ दुर्जनांसि भ्याले । राजकारण नाहीं राखिलें । तेणें अवघें प्रगट झालें । बरें वाईट ॥ २१ ॥ समुदाय पाहिजे मोठा । तरी तणावा[3] असाव्या बळकटा । मठ करून ताठा । धरूं नये ॥ २२ ॥ दुर्जन प्राणी समजावे । परी ते प्रगट न करावे । सज्जनापरीस आळवावे । महत्व देउनी ॥ २३ ॥ जनांमध्यें दुर्जन प्रगट । तरी मग अखंड खटखट । या कारणें ते वाट । बुझूनि टाकावी ॥ २४ ॥ गलिमाच्या देखतां फौजा । रणशूरांच्या फुर्फुरती भुजा । ऐसा पाहिजे कीं राजा । कैंपक्षी[4] परमार्थीं ॥ २५ ॥ तयास देखतां दुर्जन धाके । बैसवी प्रचीतीचे तडाखे । बंड पाषांडाचे वांखे[5] । सहजचि होती ॥ २६ ॥ हीं धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें । ढिलेपणाच्या संभ्रमें[6] । जाऊं नये ॥ २७ ॥ कोठेंच पडेना दृष्टी । ठायीं ठायीं त्याच्या गोष्टी । वाग्विलासें सकळ सृष्टी । वेधिली तेणें ॥ २८ ॥ हुंब्यासि हुंबा लाऊन द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा । लौंदापुढें करावा । दुसरा लौंद[7] ॥ २९ ॥ धट्टास आणावा धट्ट । उद्धटास पाहिजे उद्धट । खटनटासि खटनट[8] । अगत्य करी ॥ ३० ॥ जैशास तैसा जेव्हां भेटे । तेव्हां मजालसी[9] थाटे । इतुकें होतें परी धनी कोठें । दृष्टीस न पडे ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशतिदशके राजकारणनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. विवेकलक्षण.

श्रीगणेशाय नमः ॥ जेथें अखंड नाना चाळणा । जेथें अखंड नाना धारणा । जेथें अखंड राजकारणा । मनासि आणिती ॥ १ ॥ सृष्टीमध्यें उत्तम

---

१. कारस्थानी लोक. २. योजावे. ३. ताणदोर. ४. कैवारी. ५. प्राणांत अवस्था. ६. मार्गानें. ७. दांडगा. ८. दुष्ट. ९. स्नेहसंबंध. १०. समुदाय.

गुण । तितुकें चाले निरूपण । निरूपणाविण क्षण । रिकामा नाहीं ॥ २ ॥ चर्चा आशंका प्रत्युत्तरें । कोण खोटें कोण खरें । नाना वक्तृत्वें शास्त्राधारें । नाना चर्चा ॥ ३ ॥ भक्तिमार्ग विशद कळे । उपासनामार्ग आकळे । ज्ञानविचार निवळे । अंतर्यामीं ॥ ४ ॥ वैराग्याची बहुत आवडी । उदासवृत्तीची गोडी । उदंड उपाधि तरी सोडी । लागोंच नेदी ॥ ५ ॥ प्रबंधांचीं पाठांतरें । उत्तरास संगीतें उत्तरें । नेमक बोलतां अंतरें । निवती सकळांचीं ॥ ६ ॥ आवडी लागली बहुत जना । तेथें कोणाचें कांहीं चालेना । दुळवेंट पडिला अनुमाना । येईल कैसा ॥ ७ ॥ उपासना करूनियां पुढें । पुरवलें पाहिजे चहूंकडे । भूमंडळीं जिकडे तिकडे । जाणती तया ॥ ८ ॥ जाणती परी आढळेना । काय करितो तें कळेना । नाना देशींचे लोक नाना । येऊन जाती ॥ ९ ॥ तितुक्यांचीं अंतरें धरावीं । विवेकें विचारें भरावीं । कडोविकडीं विवरावीं । अंतःकरणें ॥ १० ॥ किती लोक तें कळेना । किती समुदाय आकळेना । सकळ लोक श्रवणमनना । मध्यें घाली ॥ ११ ॥ फड समजावीस करणें । गद्य पद्य सांगणें । परांतरासि राखणें । सर्वकाळ ॥ १२ ॥ ऐसा ज्याचा दंडक । अखंड पाहणें विवेक । सावधापुढें अविवेक । येईल कैंचा ॥ १३ ॥ जितुकें कांहीं आपणास ठावें । तितकें हळूहळू शिकवावें । शाहणे करूनि सोडावे । बहुत जन ॥१४॥ परोपरी शिकवणें । आडणुका सांगत जाणें । निवळ करून सोडणें । निस्पृहासी ॥१५॥ होईल तें आपण करावें । न होतां जनांकरवीं करवावें । भगवद्भजनेंविण राहावें । हा धर्म नव्हे ॥ १६ ॥ आपण करावें करवावें । आपण विवरावें विवरवावें । आपण धरावें धरवावें । भजनमार्गासी ॥ १७ ॥ जुन्या लोकांचा कंटाळा आला । तरी नूतन प्रांत पाहिजे धरिला । जितुकें होईल तितुक्याला । आळस करूं नये ॥ १८ ॥ देहाचा अभ्यास बुडाला । ह्मणिजे महंत बुडाला । लागवेगें नूतन लोकांला । शाहाणें करावें ॥ १९ ॥ उपाधींत सांपडों नये । उपाधीस कंटाळों नये । निःसंगपण कामा न ये । कोणी एका विषयीं ॥२०॥ काम नासणार नासतें । आपण वेडें उगेंच पाहतें । आळसी हृदयशून्य तें । काय करूं जाणे ॥ २१॥ धकाधकीचा मामला । कैसा घडे

१. सरळ. २. पुष्कळांशीं संबंध. ३. युक्तिप्रयुक्तीनें. ४. रीत. ५. प्रसंग.

अशक्ताला । नाना बुद्धि शक्ताला । म्हणोनि शिकवाव्या ॥२२॥ व्याप होईल तों राहावें । व्याप राहतां उठोन जावें । आनंदरूप फिरावें । कोठें तरी ॥ २३ ॥ उपाधीपासून सुटला । तो निस्पृहपणें बळावला । जिकडे अनुकूळ तिकडे चालिला । सावकाश ॥२४॥ कीर्ति पाहतां सुख नाहीं । सुख पाहतां कीर्ति नाहीं । केल्याविण कांहींच नाहीं । कोठें तरी ॥ २५ ॥ येरवीं काय राहतें । होणार तितुकें होऊन जातें । प्राणिमात्र अशक्त तें । पुढें आहे ॥ २६ ॥ आधींच तकवा सोडिला । मध्येंचि धिंवसा[1] सांडिला । तरी संसार हा शेवटाला । कैसा पावे ॥२७॥ संसार मुळींच नासका । विवेकें करावा नेटका । नेटका करितां फिका । होत जातो ॥२८॥ ऐसा याचा जिनसाना । पाहतां काळों येतें मना । परंतु धीर सांडावा ना । कोणी एकें ॥२९॥ धीर सांडितां काय होतें । अवघें सोसावें लागतें । नाना बुद्धि नाना मतें । शाहणा जाणे ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशतिदशके विवेकलक्षणनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी २८५.

---

# दशक विसावा.

## १. पूर्णापूर्ण.

श्रीगणेशाय नमः ॥ प्राण व्यापक मन व्यापक । पृथ्वी आप तेज व्यापक । वायु आकाश त्रिगुण व्यापक । अंतरात्मा मूळमाया ॥ १ ॥ निर्गुण ब्रह्म तें व्यापक । ऐसें अवघेंच व्यापक । तरी हें सगट कीं काय एक । भेद आहे ॥ २ ॥ आत्मा आणि निरंजन । येणें वाढतें अनुमान । आत्मा सगुण कीं निर्गुण । आणि निरंजन ॥ ३ ॥ श्रोता संदेहीं पडला । तेणें संदेह वाढला । अनुमान धरून बैसला । कोण तो कैसा ॥ ४ ॥ ऐका पहिली आशंका । अवघा गलबला करूं नका । प्रगट करून विवेका । प्रत्यय पाहावा ॥ ५ ॥ शरीरपाडें[2] सामर्थ्यपाडें[2] । प्राणी व्यापक तरी निवाडे । परी पाहतां मनाएवढें । चपळ नाहीं ॥ ६ ॥ चपळपण एकदेशी । पूर्ण व्यापकता नव्हे त्यासी । पाहतां पृथ्वीच्या व्यापासी[3] । सीमा आहे ॥ ७ ॥ तै-

१. धैर्य. २. शरीराच्या व बळाच्या मानानें. ३. विस्तारास.

सेंचि आप आणि तेज । अपूर्ण दिसती सहज । वायु चपळ समज । एक- देशीं ॥ ८ ॥ गगन आणि निरंजन । तें पूर्ण व्यापक सघन । कोणी एक अनुमान । तेथें असेचिना ॥ ९ ॥ त्रिगुण गुणक्षोभिणी माया । मायिक जाईल विलया । अपूर्ण एकदेशी तया । पूर्ण व्यापकता न घडे ॥ १० ॥ आत्मा आणि निरंजन । हें दोहींकडे नामाभिधान । अर्थान्वय समजोन । बोलणें करावें ॥ ११ ॥ आत्मा मन अत्यंत चपळ । तरी हें व्यापक नव्हेचि केवळ । सुचित्त अंतःकरण निवळ । करून पाहावें ॥ १२ ॥ अंतराळीं पाहतां पाताळीं नाहीं । पाताळीं पाहतां अंतराळीं नाहीं । पूर्णपणें वसत नाहीं । चहूंकडे ॥ १३ ॥ पुढें पाहतां मागें नाहीं । मागें पाहतां पुढें नाहीं । वाम सव्य व्यापक नाहीं । दश दिशा ॥ १४ ॥ चहूंकडे निशाणें मांडावीं । एकसरी कैशीं शिवावीं । या कारणें समजोन उगवी । प्रत्यय आपणासी ॥ १५ ॥ सूर्य जळीं प्रतिबिंबला । हाहि दृष्टांत न घडे वस्तूला । वस्तुरूप निर्गुणाला । म्हणिजेत आहे ॥ १६ ॥ घटाकाश मठाकाश । हाहि दृष्टांत विशेष । तोलूं जातां निर्गुणास । साम्यता येते ॥ १७ ॥ ब्रह्माचा अंश आकाश । आणि आत्म्याचा अंश मानस । दोहींचा अनुभव प्रत्ययास । येथें घ्यावा ॥ १८ ॥ गगन आणि हें मन । कैशीं होतीं समान । मननशीळ महाजन । सकळही जाणती ॥ १९ ॥ मन हें पुढें वावडे । मागें अवघेंचि रितें पडे । पूर्ण गगनास साम्यता घडे । कोण्या प्रकारें ॥ २० ॥ परब्रह्महि अचळ । आणि पर्वतासहि म्हणती अचळ । दोन्हीं एक केवळ । कैसें म्हणावें ॥ २१ ॥ ज्ञान अज्ञान विपरीत ज्ञान । तिन्ही कैशीं होतीं समान । याचा प्रत्यय मनन । करून पहावा ॥ २२ ॥ ज्ञान म्हणिजे जाणणें । अज्ञान म्हणिजे नेणणें । विपरीत ज्ञान म्हणिजे देखणें । एकाचें एक ॥ २३ ॥ जाणणें नेणणें वेगळें केलें । ढोबळें पांचभौतिक उरलें । विपरीत ज्ञान समजलें । पाहिजे जीवीं ॥ २४ ॥ द्रष्टा साक्षी अंतरात्मा । जीवात्माचि होय शिवात्मा । पुढें शिवात्मा तोचि होय जीवात्मा । जन्म घेतो ॥ २५ ॥ आत्मत्वीं जन्ममरण न लागे । आत्मत्वीं जन्ममरण न भंगे । संभवामि[१] युगे युगे । ऐसें वचन[२] ॥ २६ ॥ जीव एकदेशी नर । विचारें

१. प्रत्येक युगामध्यें अवतार घेतो. २. गीता, अध्याय ४ था पहा.

झाला विश्वंभर। विश्वंभरास संसार। चुकेना कीं ॥ २७ ॥ ज्ञान आणि अज्ञान। वृत्तिरूपें हें समान। निवृत्तिरूपें विज्ञान। झालें पाहिजे ॥ २८॥ ज्ञानें येवढें ब्रह्मांड केलें। ज्ञानें येवढें वाढविलें। नाना विकारांचें वळलें। तें हें ज्ञान ॥ २९ ॥ आठवें देह ब्रह्मांडींचें। तें हें ज्ञान होय साचें। विज्ञानरूप विदेहाचें। पद पाविजे ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विंशतिदशके पूर्णापूर्णनिरूपणं नाम प्रथमः समासः ॥ १ ॥

## २. त्रिविध सृष्टि.

श्रीगणेशाय नमः ॥ मूळमाया नसतां चंचळ। निर्गुण ब्रह्म तें निश्चळ। जैसें गगन अंतराळ। चहूंकडे ॥ १ ॥ जिकडे पाहावें तिकडे अपार। कोणीकडे नाहीं पार। एकजिनसी स्वतंत्र। दुसरें नाहीं ॥ २ ॥ दृश्य आलें आणि गेलें। परब्रह्म तें संचलें। जैसें गगन कोंदाटलें। चहूंकडे ॥ ३ ॥ ब्रह्मांडावरतें बैसावें। अवकाश भकास अवलोकावें। तेथें चंचळ व्यापकाच्या नांवें। शून्याकार ॥ ४ ॥ दृश्य विवेकें काढिलें। मग परब्रह्म कोंदाटलें। कोणासीच अनुभवलें। नाहीं कदा ॥ ५ ॥ अधोर्ध्व पाहतां चहूंकडे। निर्गुण ब्रह्म जिकडे तिकडे। मन धांवेल कोणीकडे। अंत पाहावया ॥ ६ ॥ दृश्य चळे ब्रह्म चळेना। दृश्य कळे ब्रह्म कळेना। दृश्य आकळे ब्रह्म आकळेना। कल्पनेसी ॥ ७ ॥ कल्पना म्हणिजे कांहींच नाहीं। ब्रह्म दाटलें ठायींच्या ठायीं। वाक्यार्थ विवरत जाई। म्हणिजे बरें ॥ ८ ॥ परब्रह्मायेवढें थोर नाहीं। श्रवणापरतें साधन नाहीं। कळल्याविण कांहींच नाहीं। समाधान ॥ ९ ॥ पिपीलिका[१]मार्गें हळुहळु घडे। विहंग[२]में फळासि गांठी पडे। साधक मननीं पवाडे। म्हणिजे बरें ॥ १० परब्रह्मासारिखें दुसरें। कांहींच नाहीं खरें। निंदा आणि स्तुति उत्तरें। परब्रह्मीं नाहीं ॥ ११ ॥ ऐसें परब्रह्म एकजिनसी। कांहींच तुळेना तयासी। महानुभाव पुण्यराशी। तेथें पहुडती ॥ १२ ॥ चंचळें होते दुःखप्राप्ती। निश्चळायेवढी नाहीं विश्रांती। निश्चळ प्रत्ययें पाहाती। महानुभाव ॥ १३ ॥ मुळापासून शेवटवरी। विचा-

१. मुंगीच्या चालीनें; म्हणजे प्रथम कर्म, नंतर उपासना व शेवटीं ज्ञान होणें.
२. पक्षाच्या भरारीप्रमाणें; म्हणजे एकदम विचार सुचून ज्ञान होणें.

रणा केलीच करी । प्रत्ययाचा निश्चय अंतरीं । तयासीच फावे ॥ १४ ॥ कल्पनेची सृष्टि जाहली । त्रिविध प्रकारें भासली । तक्षिण बुद्धीनें आणिली । पाहिजे मना ॥ १५ ॥ मूळमायेपासून त्रिगुण । अवघें एकदेशी लक्षण । पांचां भूतांचा ढोबळा गुण । दिसतचि आहे ॥ १६ ॥ पृथ्वीपासून चारी खाणी । चारी वेगळाली करणी । सकळ सृष्टीची चालणी येथूनी । पुढें नाहीं ॥ १७ ॥ सृष्टीचें त्रिविध लक्षण । विशद करूं निरूपण । श्रोतीं सुचित्त अंतःकरण । केलें पाहिजे ॥ १८ ॥ मूळमाया जाणिवेची । मुळीं सूक्ष्म कल्पनेची । जैशी स्थिती परा वाचेची । तद्रूपचि ते ॥ १९ ॥ अष्टधा प्रकृतीचें मूळ । ते हे मूळमायाच केवळ । सूक्ष्मरूप बीज सकळ । मुळींच आहे ॥ २० ॥ जड पदार्थ चेतवितें । म्हणोनि चैतन्य बोलिजेतें । सूक्ष्मरूपें संकेतें । समजोन घ्यावें ॥ २१ ॥ प्रकृतिपुरुषांचा विचार । अर्धनारी नटेश्वर । अष्टधा प्रकृतीचा विवर । सकळ कांहीं ॥ २२ ॥ गुप्त त्रिगुणांचें गूढत्व । म्हणोन संकेत महत्तत्व । गुप्तरूपें शुद्ध सत्व । तेथेंचि वसे ॥ २३ ॥ जेथून गुण प्रगटती । तीस गुणक्षोभिणी म्हणती । त्रिगुणांचीं रूपें समजती । धन्य ते साधु ॥ २४ ॥ गुप्तरूपें गुण सौम्य । म्हणोन बोलिजे गुणसाम्य । सूक्ष्मसंकेत अगम्य । बहुतांस कैंचा ॥ २५ ॥ मूळमायेपासून त्रिगुण । चंचळ एकदेशी लक्षण । प्रत्यय पाहतां खुण । अंतरीं येते ॥ २६ ॥ पुढें पंचभूतांचीं बंडें । वाढलीं विशाळें उदंडें । सप्तद्वीपें नवखंडें । वसुंधरा हे ॥ २७ ॥ त्रिगुणापासून पृथ्वीवरी । दुसऱ्या जिन्नसा अनेक परी । दोनी जिनसा या उपरी । तिसरा ऐका ॥ २८ ॥ पृथ्वी नाना जिनसांचें बीज । अंडज जारज स्वेदज उद्भिज । चारी खाणी चारी वाणी सहज । निर्माण जाहल्या ॥ २९ ॥ खाणी वाणी होती जाती । परंतु तैशीच आहे जगती । ऐसे होती आणि जाती । उदंड प्राणी ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विंशतिदशके त्रिविधसृष्टिलक्षणनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

---

## ३. सूक्ष्म नामाभिधान.

श्रीगणेशाय नमः ॥ मुळींहूनि शेवटवरी । विस्तार बोलिला नानापरी । पुन्हा विवरत विवरत माघारीं । वृत्ति न्यावी ॥ १ ॥ चारी खाणी चारी

वाणी । चौऱ्यायशीं लक्ष जीवयोनी । नाना प्रकारचे प्राणी । जन्मास येती ॥२॥ अवघे होती पृथ्वीपासूनी । पृथ्वीमध्यें जाती नासोनी । अनेक येती जाती परी अवनी । तैशीच आहे ॥ ३ ॥ ऐसें हें शेंड्याकडील खंड । दुसरें भूतांचें बंड । तिसरें नामाभिधानें उदंड । सूक्ष्मरूपें ॥ ४ ॥ स्थूल अवघें सांडून द्यावें । सूक्ष्मरूपें वोळखावें । गुणांपासून पाहिलेंच पाहावें । सूक्ष्मदृष्टी ॥ ५ ॥ गुणांचीं रूपें जाणीव नेणीव । पाहिलाच पाहावा अभिप्राव । सूक्ष्म दृष्टीच लाघव । येथून पुढें ॥ ६ ॥ शुद्ध नेणीव तमोगुण । शुद्ध जाणीव सत्वगुण । जाणीव नेणीव रजोगुण । मिश्रित चालिला ॥ ७ ॥ त्रिगुणांचीं रूपें ऐशीं । कळों लागलीं आपैसीं । गुणांपुढील कर्दमासी । गुणक्षोभिणी बोलिजे ॥ ८ ॥ रज तम आणि सत्व । तिहींचें जेथें गूढत्व । तेंचि जाणिजे महत्तत्व । कर्दमरूप[2] ॥९॥ प्रकृतिपुरुष शिवशक्ती । अर्धनारीनटेश्वर म्हणती । परी याची स्वरूपस्थिती । कर्दमरूपें[2] ॥ १० ॥ सूक्ष्मरूपें गुण सौम्य । त्यासीच म्हणिजे गुणसाम्य । तैसेंच चैतन्य अगम्य । सूक्ष्मरूपी ॥ ११ ॥ बहुजिनसी मूळमाया । महाकारण ब्रह्मांडींची काया । ऐसिया सूक्ष्म अन्वया । पाहिलेंचि पाहावें ॥१२॥ चारी खाणी पांच भूतें । चौदा[3] सूक्ष्म संकेतें । काय पाहाणें तें येथें । शोधून पाहावें ॥ १३ ॥ अहाचें[4] पाहतां कळेना । गरज केल्यानें समजेना । नाना प्रकारीं जनांच्या मना । संदेह पडती ॥ १४ ॥ चौदा[3] पांच एकोणीस । एकोणीस चार तेवीस । यामध्यें मूळ चतुर्दश । पाहिलेंचि पाहावें ॥ १५ ॥ जो विवरोन समजला । तेथें संदेहचि नाहीं उरला । समजल्याविण जो गलबला । तो निरर्थक ॥ १६ ॥ सकळ सृष्टीचें बीज । मूळमायेंत असे सहज । अवघें समजतां सज्ज[5] । परमार्थ होतो ॥ १७ ॥ समजलें माणूस चावळेना । निश्चयी अनुमान धरीना । सांवळागोंदा करीना । परमार्थ कदा ॥ १८ ॥ शब्दातीत बोलतां आलें । त्यास वाच्यांश असें बोलिलें । शुद्ध लक्ष्यांशें लक्षिलें । पाहिजे विवेकें ॥ १९ ॥ पूर्वपक्ष म्हणिजे माया । सिद्धांतें जाय विलया । माया नसतां मग तया । काय म्हणावें ॥ २० ॥ अन्वय आणि व्यतिरेक । हा पूर्वपक्षाचा विवेक । सिद्धांत म्हणिजे शुद्ध एक । दुसरें नाहीं ॥ २१ ॥

---

१. पृथ्वी. २. मिश्रीभाव, चैंदा. ३. मूळमायेचीं चौदा नांवें. ४. वरवर. ५. पूर्ण.

अधोमुखें भेद वाढतो । ऊर्ध्वमुखें भेद तुटतो । निःसंगपणें निर्गुणी तो । महायोगी ॥२२॥ माया मिथ्या ऐशी कळली । तरी मग भीड कां लागली । मायेचे भिडेनें घसरली । स्वरूपस्थिती ॥ २३ ॥ लटकें मायेनें दपटावें । सत्य परब्रह्म सांडावें । मुख्य निश्चयें हिंडावें । कासयासी ॥ २४ ॥ पृथ्वीमध्यें बहुत जन । त्यामध्यें असती सज्जन । परी साधूस वोळखतो कोण । साधूवेगळा ॥ २५ ॥ म्हणोन संसार सांडावा । मग साधूचा शोध घ्यावा । फिरफिरों ठायीं पाडावा । साधुजन ॥ २६ ॥ उदंड हुडकावे संत । सांपडे प्रचीतीचा महंत । प्रचीतीविण स्वहित । होणार नाहीं ॥ २७ ॥ प्रपंच[१] अथवा परमार्थ[२] । प्रचीतीविण अवघें व्यर्थ । प्रत्ययज्ञानी तो समर्थ । सकळांमध्यें ॥२८॥ रात्रंदिवस पाहावा अर्थ । अर्थ पाहेल तो समर्थ । परलोकींचा निजस्वार्थ । तेथेंचि घडे ॥ २९ ॥ म्हणोनि पाहिलेंचि पाहावें । आणि शोधिलेंचि शोधावें । अवघें कळतां स्वभावें । संदेह तुटती ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विंशतिदशके सूक्ष्मनामाभिधाननिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३ ॥

---

## ४. शिवशक्ति.

श्रीगणेशाय नमः ॥ सकळ जनांस प्रार्थना । उगेंच उदास करावें ना । निरूपण आणावें मना । प्रत्ययाचें ॥ १ ॥ प्रत्यय राहिला एकीकडे । आपण धांवतो भलतीकडे । तरी मग सारासाराचे निवाडे । कैसे होती ॥ २ ॥ उगीच पाहतां सृष्टी । गलबला दिसतो दृष्टी । परी राजसत्तेची[३] गोष्टी । वेगळीच ॥ ३ ॥ पृथ्वीमध्यें जितुकीं शरीरें । तितुकीं भगवंताचीं घरें । नाना सुखें येणें द्वारें । प्राप्त होती ॥ ४ ॥ त्याचा महिमा कळेल कोणाला । मातेवांचून कृपाळू झाला । प्रत्यक्ष जगदीश जगाला । रक्षीतसे ॥ ५ ॥ सत्ता पृथ्वीमध्यें वाढली । जेथें तेथें विभागली । कळेनें सृष्टी चालली । भगवंताची ॥ ६ ॥ मूळ जाणत्या पुरुषाची सत्ता । शरीरीं विभागली तत्वतां । सकळ कळा चातुर्यंता । तेथें वसे ॥ ७ ॥ सकळ पुरुषांचा ईश । जगामध्यें जगदीश । नाना शरीरीं सावकाश । करूं[४] लागे ॥ ८ ॥ पाहतां सृष्टीची रचना ।

---

१. प्रपंचदृष्टीनें. २. परमार्थदृष्टीनें. ३. ईशसत्ता. ४. व्यवहार करूं लागे.

ते एकाचेन चालेना । एकलाचि चालवी नाना । देह धरुनी ॥ ९ ॥ नाहीं उंच नीच विचारिलें । नाहीं बरें वाईट पाहिलें । कार्य चालों ऐसें झालें । भगवंतासी ॥ १० ॥ किंवा नेणणें आडवें केलें । किंवा अभ्यासीं घातलें । हें कैसें कैसें केलें । त्याचा तोचि जाणे ॥ ११ ॥ जगदंतरीं अनुसंधान । बरें पाहणें हेंचि ध्यान । ध्यान आणि तें ज्ञान । एकरूप ॥ १२ ॥ प्राणी संसारासि आला । कांहीं एक शाहाणा झाला । मग तो विवरों लागला । भूमंडळीं ॥ १३ ॥ प्रगट रामाचें निशाण । आत्माराम ज्ञानघन । विश्वंभर विद्यमान । भाग्यें कळे ॥ १४ ॥ उपासना धुंडीन वासना धरिली । तरी ते लांबतचि गेली । महिमा न कळे हे बोली । यथार्थचि आहे ॥ १५ ॥ द्रष्टा म्हणिजे पाहता । साक्षी म्हणिजे जाणता । अनंतरूपी अनंता । वोळखावें ॥ १६ ॥ संगती असावी भल्याची । धाटी कथानिरूपणाची । कांहीं एक मनाची । विश्रांति आहे ॥ १७ ॥ त्याहिमध्यें प्रत्ययज्ञान । जाळून टाकिलें अनुमान । प्रचीतीविण समाधान । पाविजेल कैंचें ॥ १८ ॥ मूळसंकल्प तो हरिसंकल्प । मूळमायेमधील साक्षेप । जगदंतरीं तेंचि रूप । देखिजेतें ॥ १९ ॥ उपासना ज्ञानस्वरूप । ज्ञानीं चौथा[1] देह[2] आरोपें । या कारणें सर्व संकल्प । सोडून द्यावा ॥ २० ॥ पुढें परब्रह्म विशाळ । गगनासारिखें पोकळ । घन पातळ कोमळ । काय म्हणावें ॥ २१ ॥ उपासना म्हणिजे ज्ञान । ज्ञानें पाविजे निरंजन । योगियांचें समाधान । येणें रीतीं ॥ २२ ॥ विचारें नेहटूनसों[3] पाहे । उपासना आपणचि आहे । एक जाय एक राहे । वासना धरुनी ॥ २३ ॥ अखंड ऐशी घालमेली । पूर्वापार होत गेली । आतांहि तैशीच चालिली । उत्पत्ति स्थिती ॥ २४ ॥ बनावरी बनें[4]करांची सत्ता । जळावरी जळचरांची सत्ता । भूमंडळीं भूपाळांची सत्ता । येणेंचि न्यायें ॥ २५ ॥ सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें । परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठानें[5] पाहिजे ॥ २६॥ कर्ता जगदीश हें तों खरें । परी विभाग आला पृथगाकारें । येथें अहंतेचें कांविरें[6] । बाधिजेना ॥ २७ ॥ हारिदाता हरिभोक्ता[7] । ऐसें चालतें तत्वतां । ये गोष्टीचा आतां । विचार पा-

१. मूळमाया. २. कल्पना. ३. लक्ष देऊन. ४. वनरक्षकाची. ५. आश्रय. ६. भ्रम. ७. हरिच देतो व हरिच सेवन करितो; (मी तूं हा भेद व्यर्थ आहे.)

ह्यावा ॥ २८ ॥ सकळ कर्ता परमेश्वरु। आपला मायिक विचारु। जैसें कळेल तैसें करू। जगदंतरीं ॥ २९ ॥ देवायेवढें चपळ नाहीं। ब्रह्मायेवढें निश्चळ नाहीं। पायरीनें पायरी चढोनि पाहीं। मूळपर्यंत ॥३०॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विंशतिदशके शिवशक्तिनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥४॥

---

## ५. चत्वार जिन्नस.[1]

श्रीगणेशाय नमः ॥ येथून पाहतां तेथवरी। चारी जिन्नस अवधारी। एक चौदा पांच चारी। ऐसें आहे ॥ १ ॥ ब्रह्म सकळांहून वेगळें। ब्रह्म सकळांहून आगळें। नाना कल्पने निराळें। परब्रह्म तें ॥ २ ॥ परब्रह्माचा विचार। नाना कल्पनेहून पर। निर्मळ निश्चळ निर्विकार। अखंड आहे ॥ ३ ॥ परब्रह्मास कांहींच तुळेना। हा एक मुख्य जिन्नसाना। दुसरा जिन्नस नाना। कल्पना मूळमाया ॥ ४ ॥ नाना सूक्ष्मरूप। सूक्ष्मरूप आणि कर्दमरूप। मुळींच्या संकल्पाचा आरोप। मूळमाया ॥ ५ ॥ हारिसंकल्प मुळींचा। आत्माराम सकळांचा। संकेत नामाभिधानाचा। ऐसा आहे ॥ ६ ॥ निश्चळीं चंचळ चेतलें। म्हणोनि चैतन्य बोलिलें। गुणसमानत्वें झालें। गुणसाम्य ऐसें ॥ ७ ॥ अर्धनारी नटेश्वर। तोचि षड्गुणेश्वर। प्रकृति पुरुषाचा विचार। शिवशक्ती ॥ ८ ॥ शुद्ध सत्वगुणाची मांडणी। अर्धमात्रा गुणक्षोभिणी। पुढें तिहीं गुणांची करणी। प्रगट झाली ॥ ९ ॥ मन माया अंतरात्मा। चौदा जिन्नसांची सीमा। विद्यमान ज्ञानात्मा। इतके ठायीं ॥ १० ॥ ऐसा हा दुसरा जिन्नस। अभिधानें चतुर्दश। आतां तिसरा जिन्नस। पंचमहाभूतें ॥ ११ ॥ येथें पाहतां जाणीव थोडी। आदि अंत रोकडी। खाणी निरूपिल्या तांतडी। तो चौथा जिन्नस ॥ १२ ॥ चारी खाणी अनंत प्राणी। जणिवेची झाली दाटणी। चारी जिन्नस येथुनी। संपूर्ण झाले ॥ १३ ॥ बीज थोडें पेरिजेतें। पुढें त्याचें उदंड होतें। तैसें झालें आत्मयातें। खाणी वाणी प्रगटतां ॥ १४ ॥ ऐशी सत्ता प्रबळली। थोडे सत्तेची उदंड झाली। मनुष्यवेषें सृष्टि भोगिली। नाना प्रकारें ॥ १५ ॥ प्राणी मा-

---

१. एक ब्रह्म, चौदा नांवें असलेली मूळमाया, पंचमहाभूतें, व चारी खाणी असे हे चार जिन्नस सर्व ब्रम्हांडांत आहेत.

रून श्वापद पळे। वरकड यास काय कळे। नाना भोग तो निवळे[1]। मनुष्यदेहीं ॥ १६ ॥ नाना शब्द नाना स्पर्श। नाना रूप नाना रस। नाना गंध ते विशेष। नरदेह जाणे ॥ १७ ॥ अमूल्य रत्नें नाना वस्त्रें। नाना यानें[2] नाना शस्त्रें। नाना विद्या कळा शास्त्रें। नरदेह जाणे ॥१८॥ पृथ्वी सत्तेनें व्यापली। स्थूळास्थूळीं आटोपली। नाना विद्या कळा केली। नाना धारणा ॥ १९ ॥ दृश्य अवघेंचि पाहावें। स्थानमान सांभाळावें। सारासार विचारावें। नरदेह जाहलिया ॥ २० ॥ इहलोक आणि परलोक। नाना प्रकारचा विवेक। विवेक आणि अविवेक। मनुष्य जाणे ॥ २१ ॥ नाना पिंडब्रह्मांडरचना। नाना मुळींची कल्पना। नाना प्रकारीं धारणा। मनुष्य जाणे ॥ २२ ॥ अष्ट भोग[3] नव रस। नाना प्रकारचा विलास। वाच्यांश लक्ष्यांश सारांश। मनुष्य जाणे ॥२३॥ मनुष्यें सकळांसि आळिलें[4]। त्या मनुष्यास देवें पाळिलें। ऐसें हें अवघें कळलें। नरदेहयोगें ॥ २४॥ नरदेह परम दुर्लभ। येणें घडे अलभ्य लाभ। दुर्लभ तें सुलभ। होत जातें ॥ २५ ॥ वरकड देह काबाड। नरदेह मोठें घबाड। परंतु पाहिजे जाड। विवेकरचना ॥ २६ ॥ येथें ज्याणें आळस केला। तो सर्वस्वें बुडाला। देव नाहीं ओळखिला। विवेकबळें ॥२७॥ नर तोचि नारायण। जरी प्रत्ययें करी श्रवण। मननशीळ अंतःकरण। सर्वकाळ ॥२८॥ जेणें स्वयेंचि पोहावें। त्यासि कासेस नलगे लागावें। स्वतंत्रपणें शोधावें। सकळ कांहीं ॥२९॥ सकळ शोधून राहिला। संदेह कैंचा तयाला। पुढें विचार कैसा झाला। त्याचा तोचि जाणे ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विंशातिदशके चत्वारजिन्नसनिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

---

## ६. आत्मगुण.

श्रीगणेशाय नमः ॥ पाहों जातां भूमंडळ। ठायीं ठायीं असे जळ। कित्येक ते निर्मळ माळ। जळेंविण पृथ्वी ॥ १ ॥ तैसें दृश्य विस्तारलें। कांहीं एक जाणीवेनें शोभलें। जाणीवरहित उरलें। कितीएक दृश्य ॥ २ ॥ चारी

---

१. प्रकटतो. २. वाहनें. ३. अन्न, उदक, तांबूल, पुष्प, चंदन, वसन, शय्या आणि अलंकार हे आठ भोग. ४. आकलन केलें.

खाणी चारी वाणी । चौऱ्यायशीं लक्ष जीवयोनी । शास्त्रीं अववें नेमूनी । बोलिलें असे ॥ ३ ॥ श्लोक ॥ जलजा नवलक्षाश्च दशलक्षाश्च पक्षिणः । क्रिमयो रुद्रलक्षाश्च विंशल्लक्षा गवादयः ॥ स्थावरास्त्रिंशल्लक्षाश्च चतुर्लक्षाश्च मानवाः । पापपुण्यं समं कृत्वा नरयोनिषु जायते ॥ १ ॥ टीका ॥ मनुष्यें चारी लक्ष । पशु तीस लक्ष । कृमि अक्रा लक्ष । बोलिले शास्त्रीं ॥ ४ ॥ दहा लक्ष ते खेचर[1] । नव लक्ष जळचर । वीस लक्ष स्थावरें[2] । बोलिले शास्त्रीं ॥ ५ ॥ ऐशीं चौऱ्यायशीं लक्ष जीवयोनी । जितुका तितुका प्राणी । अनंत देहांची मांडणी । मर्यादा कैंची ॥ ६ ॥ अनंत प्राणी होती जाती । त्यांचें अधिष्ठान जगती । जगतीवेगळी स्थिती । त्यांसि कैंची ॥ ७ ॥ पुढें पाहतां पंचभूतें । पावलीं स्पष्ट दशेतें । कोणी विद्यमान कोणी ते । उगीच[4] असती ॥ ८ ॥ अंतरात्म्याची ओळखण । तेचि जेथ चपळपण । जाणीवेचें अधिष्ठान । सावध ऐका ॥ ९ ॥ सुख दुःख जाणता जीव । तैसाच जाणावा सदाशिव । अंतःकरणपंचक अपूर्व । अंश आत्मयाचा ॥ १० ॥ स्थूळीं आकाशाचे गुण । अंश आत्म्याचे जाण । सत्व रज तमोगुण । अंश आत्म्याचे ॥ ११ ॥ नाना चाळणा नाना धृती[5] । नवविधा भक्ति चतुर्विधा मुक्ती । अलिप्तपण सहजस्थिती । गुण आत्म्याचे ॥ १२ ॥ द्रष्टा साक्षी ज्ञानघन । सत्ता चैतन्य पुरातन[6] । श्रवण मनन विवरण । गुण आत्म्याचे ॥ १३ ॥ दृश्य[3] द्रष्टा दर्शन । ध्येय ध्याता ध्यान । ज्ञेय ज्ञाता ज्ञान । आत्मरूप ॥ १४ ॥ वेद शास्त्र पुराणार्थ । गुप्त चालिला परमार्थ । सर्वज्ञपणें समर्थ । गुण आत्म्याचे ॥ १५ ॥ बद्ध मुमुक्षु साधक सिद्ध । विचार पाहाणें शुद्ध । बोध आणि प्रबोध । गुण आत्म्याचे ॥ १६ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति तुर्या । प्रकृति पुरुष मूळमाया[8] । पिंडब्रह्मांड अष्टकाया[7] । गुण आत्मयाचे ॥ १७ ॥ परमात्मा आणि परमेश्वरी । जगदात्मा आणि जगदीश्वरी । महेश आणि माहेश्वरी । गुण आत्मयाचे ॥ १८ ॥ सूक्ष्म जितुकें नाम रूप । तितुकें आत्म्याचें स्वरूप । संकेत नामाभिधानें अमूप । सीमा

१. पक्ष्यादिक. २. वृक्षादिक. ३. दृश्य. ४. गुप्त. ५. धैर्य. ६. अनादि. ७. स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण, विराट, हिरण्यगर्भ, अव्याकृत आणि मूळप्रकृति हीं आठ शरीरें. ८. मूळमाया.

नाहीं ॥ १९ ॥ आदिशक्ति शिवशक्ती । मुख्य मूळमाया सर्वशक्ती । नाना जिन्नस उत्पत्ति स्थिती । तितुके गुण आत्मयाचे ॥ २० ॥ पूर्वपक्ष आणि सिद्धांत ॥ गाणें वाजविणें संगीत । नाना विद्या अद्भुत । गुण आत्मयाचे ॥ २१ ॥ ज्ञान अज्ञान विपरीत ज्ञान । असद्वृत्ति सद्वृत्ति जाण । ज्ञप्तिमात्र[1] अलिप्तपण । गुण आत्मयाचे ॥ २२ ॥ पिंडब्रह्मांडतत्वझाडा । नाना तत्वांचा निवाडा । विचार पाहाणें उघडा । गुण आत्मयाचे ॥ २३ ॥ नाना ध्यानें अनुसंधानें । नाना स्थिति नाना ज्ञानें । अनन्य आत्मनिवेदनें । गुण आत्मयांचे ॥ २४ ॥ तेहतीस कोटी सुरवर । अठ्यायशीं सहस्र ऋषीश्वर । भूत खेचर अपार । गुण आत्मयाचे ॥ २५ ॥ भूतावळी औट कोटी । चामुंडा छप्पन्न कोटी । कात्यायनी नव कोटी । गुण आत्मयाचे ॥ २६ ॥ चंद्र सूर्य तारामंडळें । नाना नक्षत्रें ग्रहमंडळें । शेष कूर्म मेघमंडळें । गुण आत्मयाचे ॥ २७ ॥ देव दानव मानव । नाना प्रकारींचे जीव । पाहतां सकळ भावाभाव । गुण आत्मयाचे ॥ २८ ॥ आत्मयाचे नाना गुण । निर्विकार निर्गुण । जाणणें एकदेशी[2] पूर्ण । गुण आत्मयाचे ॥ २९ ॥ आत्माराम उपासना । तेणें पावलों निरंजना । निःसंदेह अनुमाना । ठावाचि नाहीं ॥३०॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विंशतिदशके आत्मगुणनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

---

## ७. आत्मा.

श्रीगणेशाय नमः ॥ अनिर्वाच्य समाधान झालें । तें पाहिजे बोलिलें । बोलिल्यासाठीं समाधान गेलें । हें तों घडेना ॥ १ ॥ कांहीं सांडावें लागत नाहीं । कांहीं मांडावें लागत नाहीं । एक विचार शोधून पाहीं । म्हणिजे बरें ॥ २ ॥ मुख्य काशीविश्वेश्वर । सेतुबंध रामेश्वर । मल्लिकार्जुन भीमाशंकर । गुण आत्मयाचे ॥ ३ ॥ जैशीं मुख्य बारालिंगें । याहीवेगळीं अनंत लिंगें । प्रचित जाणिजे जगें । गुण आत्मयाचे ॥ ४ ॥ भूमंडळीं अनंतशक्ती । नाना साक्षात्कार चमत्कार होती । नाना देवांच्या सामर्थ्यमूर्ती । गुण आत्मयाचे ॥ ५ ॥ नाना सिद्धांचीं सामर्थ्यें । नाना मंत्रांचीं सामर्थ्यें । नाना मोहरे[3] वल्लींत सामर्थ्यें । गुण आत्मयाचे ॥ ६ ॥ जितुके

---

१. ज्ञानस्वरूप. २. अपूर्ण किंवा पूर्ण जाणणें. ३. ओषधी मणी.

कांहीं उत्तम गुण । तितुके आत्मयाचें लक्षण । बरें वाईट तितुकें जाण । आत्म्याचकारितां ॥ ७ ॥ शुद्ध[1] आत्मा उत्तम गुणीं । सबळ[2] आत्मा अवलक्षणी । बरें वाईट अवघी करणी । आत्मयाची ॥ ८ ॥ नाना साभिमान धरणें । नानाकृति सृष्टि करणें । नाना शापउःशाप लक्षणें । आत्मयाचेनी ॥ ९ ॥ पिंडाचा बरा शोध घ्यावा । तत्वांचा पिंड शोधावा । तत्वें शोधितां पिंड अघवा । कळों येतो ॥ १० ॥ जड देह भूतांचा । चंचल गुण आत्मयाचा । निश्चळ ब्रह्मावेगळा ठाव कैंचा । जेथें तेथें ॥ ११ ॥ निश्चळ चंचळ आणि जड । पिंडीं करावा निवाड । प्रत्ययावेगळें जाड । बोलणें नाहीं ॥ १२॥ पिंडामधून आत्मा जातो। तेव्हां निवाडा कळों येतो। देह जड हा पडतो। देखतदेखतां ॥१३॥ जड तितुकें पडलें। चंचळ तितुकें निघोन गेलें। जडचंचळाचें रूप आलें । प्रत्ययासी ॥ १४ ॥ निश्चळ आहे सकळां ठायीं । हें तों पाहणें नलगे कांहीं । गुणविकार तेथें नाहीं । निश्चळासी ॥ १५ ॥ जैसें पिंड तैसें ब्रह्मांड । विचार दिसतो उघड । जड चंचळ जातां जाड । परब्रह्मचि आहे ॥ १६ ॥ महाभूतांचा खंबीरें[3] केला । आत्मा घालून पुतळा झाला । चालिला सृष्टीचा गलबला । येणें रीती ॥ १७ ॥ आत्मा मायाविकार[4] करी । आळ घालिती ब्रह्मावरी । प्रत्ययें सकळ कांहीं विवरी । तोचि भला ॥ १८ ॥ ब्रह्म व्यापक अखंड । वरकड व्यापकता खंड । शोधून पाहतां जड । कांहींच नाहीं ॥ १९ ॥ गगनास खंडितां न ये । गगनाचें नासेल काय । जरी झाला महाप्रळय । सृष्टिसंहार ॥ २० ॥ जें संहारामध्यें सांपडलें । सहजचि नाशवंत झालें । जाणते लोकीं उगविलें । पाहिजे कोडें ॥ २१ ॥ न कळतां वाटे कोडें । कळतां अवघें दिसे उघडें । म्हणोनि एकांतीं निवाडें । विचार पाहावा ॥ २२ ॥ मिळतां प्रत्ययाचे संत । एकांतापरीस एकांत । केली पाहिजे सावचित । नाना चर्चा ॥ २३ ॥ पाहिल्यावेगळें कळत नाहीं । कळतां कळतां संदेह नाहीं । विवेक पाहतां कोठेंचि नाहीं । मायाजाळ ॥ २४ ॥ गगनीं आभाळ आलें । मागुती सवेंचि उडालें । आत्म्याकारितां दृश्य झालें । उडेल तैसें ॥ २५ ॥ मुळापासून शेवटवरी । विवेकी विवेकें विवरी । तो निश्चय थावरी । चळेना ऐसा ॥ २६ ॥

---

१. निरुपाधिक. २. शबल, सोपाधिक आत्मा; जीव. ३. मूर्ति. ४. मायेचे विकार.

वरकड निश्चय अनुमानाचे । अनुमानें बोलतां काय वेंचे । जाणते पुरुष प्रचीतिचि । ते तों मानीतना ॥ २७ ॥ उगीच बोलणें अनुमानाचें । अनुमानाचें कोण्या कामाचें । येथें सगट विचाराचें । काम नाहीं ॥ २८ ॥ सगट विचार तो अविचार । किती एक म्हणती एकंकार । एकंकारें भ्रष्टाकार । करूं नये ॥ २९ ॥ कृत्रिम अवघें सांडावें । कांहीं एक शुद्ध घ्यावें । जाणजाणोनि निवडावें । सारासार ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विंशतिदशके आत्मनिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७ ॥

---

## ८. देहक्षेत्र.

श्रीगणेशाय नमः ॥ विधिप्रपंचतरु[1] वाढला । वाढतां वाढतां विस्तीर्ण झाला । फळें येतां विश्रांति पावला । बहुत प्राणी ॥ १ ॥ नाना फळें रसाळें लागलीं । नानाजिन्नसें[2] गोडीस आलीं । गोडी पाहावया निर्माण केलीं । नाना शरीरें ॥ २ ॥ निर्माण जाहले उत्तम विषय । शरीराविणें भोगितां न ये । म्हणोनि निर्मिला उपाय । नाना शरीरें ॥ ३ ॥ ज्ञानेंद्रियें निर्माण केलीं । भिन्न भिन्न गुणांचीं निर्मिलीं । एका शरीरास लागलीं । परी वेगळालीं ॥ ४ ॥ श्रोत्रेंद्रियीं शब्द पडिला । त्याचा भेद पाहिजे कळला । ऐसा उपाय निर्माण केला । इंद्रियामध्यें ॥ ५ ॥ त्वचेंद्रियें शीतोष्ण भासे । चक्षुरिंद्रियें सकळ दिसे । इंद्रियांमध्यें गुण ऐसे । वेगळाले ॥ ६ ॥ जिव्हेमध्यें रस चाखणें । घ्राणामध्यें परिमळ घेणें । इंद्रियांमध्यें वेगळाल्या गुणें । भेद केले ॥ ७ ॥ वायुपंचकीं अंतःकरणपंचक । मिसळोन फिरे निःशंक । ज्ञानेंद्रियें कर्मेंद्रियें सकळिक । सावकाश पाहे ॥ ८ ॥ कर्मेंद्रियें लागवेगीं[3] । जीव भोगी विषयांलागीं । ऐसा हा उपाय जगीं । ईश्वरें केला ॥ ९ ॥ विषय निर्माण झाले बरवे । शरीरेंविण कैसे भोगावे । नाना शरीरांचे गोवे । याच कारणें ॥ १० ॥ अस्थिमांसांचीं शरीरें निर्माण केलीं । विषयभोगें वाढविलीं । लहान थोर निर्माण झालीं । येणें प्रकारें ॥ ११ ॥ अस्थिमांसांचीं शरीरें । निर्माण केलीं जगदीश्वरें । विवेकें गुणविचारें । करूनियां ॥ १२ ॥ अस्थिमांसांचा पुतळा । जाणे ज्ञानें सकळ कळा । शरीरभेद वेगळा । ठायीं ठायीं ॥ १३ ॥ तो भेद

---

१. ब्रह्मदेवाचा संसार हाच कोणी एक वृक्ष. २. अनेक प्रकारें. ३. उत्कंठेनें.

कार्याकारण । त्याचा उदंड आहे गुण । सकल तीक्ष्णबुद्धीविण । काय कळे ॥ १४ ॥ सकल करणें ईश्वराला । म्हणोनि भेद निर्माण केला । ऊर्ध्वमुख[1] होतां भेदाला । ठाव कैंचा ॥ १५ ॥ सृष्टिकर्मीं अगत्य भेद । संहारें सहजचि अभेद । भेद अभेद हा संवाद । मायागुणें ॥ १६ ॥ मायेमध्यें अंतरात्मा । न कळे तयाचा महिमा । झाला चतुर्मुख ब्रह्मा । तोहि संदेहीं पडे ॥ १७ ॥ पीळ पेंच कडोविकडीं[2] । तर्क तीक्ष्ण घडीनें घडी । मनासि होय तांतडी । विवरण करितां ॥ १८ ॥ आत्मत्वीं लागलें सकळ कांहीं । निरंजनीं हें कांहींच नाहीं । एकांतकाळीं समजोन पाहीं । म्हणिजे बरें ॥ १९ ॥ देहसामर्थ्यानुसार । सकळ करी जगदीश्वर । थोर सामर्थ्यें अवतार । बोलिजेती ॥ २० ॥ शेष कूर्म वराह झाले । येव्हढे देह विशाळ धरिले । तेणेंकरितां रचना चाले । सकळ सृष्टीची ॥२१॥ ईश्वरें केव्हढें यंत्र केलें । सूर्यबिंब धांवाया लाविलें । धुकटाकरवीं धरविलें । अगाध पाणी[3] ॥ २२ ॥ पर्वता ऐसें ढग उचलती । सूर्यबिंबास आच्छादिती । तेथें सर्वेचि वायूची गती । प्रगट होय ॥ २३ ॥ झिडझिडकूं धांवे वारा । जैसा काळाचा म्हणियारा[4] । ढग मारून दिनकरा । मोकळें करी ॥ २४ ॥ बैसती विजांचे तडाखे । प्राणिमात्र अवचितां धाके । गगन कडकडून तडके । स्थळांतरीं[5] ॥ २५ ॥ एकासि एक वर्म केलें । महद्भूतें महद्भूत आळिलें । सकळ समभागें चालिलें । सृष्टिरचनेसी ॥२६ ॥ ऐसे अनंत भेद आत्मयाचे । सकळ जाणती ऐसें कैंचे । विवरतां विवरतां मनाचे । फडके होती ॥ २७ ॥ ऐसी माझी उपासना । उपासकीं आणावी मना । अगाध महिमा चतुरानना । काय कळे ॥२८॥ आवाहनविसर्जन[6] । हेंचि भजनाचें लक्षण । सकळ जाणती सज्जन । मी काय सांगों ॥ २९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विंशतिदशके देहक्षेत्रनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८ ॥

---

## ९. सूक्ष्मब्रह्म.

श्रीगणेशाय नमः ॥ मृत्तिकापूजन करावें । आणि सर्वेचि विसर्जावें ।

---

१. आत्मरूपासन्निध. २. युक्तिप्रयुक्तीनें. ३. धुराचे मेघ बनविले, असा भाव. ४. चाकर. ५. ठिकऱ्या ठिकऱ्या. ६. मायेची उभारणी आणि संहारणी.

हें मानेना स्वभावें । अंतःकरणासी ॥ १ ॥ देव पूजावा आणि टाकावा । हें प्रशस्त न वाटे जीवा । याचा विचार पहावा । अंतर्यामीं ॥ २ ॥ देव करिजे ऐसा नाहीं । देव टाकिजे ऐसा नाहीं । म्हणोन याचा कांहीं । विचार पाहावा ॥ ३ ॥ देव नाना शरीरें धरितो । धरूनि मागुती सोडितो । तरी तो देव कैसा आहे तो । विवेकें ओळखावा ॥४॥ नाना साधनें निरूपणें । देव शोधायाकारणें । सकळ आपुल्या अंतःकरणें । समजलें पाहिजे ॥ ५ ॥ ब्रह्मज्ञानाचा उपाय । समजल्याविण देतां न ये । पदार्थ आहे मा घे जाय । ऐसें म्हणावें ॥ ६ ॥ सगट लोकांचे अंतरींचा भाव । मज प्रत्यक्ष भेटवावा देव । परंतु विवेकाचा उपाव । वेगळाचि आहे ॥ ७ ॥ विचार पाहतां तगेना । त्यास देव ऐसें म्हणवेना । परंतु जन राहेना । काय करावें ॥८॥ थोर लोक मरोन जाती । त्यांच्या सुरता[1] करूनि पाहती । तैशीच आहे ही गती । उपासनेची ॥ ९ ॥ थोर व्यापार ठाकेना जनीं । म्हणोनि केली रखतवांनी[2] । राज्यसंपदा तयाचेनी । प्राप्त कैंची ॥ १० ॥ म्हणोनि जितुका भोळा भाव । तितुका अज्ञानाचा स्वभाव । अज्ञानें तरी देवाधिदेव । पाविजेल कैंचा ॥ ११ ॥ अज्ञानासि ज्ञान न माने । ज्ञात्यास अनुमान न माने । म्हणोनि सिद्धांचिये खुणे । पावलें पाहिजे ॥ १२ ॥ माया सांडून मुळासि जावें । तरीच समाधान पावावें । ऐसें न होतां भरंगळावें । भलतीकडे ॥१३॥ माया उल्लंघायाकारणें । देवासि नाना उपाय करणें । अध्यात्मश्रवणपर्येंचि जाणें । प्रत्ययानें ॥ १४ ॥ ऐसें न करितां लौकिकीं । अवघीच होते चुकाचुकी । स्थिति खरी आणि लटिकी । ऐशी ओळखावी ॥ १५ ॥ खोट्याचे वाटे जाऊं नये । खोट्याची संगति धरूं नये । खोटें संग्रहीं करूं नये । कांहीं एक ॥ १६ ॥ खोटें तें खोटेंचि खोटें । खऱ्यासि तगेना तें बालटें । मन अधोमुख[3] तें उफराटें[4] । केलें पाहिजे ॥१७॥ अध्यात्मश्रवण करीत जावें । म्हणजे सकळ कांहीं फावे । नाना प्रकारींचे गोवे । तुटोनि जाती ॥ १८ ॥ सूत गुंतलें तें उकलावें । तैसें मन उगवावें । मानत मानत घालावें । मुळाकडे ॥ १९ ॥ सकळ कांहीं कालवलें । त्या सकळाचें सकळ जाहलें । शरीरीं विभागलें । सकळ कांहीं ॥२०॥ काय तें येथेंचि पाहावें ।

१. तसबिरी. २. मजूरकाम. ३. प्रवृत्तिमार्गांत असलेलें. ४. निवृत्त.

कैसें तें येथेंचि शोधावें । सूक्ष्माचीं चौदा नांवें । येथेंचि समजावीं ॥ २१ ॥ निर्गुण निर्विकार एक । तें सर्वां ठायीं व्यापक । देहामध्यें तें निष्कलंक । आहे कीं नाहीं ॥ २२ ॥ मूळमाया संकल्परूप । तें अंतःकरणाचें स्वरूप । जड चेतवी चैतन्यरूप । तेंहि शरीरीं आहे ॥ २३ ॥ समान गुण गुणसाम्य । सूक्ष्म विचार तो अगम्य । सूक्ष्म साधु जाण ते प्रणम्य[1] । तयां समस्तांसी ॥ २४ ॥ द्विधा भासतें शरीर । वामांगें दक्षिणांग[2] विचार । तोचि अर्धनारी नटेश्वर । पिंडीं ओळखावा ॥ २५ ॥ तोचि प्रकृति पुरुष जाणिजे । शिव-शक्ति वोळखिजे । षड्गुणेश्वर बोलिजे । तया कर्दमासी ॥ २६ ॥ तयासीच म्हणिजे महत्तत्त्व । मीपणें तयासि अहंतत्त्व । निश्चयें बुद्धितत्व । तयासीच म्हणती ॥ २७ ॥ त्रिगुणें चालतें शरीर । प्रत्यक्ष दिसे विचार । मुळींच्या कर्दमाचें शरीर । ऐसें जाणावें ॥ २८ ॥ मन माया आणि जाणीव । हाहि दिसतो स्वभाव । चौदा नामांचा अभिप्राव । पिंडीं पाहावा ॥ २९ ॥ पिंड पडतां अवघेंचि जातें । परंतु परब्रह्म राहतें । शाश्वत समजोन मग तें । दृढ धरावें ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विंशतिदशके सूक्ष्मब्रह्मनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

---

## १०. विमल ब्रह्म.

श्रीगणेशाय नमः ॥ धरूं जातां धरितां न ये । टाकूं जातां टाकितां न ये । जेथें तेथें आहेच आहे । परब्रह्म तें ॥ १ ॥ जिकडे तिकडे जेथें तेथें । विन्मुख होतां सन्मुख होतें । सन्मुखपण चुकेना तें । कांहीं केल्या ॥ २ ॥ बैसलें माणूस उठोन गेलें । तेथें आकाशचि राहिलें । आकाश चहूंकडे । पाहिलें । तरी सन्मुखचि आहे ॥ ३ ॥ जिकडे जिकडे प्राणी पळोन जातें । तिकडे आकाशचि भोंवतें । बळें आकाशाबाहेर तें । कैसें जावें ॥४॥ जिकडे जिकडे प्राणी पाहे । तिकडे सन्मुखचि आहे । समस्तांचे मस्तकीं राहे । मध्यान्हीं मार्तंड जैसा ॥ ५ ॥ परी तो आहे एकदेशी । दृष्टांत न घडे वस्तूसी । कांहीं एक चमत्कारासी । देऊन पाहिलें ॥ ६ ॥ नाना तीर्थें नाना देशीं । कष्टत जावें पाहावयासी । तैसें नलगे परब्रह्मासी । बैसले ठायीं

---

१. प्रणाम, नमस्कार. २. डावा व उजवा भाग.

॥ ७ ॥ प्राणी बैसोनीच राहतां । अथवा बहुत पळोन जातां । परब्रह्म तें तत्वतां । समागमें ॥ ८ ॥ पक्षी अंतराळीं गेला । भोंवतें आकाशचि तयाला । तैसें ब्रह्म प्राणियाला । व्यापून असे ॥ ९ ॥ परब्रह्म पोकळ घनदाट । परब्रह्म शेवटाचा शेवट । ज्यासि त्यासि ब्रह्म नीट । सर्वकाळ ॥१०॥ दृश्या सबाह्य अंतरीं । ब्रह्म दाटलें ब्रह्मांडोदरीं । अरे त्या निर्मळाची सरी । कोणास द्यावी ॥ ११ ॥ वैकुंठ कैलास स्वर्गलोकीं । इंद्रलोकीं चौदा लोकीं । पन्नगादि पाताळलोकीं । तेथेंहि आहे ॥१२॥ काशीपासून रामेश्वर । अवघें दाटलें अपार । पाहतां पाहतां पारावार । त्यास नाहीं ॥ १३ ॥ परब्रह्म तें एकलें । एकदाचि सकळांसि व्यापिलें । सकळांस स्पर्शोन राहिलें । सकळां ठायीं ॥ १४ ॥ परब्रह्म पाउसें भिजेना । अथवा चिखलानें भरेना । पुरामध्यें परी [1]वाहेना । पुरासमागमें ॥ १५ ॥ एकसरें सन्मुख । वाम [2]सव्य दोहींकडे एक । अधोर्ध्व प्राणी सकळिक । व्यापून आहे ॥ १६ ॥ आकाशाचा डोहो भरला । कदापि नाहीं उचंबळला । असंभाव्य पसरला । जिकडे तिकडे ॥ १७ ॥ एकजिनसी गगन उदास । जेथें नाहीं दृश्य भास । भासेंविण निराभास । परब्रह्म जाणावें ॥ १८ ॥ संत साधु महानुभावां । देव दानव मानवां । परब्रह्म सकळांस विसांवा । विश्रांति ठाव ॥ १९ ॥ कोणीकडे शेवटास जावें । कोणीकडे काय पाहावें । असंभाव्य तें मानावें । काय म्हणोनी ॥ २० ॥ स्थूल नव्हे सूक्ष्म नव्हे । कांहीं एक सारिखें नव्हे । ज्ञानदृष्टीविण नव्हे । समाधान ॥ २१ ॥ पिंडब्रम्हांड निरास । मग तें ब्रह्म निराभास । येथून तेथवरी आकाश । भकासरूपें ॥ २२ ॥ ब्रह्म व्यापक हें तों खरें । दृश्य आहे तों हें उत्तरें । व्यापाविण कोण्या प्रकारें । व्यापक म्हणावें ॥ २३ ॥ ब्रह्मासि शब्दाचि लागेना । कल्पना कल्पूं शकेना । कल्पनेतीत निरंजना । विवेकें ओळखावें ॥ २४ ॥ शुद्ध सार श्रवण । शुद्ध प्रत्ययाचें मनन । विज्ञानीं पावतां [3]उन्मन । सहजचि होतें ॥ २५ ॥ झालें साधनाचें फळ । संसार झाला सकळ । निर्गुण ब्रह्म तें निश्चळ । अंतरीं बिंबलें ॥ २६ ॥ हिशेब झाला मायेचा । झाला निवाडा तत्वांचा । [4]साध्य होतां साधनाचा । ठाव नाहीं ॥ २७ ॥ स्पर्शीं जें जें देखिलें । तें तें जागृ-

१. डावें. २. उजवें. ३. संकल्पविकल्परहित स्थिति. ४. ब्रह्मरूप.

तीस उडालें । सहजाचि अनिर्वाच्यें झालें । बोलतां न ये ॥ २८ ॥ ऐसें हें विवेकें जाणावें । प्रत्ययें खुणेसि बाणावें । जन्ममृत्यूंच्या नांवें । शून्याकार ॥ २९ ॥ भक्तांचेनी साभिमानें । कृपा केली दाशरथीनें । समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥ ३० ॥ वीस दशक दासबोध । श्रवणद्वारें घेतां शोध । मननकर्त्यास विशद । परमार्थ होतो ॥ ३१ ॥ वीस दशक दोनशें समास । साधकें पाहावे सावकाश । विवरतां विशेषाविशेष । कळों लागे ॥ ३२ ॥ ग्रंथाचें करावें स्तवन । स्तवनाचें काय प्रयोजन । येथें प्रत्ययास कारण । प्रत्यय पाहावा ॥ ३३ ॥ देह तंव पांचां भूतांचा । कर्ता आत्मा तेथींचा । आणि कवित्वप्रकार मनुष्यांचा । कशावरुनी ॥ ३४ ॥ सकळ करणें जगदीशाचें । आणि कवित्व मनुष्यांचें । ऐशा अप्रमाण बोलण्याचें । काय घ्यावें ॥ ३५ ॥ सकळ देहांचा झाडा केला । तत्वसमुदाय उडाला । तेथें कोण्या पदार्थाला । आपुलें म्हणावें ॥ ३६ ॥ ऐशीं हीं विचाराचीं कामें । उगीच भ्रमों नये भ्रमें । जगदीश्वरें अनुक्रमें । सकळ केलें ॥ ३७ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विंशतिदशके विमलब्रह्मनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥ ओंवी ३०८.

एकूण ओंवीसंख्या ७७५०.

---



१. बोलून दाखविण्यास कठीण. २. रघुवीरानें.

॥ श्री ॥

# दासबोधाची आरती.

जय जय दासबोधा ग्रन्थराज प्रसिद्धा ।
आरती वोवाळीन विमळज्ञान बाळबोधा ॥ ध्रु० ॥
वेदांतसंमतीचा काव्यसिंधु भरला ।
श्रुति शास्त्रग्रन्थ गीता साक्ष संगम केला ।
महानुभाव संतजनीं अनुभव चाखिला ।
अज्ञान जड जीवां मार्ग सुगम जाला ॥ १ ॥
नवविधा भक्तिपंथें रामरूप अनुभवी ।
चातुर्यनिधी मोठा मायाचक्र उगवी ।
हरिहरहृदयींचें गुह्य प्रगट दावी ।
बद्धाचि सिद्ध जाले असंख्यात मानवी ॥ २ ॥
वीसही दशकींचा अनुभव जो पाहे ।
नित्यनेमें विवरितां स्वयें ब्रह्मचि होय ।
अपार पुण्य गांठीं तरी श्रवण लाहे ।
कल्याणलेखकाचे भावगर्भ हृदयीं ॥ ३ ॥

